

# स्वर्गप्राप्तीसाठी चढाओढ

प्रजापतीला दिती व अदिती अशा दोन बायका होत्या. दितीची मुले दैत्य व अदितीची मुले देव यांची भाऊबंदकी लहानपणापासूनच वाढत गेली. त्यांची नेहमी आपसात मारामारी होई. त्यांचे भांडण मिटविण्यासाठी प्रजापतीने देवांना स्वर्गाचे व दैत्यांना पाताळाचे राज्य वाटून दिले. नंतर तो आपल्या मुलांना म्हणाला– "तुम्ही आपापल्या राज्यात जाऊन रहा. एकत्र राहू नका."

परंतु दैत्यांनी हट्ट केला की त्यांना स्वर्गलोकाचे राज्य मिळाले पाहिजे. देव म्हणाले, आम्हांला पाताळलोक नको. आतां हे भांडण मिटविण्यासाठी प्रजापती आपल्या मुलांना म्हणाला–"देवांपैकी एकाने आणि दैत्यांपैकी एकाने भूलोकात जाऊन रहावे. दोघां पैकी ज्याला जय मिळेल त्याने व त्याच्या भाऊबंदांनी स्वर्गात जाऊन रहावे व इतरांनी पाताळ लोकात."

दोघांनी त्याला होकार दिला. भूलोकात जाऊन राहण्यासाठी देवांनी आपल्या पैकी एकाची निवड केली व दैत्यांनी पण आपल्या पैकी एकाची निवड केली. भूलोकांत मानव कसे राहतात हे दोघांनी जाऊन पाहिले.

"तू आपला उदर निर्वाह कसा काय करणार आहेस रे?" दैत्याने देवाला विचारले.

"कां, सर्व मेहनत करतात तशी मेहनत करून!" देव म्हणाला.

"ठीक, तर मग तू मेहनत करून आपला उदरनिर्वाह कर व मी मेहनतीशिवाय



आपल्या पोटापाण्याची व्यवस्था करतो." दैत्य म्हणाला.

दोघे एका जमिनीच्या मालकाकडे गेले. त्यांनी त्याला काही काम द्यायला सांगितले. त्याने प्रत्येकाला एक नांगर व एक बैलाची जोडी दिली आणि जमीन दाखवून म्हणाला– "ही जमीन नांगरून शेती करा."

दोघांनी शेत नांगरायला सुरवात केली. थोड्या वेळाने दैत्याला कंटाळा आला. त्याने नांगराचे बैल सोडले व त्यांना चरायला सोडले आणि स्वत: संध्याकाळपर्यंत झाडाखाली घोरत पडला.

त्याची झोप मोडली तेव्हा काळोख पडू लागला होता. देवाने आपले सर्व शेत छान नांगरून काढले होते. थोडे उरले होते ते दैत्याने नांगरले व दोघे जमिनीच्या मालकाकडे गेले. त्याने दोघांना एक खोली दाखविली आणि दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर भेटायला सांगितले. खोलीत काळोख होता.

दिवसभर मेहनत केल्यामुळे देवाला छान झोप लागली. परंतु दैत्य दिवसभर झोपला होता म्हणून त्याला मुळीच झोप लागली नाही.

उजाडल्यावर दोघे खोली बाहेर आले. देवाच्या अंगाला सोन्याची माती लागलेली दैत्याला दिसली. दैत्याच्या अंगाला काही नव्हते. कारण त्याने मेहनत केलीच नव्हती. त्याला घाम आलाच नाही. पण देवाच्या अंगावर निथळत्या घामाचे फळ म्हणूनच की काय जी माती लागली ती सोन्यासारखी चमकत होती, किंबहुना ते सोनेच होते.

जमिनीचा मालक देवाला म्हणाला– "तुझ्या अंगावर जे सोने जमले आहे ते तू ठेवून घे. काल तू जी मेहनत केलीस त्याचे ते फळ आहे."

दैत्य निराश झाला. "आज रात्री मी याच्या दुप्पट सोने मिळवीन." त्याने मनाशी विचार केला.

दुसऱ्या दिवशी नांगरायला मालकाने दुसरेच एक शेत दाखविले. देव आणि दैत्य ते नांगरू लागले. आदल्या दिवसा सारखाच दैत्याला थोडा वेळ काम केल्यावर कंटाळा आला. बैलांना चरायला सोडून तो एका झाडाखाली काळोख पडेपर्यंत घोरत पडून राहाला.

त्या दिवशी सुद्धा एकट्या देवाने दोघांच्या वाट्याचे शेत नांगरून काढले. घरी जाण्यापूर्वी दैत्याने आपल्या सर्व अंगाला डिंग लावून घेतला.



घरी गेल्यावर मालकाने दोघांना दोन दोणी दाखवून त्यात आपापल्या बैलांसाठी पाणी भरायला सांगितले. दैत्याने एका दोणी जवळ आपल्या बैलांना नेऊन उभे केले व देवाने दुसऱ्या दोणी जवळ आपले बैल नेऊन बांधले. दैत्याच्या बैलांना मेहनत झालीच नव्हती म्हणून पाण्याला नुसते तोंड लावून ते बाजूला झाले. पण देवाच्या बैलांनी दोण भरून पाणी पिऊन टाकले. कारण काम करून ते दमले होते व त्यांना खूप तहान लागली होती.

दोणीतले पाणी संपल्यावर दोणीच्या तळाला सोने दिसले. ते दाखवून मालक देवाला म्हणाला—"ही तुझी आजच्या कामाबद्दल मजुरी. घे तू हे सारे सोने."

"आणि माझी मजुरी?" दैत्याने विचारले. तुझ्या बैलांनी असेच अंग मोडून काम केले असते आणि सर्व पाणी प्याले असते तर तुझी मजुरी देखील दोणीच्या तळाला जमा झाली असती. पण तू मेहनत केली नाहीस व तुझ्या बैलांनी पण केली नाही. मग मी काय करू?"

हे सर्व आकाशांत उभे राहून देव पहात होते. ते म्हणाले—"आमच्या भावाचाच जय झाला. स्वर्ग आमचा!"

पण दैत्यांना ते कबूल नव्हते.

"भूलोकत फक्त शेतकी हाच धंदा आहे, वाटते? तेथे मोठा समुद्र आहे. समुद्रात राहून उदर निर्वाह चालविण्याची शक्ती कोणात जास्त आहे, पाहिले पाहिजे." दैत्य म्हणाले.

प्रजापतीने आपल्या दोघां मुलांना भूलोकांतून बोलावून घेतले व म्हणाला—"तुम्ही दोघे होडक्या घेऊन समुद्रांत जा व मासे धरण्याचे काम करा. जो जास्त मासे धरून आणील त्याला स्वर्गाचे राज्य मिळेल व दुसऱ्याला पाताळाचे."

देव व दैत्य निरनिराळ्या होडक्यांत बसून एकेक जाळे घेऊन समुद्रात मासे धरायला निघाले.

या खेपेस दैत्यांनी आपल्या भावाचा जय व्हावा म्हणून एक युक्ति शोधली. त्यांच्या पैकी काही समुद्रात बुडी मारून आपल्या भावाच्या जाळ्यात मासे भरू लागले.

देवाने आपले जाळे पाण्याबाहेर काढले तेव्हा त्यात सापडलेल्या माशांचा एक मोठा ढीग झाला. त्याच वेळी दैत्याने आपले जाळे वर काढले. त्यात दहापट मासे होते. म्हणून जाळे पाण्या बाहेर काढतांना तुटून गेले आणि जाळ्यात सापडलेले सर्व मासे समुद्रांत पडले.

अशा तऱ्हेने या खेपेस देखील दैत्य देवाला जिंकू शकला नाही. म्हणून देवांना स्वर्गाचे राज्य मिळाले व दैत्यांना पाताळ लोकाचे.















# पाताळ कोट

[ १९ ]

[ सूर्योदय होताच मांत्रिकाच्या अनुयायांनी पाताळकोटावर भस्मांचा मारा केला. त्यांचा परिणाम होऊन राक्षस जणु काही दारूच्या गुंगीत आपसांत मारामारी करू लागले. महाकली राक्षस हत्तींच्या रथात बसून तेथे आला. विरूपने सोडलेला गरुडपक्षी पायाला बांधलेल्या मगरीच्या पिलासकट पाताळकोटावर घिरट्या घालू लागला.–पुढे ]

राक्षसांचे लक्ष काळ्या गरुडाकडे आहे, हे महाकलीने ओळखले. त्याने आपला हत्तींचा रथ थांबवला आणि एकदा वर डोके करून पाहिले. त्याला पण गरुडाच्या पायाला बांधलेले मगरीचे पिल्लू दिसले. त्या पक्ष्यात त्याला विशेष असे काही दिसले नाही. त्याच्यासारखे पक्षी त्याने पूर्वीकडील डोंगराळ प्रदेशात पाहिले होते. पण सोनेरी मगरीचे पिल्लू तिच्या पायाला कां लोंबकळत आहे? सोनेरी मगरी सुद्धा असतात का?

राजा थक्क होऊन जागच्याजागी उभा आहे हे पाहून एक म्हातारा राक्षस जवळ येऊन म्हणाला–" महाराज! आपले लोक त्या मगरीला आपले वडील घोरकली समजून नमस्कार करीत आहेत.







आपण देखील नमस्कार करावा. नाही तर त्यांना वाटेल की, आपल्या मनात पितृभक्ति नाही. आणि ते आपली निंदा करतील."

" हा गरुडपक्षी माझे वडील कसे असणार! यात खात्रीने काही तरी फस-वणूक आहे. एक आठवडाभर मी पाहातो आहे, डोंगरावरून आपल्यावर कोणी तरी पाळत ठेवीत आहे. ही बातमी मला यापूर्वीच मिळालेली आहे. हे तुम्हांला माहीत नाही का?" महाकली काहीसा रागानेच म्हणाला.

महाकली म्हणाला ते तो म्हातारा राक्षस एका उंच दगडावर उभा राहून सर्व राक्षसांना संबोधून सांगत म्हणाला–" हा गरुडपक्षी डोंगरांत राहणारा एक आंधळा पक्षी आहे. महाबलवान राक्षसराज घोरकली नाही. असे आपले महाराज महाकली सांगत आहेत.

ते ऐकून राक्षसांनी नेम धरून गरुड पक्ष्याला दगड मारायला सुरवात केली. काहींनी आपल्या मयत महाराजांची थट्टा करणाऱ्या त्या पक्ष्यावर शस्त्रप्रहार केला.

महाकलीने आपल्या अंगरक्षकांना जवळ बोलाविले व त्यांचा काही तरी सल्ला घेतला.

कालशंबरने गरुडाच्या पायाला मगरीचे पिल्लू बांधून त्याला सोडले यांत त्याचा जो डाव होता तो सुरवातीला थोडा साधला. परंतु महाकलीच्या लक्षांत तो डाव आल्या-बरोबर त्याने आपल्या अनुयायांना सावध केले. डोंगरावरून झुडपाआड उभा राहून कालशंबर हे सर्व पहात होता. मोठ्याने हंसत तो म्हणाला–" सरोवराच्या तळाला असलेली ती शिळा आतांपर्यंत आपल्या लोकांनी काढली असावी. गुहेत राहणारे







आपले अनुयायी अजून वर डोंगरावर आलेले दिसत नाहींत? जय शांभवी! त्वकर ये! त्वकर ये!" असे म्हणत तो मंत्रदंड जोरजोराने फिरवू लागला.

इतक्यात डोंगर इतक्या जोराने हादरला की जणुकाही भूकंपच झाला. डोंगराच्या पायथ्याजवळ जमीन फोडून जोराने ताडा-एवढे पाण्याचे फवारे पाताळकोटाच्या दिशेने वाहू लागले. जवळचे सर्व मैदान पाण्याने भरले आणि पाणी पाताळकोटात शिरले.

वाचकांना ही गोष्ट आठवत असेल की भुयाराच्या छपरांतून पाणी टपटप गळू लागलेले पाहून कालशंबरचे अनुयायी घाबरून गेले होते व त्यांनी ती गोष्ट मांत्रिकाला येऊन सांगितली होती. त्याच्या मागचें गूढ हेच होते.

"प्रलय, प्रलय....!"चा हाहाकार उडून गेला. म्हातारा राक्षस ओरडून म्हणाला—"घोरकालेश्वरचा, त्याचा अपमान झाल्याने आपल्यावर कोप झाला आहे. त्याचा हा दंड आहे. राक्षस जातीचा सर्वनाश होणार आणि या सर्वाला जबाबदार महाकाली आहे."

तलावाच्या तळाला बसविलेली शिळा वेलांच्या दोरखंडांनी ओढून ज्यांनी हा





प्रलय केला होता ते धावत कालशंबरजवळ आले. भद्र मोठ्या उत्साहाने म्हणाला—"महामांत्रिक आपला जय झाला आहे. ती शिळा ओढल्याबरोबर डोंगर फोडून पाणी धबधब्यासारखे पाताळकोटांत शिरले. तेव्हां डोंगर भूकंपासारखा हालला."

"हा भूकंप नाही, प्रलय आहे, महा-प्रलय! मी सरोवराच्या तळाशी बुडी मारून कित्येक तास पाण्यांत मंत्रबळाने राहून तीन चार जागी खोल भुयारे खणून ठेवली व त्यांच्या तोंडावर ती मोठी शिळा बसवून ठेवली होती. प्रलय करण्याची योजना मी कित्येक दिवसांपासून आखून ठेवली होती. सर्व पाताळकोट बुडेल एवढें पाणी आहे या सरोवरात. या कालशंबरच्या योजना अशा पुकट जाण्यासाठीं नसतात. पहा, प्रत्येक गोष्ट कशी हुकमी होत चालली आहे. परंतु त्या आधी काही राक्षस डोंगरावर चढून पाऊल वाटेने पळून जाऊन स्वतःचा आपला जीव वाचवतील कदाचित. त्यांच्यापैकी कोणी पळून जाऊ नये या गोष्टीची सावधगिरी आपण बाळगली पाहिजे." असे सांगून त्या काही तरी ऐकू आल्यासारखा कानाला



हात लावला व म्हणाला—"तुम्हाला नाही का ऐकू येत?"

"दूर वाघासिंहांची डरकाळी ऐकू येत आहे." विरूप म्हणाला.

"होय! वाघासिंहाच्या डरकाळ्या ऐकू येत आहेत ना?" मांत्रिकाने स्मित करून विचारले व म्हणाला—"तेच ते कुंभीरने पाळलेले वाघ व सिंह. त्यांना दोन तीन दिवसांपासून काही खायला मिळालेले नाहीं. त्या एकुलत्या एका पाऊल वाटेच्या तोंडाशी ते येत आहेत. त्या वाटेने महाकली किंवा त्याचे अनुयायी कोणालाच पळून निसटून जाणे शक्य नाही. तिकडे न जाता आपण उभे आहो, या बाजूने त्यांनी पळून जाण्याचा विचार केला तर आपण आहोच त्यांच्या समाचाराला. पाण्यात बुडून मरण्याशिवाय गत्यंतर नाही."

"कुंभीर, थोड्या वेळापूर्वी शशिकांत व कांतिसेना दोघांना घेऊन सरोवराकडे निघाला होता त्याचे काय झालें कळत नाही." भद्र म्हणाला.

"माझा मित्र व शत्रु पुलिंद याची तरुण बायको माया सिनगी पण त्याच्याबरोबर आहे, असे तूं म्हणाला होतास. ती









आपले अनुयायी अजून वर डोंगरावर आलेले दिसत नाहींत? जय शांभवी! लवकर ये! लवकर ये!" असे म्हणत तो मंत्रदंड जोरजोराने फिरवू लागला.

इतक्यात डोंगर इतक्या जोराने हादरला की जणुकाही भूकंपच झाला. डोंगराच्या पायथ्याजवळ जमीन फोडून जोराने ताडा-एवढे पाण्याचे फवारे पाताळकोटाच्या दिशेने वाहू लागले. जवळचे सर्व मैदान पाण्याने भरले आणि पाणी पाताळकोटात शिरले.

वाचकांना ही गोष्ट आठवत असेल की भुयाराच्या छपरांतून पाणी टपटप गळू लागलेले पाहून कालशंबरचे अनुयायी घाबरून गेले होते व त्यांनी ती गोष्ट मांत्रिकाला येऊन सांगितली होती. त्याच्या मागचें गूढ हेच होते.

"प्रलय, प्रलय....!"चा हाहाकार उडून गेला. म्हातारा राक्षस ओरडून म्हणाला— "घोरकालेश्वरचा, त्याचा अपमान झाल्याने आपल्यावर कोप झाला आहे. त्याचा हा दंड आहे. राक्षस जातीचा सर्वनाश होणार आणि या सर्वाला जबाबदार महाकाली आहे."

तलावाच्या तळाला बसविलेली शिळा वेलांच्या दोरखंडांनी ओढून ज्यांनी हा



प्रलय केला होता ते धावत कालशंबरजवळ आले. भद्र मोठ्या उत्साहाने म्हणाला— "महामांत्रिक आपला जय झाला आहे. ती शिळा ओढल्याबरोबर डोंगर फोडून पाणी धबधब्यासारखे पाताळकोटांत शिरले. तेव्हां डोंगर भूकंपासारखा हालला."

"हा भूकंप नाही, प्रलय आहे, महा-प्रलय! मी सरोवराच्या तळाशी बुडी मारून कित्येक तास पाण्यांत मंत्रबळाने राहून तीन चार जागी खोल भुयारे खणून ठेवली व त्यांच्या तोंडावर ती मोठी शिळा बसवून ठेवली होती. प्रलय करण्याची योजना मी

म्हाळसा त्यांना कोठे चुकीच्या वाटेने तर घेऊन नाही गेली?" विरूपने विचारले.

"आपल्यासमोर राजकुमारीला कसे वांचवायचे हा मुख्य प्रश्न आहे. आपण कदंब राज्याच्या प्रजेला वचन दिले आहे की तिला आम्ही सोडवून आणू व राणी करू." धूमक म्हणाला.

सोमकने होकारार्थी मान हलवून खांबाला लोंबत असलेल्या भात्यातून बाण काढले.

कालशंबर ते संभाषण इतका वेळ निमूटपणे ऐकत होता. एकदम म्हणाला—

"प्रत्येकजण आपापला हेतू साध्य करण्याच्या हेतूने वागणार असेल तर सर्वांवरच एकदम संकट येईल. माझ्या वडिलांचा क्रूरपणाने वध करणाऱ्या त्या दुष्ट महाकालीचा वध करता आला तर माझ्या मनाचे समाधान होईल. पण तेवढ्याने काय फायदा? कारण त्याच्या जागी दुसरा राक्षस पाताळकोटाची गादी बळकावून तसाच अत्याचार करू लागेल म्हणून या राक्षस जातीचाच शेवट झाला पाहिजे. त्यानंतर राजकुमारी व मंत्र्याच्या मुलगा शशिकांत यांचा विचार करता येईल. थोडा धीर धरा."





याचे उत्तर देण्याच्या हेतूने भद्र व धूमक काही बोलणार एवढ्यात पाताळ-कोटाकडून एक भयंकर आवाज काही तरी कोसळल्यासारखा ऐकू आला.

मांत्रिक व त्याचे अनुयायी त्या बाजूला धावले. त्यांनी वाकून खाली दरीत पाहिले. डोंगराचा एक कडा पाण्याच्या ओघाने कोसळला होता. जे राक्षस त्यावर उभे होते ते पाण्यात पडले आणि मोठमोठ्याने ओरडू लागले. कित्येक, मांत्रिक उभा होता त्या डोंगराच्या बाजूला पोहोत येऊ लागले.

कालशंबर मंत्रदंड उचलून म्हणाला— "भद्र व धूमक! मी म्हणतो ते ऐका. शशिकांत व कांतिसेना दोघे सुरक्षित आहेत. माझ्या बोलण्यावर भरवसा ठेवा." असे सांगून त्याने मंत्रदंड त्यांच्यासमोर काही तरी दाखविण्यासाठीं ठेवला व म्हणाला— "पहा, या झाडाखाली दिसले का? त्यांच्या शेजारी कुंभीर उभा आहे."

ते मांत्रिकाच्या मंत्रदंडाकडे पहात असता मांत्रिक म्हणाला—"भद्र! आपण मोठमोठ्या गोफणी तयार करून लपवून ठेवल्या होत्या त्यांचा प्रयोग करायला हीच संधी आहे. पोहोत काठाकडे जाणाऱ्या राक्षसावर नेम धरून मारा करा, संभाळून!"

भद्रने टाळी वाजवून गुहेतून बाहेर आलेल्या मांत्रिकाच्या अनुयायांना खुणावून काही तरी सांगितले आणि ते सर्व झाडीत शिरले.

तेथे मोठमोठे दगड ठेवले होते. ते गोफणीत घालून तयार ठेवले व हुकूम होण्याची वाट पाहू लागले.

भद्र जवळ येऊन म्हणाला—"करा दगडांचा वर्षाव व पाठवा एकेकाला यम-सदनास." नंतर त्याने काही जणांना आणखी दगड जमा करून जवळ न्यायला सांगितले.

थोड्या वेळाने दगडाचा वर्षाव सुरू झाला. दगड लागल्यावर ओरडत राक्षस बुडून मरून जाऊ लागले.

तोपर्यंत पाताळकोटाच्या बऱ्याचशा भागात खूप पाणी शिरले होते. फक्त काही बुरूज पाण्यावर दिसत होते. बुरजांची कडा धरून काही राक्षस लोंबत होते.

खाली फेसाळलेले पाणी पाहून गरु-डाच्या पायाला बांधलेले सोनेरू मगरीचे पिल्लू पाण्यात उडी मारायला धडपड करू लागले. म्हणून पुष्कळ प्रयत्न करून सुद्धा गरुडाला उंच आकाशांत उडत राहणे अशक्य झाले. पाण्यापासून दहा बारा हातावरच तो उडत होता.

राक्षसांना महाकलीने समजावून सांगितले होते की, तो गरुडपक्षी व ते मगरीचे पिलू, यांचा मयत राक्षसराज घोरकली याचा कांही संबंध नाहीं. तरी बुरजाला लोंबकळणारा एक राक्षस मोठ्याने ओरडला— "आपल्याला वांचवायला घोरकलेश्वर येत आहे."



ते ऐकून सर्व राक्षस ओरडू लागले— "घोरकलेश्वर महाराज! वांचवा, वांचवा आम्हांला!"

ते सर्व पाहून कालशंबर मोठमोठ्याने हसू लागला. "विरूप! अरे तू म्हणाला होतास तसा तुझा काळा गरुड खरोखरच देवपक्षी आहे रे. त्याच्या मदतीने आपण राक्षसांना खूप छकवले. पण महाकली कोठे गडप झाला? सर्व बुडून मेले तरी तो एकटाच जिवंत राहाला की काय?" मांत्रिकाच्या चेहऱ्यावर चिंता स्पष्टपणे दिसत होती.

सर्वांनी पाण्याकडे लक्षपूर्वक पाहिले. एकाएकी दोन हत्ती पाताळकोटाच्या बुरुजामागून पुढे आले. त्यापैकी एकावर महाकली बसलेला होता. दुसऱ्यावर त्याचे दोन अंगरक्षक बसलेले होते. सर्वांचे कपडे पाण्याने भिजलेले होते.

महाकलीचे अंगरक्षक त्याच्या सांगण्याप्रमाणे डोंगरांतून जाणारी भुयाराची चोरवाट हुडकीत होते. त्या दिशेने आपल्या हत्तीला फिरवून तिकडे जात तो ओरडला "या लवकर, त्या भुयाराच्या वाटेने आपण वर जमिनीवर जाऊ शकलो तर त्या मांत्रिकाचा शेवट झालाच, समजा. कांतिसेना कोठे आहे? आणि तो शशिकांत कोठे आहे? ती दुष्ट मायासिंगी पण बुडली की काय पाण्यात? आणि कुंभीर दिसत नाही कोठे! त्यालाच सर्वांवर नजर ठेवायला मी नेमले होते. कुंभीर....कुंभीर....!" असा तो ओरडू लागला.

"महाकलीचे डोके ठिकाणावर नाही. चला तर सर्व त्या भुयाराकडे कुंभीर त्याच्या तोंडावर रानटी जनावरांच्या मदतीने तेथे आत्ता उभा असेल. परंतु राक्षसांसमोर वाघ व सिंह काय करू शकणार? आपणाला जशी कुत्री तसे त्यांना वाघसिंह." असे म्हणत कालशंबर झपझप पावले उचलीत त्या बाजूला निघाला.

सर्व राक्षस राजाच्या पाठोपाठ भुयाराच्या तोंडाकडे पोहोत जाऊ लागले. मांत्रिक त्यांच्या आधी भुयाराची वाट चढत उतरत, काही ठिकाणी शब्दशः रांगत, राक्षस पोचण्यापूर्वी भुयाराच्या तोंडाजवळ पोचला. त्या बाजूला कुंभीर व त्याच्या जातीचे काही राक्षस दिसले. [पुढल्या अंकांत संपूर्ण]

## कष्ट प्रमाणे

विक्रमार्काने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे कांहीं बोलल्याशिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतांत बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा! तू कोणती फलापेक्षा ठेवून एवढे कष्ट करीत आहेस हें नाही मला माहीत. हयग्रीवाप्रमाणे फार मोठ्या फळाची अपेक्षा सोडून बेताच्या फळाची अपेक्षा ठेवून जे मिळेल त्यातच आपले नशीब समज. तुला त्या हयग्रीवाची गोष्ट सांगतो, ती लक्ष देऊन ऐक." असे सांगून तो गोष्ट सांगू लागला.

महानदीच्या काठी एका जागी हयग्रीव नांवाचा एक तरुण युवक तलावाचे पाणी लावून शेती करीत असे. काही दिवसांनी



तलाव कोरडा पडला आणि हयग्रीवची शेतकी बंद पडली. म्हणून पोटापाण्यासाठीं त्याला जंगलाचा आश्रय घ्यावा लागला. त्याला फार काबाडकष्ट करावे लागत.

जंगलात फिरत असता त्याला एका जागी एक मुनी तपश्चर्या करीत असलेला दिसला. हयग्रीवने रानातली कंदमुळे व फळें मुनींसमोर ठेवली आणि त्यांना नमस्कार करून हात जोडून उभा राहाला. मुनीने चकित होऊन त्याच्याकडे पाहाले व त्याने दिलेली कंदमुळे फळें स्वीकारून त्याला आशीर्वाद दिला.

त्यानंतर रोज हयग्रीव कंदमुळे आणून मुनीच्या समोर ठेवू लागला. तो मुनीना नमस्कार करून आपल्या कामाला निघून जाई. असेच कांहीं दिवस लोटल्यावर मुनीने त्याला एके दिवशी विचारले— "आज पौर्णिमा आहे. तुला कांहीं मागून घ्यावयाचे आहे का? वाटे ती वस्तु मागून घे."

हयग्रीवला कष्ट काय ते दारिद्र्याचे होते. म्हणून म्हणाला—"प्रभो, मला एक हजार सुवर्णमुद्रा द्याव्या! माझे सर्व आयुष्य सुखाने जाईल."

"तथास्तु." मुनी म्हणाले.

हयग्रीवने घरी जाऊन पाहिले तेव्हा त्याला एका भांड्यात सुवर्णमुद्रा दिसल्या. ते धन मिळाल्याने त्याच्या आनंदाला पारावार उरला नाही. मुनिकृपेमुळे त्या मुनीविषयी त्याच्या मनांतली भक्ती दुणावली. म्हणून त्याला आता जंगलांत जाण्याचे कांही कारण उरले नव्हते तरी तो रोज रानात दूध व फुले फळे घेऊन जाई व ती मुनीसमोर ठेवून त्यांच्या आशीर्वाद घेऊन घरी परत येई. आपली कृतज्ञता तो अशा तऱ्हेने व्यक्त करी. तो गरीब होता तेव्हा कोणी विचारपूस करायला देखील येत नसे. परंतु त्याच्या जवळ पैसे आहेत हे कळल्यावर त्याचे अनेक चाहाते त्याच्याकडे रोज येऊ लागले व त्याचे हितैषी म्हणवू लागले.

"अरे चांगलेसे घर बांधून घे. चांगले कपडे घालीत जा. स्वतः पोट भर खात जा व आल्या गेल्यालापण दोन घास देत जा. पैसे खर्च करायला असतात. नाहीतर पैसा असून नसून सारखाच. तू नीट राहू लागलास तर थोरा मोठ्यांच्या मुली सांगून येतील व तुला थोरपणा देण्यांत भूषण वाटेल त्यांना." असे उपदेश त्याचे हितैषी त्याला देऊ लागले व तो खुल्या हाताने खर्चपण करू लागला.

असाच आणखी एक महिना लोटला. तो नित्यनियमितपणे मुनीसमोर भेट नेऊन ठेवीत राहाला.

एकदा मुनी त्याला म्हणाले—"आज पौर्णिमा आहे. काही इच्छा असेल तर घे मागून. मी तुझी इच्छा पुरी करीन."

"प्रभो, आपल्या कृपेने माझी गरीबी नाहीशी झाली. एका चांगल्याशा मुलीशी लग्न करून सुखाने संसार करावा म्हणतो. आपण सुंदर व गुणवती मुलीशी लग्न





करून दिलेत तर मी आपला फारफार आभारी होईन." हयग्रीव म्हणाला.

"ठीक, जा घरी. वाटेतच तुला हवी तशी सुंदर मुलगी मिळेल. तिला घेऊन जा व तिच्याशी लग्न करून घेऊन सुखाने रहा." मुनी म्हणाला.

मुनीने सांगितल्याप्रमाणे तो घरी निघाला तेव्हा त्याला रस्त्याच्या बाजूला एका झाडाखाली उभी असलेली एक सुंदर मुलगी दिसली. हयग्रीवने तिला विचारले—"कोण ग तू? तुझे आई वडील कोठे आहेत व तू अशी एकटी येथे उभी का?"

"मला नाही काही ठाऊक." ती म्हणाली.

"तरमग येतेस का माझ्याबरोबर? लग्न करून घेशील का माझ्याबरोबर?" त्याने विचारले. ती त्याला कबूल झाली. त्याने तिच्याशी लग्न करून घेतले. तिच्याबरोबर त्याचा संसार सुखाचा झाला.

आणखी दोन महिने लोटले. एकाएकी हयग्रीवची बायको आजारी पडली. त्याने पुष्कळ औषधपाणी केले. पण गुण पडला नाही आणि त्यातच ती मरण पावली. त्याच वेळी त्याच्या घरात चोर शिरले आणि त्याच्याकडे होते नव्हते ते सर्व चोरून घेऊन निघून गेले.

हताश होऊन हयग्रीव पुन्हा मुनींकडे गेला आणि त्याने त्याच्यावर आलेल्या संकटाविषयी सांगून मदत करावी अशी विनंती केली. म्हणाला—"मुनीश्वर! आपण दोनदा माझ्यावर कृपा करून वर दिलेत. परंतु मला त्यांचे जे फळ मिळाले त्यांचा उपभोग मी घेऊ शकलो नाही. मी होतो तसाच आज आहे. आपणच हातभार लावलात तर उद्धार होईल."

मुनी 'बरे' या अर्थी डोके हलवून म्हणाले—"आजच पौर्णिमा आहे. काही इच्छा असेल तर मागून घे. मी पुरी करीन. पण लक्षात ठेव, हा शेवटचा वर आहे. कारण हा वर दिल्यानंतर मी तपश्चर्या करून मिळविलेली सर्व शक्ती क्षीण होईल. मी उद्या हिमालय पर्वतात जाणार आहे. पुन्हा मी येथे आढळणार नाही."

"असे असेल तर मला पुन्हा धन व पत्नी द्यावी. मी कोणता ही नवा वर मागणार नाही." हयग्रीव म्हणाला.

"तू वाटेल तो वर माग, पण एक गोष्ट लक्षांत ठेव. हा शेवटचा वर आहे." मुनी म्हणाला.

हयग्रीवाने काही वेळ विचार केला आणि म्हणाला—"तर मग मला असा वर द्या की ज्या तळ्याचे पाणी माझ्या शेताला लागते त्या तळावात बारा महिने भरपूर पाणी राहील."

"ठीक, तथास्तु!" मुनी म्हणाला.

दुसऱ्या दिवशी हयग्रीव आपल्या शेताजवळ जाऊन पाहतो तो तळ्यात पाणी भरलेले. त्याने शेत नांगरले. शेताला पाणी लावले. पीक छान आले. शेत सुपीक होते व भरपूर पाणी मिळू लागले, म्हणून दोन दोन पिके



निघू लागली. जे पीक निघे ते विकून त्याला पैसा पण बराच मिळू लागला. त्याला मुली सांगून येऊ लागल्या. त्याने एका सुंदर मुलीशी लग्न करून घेतले. त्याला दोन तीन मुले झाली. त्याचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला एका गोष्टीची शंका वाटते. हयग्रीवला पैसा व बायको यां शिवाय दुसऱ्या कोणत्याही वस्तूची गरज वाटत नव्हती. मग त्याने त्यांपैकी काही तरी एक कां नाही मागून घेतले? त्याने तिसरीच एक वस्तु कां मागून घ्यावी? तू या प्रश्नाचे उत्तर माहीत असून दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"हयग्रीवने तिसऱ्या वेळी जो वर मागितला त्यात त्याचा सूज्ञपणाच दिसतो. त्या पूर्वीच पैशाचे आणि बायकोचे सुख त्याने अनुभवले होते. तरी त्याने प्रथम त्याच दोन वस्तू मागितल्या होत्या. परंतु मुनीने जेव्हां त्याला सावध केले की हाच शेवटचा वर, तेव्हा तो विचारात पडला. पैसा व बायको दोन्हींची शाश्वती त्याला वाटत नव्हती. त्याहून जमिनीची शाश्वती जास्त वाटली. परंतु पाण्याचा अभाव होता. म्हणून त्याने तेच मागून घेतले. त्याला खरे सुख त्यामुळेच मिळाले पण."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# सूर्यकमळ

प्रभावती नगरीचा राजा विश्वावसू याला जितेंद्रिय, पराक्रम, शत्रुजित आणि धवलकीर्ती अशी चार मुले होती. सर्व शूर व पराक्रमी होते. सर्वांवर बापाचे प्रेम सारखे होते. परंतु त्यांच्यापैकी एकालाच गादी मिळणे शक्य होते. हीच एक काळजी राजाला वाटे. कोणाला राज्य मिळणार हे ठरवून टाकणे आवश्यक होते. यासाठी त्याने एक उपाय योजला.

विश्वावसूच्या वाडवडिलांपासून त्यांच्या राजवाड्यात एक सूर्यकमळ असे. आश्चर्य असे की त्या कमळातून प्रकाश दिसे. ते कमळ प्रभावती नगरीत असे तोपर्यंत राज्यावर कधी संकट, दुष्काळ, महापूर किंवा रोगराई आली नाही. परंतु काही दिवसापूर्वी ते कोणी व कोठे नेले हे कोणालाच माहीत नव्हते. ते अमक्या ठिकाणी आहे किंवा तमक्या ठिकाणी आहे, अशा अफवा मात्र ऐकू येत. राजाने विचार केला त्या सूर्यकमळाचा शोध लावील त्यालाच राज्य द्यावयाचे. तसे त्याने आपल्या मुलांना सांगितले.

शुभमुहूर्त पाहून चौघे भाऊ चार दिशांना सूर्यकमळाच्या शोधार्थ निघाले. जितेंद्र पूर्व दिशेला गेला. त्याने वाटेत जो कोणी भेटला त्याला त्या सूर्यकमळा विषयी विचारले. काही दर्यावर्दी लोकांकडून त्याला कळले की ते कमळ पूर्वेकडील कोणत्या तरी बेटात आहे. म्हणून तो एका जहाजात बसून त्या बेटात गेला. त्याने त्या बेटावर पाय ठेवला असेल नसेल तेथील लोक त्याला पाहताच एका हत्तीला पुढे करून त्याच्या चार बाजूला घोळका करून उभे राहिले. त्या हत्तीने एक



हार जितेंद्रच्या गळ्यात घातला. नंतर त्याला कळले की तो त्या बेटाचा व त्या लगतच्या दुसऱ्या बेटाचा राजा झाला आहे.

एकाएकी हे कसे झाले हे त्याला पुढे नंतर कळले. तो ज्या बेटावर उतरला होता त्या बेटावरच्या राजाला एका दर्यावर्दी व्यापाऱ्याने एक सूर्यकमळ विकले होते. ते सूर्यकमळ त्या बेटावर आले त्या दिवसापासून त्या राज्याची भरभराट होऊ लागली. ते कळल्यावर शेजारच्या एका राजाने ते सूर्यकमळ चोरून आणायचे ठरवून आपले हेर त्या राज्यात पाठवून दिले. हेरांनी विषप्रयोग करून राजाचा वध केला. दोन्ही राज्यात त्यामुळे मतभेद वाढले व दंगेधोपे सुरु झाले. त्या गडबडीत कोणीतरी सूर्यकमळ चोरून नेले.

त्यानंतर काही दिवसांनी दोन्ही बेटावरच्या प्रजेने सलोखा करून घेऊन दोन्ही बेटावर राज्य करण्यासाठी एका राजाची निवड करण्याचे ठरविले. त्यांनी हत्तीच्या सोंडेत एक फुलाचा हार दिला व त्याच्या पाठीमागून चालू लागले. त्या हत्तीने तो हार जितेंद्रच्या गळ्यांत घातला.

सूर्यकमळाचा लाभ काय हे जितेंद्रला माहीत होते. परंतु त्या कमळामुळे जे नुकसान होते ते त्याला कळले. तेव्हां पासून सूर्यकमळ मिळविण्यासाठी त्याने आजपर्यंत जो प्रयत्न केला तो फुकट समजून त्याचा नाद त्याने सोडून दिला. एवढेच नव्हे तर त्याला आता अनायासही दोन बेटांचे राज्य मिळाले होते. म्हणून त्याने आपल्या वडिलांकडे निरोप पाठवून त्यांना कळविले की मी सूर्यकमळाचा शोध करणे सोडून दिले आहे.

दुसरा राजकुमार पराक्रम पश्चिमेला निघाला. कित्येक देश फिरत राहाल्यावर देखील त्याला सूर्यकमळाविषयी काहीच कळले नाही. तो कोविदनगर नावाच्या गावी आला तेव्हा तेथे राजकुमारीच्या स्वयंवराची तयारी चालू असल्याचे त्याला कळले स्वयंवराला हजर राहायला कोणत्या ही राजकुमाराला परवानगी होती. म्हणून पराक्रम देखील स्वयंवराला हजर झाला. आपले नाव गाव सांगून तो राजकुमारांच्या रांगेत जाऊन बसला. राजकन्या सर्व राजकुमारांना पहात पराक्रम बसला होता तेथे येऊन थबकली. तिने पराक्रमच्या गळ्यांत वरमाला घातली.

राजा, मंत्री व स्वयंवराला हजर झालेले राजकुमार सर्वांनी त्याचे अभिनंदन केले. थाटामाटाने लग्न समारंभ पार पडला. कोविद राजाला मुलगा नव्हता. एकुलती एक मुलगी होती. तिचे ज्याच्याशी लग्न होईल तोच राजा होणार हें निश्चित होते. म्हणून पराक्रमला कोविद देशाची गादी मिळाली. अशा प्रकारे एका एकी गादी मिळाल्यावर पराक्रमला सूर्यकमळाचा शोध काढण्यास उत्साह वाटेनासा झाला. त्याने आपल्या वडिलांना दूत पाठवून तसे कळविले.



तिसरा शत्रुजित दक्षिण दिशेला गेला. तो सूर्यकमळाचा शोध काढीत दक्षिण समुद्र किनाऱ्यापर्यंत गेला. त्याला तेथील लोकांनी सांगितले की पूर्वी त्या देशांत सूर्यकमळ होते. पण काही दिवसांपूर्वी ते कोणी तरी चोरून नेले. गेली काही वर्षे त्याचा थांग पत्ता ही नाही. ते कळल्यावर शत्रुजित घरी परत गेला नाही तो समुद्राच्या काठाकाठाने पश्चिमेकडे निघाला. त्या दिशेला एका राज्यांत त्याचा भाऊ राज्य करीत आहे हे कळल्यावर तो भावाला भेटण्यासाठी त्याच्या राज्यात गेला व



त्याला भेटला. त्याने आपल्या भावाचे व भावजयींचे अभिनंदन केले. चार दिवस त्यांच्या घरी आराम करून सूर्यकमळाच्या शोधार्थ तो उत्तरेकडे निघाला.

काही अंतर चालून गेल्यावर त्याला समोर एक डोंगर दिसला. तो डोंगर सामान्य डोंगरासारखा नव्हता. जवळ जाऊन पाहिले तर तो एक सुवर्णपर्वत होता. त्या डोंगराच्या दगडांत कमीत कमी पन्नास टक्के तरी सोने होतेच. शत्रुजित चकित होऊन त्या डोंगराकडे पहात असता त्याला कोणीतरी त्याचा हात धरून ओढीत असल्याचा भास झाला. त्याने आपला हात सोडवून घेऊन मागे वळून पाहिले तेव्हां त्याला कोणी दिसला नाही. जवळ पासच कोणती तरी अदृश्य शक्ती फिरत असावी असा विचार करून त्याने आपली तलवार उपसली व हवेतच तलवार फिरवू लागला. थोड्या वेळाने त्याला कोणी ओरडत असल्याचे ऐकू आले. त्याला एका राक्षसाच्या शरिराचे दोन तुकडे होऊन जमिनीवर पडलेले दिसले. राक्षसाच्या डोक्यातून एक गोळी बाहेर आली. ही गोळी होती म्हणूनच तो राक्षस दिसत नव्हता.

राक्षस मरून पडताच जवळ पासच्या झाडीतून लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊ लागल्या व लोक "महाराज की जय!" असा जयघोष करू लागले.

"कोण तुम्ही! मला 'महाराज' म्हणून कां म्हणत आहां?" शत्रुजितने त्यांना विचारले. त्यांनी आपला परिचय दिला. ते जवळच्या सुवर्ण कोश नावाच्या नगराचे रहिवासी होते. हा सुवर्णपर्वत त्यांचा होता. परंतु त्या डोंगरावर एक राक्षस येऊन राहू लागला. तो अदृश्यपणे गावात प्रवेश करी व वाटेल त्याला धरून खाई. एकदा त्याने स्वत: राजालाच धरले आणि ठार केले. कोणी सुवर्णपर्वताकडे फिरकले तर तो राक्षस त्या माणसाला ठार करून टाकी. त्या दिवशी तो गावात येत नसे. यावरून तो सुवर्णपर्वतानजीकच कोठे तरी रहात असावा असे त्यांना वाटले. सुवर्णपर्वताकडे कोणी जातो का हे ते पाळत ठेवून पहात. कोणी आला नाही की ते आपल्या घरा बाहेर पडत नसत. राक्षसाला भूक भागवायला सुवर्णपर्वताजवळ कोणी मनुष्य भेटला हे कळले की ते निर्विघ्नपणे आपले काम करीत. त्या राक्षसाच्या अत्याचारामुळे कित्येक दिवसांपासून त्यांना सुख अनुभवायला मिळाले नाही. अशा राक्षसाला शत्रुजितने ठार केले, म्हणून त्यांनी त्याला आपला राजा केले.

त्याला सुवर्णपर्वतच मिळाल्यावर सूर्यकमळाचा शोध काढण्याचा त्याचा उत्साहपण थंडावला. त्याने ती गोष्ट आपल्या वडिलांना कळविली.

धवल कीर्ती उत्तर दिशेला गेला होता. सूर्यकमळ मिळेपर्यंत मागे फिरायचे नाही की कोठे थांबायचे नाही असा त्याने मनाशी निर्धार केला होता. त्याचा प्रवास



पण तेवढा आरामात गेला नाही. त्याला एक कारण होते. उत्तरेकडे तो जाऊ लागला तसतसा देश मोठा होत गेला. एवढेच नव्हेतर त्याला सूर्यकमळाविषयी थोडी फार माहितीपण मिळत होती. काही गोष्टी नुसत्या गप्पाच होत्या. पण काही खऱ्या होत्या. तरी त्याचा पुष्कळ वेळ फुकट गेला. धवलकीर्ती ऐवजी दुसरा कोणी असता तर आता पर्यंत मागेच फिरला असता.

धवलकीर्तीने इतरांच्या तोंडी ऐकले होते की सूर्यकमळ एका जागी टिकत नाही.



ते कोणी तरी चोरून नेत असते. त्याला असे ही कळले की एका राक्षसने ते चोरून नेले आहे. तो अदृश्यपणे वावरतो. सुवर्णकमळ त्याच्या जवळच आहे. म्हणून तो त्या राक्षसाच्या शोधार्थ सुवर्णकोश नगरी आला. तेव्हा त्याला कळले की त्याच्या भावानेच त्या राक्षसाचा वध केला. परंतु ते सूर्यकमळ त्याच्याकडे नव्हते.

"अरे आहे कोठे सूर्यकमळ? सोड त्याचा नाद आणि माझ्या सारखेच एखादे राज्य मिळवून सुखाने रहा." शत्रुजित आपल्या भावाला म्हणाला. पण धवल-कीर्तीला ते पटले नाही. तो म्हणाला "काय वाटेल ते झाले तरी सूर्यकमळ मिळेपर्यंत मी कोठे स्वस्थ बसणार नाही. त्याच्या तिघां भावांनी सूर्यकमळ शोधून काढण्याचा विचार सोडून दिल्याचे त्याला कळले होते. पण त्याचा निश्चय अढळ होता.

धवलकीर्तीचा अढळ निश्चय पाहून शत्रुजित त्याला राक्षसाच्या डोक्यातली गोळी देत म्हणाला—"तर मग तूं ही गोळी जवळ ठेवून घे. ही मंत्रवलेली गोळी आहे. या गोळीच्या मदतीने तुला कदाचित सूर्यकमळाचा शोध काढणे शक्य होईल."

ती गोळी घेऊन काही दिवस प्रवास केल्यावर धवलकीर्तीला सूर्यकमळाविषयी निश्चित अशी थोडी माहिती मिळाली की सूर्यकमळ सुधावर्त नावाच्या देशात आहे.

तो वेळ घालवल्याशिवाय त्या देशांत गेला. परंतु तो त्या देशांत पोंचला तेव्हां त्याला असे कळले की थोड्याच वेळा पूर्वी कोणी तरी सूर्यकमळ चोरून नेले आहे. सुधावर्त देशाच्या राजाने जाहीर केले की जो कोणी सूर्यकमळाचा शोध काढून देईल त्याचा विवाह राजकन्येशी करून त्यालाच राज्य पण देण्यांत येईल.



धवलकीर्ती किती मोठी आशा घेऊन आला होता. ती घोषणा ऐकून त्याला थोडी निराशा वाटली. परंतु तो स्वस्थ बसला नाही. ती चोरी कोठे झाली, केव्हा झाली. चोर त्या जागी कसे पोंचले असतील वगैरे अनेक प्रश्न त्याच्या मनात आले. या प्रश्नांचे समाधान कारक उत्तर मिळेपर्यंत चोरांचा पत्ता लावणे कठीण, असे त्याला वाटले. तो नगरात प्रत्येकाला विचारी की त्याला काही माहीत आहे का? पण प्रत्येकाकडून "ते सर्व आपल्याला नाही माहीत." असेच उत्तर त्याला मिळे.

म्हणून धवलकीर्ती सरळ सुधावर्तच्या राजाकडेच गेला व त्याला त्याने ते प्रश्न विचारले. परंतु राजाने काहीच उत्तर दिले नाही. उलट राजाला धवलकीर्तीचाच संशय येऊ लागला. "तूच चोरांचा साथीदार दिसतो आहेस," असे म्हणायला देखील राजाने मागेपुढे पाहिले नाही.

धवलकीर्तीला ते ऐकून राग आला. म्हणाला—"सूर्यकमळ चोरीला गेले तर ते शोधून काढणारा हे प्रश्न विचारल्या शिवाय राहील का? शिवाय ते कमळ आमचे आहे. त्याच्या शोधार्थ आम्ही चौघे भाऊ



हिंडत आहो. मी आपल्या मुलीशी लग्न करून घेण्याच्या हेतूने मुळीच आलो नाहीं."

"असे होय, तरमग मी सूर्यकमळा विषयी तुला काहीच सांगत नाही. कारण समज, चोराकडून तू सूर्यकमळ परत मिळविलेसच तर त्याचा मला काय फायदा?" राजा म्हणाला.

धवलकीर्तीने मंत्रवलेल्या गोळीच्या सहाय्याने अदृश्यपणे राजवाड्यांत राहून कोण काय बोलते हे ऐकून घेतले. त्याला वाड्यांतल्या अनेक गुप्त गोष्टींची माहिती



झाली. परंतु सूर्यकमळा विषयी काही एक माहिती मिळाली नाही. कारण राजवाड्यांत सूर्यकमळा विषयी कोणी कधी बोलला नाही.

धवलकीर्ती रानांत वनांत अदृश्यपणे हिंडला व चोर कोठे लपतात व काय करतात हे माहीत करून घेतले. एकाजागी त्याला एक मुनी तपश्चर्या करीत असलेले दिसले. ते मुनी दिव्य दृष्टीने पाहून सूर्यकमळाविषयी काही माहिती सांगू शकतील असे वाटून तो मुनींना भेटावला निघाला. तेवढ्यात त्याला कोणी तरी शिट्टी वाजवल्याचा आवाज ऐकू आला.

मुनीने त्या शिट्यांचे उत्तर स्वतः शिट्टी वाजवून दिले.

त्या पाठोपाठ चार पाच जण घेऊन मुनी समोर उभे राहाले. त्यांच्या कपड्यावरून व वागण्यावरून ते चोर असावेत असे धवलकीर्तीला वाटले. ते मुनीजवळ काही तरी सांगू लागले. धवलकीर्तीने अदृश्यपणे जवळ उभा राहून त्यांचे बोलणे ऐकून घेतले.

"या महिन्यात नगराच्या बाजूने कोणी नवीन आल्यासारखे दिसले नाही." एक चोर म्हणाला.

"चोरी झाली की नाही यातच शंका आहे." दुसरा चोर म्हणाला.

मुनी काही वेळ विचार करून म्हणाला—"सूर्यकमळ कोणी चोरून नेलेले नाही. आपल्याला फसविण्यासाठी राजाने ते चोरीला गेल्याचे जाहीर केले आहे. कारण सूर्यकमळ चोरीला गेले आहे असे जाहीर झाले की त्याचा शोध राजवाड्यांत कोणी करणार नाही व दुसरीकडेच त्याच्या शोधार्थ चोर राहतील, हा हेतू. या शिवाय आपण परस्परांवर संशय करून आपसात भांडू हा ही एक हेतू असावा. राजाने स्वतःच





कोणाला कळू दिल्याशिवाय राजवाड्यातच कोठे तरी ते कमळ लपवून ठेवले आहे. म्हणून राजवाड्यांतले गुपित सांगायला आपल्याला कोणी भेटणार पण नाही.

चोरांना राग आला. ते म्हणाले, ठीक त्या राजाचा समाचार आपण घेऊंया. त्याची मान तरी छाटून टाकू, नाहीतर त्याला पळवून आणून सुळावर चढवू, नाहीतर राजवाड्याला आगलावू." असेच काही तरी ते बडबडले. मुनीचे सोंग करून बसलेला त्यांचा सरदार त्यांची समजूत घालू लागला. घाई करून कसे भागेल? मी काहीतरी उपाय योजून सांगतो म्हणजे सर्व ठीक होईल.

धवलकीर्ती तेथे फार वेळ थांबला नाही. तो सरळ राजवाड्यात गेला. म्हणाला—"राजा! तू राजकन्येचा विवाह माझ्याशी करून दे. सूर्यकमळाचा पत्ता मला माहीत आहे."

राजाने संशयित मुद्रेने त्याच्याकडे म्हणाला—"पण उपयोग काय? ते कमळ तुला द्यावे लागेल नाही का?"

"कमळ तर तुझ्या जवळच आहे, हे तुलापण माहीत आहे. म्हणून तूच ठरव, तू मला आपली मुलगी देऊन कमळ देणार की फक्त कमळ." धवलकीर्ती म्हणाला. आणि त्याने तलवार उपसून राजाच्या छातीवर धरली.

"माझा जीव घेऊ नकोस. तुला मी आपली मुलगी देतो व सूर्यकमळ पण देतो. मी चोरांना फसविण्याच्या हेतूने सूर्यकमळ चोरीला गेले अशी बतावणी केली होती. तू सूर्यकमळ माझ्याजवळ राहू दिले नाहीस तरी ते तुझ्याजवळपण राहील की नाही शंकाच." राजा म्हणाला.

धवलकीर्ती स्मित करून म्हणाला—"चोर तुझ्याहून व माझ्याहून जास्त हुशार



आहेत. सूर्यकमळ तुझ्याजवळ आहे, ही गोष्ट मला चोरांकडून कळली. आता ते माझ्या हातातून कसे चोरून घेऊन जातात हे मी पाहणार आहे. तू बेफिकीर रहा."

राजाने धवलकीर्तीशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले आणि सूर्यकमळ उपहार म्हणून दिले. सूर्यकमळ हातात घेऊन धवलकीर्तीने एक मंत्र म्हटला व सूर्यकमळ होमकुंडांत टाकून दिले.

"अरे, अरे!" असे राजा घाबरून म्हणाला.

"महाराज! या एका सूर्यकमळामुळे किती राज्ये धुळीला मिळाली याची कथा कळली तर तुम्हांला या सूर्यकमळाचा मोह राहणार नाही. हे सूर्यकमळ राहील त्या राज्यांत सतत सुख संपत्ती वास करील याचे उदाहरण माझ्या पाहाण्यात किंवा ऐकिवात नाही. उलट या कमळा पायी कित्येक राज्ये व कित्येक कुटुंबे नष्ट झाली याची उदाहरणे पुष्कळ आहेत. याविषयी मला जितके माहीत आहे तितके कदाचित इतर कोणाला माहीत असेल. मी या कमळाचा नाश व्हावा याच खटपटीत होतो." धवलकीर्ति म्हणाला.

राजकुमारीशी विवाह करून तो स्वदेशी निघून गेला. त्याने जे पाहिले व ऐकले ते वृत्त वडिलांना येऊन सांगितले. सूर्यकमळ मिळवून ते नष्ट करून टाकल्याचे मुलाकडून त्याला कळले. त्याने मुलाची पाठ थोपटली. त्यालाच आपला वारस म्हणून जाहीर केले.

वडील वारल्यावर तोच राजा झाला व त्याने अनेक वर्षे राज्य करून कीर्ति संपादन केली.





# गुरु उपदेश

एका गावी एका गुरुकुलात जवळपासच्या गावांतले विद्यार्थी येऊन विद्याध्ययन करीत असत. त्यांत फक्त एकाच गावचे तीन विद्यार्थी होते. त्यांना सुटी पडल्याला घरी जावेसे वाटले, म्हणून त्यांनी गुरूजवळ जाऊन परवानगी मागितली.

"जाऊन या, पण तोंडाला येईल ते बडबडत राहू नका. लक्षात ठेवा, मी जे काही शिकविले आहे त्यातले प्रत्येक वाक्य म्हणजे एक अनमोल रत्न आहे." असा हितोपदेश करून गुरूने त्यांना आशीर्वाद दिला.

गुरूचा निरोप घेऊन तिघे आपल्या गावी निघाले. गुरूचा उपदेश होता म्हणून ते काही बोलल्याशिवाय वाटेने चालत होते. त्या देशाचा राजा कधी कधी वेष पालटून गावात हिंडत असे. तो असा त्या दिवशीपण फिरत होता. तेव्हां त्याची नजर या तिघा शिष्यांवर पडली. दोन मुले एकत्र झाली की त्यांच्या गप्पा सुरू होतात पण हीच मुले निमूटपणे चालत असलेली पाहून राजाला आश्चर्य वाटले. म्हणून त्याने उघड त्यांना तसे विचारले–"काय रे मुलांनो! असे गुपचूप कां?"

"प्रत्येक वाक्य किंवा बोल हा रत्नासारखा असतो, वाया घालवायचा नसतो." एक विद्यार्थी म्हणाला.

ते उत्तर ऐकून राजा गालातल्या गालात हसून म्हणाला–"असे होय? तरमग मी प्रत्येकाला एकेक रत्न देतो. तुम्ही एकेक वाक्य बोला." ते ऐकून मुलांनी होकारार्थी मान हलविली.

सौ. कमलाबाई नियम



राजाने शिष्यांना तीन रत्ने काढून दिली व म्हणाला—“ प्रत्येक जण एका मागून एक ते रत्नासारखे अनमोल वाक्य बोला.”

“ जिथे धोका असेल तेथे दुर्लक्षपणा धोक्याचा असतो.” एक जण म्हणाला.

“ सूड घेणाऱ्याला सुद्धा दूध द्यावे.” दुसरा म्हणाला.

“ मूर्खाला दंड हेच औषध होय.” तिसरा म्हणाला.

नंतर राजाने त्यांना निरोप दिला. प्रत्येकाला एकेक रत्न मिळालेले पाहून तिघे आनंदाने आपापल्या घरी जावयास निघाले. राजा विद्यार्थी जे म्हणाले त्या विषयीं मुलांच्या भोळेपणा बद्दल विचार करीत आपल्या राजवाड्यात घाई घाईने निघून गेला.

तो राजवाड्यात पोचला तेव्हा ज्योतिषी त्याची वाट पहात बसला होता. राजा रोज एका गुप्तस्थानी बसून ज्योतिष्याकडून त्या दिवसाचे भविष्य ऐकून घेई. ज्योतिषी निःसंकोचपणे जे खरे ते सांगत असे. म्हणून तो बोले ते कोणी ऐकू नये असे राजाला वाटे.

गुप्तस्थानी पोचल्यावर ज्योतिषी राजाला म्हणाला—“ आजचा दिवस एक शुभदिन आहे, कसलीच काळजी करण्याचे कारण नाही. परंतु रात्री सावध रहावे. तसे प्राणभय नाहीं. पण येणारे संकट आपले बळ दाखवून जाणार, एवढे निश्चित.”

ज्योतिष्याने प्राणभय नाही हे सांगितल्यावर राजाने त्या संकटाकडे प्रथम दुर्लक्ष केले. परंतु थोड्या वेळाने गुरुकुलातल्या विद्यार्थ्याने सांगितलेली सूक्ती आठवली—“ धोका असेल तेथे दुर्लक्ष करणे धोक्याचे होय!” म्हणून त्या दिवशी रात्री राजाने जास्त काळजी वाहण्याचे ठरविले.



कोणी कदाचित विष खायला घालील असा विचार करून त्या दिवशी काळोख पडल्यावर तो जेवला देखील नाही. रात्रभर जागत राहून संकट केव्हा व कसे येते हे पहायचे त्याने ठरविले.

त्या दिवशी रात्री तो आपल्या पट्टराणीच्या शयनगृहात गेला नाही. आपल्याच खोलीत बसून विश्राम करण्याचे त्याने ठरविले.

त्या दिवशी राजा जेवला नाही म्हणून सैपाकी काही फळे व दुधाचा पेला ठेवून गेला. पण राजाने त्याला देखील हात लावला नाही.

खोलीत दिवा तेवत होता. राजा जागच्या जागी पडून डोळे उघडून काय होते ते पहात होता.

रात्री राजाला खिडकीतून एक साप खोलीत येत आहे हे दिसले. म्हणजे त्या सापाच्या रूपे संकट आले होते.

त्याला तलवारीने ठार करून झोपण्याचा विचार राजाने केला. इतक्यात त्या दुसऱ्या विद्यार्थ्याने सांगितलेली सूक्ती त्याला आठवली—“ सूड घेणाऱ्या दुष्टाला देखील दूध पाजावे.”













राजाने उठून दुधाचा पेला सापाच्या वाटेवर आणून ठेवला. साप दूध पिऊन आला तसाच निघून गेला.

राजा उजाडेपर्यंत जागा होता. परंतु विशेष असे काही घडले नाही.

उजाडल्यावर महाराज झोपायला का आले नाहीत याची चवकशी करण्यासाठी संशयी वृत्तीची राणी आली. तिने राजाला विचारले—"रात्रभर कोठे झोपायचे झाले? डोळे पाहून वाटते जणु काही रात्री डोळाच लागला नाही स्वारीचा?"

"होय, तसेच कारण होते. पण तुझा त्याच्याशी काही संबंध नाही." राजा म्हणाला.

पण राणीच्या मनाचे समाधान त्या उत्तराने झाले नाही. राजाने सर्व काही नीट सांगितल्या शिवाय तिच्या मनाला चैन तरी कसे पडणार? म्हणून ती खोदून खोदून प्रश्न विचारू लागली व राजा पिसाळल्या सारखा काही तरी असंगत वाटेल ते उत्तर देऊ लागला.

त्या दिवशी रात्री राजाने बरोबर उत्तर दिले नाही तेव्हा राणी हट्टाला पेटली. ती म्हणाली—"रात्रभर स्वारी कोठे होती हे कळणार नाही तो पर्यंत मी येथून हलणार नाही व स्वारीला पण हलू देणार नाही."

"मूर्खाला दंड हे एकच औषध आहे." ही तिसऱ्या विद्यार्थ्याने सांगितलेली सूक्ती राजाला आठवली. राजाने आपली काठी घेतली व राणीला दोन दिल्या.

त्यानंतर राणीने कधी राजासमोर हट्ट केला नाही. तिने त्याला प्रश्न करायचेच सोडून दिले. तेव्हापासून राजाचे पुढील आयुष्य सुखी झाले.





# विकलेला मुलगा

एका गावी एक धर्मभीरू नवरा बायको रहात असत. त्यांना बरेच दिवस मूल बाळ नव्हते. पण देव कृपेने बायकोला दिवस राहाले. नऊ महिने भरत आल्या-वर बायकोने विचार केला की कोठे तरी तीर्थक्षेत्रात तिचे बाळंतपण झाले तर गुणी मूल जन्माला येईल. ती गोष्ट पतीला पण पटली व दोघे जवळच्याच एका तीर्थक्षेत्री जाण्यासाठी निघाले.

गावाबाहेर एका जंगलांतून जावे लागले. गरोदर बाई चालून दमली. विश्रांतीसाठी कोठे जागा आहे का दोघं पाहू लागली. तेव्हा दोघांना झाडीपडीकडे एक झोपडी दिसली. दोघे त्या झोपडीजवळ गेले. झोपडीत एक सिद्ध पुरुष रहात होता. त्याने ओसरीत त्यांना रात्रभर रहायला परवानगी दिली. जमिनीवर अंग टाकताच बायकोला झोप लागली. पण नवऱ्याला झोप येईना.

रात्री तो सिद्धपुरुष आपल्या शिष्यां-बरोबर बोलत असता नवऱ्याला ऐकू आले. "त्या बाईला मुलगी होईल की मुलगा?" एका शिष्याने विचारले.

"मुलगी होईल. पण आईला मरण येईल. पुढे त्या मुलीला एक मुलगा होईल व ती मुलाला विकून टाकील." तो सिद्धपुरुष म्हणाला.

ते ऐकून नवऱ्याला फार वाईट वाटले. माझ्या बायकोला बाळंत झाल्यावर मरण आणि तिला होणारी मुलगी आपल्या मुलाला विकणार! हा कोणाचा तरी शाप आपल्या डोक्यावर पडला आहे. दुसऱ्या दिवशी पहाटे त्याने आपल्या बायकोला












उठविले, सिद्धपुरुषाचे आभार मानले आणि दोघे यात्रेला पुढे निघाले. तीर्थक्षेत्री पोचण्या पूर्वीच एका शेतकऱ्याच्या घरी ती बाई बाळंत होऊन तिला मुलगी झाली व ती स्वत: मरण पावली.

सिद्ध पुरुषाच्या तोंडची एक गोष्ट खरी झाली. दुसरी गोष्ट, काय वाटेल ते करून, खोटी ठरविण्याचा त्याने मनाशी निश्चय केला. त्याने मुलीला संभाळायला एक दाई ठेवली. पुढे त्याच्या त्याला प्रयत्नांत यश आले. मुलगी पांच वर्षांची झाली तो पर्यंत तो चांगला श्रीमंत झाला.

नंतर त्याने गांवाबाहेर एका जागी एका बुरूजवजा मोठ्या स्तंभावर एक घर बांधले आणि त्या घरात दाई व मुलगी दोघींच्या राहण्याची व्यवस्था करून दिली. त्यांना त्या खांबावरून खाली उतरून जाणे शक्य नव्हते. त्यांना आवश्यक सर्व वस्तू त्या स्तंभावरील घरांत पोचत्या होऊ लागल्या. त्याने हे सर्व एवढ्या साठी केले की त्या मुलीचे लग्नच होऊ नये.

त्याची मुलगी फार सुंदर होती. ती त्या स्तंभावरील घरातच लहानाची मोठी झाली. वयाबरोबर तिचे सौंदर्यपण वाढत गेले. तिने पुरुषामध्ये फक्त आपल्या बापालाच पाहिले होते. दाईशिवाय स्त्रीजातीशी पण तिचा परिचय झाला नाही.

एकदा ती आपल्या घराच्या गच्चीवर उभी राहून बाहेर पहात होती. दूर तिला एक मोठा खेमा दिसला. तो त्या गांवच्या राजकुमारासाठी बांधण्यात आला होता. तो शिकारीसाठी त्या जंगलात आला होता. त्या मुलीने त्याला पाहिले तेव्हा तो शिकारीचा गणवेष घालून तयार उभा होता. तिने आपल्या दाईला बाहेर बोलावून त्या राजकुमाराकडे बोट दाखवून विचारले—"तो एक विचित्र प्राणी दिसतो आहे. त्याला काय म्हणतात?"

"बाळ, तो प्राणी नाही. ते आपल्या गांवचे राजकुमार आहेत." दाई म्हणाली. त्या मुलीचे नाव रूपराणी होते. दाई रूपराणीला रोज एक गोष्ट सांगे. त्यात कोणी तरी राजकुमार व राजकन्याच गोष्टीचे नायक किंवा नायिका असत. त्यांचा प्रेमविवाह होई व आयुष्यभर दोघं सुखाने रहात. म्हणून रूपराणीने जेव्हा राजकुमाराला पाहिले तेव्हा साहजिकच तिच्या मनात निराळेच विचार येऊ लागले.

राजकुमाराने पण रूपराणीला पाहिले. तिचे सौंदर्य पाहून त्याला आश्चर्य वाटले. त्याने पुढे येऊन रूपराणीला हाक मारली. रूपराणी गच्ची वरूनच त्याच्याशी बराच वेळ बोलत उभी राहाली.

त्यानंतर शिकारीसाठी राजकुमार त्याच बाजूला येऊ लागला. दोघांची ओळख इतकी वाढली की परस्परांना भेटल्या शिवाय त्यांना एक दिवस देखील चैन पडेनासे झाले. रूपराणीने एक दोरी खाली सोडली. ती धरून राजकुमार रोज वर चढून येई.



दोघांनी गांधर्व विवाह करून घेतला. राजकुमार आला की दोन तीन दिवस तरी राहाल्या शिवाय जात नसे. त्याने तिला एक अंगठी व एक कंठहार दिला.

निसर्गनियमाप्रमाणे रूपराणी गरोदर होऊन तीन चार महिने लोटले. तिच्या वडिलांना तिने किंवा दाईने तिच्या गुप्त विवाहाविषयी काहीच कळविले नव्हते. राजकुमार पण आपल्या या गुप्त प्रेमसंबंधाविषयी राजाजवळ कधी काही बोलला नाही. कारण एका सामान्य कुळात जन्मलेल्या मुलीशी लग्न करून घ्यायला



राजा तयार होणार नाही हे राजकुमाराला माहीत होते.

नऊ महिने लोटल्यावर रूपराणीला एक मुलगा झाला. म्हणून आणखी एक प्रश्न उभा राहिला. त्या मुलाला लवकर दूर कोठे पाठवून दिले नाही तर ते गुपित तिच्या वडिलांना कळल्या शिवाय राहणार नाहीं. दर आठदहा दिवसांनी तिचा बाप येऊन खाडनच विचारपूस करून जाई. तो येईल त्या वेळेस नेमका मुलगा रडला तर बापाला सर्व कळेल असे तिला व दाईला वाटत होते.

म्हणून तिने व दाईने मुलाला कोठे तरी बाहेर पाठवून द्यायचे ठरविले. त्या दिवशी रात्री दोरी लावून दाई खाली उतरली आणि बागेतून एक टोपलीभर फुले घेऊन आली. रूपराणीने मुलाला दूध पाजून त्या फुलांच्या टोपलीत झोपवले. राजकुमाराने तिला जी काही भेट दिली होती ती मुलाजवळ टोपलीत ठेवून वर फुले घातली व मुलाला फुलाखाली झाकून ठेवले.

दाई ती टोपली घेऊन सरळ राजवाड्यात गेली आणि तिथल्या दासींना म्हणाली—"मी राणी सरकारांसाठी फुले घेऊन आले आहे." तिने फुलांची किंमत दोन वराह सांगितली.

दोन वराहात टोपलीभर फुले मिळणार हे ऐकून राणीने दोन वराह देऊन फुलांची टोपली घेऊन यायला दासींना सांगितले. दासींनी फुलांची टोपली आणल्यावर राणीने एकेक करून फुले काढून घ्यायला सुरवात केली. पण फुले काढीत असता फुलांसारखा सुंदर व सुकुमार एक मुलगा तिला टोपलीत दिसला. त्याच्या रंगारूपावरून तो उच्च कुळात जन्मलेलाच राणीला वाटला.



राजाने पण मुलाला पाहिले व म्हणाला—"किती गोड आहे मुलगा!"

राणीने त्या फुलवालीला बोलावून आणण्यासाठी दासींना पाठविले. पण दासी बाहेर जाईपर्यंत ती निघून गेली होती. म्हणून तो मुलगा कोणाचा होता हे कळणे शक्य नव्हते. त्या मुलाबरोबर अंगठ्या व काही बिल्ले व पदके ठेवलेली दिसली.

"खात्रीने हा कोणत्या तरी उच्चकुळातला मुलगा असला पाहिजे. याला आपणच राजवाड्यात ठेवून घेऊ." राजा म्हणाला. रक्ताकडे रक्त धाव घेते या न्यायाने राणीला पण त्या मुलाचे आकर्षण वाटत होते.

मुलाजवळ अंगठ्या व पदके पाहून व ती ओळखून राजकुमाराने तो आपलाच मुलगा असल्याचे ओळखले. परंतु तो त्या विषयी उघड काहीच बोलला नाही. आई-वडिलांनीच त्याची जबाबदारी घेतली आहे तेव्हा काळजी करण्याचे कारण नाही. पुढे मागे संधी पाहून खरी गोष्ट सांगता येईल, असा त्याने विचार केला.

बाकी सर्व ठीक होते. पण आई जवळ नसल्यामुळे मुलगा दुधासाठी फार रडे.



त्याला शांत करणे कोणाला शक्य नव्हते. रडून रडून तो दमून जाई व त्याला झोप लागे. झोपून उठला की रडू लागे.

"ओव्या म्हणून त्याला झोपविल्याशिवाय त्याला झोप येणार नाही," असे राजाने दासींना सांगितले. दासींनी ओव्या म्हणून, पाळण्यांत घालून, नाना प्रकारे त्याला झोपविण्याचा यत्न केला. पण सर्व फुकट.

राजाने राजधानीत दवंडी पिटविली की राजवाड्यात येऊन जी कोणी स्त्री एका रडत असणाऱ्या मुलाला उगा करील तिला मोठे

       



बक्षिस देण्यात येईल. बक्षिसाच्या आशेने कित्येक स्त्रियांनी येऊन गोड आवाजात ओव्या म्हणून त्याला झोपविण्याचा यत्न करून पाहिला. पण मुलाचे रडणे थांबले नाही.

"आणखी गांवांत स्त्रिया नाहीत का?" राजाने विचारले.

"नगराबाहेर जंगलांत एका जागी एक स्तंभी महालात एक स्त्री व तिची दाई राहतात. त्यांच्या शिवाय कोणी स्त्री उरली नाही." मंत्री म्हणाला.

"इतर स्त्रियांबरोबर त्या दोघी कां नाही आल्या?" राजाने विचारले.

"त्या मुलीच्या बापाने तिला व तिच्या दाईला तेथे ठेवले आहे व त्यांना खाली उतरावला परवानगी नाही." नोकर म्हणाले.

"तिच्या बापाला कैद करून घेऊन या." राजाने आज्ञा केली. त्या प्रमाणे राजाचे शिपाई रूपराणीच्या बापाला कैद करून घेऊन आले.

"मी दवंडी पिटवून राजधानीभरच्या स्त्रियांना या मुलाला ओवी म्हणून झोंप-विण्यासाठी बोलाविले. सर्व आल्या. आली नाही ती तुझी मुलगी. असे का?" राजाने रूपराणीच्या बापाला विचारले.

रूपराणीचा बाप म्हणाला—"महाराज! माझ्या मुलीचे अद्याप लग्न झाले नाही."

प्रत्येकीने येऊन गाणे म्हटलेच पाहिजे. ही माझी आज्ञा आहे." राजा म्हणाला.

निरुपाय होऊन रूपराणीचा बाप मुलीला घेऊन आला. तिला पाहून राजा म्हणाला—"हा मुलगा रडतो आहे. कदाचित तुझे गाणे ऐकून रडायचा थांबेल तो. तू त्याला घेऊन गाणे म्हण." राजा म्हणाला.

रूपराणी गाणे म्हणू लागली.

बाळा, जो जो रे,  
गुणि बाळा, जा झोपी लडिवाळा!  
बाळा, जो जो रे।  
फुटकी नशिबाची, खरोखरी, आई तुझी गरिबाची,  
आली तिजवरती रे म्हणूनी पाळि तुला विकण्याची;  
परंतु फार गुणी पिता तुझे, आजोबा अन् राजे,  
करतिल रक्षण ते, आज तुझे, विसर प्रेम माझेचे॥

रूपराणीने अंगाईगीत म्हणताच मुलाचे रडणे थांबले. मुलगा शांत झोपी गेला.

राजाने रूपराणीजवळ येऊन विचारले—"मुली! तूच या मुलाची आई दिसतेस. मग तू आपल्या मुलाला असे विकून का टाकलेस?"

रूपराणी काही बोलली नाही. मान खाली करून बसून राहाली.

राजाने तिला गोड प्रेमळ आवाजांत विचारले—"मुली! तू काय ते खरे सांग. तुला कोणाची भीती? सांग, या मुलाच्या बापाचे नांव सांग."

रूपराणीने एकदां मान वर करून राजकुमाराकडे पाहिले व पुन्हा मान खाली करून बसली.

राजकुमाराने खरे वृत्त सांगून राजाजवळ क्षमा मागितली.

रूपराणी पण रडत रडत वडिलांच्या पाया पडली. बापाने तिला उभी करून पोटाशी धरले व म्हणाला—"यांत तुझा अपराध नाही. तुझ्या जन्मापूर्वीच एका सिद्धपुरुषाने हे भविष्य वर्तवले होते. मी ते भविष्य खोटे ठरविण्यासाठी ही सर्व खटपट केली. पण विधिलिखित मिटविणे कोणाला शक्य आहे का?"

राजाने ते सर्व ऐकले व मुलाला क्षमा करून रूपराणीला आपली सून म्हणून कबूल केले. त्याने आपल्या नातवाचे बारसे थाटामाटाने करविले.
















# हरवलेल्या गाई

एका डोंगराळ प्रदेशांत रामू नांवाचा एक गरीब अनाथ मुलगा होता. तो कामाच्या शोधार्थ हिंडत असता त्याला डोंगराच्या उतरणीवरील एका गांवी एक शेतकरी दिसला. त्यानें त्याला कांहीं काम देता का म्हणून विचारलें.

तो म्हणाला—"गुराख्याचें काम करशील का? माझ्याकडे दहा गाई आहेत. त्यांना रोज चरायला न्यायचे हे काम आहे. तुला एक वर्षभर या कामावर नेमतो. या अवधीत माझ्या गाई दुप्पट झाल्या तर मी तुझे लग्न करून देईन. पण गाई दुप्पट झाल्या नाहींत तर मी काय करीन हे सांगत नाहीं."

शेतकऱ्याची अट रामूने कबूल केली व त्याच्याकडे गुराख्याच्या कामावर लागला. तो रोज मालकाच्य दहा गाई चरायला घेऊन जाई व संध्याकाळी त्यांना घेऊन परत येई.

एकदा तो गाईंना चरायला घेऊन रानात गेला असता तेथें एक मुलगा आला. रामूबरोबर झाडाखाली बसून तो गप्पा मारू लागला. काळोख पडू लागल्यावर रामू गाईंना घेऊन घरी निघाला तेव्हां तो त्याला म्हणाला—"तुला एक गंमत दाखवतो, ती पहा!" असे सांगून त्यानें लहान लहान दगड जमा केले. नंतर त्या दगडांवर मंत्र टाकल्यासारखा काहीतरी पुटपटला. "कां असे कां करतो आहेस?" रामूने विचारले. तेव्हां तो म्हणाला—"मी या दगडांचा ढीग करून यांवर मंत्र टाकला आहे. उद्या येऊन गंमत पहा. या दगडांच्या जागी तुला काजूंच्या मिठाईचा ढीग दिसेल."

सौ. कमलाबाई पाटकर

रामूला ते सर्व खरे वाटले नाही. पण दुसऱ्यादिवशी तो आला तेव्हां त्या दगडांच्या ढिगाच्या जागीं खरोखरच काजूच्या मिठाईचा ढीग त्याला दिसला. रामू तेथें आला तेव्हां दुसऱ्या बाजूने तो मुलगा पण आला आणि विचारू लागला—"पटली खात्री माझ्या मंत्राची? मी तुला सांगितले होतें ना? ये, आपण दोघे मिळून खाऊ." असे सांगून त्याने त्या काजूच्या बरफीचे दोन भाग केले आणि एक भाग रामूला खायला दिला. दोघांनी आपापल्या वाट्याची बरफी खाऊन टाकली.



रामू आपल्या वाट्याची बरफी पुरी संपवू शकला नाही. त्या पूर्वीच त्याला भोवळ आल्या सारखे झाले. कारण दुसरा मुलगा चोरांच्या एका टोळीतला होता. त्याने रामूला जी बरफी दिली होती, तीत झोपेचे औषध होते. म्हणून रामूला लवकर गाढ झोप लागली.

रामूला झोप लागल्यावर झाडाआड लपून बसलेले चार चोर पुढे आले. त्यांनी रामूला हलवून पाहिले. तो गाढ झोपलेला आहे या गोष्टीची खात्री पटल्यावर चोरांनी गाईंच्या गळ्यात बांधलेल्या घंटा त्यांच्या पट्ट्यासकट त्या मुलाला दिल्या. त्याने त्या एका झाडाच्या फांदीला बांधून ठेवल्या आणि नंतर चोर व तो मुलगा गाईंना हाकून घेऊन गेले.

बऱ्याच वेळानंतर रामूची झोप मोडली. त्याला घंटा वाजत असल्याचे ऐकू आले. परंतु आवाज आकाशाकडून येत असल्याचा भास झाला. म्हणून त्याने वर पाहिलें. तेव्हा त्याला फांदीला टांगलेल्या घंट. अंधूक दिसल्या. वाऱ्याने फांदी हाल. लागली तेव्हां घंटा वाजू लागल्या. प्रथम



त्याला वाटले की होते गाई चरत आहेत व त्यांच्या गळ्यातले घुंगरू व घंटा वाजत आहेत. म्हणून तो मध्ये कित्येकदा झोप मोडली तरी पुन्हा झोपला. आतां त्याची चांगली झोप मोडली तेव्हा खूप काळोख पडला होता. उठून त्याने पाहिले, एक देखील गाय त्याला दिसली नाही. घुंगरू व घंटा वाजत होत्या. त्या झाडावर चढून त्याने काढून घेतल्या आणि घरी गेला. मालकाला म्हणाला—"गाईंना कोणी चोरून घेऊन गेल्यासारखे दिसत आहे" आणि मान खाली करून उभा राहिला.

मालक रामूला रागावला नाही की काही बोलला नाही. "शांता!" त्याने आपल्या मुलीला बोलाविले आणि म्हणाला—"याला देखील इतर नऊ जणांबरोबर ठेवू या."

दुसऱ्या दिवशी मालकाने रामूला बोलावून त्याच्या हातात एक पोते दिले व म्हणाला—"या पोत्यांत बाभळीचे काटे आणि चिंचेच्या काटक्या भरून घेऊन ये."

रामू रानात गेला. पोत्यांत त्याने बाभळीचे काटे व चिंचेच्या काटक्या भरल्या व घरी निघाला. वाटेत त्याला मालकाची मुलगी शांता भेटली. म्हणाली—"हे तू काय करतो आहेस? बाबांनी तुला हे काटे व चिंचेच्या काटक्या तोडून आण्यायला कशासाठी पाठविले होते हे नाही का कळले? बाभळीच्या कांट्यावर तुला आडवा टाकून चिंचेच्या काठीने बडवणार आहेत ते. तू दे हे पोते टाकून आणि पाय काढ. माझ्या बाबांनी आतांपर्यंत नऊ जणांना ही शिक्षा दिली आहे. आमच्या कडे शंभर गाई होत्या. प्रत्येक वेळी दहा या प्रमाणे चोर सगळ्या गाई चोरून घेऊन गेले.



आम्ही आपल्या गाईंना भाग्यलक्ष्मी म्हणत होतो. त्याच नावाने हाक मारले तर त्या उत्तर देत. माझ्या बाबांचा राग जाऊन तुझ्यावर त्यांची मर्जी व्हावी असे तुला वाटत असेल तर तू शंभरच्या शंभर गाई परत आणून दे. नाही तर या बाजूला येण्याचे नाव काढू नकोस."

रामू हुशार होता. त्याने गुराख्याचे काम करायचे ठरविले. पण ज्याच्याकडे शंभर गाईंहून कमी गाई आहेत त्याच्याकडे नोकरी न करण्याचे त्याने ठरविले. एका गावी त्याला असा मालक मिळाला. रामूने त्याच्याकडे जाऊन गुरे राखण्याचे काम मागून घेतले.

तो म्हणाला—"तू अगदी कसा वेळेवर आला आहेस पहा. मला एक गुराखी हवा आहे. पण काही अटींवर. मान्य असतील तर रहा, नाही तर चालू लाग. मी फक्त तीनच महिने तुला काम देणार आहे. तुला मी निराळा पगार असा देणार नाही. तीन महिन्यानंतर ज्या गाई तू बोलावल्याबरोबर तुझ्याजवळ येऊन उभ्या राहतील त्या तुझ्या. तोच तुझा पगार. या पलीकडे तुला निराळा पगार मिळणार नाही."



हा मनुष्य चोरांकडून गाई विकत घेत असे. तोच त्याचा धंदा होता. सौदा पटवून स्वस्तात सौदा पटला तर तो गाई विकत घेई. अशा तऱ्हेने त्याने शेदोनशे गाई एकत्र केल्या होत्या.

रामूला हे कळायला वेळ लागला नाही की त्याच्या जुन्या मालकाच्या गाई यानेच चोरांकडून विकत घेऊन ठेवल्या आहेत. कारण त्याने 'भाग्यक्ष्मी' म्हणून हाक मारतांच काही गाई येऊन त्याच्या जवळ उभ्या रहात. त्याने तीन महिने त्याच्याकडे नोकरीवर कसे तरी पुरे केले. शेवटच्या











दिवशी मालकाने त्याला बोलावून म्हणाला— "बावरे! झाले तीन महिने. उद्या तू आपल्याघरी जा. बोलावल्यावरोबर ज्या गाई तुझ्याजवळ उभ्या राहतील त्या तुझ्या. त्यांना तूं घेऊन जा."

दुसऱ्या दिवशी सकाळी रामू गावात गेला व चार वडीलधाऱ्या गावकऱ्यांना बोलावून घेऊन आला. त्यांना पाहून मालकाने त्याला विचारले—"यांना बोलावून कशासाठी आणले आहेस?"

"सहज! समजा, काही गाई मी बोलावल्यावर माझ्याजवळ आल्या व मी त्यांना घेऊन जाऊ लागलो तर कोणी म्हणेल की मी त्या चोरून घेऊन जातो आहे. म्हणून अटीप्रमाणे माझ्या पगाराच्या म्हणून ज्या गाई होतील त्या साक्षी ठेवून मी नेणार आहे." तो म्हणाला.

"ठीक! तर मग बोलाव गाईंना!" मालक रागाने म्हणाला.

रामू, गाईच्याजवळ न जाता 'भाग्य-लक्ष्मी' असे नांव घेऊन गाईंना एक एक हाक मारू लागला. थोड्याच वेळात शंभर गाई पुढे येऊन त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभ्या राहाल्या. रामूने सर्वांसमक्ष त्या गाई हाकून नेल्या व आपल्या जुन्या मालकाकडे गेला.

म्हणाला—"या घ्या, तुमच्या दहा गाईंच्या शंभर गाई करून घेऊन आलो आहे."

शांता धावत जाऊन गाईचे घुंगरू घेऊन आली व ते गाईंच्या गळ्यांत बांधून टाकले. शांताच्या बापाने रामूला वचन दिल्याप्रमाणे आपला जावई करून घेतले.





सक्त आहे. जरासंधाने जगातल्या सर्व क्षत्रियांना एकत्र करून विनाकारण मथुरेवर कशी स्वारी केली हे तुम्हांला माहीतच आहे. हे संकट अद्याप पूर्णपणे टळलेले नाही. आमच्या अंगात शक्ती व सामर्थ्य भरपूर आहे. आपल्याकडे हत्ती, घोडे व रथ आहेत. भरलेला खजिना आहे. परंतु या सर्वांचा उपयोग काय? शत्रूने स्वारी केली कीं या सर्वांचा नाश होतो व पुन्हा आपल्याला जमवाजमव करावी लागते. एखाद वेळची गोष्ट असेल तर त्याला ही हरकत नाही. पण हे नित्य होत आहे व पुढे होत राह-णार. म्हणून येथून निघून जाणे मला तरी इष्ट वाटते. आपण कोठे तरी दूर जाऊन राहणे बरोबर होईल. तिकडे थोडा तरी आराम मिळेल."

कृष्णाची सूचना यादवांना पटली. कारण जरासंधाचा वध करणे अशक्य होते. त्याचे सैन्य पण अफाट होते. युद्ध चालू ठेवणे शक्य होते. पण किती दिवस युद्ध कर-णार? युद्धाचा शेवट लवकर होणार नाही हे प्रत्येकाला कळत होते. दोन्ही पक्ष्यांना ते आत्मघातीच ठरले असते. तेव्हां कृष्णाने जर एकादा अधिक सुरक्षित प्रदेश सुचवला तर तिकडे जाणे हिताचे होईल असे याद-वांना वाटले.

यादवांना घेऊन कोठे जायचे हे ठर-वून कृष्णाने निघण्याची तयारी करण्यास सांगितले.

त्याच वेळी अशी बातमी आली की कालयवन हा मथुरेवर स्वारी करण्यासाठी निघाला असून त्याच्या मदतीला जरासंध पण येत आहे. तेव्हां कृष्ण म्हणाला— "तर मग चला आजच आपण मथुरानगर सोडून निघून जाऊ. आजचा दिवस पण चांगला आहे."

वसुदेव, उग्रसेन, बलराम व कृष्ण निघाल्यावर त्यांच्या पाठोपाठ अंधकवीर आणि त्यांच्या कुटुंबांतील लोक, असंख्य हत्ती, रथ, घोडे आणि आपली जंगम संपत्ती बरोबर घेऊन सर्व मथुरेहून पश्चिमेकडे निघाले. ते समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर आले. तो प्रदेश फुलाफळांनी व वागायतीने भरलेला होता. त्याच ठिकाणी कधी काळी एकलव्याने द्रोणाचार्यांची पूजा केली होती.

सोईची जागा पाहून त्यांनी घरें कोठे बांधावयाची व बागाईत कोठें करावयाची हे ठरविले. तेथे सर्वांनी प्रयत्न व मेहनत करून एक सुंदर नगर वसविले व त्या नगरीचे नाव द्वारवती ठेवले. सर्वांनी स्वतःच्या हौशीप्रमाणे स्वतःसाठीं सुंदर घरे बांधून घेतली. यादवांच्या मनांतून आतां शत्रुभय नाहीसे झाले आणि सर्व सुखासमाधानाने द्वारवती येथे राहू लागले. परंतु द्वारवती नगरीची स्थापना होण्यापूर्वी अनेक गोष्टी घडल्या.

कृष्ण, कधी शत्रूला भ्याला नाही आणि आता कालयवन येत आहे हे ऐकून त्याच्याशी युद्ध केल्याशिवाय मथुरा सोडून तो निघून गेला आणि दूर द्वारवतीला



जाऊन राहाला तर त्याला पण एक कारण होते. ती गोष्ट अशी.

पूर्वी कधी वृष्णी व अंधक वंशांचा गर्ग नांवाचा एक गुरू होता. त्याने आजन्म ब्रह्मचर्यव्रत घेतले होते. गर्ग यादवांच्या बरोबर रहात असता कोणी त्याची थट्टा केली की तो पुरुष नसून स्त्री आहे. ते ऐकून गर्गाला फार राग आला. तो रागाने रानात निघून गेला. त्याने बारा वर्षे तपश्चर्या केली. शंकर प्रसन्न झाला. त्याला त्याने वर दिला की त्याला जो मुलगा होईल तो वृष्णी व अंधक यांना त्रास





# कृष्णावतार

बलराम गोकुळास जाऊन मथुरेला परत आला. तो सरळ कृष्णाकडे गेला. कृष्णाने त्याचा पदस्पर्श करून त्याला नमस्कार केला. नंतर दोघे भाऊ वसुदेवाकडे गेले. वसुदेव बलरामाला प्रेमाने भेटला व गोकुळांत कोण कोण भेटले व काय म्हणाले, सर्व विचारून घेतले. सर्व वृत्त सांगून बलरामाने, तेथे त्याने [illegible]ळच्या लोकांच्या सुखसोयी साठी जे केले ते वर्णन करून सांगितले. म्हणाला—“मी एका जागी बसून कालिंदी नदीला जवळ येण्यास आज्ञा केली. पण ती आली नाहीं. तेव्हां मी आपल्या नांगराचा फाळ नदींत सोडून नांगर ओढला, म्हणून एक मोठा कालवाच वृंदावनपर्यंत झाला. त्यामुळे पाण्याची उत्तम सोय झाली.”

असाच काही काळ लोटल्यावर एके दिवशी कृष्णाने यादवांची एक सभा भरविली व म्हणाला—“आपल्या या मथुरेसारखे सुंदर नगर इतरत्र कोठे ही नाही. येथल्या जमिनीसारखी सुपीक जमीन पण इतरत्र नाही. आमचे बालपण दुसऱ्या जागी झाले असले तरी आमचा जन्म या मथुरानगरीतच झाला. येथें परत येऊन आम्ही सर्व वैभव व सुख उपभोगले. परंतु आपण येथे आल्याने शत्रूच्या डोळ्यात ही नगरी










देईल. ही गोष्ट यवनेश्वर नांवाचा राजाला कळली. त्याला मूलबाळ नव्हते. तो गर्गला आपल्या देशांत बोलावून घेऊन गेला. त्याच्या राहण्याची व्यवस्था त्याने आपल्या सहस्रावधी गाईंच्या मध्यभागी करून दिली.

गर्ग, तेथे रहात असता एकदा एक अप्सरा गोपीचे रूप घेऊन आली. ती त्याच्या बरोबरच राहू लागली. शंकराचा वर होता त्याप्रमाणे गर्ग व त्या अप्सरेला एक मुलगा झाला. त्याचे नाव कालयवन ठेवण्यात आले. त्या मुलाला यवनराजाने स्वतःच्या मुलासारखे वाढविले. कालयवन फार तेजस्वी, बुद्धिमान व पराक्रमी होता. तो उद्धट होता, कधी कोणाचा आदर किंवा गौरव करणे त्याच्या गावी ही नव्हते.

एकदां यवनराजाकडे नारद आला तेव्हां कालयवनने त्याला विचारले–"जगांत सर्वांत शूर व पराक्रमी कोण आहे?"

नारद म्हणाला–"यादवांहून शूर कोणी नाही." ते ऐकून कालयवनला त्यांच्या शौर्याची परीक्षा घ्यावी असे वाटले. शकवंशीय राजा हिमालपर्वतांत रहात. त्यांना दस्यु म्हणत. कालयवन सांगे तसे ते वागत. त्यांच्या मदतीने कालयवनने एक सैन्य जमविले आणि हत्ती, घोडे, खेचरे व उंट या जनावरांना बरोबर घेऊन तो मथुरेवर स्वारीला निघाला.

नारदाकडून कृष्णाला ही गोष्ट कळली होती. सर्व गोष्टींचा विचार करून कृष्णाने मथुरा सोडून जाण्याचे ठरविले. तसा निश्चय करून कृष्णाने सर्व यादवांना नेहमी सावध राहण्यास पण सांगितले.

कृष्णाने आणखी एक गोष्ट केली. त्याने एका मडक्यांत एक काळा साप ठेवून मडक्याचे तोंड घट्ट बंद केले व एका दूता



करवी ते मडके कालयवनकडे पाठवून दिले आणि कृष्णाच्या अंगात त्या काळसर्पा इतके बळ आहे असे सांगून पाठविले.

ते ऐकून कालयवन काहीच बोलला नाही. काळ सर्प होता त्या मडक्याला एक भोंक पाडून त्यांत मुंग्या सोडल्या, आणि पुन्हा ते मडके कृष्णाकडे पाठवून कृष्णाला हा निरोप सांगायला सांगितलें–" तू किती मोठा पराक्रमी असलास तरी बारीक मुंग्याच्या वेढ्यांत सापडल्यावर सापाचे जसे काही चालत नाही तसे तुझे पण काही चालणार नाही." कृष्णाला त्या निरोपाचा अर्थ कळल्या शिवाय राहाला नाही. म्हणूनच तो मथुरेहून यादवांना बरोबर घेऊन निघून गेला.

तो द्वारवतीहून शस्त्रास्त्र वगैरे काही घेतल्या शिवाय एकटाच शत्रूच्या नगरीत शिरला. परंतु तेथील लोकांनी त्याला ओळखले व " धरा त्याला, पकडा त्याला." असे सर्व ओरडले. कालयवनला पण कृष्ण त्याच्या राजधानींत शिरला असल्याची बातमी कळली. तो देखील काही शस्त्र धारण केल्याशिवाय तेथे आला. परंतु कृष्णाने त्याच्याशी द्वंद्व युद्ध करण्यासाठी म्हणून पुढे येऊन सलामी देण्यासारखे नाटक केले व शिताफीने एका गुहेत शिरला.

त्या गुहेत मांधाता याचा मुलगा मुचिकुंद झोपलेला होता. देवासुरांचे युद्ध झाले तेव्हां त्याने फार मोठा पराक्रम गाजविला होता. त्याच्या सहाय्यानेच देवांना जय मिळाला होता. तो युद्धाचा शीण कमी व्हावा म्हणून तेथे येऊन झोपला होता. देवांनी त्यालावर दिला होता की जो कोणी निद्राभंग करील त्याला मुचिकुंदने नुसते डोळे उघडून पाहिले तरी तेवढ्याने निद्राभंग करणारा भस्म होऊन



जाईल. ही गोष्ट कृष्णाला माहीत होती. म्हणून तो त्याच्या उशाशी लपून बसला.

कृष्णाच्या पाठोपाठ कालयवन गुहेत शिरला. मुचिकुंदला झोपलेला पाहून व त्यालाच कृष्ण समजून त्याने त्याला लाथ मारली व म्हणाला " ऊठ, भित्री भागु-बाई! कळले तू किती मोठा वीर आहेस तो." असे म्हणत तो मोठ्याने हसला.

तेवढ्याने मुचिकुंदाची झोप मोडली. तो उठून बसला. त्याने झोप मोडणाऱ्याकडे रागाने पाहिले आणि वीज पडावी तसा कालयवन जागच्या जागी भस्म होऊन गेला.

नंतर कृष्ण स्वस्थ चित्त होऊन मुचिकुंद यांच्यासमोर उभा राहून " म्हणाला– मला नारदाने तू येथे आहेस हे सांगितले होते. माझे काम झाले, बरे तर मी येतो."

मुचिकुंदने कृष्णाला पाहून चकित होऊन विचारले " पण तुम्ही कोण? येथे कशासाठी आलात? हा भस्म झाला तो कोण? मी केव्हांपासून झोपलो आहे! तुम्हांला माहीत असेल तर सांगावें."

तेव्हां कृष्णाने ही कथा सांगितली– " चंद्रामारस्वाच नहुष पण एक राजा होता. त्याला ययाती नांवाचा एक मुलगा होता.



ययातीला पाच मुलगे होते. सर्वांत मोठ्याचे नाव यदु. त्याच्या वंशांत वसुदेव नांवाचा एक महापुरुष जन्मला. त्याच्या पत्नीचे नांव देवकी. मी वसुदेव देवकींचा मुलगा. वसुदेवाच्या दुसऱ्या बायकोचे नांव रोहिणी तिला जो मुलगा झाला त्याचे नांव बलराम. तो माझा मोठा भाऊ. मला वासुदेव म्हणतात. तुझ्या कोपाग्नीत भस्म झाला तो कालयवन. एक वर मिळाल्याने तो जन्मला व दुसऱ्या एका वरामुळे त्याचा शेवट झाला. तो माझा शत्रू होता. तू त्रेतायुगांत जन्मलास व आतां द्वापर चालू आहे

गुहेंतून बाहेर आल्यावर मुचिकंदने मर्त्यलोकांत अल्पबुद्धीवाले, अल्पपराक्रमी आणि असे वामनमूर्ती पाहून राज्य करण्याची इच्छा सोडून दिली आणि तपश्चर्या करण्यासाठी हिमालय पर्वतांत निघून गेला.

मुख्य शत्रूचा अशातऱ्हेने वध झाल्यावर कृष्णाने काळयवनच्या सैन्यांतील मुख्यमुख्य वीरांना अस्त्रप्रयोग करून ठार केलें. उरलेले सैन्य त्याला शरण गेले. त्यांना बरोबर घेऊन कृष्ण द्वारावतीला परत आला. ते सर्व कळल्यावर सर्व यादवांना फार आनंद झाला. त्यानंतर द्वारवती नगरी निर्माण करण्याचे काम नव्या दमाने सुरू झाले.

द्वारवती नगरी निर्माण करण्यासाठी कृष्णाने स्मरण करताच विश्वकर्मा हात जोडून उभा राहाला व विचारलें—"प्रभो! माझे कां स्मरण झाले? काय आज्ञा आहे?"

"स्वर्गांत इंद्रपुरी आहे तशी या भूलोकांत एका सुंदर नगराचा निर्माण कर." कृष्ण म्हणाला.

"अशा सुंदर नगराचा निर्माण करावयाचा असेल तर पाहिजे. समुद्र थोडा मागे सरकला तेव्हांच हें शक्य होईल." विश्वकर्मा म्हणाला.

कृष्णाने समुद्राजवळ प्रार्थना केली. समुद्र प्रकट झाला. तो बारायोजन मागे सरकला. तेव्हां विश्वकर्म्याने एका मोठ्या नगराचा निर्माण केला. सोन्याचा किल्ला, उंच वाडे, सुंदर राजमार्ग, सरोवरें व उद्याने त्याने तयार करून दिली. राजवाड्यांत कृष्ण सिंहासनावर बसला. यादव प्रमुख त्याच्यासमोर यथास्थानी येऊन बसले. कृष्णाने विश्वकर्म्याचा यथोचित सत्कार केला आणि त्याला निरोप दिला.





# अरण्यपुराण

[१८]

**का**याला अस्वल म्हणाले—"शिकार आहे चांगली." जंगलातली जनावरे परस्परांचे अशाच तऱ्हेने वंदन करतात.

"अस्वल दादा का? शिकार आहे का काळू! मी मागल्या खेपेला शिकारीला निघालो तेव्हा खाली आदळता आदळता वाचलो. फांदीवरून माझा देह खाली सरकू लागला. सरकण्याचा आवाज ऐकून माकडांची झोप मोडली आणि त्यांनी मला शिव्या हासडल्या." काबा म्हणाला.

"बिन पायाचा हिरवा किडा म्हणाली नाही का?" काळा बाघ म्हणाला.

"असं! माकड ते सुद्धा म्हणाली होय? थुःस्...." काबा रागाने फूत्कार सोडू लागला.

"नाहीतर काय? तोंडाला येईल ते बडबडतात माकडे. तुझे सर्व दात कोणी छान पाडले असं देखील म्हणाली. लहान लहान कोकरंच गिळता येतात तुला. मोठी शिकार धरण्याची शक्तीच उरली नाही, म्हणे." वाघाने चिथवण्यासाठी म्हटले.

काबाचं वय तसं मोठच होतं. मोठ्या सापांना राग आला की तो त्यांच्या तोंडावर दिसत नाही. काबाला अंग पिळवटू लागलेला पाहून त्याला राग आल्याचे वाघाने ओळखले.

माकडं रहायला आणखी कोठे तरी गेली आहेत. मी आत्ताच उन्हातून आलो तेव्हा त्याची चालू असलेली हालचाल मी दुरून ऐकली." काबा म्हणाला.

शेवटचे मलपृष्ठ



"आम्ही माकडांच्या शिकारीलाच निघालो आहो." अस्वल म्हणाले.

"तुमच्या सारखे शूर व पराक्रमी माकडांच्या मागे लागला आहा तर त्याचं तसंच कारण पण असलं पाहिजे." काबा म्हणाला.

वाघ म्हणाला—"खरी गोष्ट सांगू का? ही फळभाज्या खाणारी आणि 'किचकिच' ओरडणारी माकडं माणसाचा तो पोर आहे ना त्याला उचलून घेऊन गेली आहेत. तुला माहीत असेल त्या पोरा विषयी?"

"होय मी ऐकलं होतं की एक माणसांचं पिलू लांडग्यांच्या कळपात सामील झालं होतं. पण मला नाही ते खरं वाटलं." काबा म्हणाला.

"त्याच्या सारखा पोर आणखी कोठे मिळणे अशक्य, मी अगदी खरं सांगतो बघ. काय हुशार आहे म्हणून सांगू आणि बहादूर पण तसाच. तो माझी कीर्ती वाढवणार आहे. आम्हांला तो जीव की प्राण आहे रे!" अस्वल म्हणालं.

"प्रेम कसं असतं हे आहे मला माहीत. मी त्याच्या कित्येक गोष्टी तुला सांगेन." काबा असं सांगत असता वाघ म्हणाला—"रात्रभर गप्पा मारीत बसू. आत्तां तो पोरगा माकडांच्या हातांत सापडला आहे आणि जंगलात ही गोष्ट सर्वांना माहीत पण आहे की काबाचे नुसतं नाव ऐकून माकडांच्या अंगाचा थरकाप उडून जातो.

त्यांना माझी दहशत. मूर्ख, दुष्ट! त्यानीच मला हिरवा मासा म्हटलं नव्हतं का?" काबाने विचारले.

"मासा नव्हे, किडा म्हटलं होतं. मी आणखी काय काय ऐकलं. सगळं सांगू लागलो तर तुझ्या अंगाची लाहीच होऊन जाईल. म्हणून मी आता सांगत नाही."

"अस्सं....! तर मग त्यांच्या समाचाराला गेलं पाहिजे. त्या पोराला घेऊन ती कोठे गेली आहेत?" काबाने विचारले.

"सूर्यास्ताच्या बाजूला. आम्हांला वाटत होतं की तुला सर्व माहीत असेल." अस्वल म्हणालं.

"मला? हें कसं काय कळणार? मी माकडां बेडकांची शिकार नाही बुवा करीत. ती जवळ आली की मी त्यांना धरतो." काबा म्हणाला.

इतक्यांत आकाशांतून कोणी तरी हाक मारली—"अस्वला! इकडे बर पहा." तो गिधाडाचा आवाज होता. त्याने अस्वलाच्या शोधार्थ सारे जंगल पालथे घातलं होतं. ते पुढे म्हणालं—"मी मौवलीला माकडांबरोबर पाहून आलो आहे. त्याने तुला तो कोठे आहे हे कळविण्यासाठी मला सांगितलं. माकडं नदी पलीकडे माकडांच्या गावी त्याला घेऊन गेली आहेत. ते मोडकळीला आलेले एक गांव आहे ना तेथे. मी त्याला सांगितलं की त्याने रात्रभर माझ्या साठीं वटवाघळांची शिकार करीत रहावे. खाली तुम्हाला शिकार करावयाची आहे. बरं तर येतो मी. नमस्ते!" असे सांगून गिधाड निघाले.



"अरे गिधाडदादा! पोटभर खायला हवं आणि खूप झोप. या खेपेस मी ज्या जनावराची शिकार करीन त्याचं डोकं तुझ्या साठी वगळून ठेवीन." वाघ म्हणाला.

"पण हे सर्व कशाला? मी असं केलंच काय इतके उपकार मानायला? त्याने निरोप सांगायला सांगितला, उडता उडता तो सांगून टाकला." असे सांगून गिधाड आकाशांत उडून गेले.

"ठीक वेळेवर त्याला पक्ष्यांची भाषा आठवली. काय पण कुशाग्रबुद्धी आहे

त्याला." असे म्हणत अस्वल कौतुक करीत मान डोलवूं लागला.

"तुझ्या टपल्या शिरल्या असतील डोक्यांत. आता आपल्याला त्या पडक्या गांवी जायचं आहे म्हटलं." वाघ म्हणाला.

ते पडकं गाव कोठे आहे, तिघांना माहीत होतं.

"आम्ही नाही थांबत तुझ्यासाठी. मी व कावा होतो पुढे. तू हळू हळू ये पाठी मागून." वाघ म्हणाला.

"मला पाय नसले तरी मी तुमच्या सारखा लवकर येऊं शकेन बरं का!" कावा म्हणाला.

अस्वल चार पावलं जोराने धावलं. पण थोडं चालल्यावर धापा टाकू लागलं. म्हणून त्याला बसावं लागलं. बाकी दोघे पुढे निघाले. वाघ भरधांव चारी पायांवर धांवत होता आणि कावापण त्याच्या पाठोपाठ चालला होता. वाटेत ओढा लागला. वाघ उडी मारून पलीकडे गेला. पण अजगराला थांबावं लागलं. ते पण हळू हळू पोहोत पलीकडे गेलं. तरी थोडं मागे पडलं.

"कावा! तुला काय वाटलं तुलाच जास्त जोराने चालता येतं." वाघाने विचारलं.

"मला लागली आहे भूक! मला तो डाग असलेला बेडूक म्हणाली होती नाही का!" कावाने विचारलं.

"डाग असलेला बेडूक नव्हे, हिरवा किडा" वाघ म्हणाला.

"एकच! चल!"

कावा डोळे सरळ वाटेकडे रोखून चालला होता. त्याचा देह पाण्यासारखा वाटेवर जणु काही वहात चालला होता.





# ७२. ओल्डवायची दरी

पूर्व आफ्रिकेत टांजानिया देशांत ओल्डवाय दरी आहे. इतिहास संशोधकांनी वीस लाख वर्षांपूर्वीच्या मनुष्याचा व त्याच्या प्रस्तर युगांतील हत्यारांचा शोध लावला आहे. या दरीत हे संशोधनाचे कार्य १००-२०० वर्षे चालेल एवढं आहे.



व अधिकारबाह्य' असल्याचे सांगितले. त्यांनी कंपनीचे सैन्य मागे घ्यावे अशी आज्ञा दिली.

काही महिन्यानंतर कलकत्त्याहून कर्नल अपटन पुण्याला आला आणि त्याने तेथल्या सरकारशी संधीची बोलणी सुरू केली. १ मार्च १७७६ या रोजी पुरंदरची संधी झाली. या संधी अन्वये सुरतेची संधी रद्द करण्यांत आली. परंतु साल्सेट व वसई इंग्रजांकडेच राहाले. नुकसान भरपाई म्हणून पुण्याच्या सरकारला इंग्रजांना १२ लाख रुपये द्यावे लागले. इंग्रजांना राघोबाचा पक्ष सोडावा लागला, आणि त्याला कोपरगांव येथे राहाण्यास सांगण्यात आले. पुण्याच्या सरकारने त्यांना मासिक २५ हजार रुपये पेन्शन म्हणून द्यावे असे सांगण्यात आले.

परंतु या संधीची अंमल बजावणी झाली नाही. कारण मुंबईच्या कंपनी सरकारला या अटी मान्य नव्हत्या. त्यांनी ह्या संधीला साफ नकार दिला. अपटनच्या कारवायांकडे दुर्लक्ष केले आणि राघोबाला आश्रय दिला. पुण्याच्या सरकारने पण संधीची अंमल बजावणी केली नाही. १७७७ मध्ये नाना फडणीस यांनी एका फ्रेंच नागरिकाला पश्चिम किनाऱ्यावरचें एक ठाणे देऊ केले. त्याचा परिणाम असा झाला की मुंबईच्या कौंसिलला फ्रेंचांच्या डाव पेचांविषयी शंका वाटू लागली. इंग्रजांनी पुन्हां युद्ध सुरू करण्यासाठी ६०० इंग्रज व ३२०० एतद्देयशीम शिपाई पाठविले. ७ जानेवारी १७७९ या रोजी तळेगांव नजीकच्या डोंगराळ प्रदेशांत मराठा सैन्याने या सैन्याला थोपवून त्याचा पराभव केला.





# नागराजाचा कोप

एका गांवी एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. अकाल मरण आल्यामुळे त्याच्या मुलीला व बायकोला कोणा वडीलधाऱ्या पुरुषाचा आधार उरला नाही. परंतु गांवचा पाटील त्यांच्या मदतीला किंवा चवकशी करायला येत जात असे. त्याचा आधार मिळाल्याने मायलेकींना कसली उणीव भासत नव्हती. मुलीचे नांव वासंती होते. वासंती लग्नाला झाली होती. ती दिसायला पण सुंदर होती. तिच्या सौंदर्यावर मुग्ध होऊन मोठ मोठ्या लोकांकडून निरोप येऊ लागले होते.

सर्व गोष्टी पाटलांच्या सल्ल्याने ठरत असल्या कारणाने आईने मुलीच्या लग्नाविषयी पण पाटलांचा सल्ला घेण्याचे. ठरवून त्यांचे मत विचारले.

"वासंतीच्या लग्नाची तुम्ही एवढी काळजी कशाला करता वहिनी? तिच्याशी मीच लग्न करून घेईन म्हणतो. म्हणून तर मी इतके दिवस सर्व जबाबदारी घेऊन काम करीत होतो." पाटील म्हणाले.

हे ऐकून आईच्या हृदयाला धकाच बसला तिला काळजी वाटू लागली. पाटलाची तीन लग्ने तो पर्यंत होऊन गेली होती व तिन्ही बायका जिवंत होत्या. इतक्या वृद्ध माणसाशी मुलीचे लग्न करून तिला मृत्यूच्या मुखांत ढकलण्याची गोष्ट कोणत्या आईला आवडेल?

पाटलाने एका मुलीशी लग्न करण्याचे ठरविल्यावर त्याच्या विरुद्ध बोलण्याची छाती कोण करणार? त्या गांवांत तरी कोणी नव्हताच. तशी त्यांची बाजू घेऊन बोलणारा दुसरा होता तरी कोण? मग मदत कोण



करणार? म्हणून मध्यरात्रीच्या सुमारास वासंती मुलीला घेऊन कोणाला कळविल्या शिवाय गांवाबाहेर निघाली.

वाटेत, रानांत त्यांना एक देऊळ दिसले. त्या देवळांत काही वेळ विश्रांती घ्यावी असे मायलेकींनी ठरविले. देवळाला लागून एक फुलाची बाग होती. त्या बागेत पुष्कळ सुवासिक फुलें होती. फुले तोडण्यासाठी वासंती बागेत गेली तेव्हां एक सांपाचे पिल्लू झुडपातून बाहेर आले. लगेच मागे पुढे न पाहातां आईने एक दगड मारून त्या सांपाला ठार केले.

वासंतीने काही फुले डोक्यात घालीत आईला विचारले—"उगाच त्या सापाला कां मारलेस आई?"

वासंती आपले गाठाडे घाई घाईने घेऊन देवळात गेली. तिची आई पण आपले गाठाडे घेऊन तिच्या पाठोपाठ देवळांत गेली. परंतु आंत वासंती नव्हती. तिचे फक्त गाठोडेच होते. देवळांत पांच फणांच्या नागाची मूर्त होती. वासंती त्या मूर्तीमागे लपून बसली असेल कदाचित असे वाटून तिने त्या मूर्तीमागे पाहिले. पण वासंती तिथे पण नव्हती.

"बाळ, वासंती!" आईने अशी दोन तीनदां हाक मारली. पण काही उत्तर आले नाही.

पण नागाच्या मूर्तीतून एक आवाज आला—"तू माझ्या मुलाला मारलेस म्हणून मी तुझ्या मुलीला अदृश्य केले आहे."

आईला फार पश्चात्ताप वाटू लागला. ज्या मुलीसाठी ती घर सोडून आली होती ती मुलगीच अदृश्य झाली. तिला काय करावे हेच सुचेना.

तिने नागराजा समोर डोकें टेकून नमस्कार केला व नाक रगडून क्षमा



मागितली—"देवा! नकळत माझ्याकडून हा अपराध घडला. त्याबद्दल मला दंड दे. माझ्या मुलीला देऊ नकोस."

"तुझी मुलगी जिवंत आहे, पण अदृश्य आहे. माझ्या देवळाजवळून जाणाऱ्या येणाऱ्याला तुझी मुलगी तीनदा बोलावील. जो कोणी हाक ऐकून व त्यावर विश्वास करून देवळांत येईल त्याच्याशी तिचे लग्न होईल." नागराज म्हणाला.

त्यानंतर ती दिवसभर सकाळ संध्याकाळ नागराजाचे ध्यान करू लागली. दिवसभर ती देवळाबाहेर एका झाडाखाली बसून राही. जवळपासच्या झाडांची फळे तोडून आणून ती खाऊन त्यावर कसाबसा आपला जीव राखून राहाली.

एकदा एक लाकूडफोड्या त्या बाजूला आला. देवळांतून "एकदां आंत याल का?" त्याला वासंतीचा आवाज ऐकू आला. तो देवळात गेला. पुन्हा बाहेर येऊन म्हणाला—"कोणी दिसत नाही आत. काय पण विचित्र आहे." असे त्याच्या मनात आले व ते तोंडाबाहेर पण पडले.

"कोणी कां नाही म्हणता? आंत एक मोहिनी पिशाचीण आहे." आई म्हणाली.



पुन्हा वासंती म्हणाली—"आंत याल का जरा!" तें ऐकून लाकूडफोड्या घाबरून पळून गेला.

नेहमी असाच कोणीना कोणी तरी येई. कधी लाकूड फोड्या, कधी चोर लपायला आलेले, कधी असाच कोणी. देवळाजवळ आल्याबरोबर प्रत्येकाला तो आवाज ऐकू येई व आई त्याला घाबरून सोडून पाठवून देई.

काही दिवसांनी एक राजकुमार त्या बाजूला आला. त्याला सुद्धा वासंतीने बोलाविले. त्याला तो आवाज ऐकू आल्या-बरोबर तो आंत गेला. त्याला कोणी

दिसलं नाही तेव्हा त्याने देवळाच्या चारी बाजूला हिंडून पाहिले. आंत कोणी नव्हते. पुन्हा त्याला आवाज ऐकू आला. त्याने पुन्हा आत जाऊन पाहिले. आत कोणी नव्हते. त्याने झाडाखाली बसलेल्या वासंतीच्या आईला विचारले—"कोण बोलावते आहे ही?"

"मला नाही बाई ऐकू आलं." आई म्हणाली.

इतक्यात वासंतीने तिसऱ्या वेळी हाक मारली. राजकुमार पुन्हा आंत गेला. त्याच्या पाठोपाठ आईपण आत गेली. या खेपेस वासंती आत दिसली. ती बेशुद्ध स्थितीत नागदेवाच्या पायाशी पडली होती.

राजकुमाराने लगेच तिला उचलले. तिच्या तोंडावर पाणी शिंपडले. काही वेळाने ती शुद्धीवर आली. एका अपरिचित माणसाला तिच्या तोंडावर पाणी शिंपडत असलेला पाहून लाजेने तिचे गाल लाल झाले. इतक्यांत समोर तिला तिची आई दिसली. "आई!" असे मोठ्याने ओरडत ती उठली व आईला मिठी मारली.

नंतर आईने राजकुमाराचे आभार मानले व म्हणाली—"आपल्या या उपकारांची फेड कशी काय करू मी? तुम्ही माझ्या मुलीला जीवदान दिले आहे." नंतर तिने सर्व वृत्त थोडक्यांत सांगितले.

ते ऐकून राजकुमार म्हणाला—"तुमच्या इच्छे प्रमाणे तुमच्या मुलीशी लग्न करायला मी तयार आहे."

त्यानंतर मायलेकी त्या राजकुमाराबरोबर त्याच्या राजधानीत गेल्या. तेथे राजकुमार व वासंती यांचा विवाह थाटामाटाने पार पडला.





# पाताळ कोट

|२०|

[राक्षस कालदा गरुडाला पाहून साष्टांग नमस्कार करू लागले तेव्हा मांत्रिकाने डोंगरावरच्या सरोवराचे पाणी पाताळकोटात सोडले. त्या पाण्यात कित्येक राक्षस बुडून प्राणास मुकले. जे जिवंत राहिले त्यांना घेऊन कालकली भुयाराकडे निघाला. त्या भुयाराच्या तोंडावर कुंभीर व शशिकांत राक्षसांच्या वाटेवर आडवे उभे होते. —पुढें]

भुयाराजवळ पोचताच कालंधर मांत्रिक आनंदातिरेकाने ओरडून म्हणाला "कुंभीर! आता तू पाताळकोटाचा राजा झालासच समज. तुझे राहु वंशीय राक्षस पिढ्यान पिढ्या दंडकारण्यांत राज्य करतील केतु कुळाचा नाश झाला."

मांत्रिक हे अजून बोलतच होता, की इतक्यात धूमकने पाठीमागून येऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवला व म्हणाला—"महाकली भुयाराच्या दाराकडे येत आहे!

त्याचा काय हेतू आहे, ते मला माहीत आहे. येऊ दे जवळ त्याला. त्याच्यावर हे मोठमोठे दगड सोडा. त्याचा व त्याच्या अनुयायांना मोक्ष मिळेल. एका दोघांना कुंभीरच्या मदतीला पाठवा व सावध रहायला सांगा त्याला."



मांत्रिकाचे वाक्य पुरे होण्यापूर्वीच भयाराच्या दारावर कालकली येऊन पोचलेला दिसला.

"जय कुंभवती," असे म्हणत त्याने हळूच आपल्या हत्तीच्या मस्तकावर गदाप्रहार केला. लगेच हत्ती पाण्यात शिरला. त्याच्या पाठोपाठ कालकलीचे अंगरक्षक ज्या हत्तीवर बसून येत होते तो हत्तीपण पुढे सरसावला. हत्तीने भुयाराच्या दारावर बसवलेल्या मोठमोठ्या शिळा आपल्या डोक्याने ढकलून वाट केली. कालकलीला बाहेर येताच मांत्रिक व त्याच्या मित्रांनी पाहिले. त्याचवेळी भुयारातून आणखी जोराने पाण्याचा ओघ आला व त्यामुळे कालकली व त्याच्या अंगरक्षकांच्या हत्तींचे पाय डगमगू लागले. तिकडे कुंभीर व त्याच्या साथीदारांनी धोपवून ठेवलेले सिंह चवताळून गर्जना करू लागले. त्यांना सावरण्याचा कुंभीर व त्याचे साथीदार प्रयत्न करीत असता कालकली मोठ्याने ओरडून म्हणाला—"कुंभीर! अरे, तू येथे काय करतो आहेस? विश्वासघातकी! तूच भुयाराच्या तोंडावर शिळा ठेवल्या होत्यास आम्हांला बाहेर येता येऊ नये म्हणून होय ना?" असे म्हणत त्याने आपला हत्ती कुंभीरवर सोडला.

पण कुंभीर त्याला तयारच होता. त्याने आपल्या सिंहाला हत्तीच्या अंगावर सोडले आणि "राहू वंशकी जय!" असा जयजयकार करीत तो पुढे सरसावला. त्याने आपला भाला नेम धरून कालकलीवर फेकला. पण त्याचा नेम चुकला व भाला हत्तीला लागला. त्यामुळे हत्ती बावरून गेला. कालकलीने त्याला सावरण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण हत्ती मोठमोठ्याने ओरडत जंगलाकडे पळत सुटला.

कालकलीचे अनुयायी त्याच्या पाठोपाठ पळत सुटले. कुंभीरने आपल्या अनुयायांना



बरोबर घेऊन त्याचा पाठलाग केला. तिकडे शशिकांतने कालकलीला वाटेत अडविले व त्याच्यावर शरवृष्टी सुरू केली.

कालशंबर मांत्रिक मोठ्याने ओरडला—"शांभवी! त्या दुष्टाला ठार कर. आलोच मी." असे म्हणत त्याने खाली उडी मारली व कालकली वर धावून गेला. धूमक, सोमक, भद्र वगैरे मांत्रिका पाठोपाठ त्याच्या मदतीला धावले.

भयारातून पाण्याच्या ओघाबरोबर जे राक्षस भुयाराबाहेर आले त्यांना कुंभीरच्या अनुयायांनी ठार केले. कारण पाण्यात गटांगळ्या खात पोहोत ते इतके दमून गेले होते की स्वतःचे रक्षण करायची देखील त्यांच्यात शक्ती उरली नव्हती. वाघ व चित्ते त्यांच्यावर तुटून पडले व त्यांनी त्यांना फाडून चिरून टाकले.

प्रसंग ओळखून कालकलीने पळ काढण्याचा विचार केला. कारण शत्रूला तोंड देणे अशक्य आहे हे त्याला चांगले कळत होते. परंतु कालशंबर व त्याच्या अनुयायांनी त्याची वाट अडवून धरली होती." पाहिजे तर त्याला डोंगराकडे निघून जाऊ दे. कारण एकदा तो जंगलांत शिरला तर



त्याला हुडकून काढणे अशक्य होईल." मांत्रिक अनुयायांना म्हणाला.

महाकली व त्याच्या अंगरक्षकांना सर्वांनी मिळून चारी बाजूने रान घेरले होते. जंगलाच्या बाजूने कुंभीर व त्याचे अनुयायी दगडांचा व झाडाच्या फांद्यांचा वर्षाव त्यांच्यावर करीत होते. दुसऱ्या बाजूने शशिकांत व सोमक शरवृष्टी करीत होते. धूमक दोघां साथीदारांच्या मदतीने कांतिसेना व भामा सिंगनीला तेथून दूर सुरक्षित स्थानी पोचविण्याचा खटपटीत होते.



आता सुटका नाही हे कालकलीला चांगले कळत होते. तो काही वेळ गदा घेऊन स्वतःचे रक्षण करीत होता. नंतर त्याने अंगरक्षकांना सावध रहायला सांगितले व स्वतः शशिकांतावर धावून गेला. शशिकांत बाणांची वृष्टी करून ही हत्तीला अडवू शकला नाही. अशा तऱ्हेने कालकली शत्रूची फळी फोडून डोंगराकडे पळत सुटला. त्याच्या पाठीमागून त्याच्या अंगरक्षकांचा हत्ती पळू लागला.

चांगली वाट असल्याशिवाय हत्तीवर बसून पळून जाणे तितकेसे सोपे नाही हे कालकली ओळखून होता. इतक्यात त्याला समोर एक गुहा दिसली. गुहेचे तोंड इतके मोठे होते की हत्तीवर बसून त्याला आंत शिरणे शक्य होते. थोडा वेळ थांबून व मागे वळून तो आपल्या अंगरक्षकांना म्हणाला—"आता आपण शत्रूपासून पुष्कळ दूर येऊन पोचलो आहो. मी ज्या गुहेत शिरणार आहे ती त्यांना कळणे शक्य नाही. मी त्या समोरच्या गुहेत शिरत आहे. तुम्ही पण कोणत्या तरी गुहेत शिरून बसा."

महाकालीचे अंगरक्षक त्यांचा मालक गुहेत शिरल्यानंतर एका गुहेत शिरण्यासाठी निघाले. त्यांनी एकदा मागे वळून पाहिले की शत्रूला ती जागा दिसत तर नाही? आणि एका गुहेत शिरण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु त्यांच्या दुर्दैवाने हत्तीचे डोके गुहेच्या दाराला लागले व त्याच्या धक्क्याने एक मोठा दगड गडगडत येऊन त्यांच्या मानेवर पडला व ते गिरिमिरी येऊन खाली जमिनीवर आदळले. ते ओरडू सुद्धा शकले नाहीत. तेवढ्यांत वरून हसण्याचा आवाज आला व आणखी काही दगड येऊन त्यांच्या अंगावर पडले. अशा तऱ्हेने अंगरक्षकांना कपाळ-मोक्ष मिळाला.



इतक्यांत एक खुजा राक्षस "राहू व केतू वंशाचा नाश होवो." असा ओरडत दगडांच्या आडून समोर आला. त्याच्या पाठी मागे त्याची रानटी जातीची बायको जोर जोराने टाळ्या वाजवून जणुकाही त्याला प्रोत्साहन देत होती. दोन तीन मिनटांत कुंतल देशाचा मंत्री गंगाधर काही साथी-दारांना बरोबर घेऊन तेथे आला. खुजा राक्षसाने त्याला कालकली लपून बसला होता ती गुहा दाखविली. मंत्र्याने सूचने-वरून त्याचे अनुयायी मोठ्याने ओरडून मांत्रिक, सोमक इत्यादिकांना कालकली तिकडे जवळच लपला असल्याची सूचना देऊ लागले.

त्याप्रमाणे मांत्रिक, शशिकांत, कुंभीर गुहेजवळ आले. मंत्री गंगाधर डोंगरावरून खाली उतरून आला. आपल्या मुलाला प्रेमाने भेटला. दोघांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू वाहू लागले. म्हणाला—"शशि! माझी पूर्णखात्री होती की तू जिवंत आहेस. हा खुजा राक्षस तीन महिन्यापूर्वी आपल्या राजधानीत आला. त्याच्या कडून पाताळ-कोटाचा गुप्त मार्ग कळला. मी थोडे सैन्य घेऊन काही दिवसापूर्वी येथे आलो.



पाताळ कोटाचा सर्वनाश मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिला. छान झाले. राजकन्या कांतिसेना कोठे आहे?"

कांतिसेना व मामासिगनी काही वेळाने तेथे आल्या. मंत्री गंगाधराने राजकन्येला तिच्या वडिलांची खुशाली कळविली आणि म्हणाला—"तूर्त कदंब देशांत राजवट बदलली आहे. राजा कोणीच नाही. पण तू आपल्या राज्यांत पोचल्याबरोबर तुला आपली राणी करून घ्यायला प्रजा तयार आहे. त्यानंतर तू ज्याच्याशी लग्न करशील तोच राजा होईल."



"शशिकांत व राजकन्या कांतिसेना यांचा प्रेम विवाह होऊन बरेच दिवस झाले आहेत. मी तिला उचलून घेऊन आलो होतो त्या दिवशी मी तिला जे वचन दिले होते ते आज पुरे झाले." कुंभीर म्हणाला.

ते ऐकून लाजेने कांतिसेना स्मित करीत खाली मान करून उभी राहिली. कालशंबर मंत्री गंगाधरसमोर येऊन म्हणाला— "महामंत्री! या सर्व नाटकाचा शेवट सुखांत होत आहे. धूमक व सोमक या दोघांनी जी मदत केली आहे ती कधी विसरता कामा नये. भद्र तर आपलाच अनुयायी आहे. मी कुंभीरला वचन दिले आहे की पाताळकोटाचे राज्य त्याला देऊन मी परत कालीच्या सेवेला डोंगरांत निघून जाईन." नंतर खुजा राक्षसाकडे वळून मांत्रिकाने त्याला विचारले— "कालकली लपला आहे ती गुहा कोणती?"

खुजा राक्षसाने ती गुहा दाखविल्यावर मांत्रिक गुहेसमोर जाऊन उभा राहाला. त्याने आपला मंत्रदंड वर उचलून कालकलीला हाक मारली— "कालकली, ये बाहेर! भित्री भागु बाई! लपून काय बसला आहेस? तुझाकाळ हा मी तुझ्यासमोर उभा आहे पहा! ये माझ्याशी द्वंद्व करायला. माझे अनुयायी तुझ्यावर शस्त्र उगारणार नाहीत. तू मला जिंकलेस तर माझे अनुयायी तुला अडवणार नाहीत. तुला, जिकडे जावयाचे आहे तिकडे जाऊ देतील."

लगेच कालकली गदा घेऊन गुहेबाहेर आला. म्हणाला— "तरमग होऊ दे द्वंद्व! मी हत्तीला गुहेत सोडून पायी धर्मयुद्ध करण्यासाठी आलो आहे." असे म्हणत तो मांत्रिकाच्या अंगावर धावून गेला.

कालशंबरने गदेचा वार मंत्रदंडाने अडवला. म्हणाला— "पापी! तू लपून वार करून ज्याचा वध केलास त्या माझ्या पित्याचाच हा मंत्रदंड आहे. तुझी शंभर वर्षे भरली आहेत. तुझ्या अंगाला हा मंत्रदंड लागताच पाण्याच्या बुडबुड्यासारखा तुझा देह फुटून जाईल. बरे तर ये, तुझ्या गदायुद्धाचे कौशल्य तर पाहू दे." असे सांगून मांत्रिक पुढे सरसावला.

मांत्रिक जे म्हणाला ते ऐकून कालकलीचा धीर सुटला. तो थर थर कापू लागला. गदेने मंत्रदंडाचा वार अडवीत तो मागे सरकू लागला. पण कालशंबरने कालकलीला पळून जाऊ दिले नाही. तो त्याच्यावर वार करीतच राहाला. तो दमून गेल्यावर "दुष्टा, मर आतां." असे म्हणत त्याने डाव्या हाताने त्याची गदा अडवली व मंत्रदंड त्याच्या छातीत खुपसून त्याला ठार केले. डोळ्यांना दिपवून सोडणारा उजेड झाला आणि कानठळ्या बसतील इतका मोठा आवाज झाला. कालकलीच्या शरिराचे तुकडे तुकडे होऊन आकाशांत उडाले.

मंत्री गंगाधर आदिकांनीं कालशंबरचा जयजयकार केला. मांत्रिकाने कालकलीची गदा कुंभीरच्या हातांत देत म्हटले— "कुंभीर! तू यापुढे दंडकारण्याचा राजा झालास. जो पाताळकोट शिल्लक आहे तो तुझा आहे."



"महामांत्रिक! मी आपला फार फार आभारी आहे. माझी आपणाजवळ अशी विनंती आहे की सरोवरांतले पाणी पाताळकोटांत कधी शिरणार नाही याचे वचन द्या." कुंभीराने महामांत्रिकाला नमस्कार करीत अशी विनंती केली.

"ते काम मी सर्वांत प्रथम करीन. दगड यथास्थानी ठेवला की झाले. घाबरू नकोस तू." कालशंबर म्हणाला.

मंत्री गंगाधर व त्याचे अनुयायी आणि कुंभीर व त्याचे अनुयायी यांनी ती रात्र आनंदाने घालविली. मेजवानी झाली, नृत्य

व गायन झाले. मंत्री गंगाधर कुंभीर व मांत्रिक यांचा पाहुणा म्हणून दोन दिवस राहाला. नंतर कांतिसेना व शशिकांत यांच्यासह आपल्या सर्व अनुयायांना घेऊन तो कुंतलदेशी निघाला.

सर्व निघाले तेव्हां कुंभीर विरूपला एका बाजूला बोलावून म्हणाला "भामा सिंगनी विषयी थोडा संभाळून रहा. ती कालकलीवर प्रेम करू लागली होती. अगदी शेवटी ती यायला कबूलपण होत नव्हती. मी तिचे तोंड बंद करून तिला तिच्या इच्छेविरुद्ध उचलून घेऊन आलो होतो. तू भिल्लांचा सरदार पुलिंद याच्याकडे तिला पोचती केली नाहीस तर दोघे आयुष्यभर तुझ्यावर सूड उगवल्याशिवाय राहणार नाहीत.

"ती त्याची दहावी बायको आहे. मी वेळ पडल्यास तिचे हातपाय बांधून तिला उचलून घेऊन जाईन आणि पुलिंदकडे पोचती करीन. कालकलीचा शेवट झालाच आहे. परंतु त्यांत मला तितकासा आनंद वाटत नाही. कारण या गडबडीत माझा लाडका गरुड कोठे गेला, दिसत नाही." ते बोलत असता त्याच्या तोंडावर दुःख स्पष्ट दिसत होते.

"या डोंगरांत त्याला हुडकून काढून तुझ्याकडे पाठविण्याची जबाबदारी मी घेतो." कुंभीर म्हणाला. असे म्हणत त्याने प्रेमाने विरूपला मुलासारखे खाकेत धरून उचलून खाली ठेवले.

"ओहो! तू राक्षस आहेस, हे मी विसरलोच गेलो होतो." असे म्हणत विरूप जोराने हसत पुढे निघून गेलेल्या आपल्या साथी मित्रांना जाऊन भेटला.

[संपूर्ण]




# तीर्थक्षेत्र

विक्रमार्काने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे काही बोलल्याशिवाय स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! पवित्र काय व अपवित्र काय हे ठरविणे किंवा सांगणे फार कठीण आहे. तू हे कष्ट कोणत्या महात्म्यासाठी करीत आहेस हे नाही मला माहीत. परंतु प्रभास क्षेत्रासारखे तीर्थक्षेत्र दुसरे असेल की नाही शंकाच. तुला कंटाळ येऊ नये म्हणून मी त्या क्षेत्राची कथा सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एकदा प्रतिहार नांवाच्या देशाचे काही व्यापारी उंटावरून माल लादून मनशूर

नांवाच्या नगरी निघाले. वाट एका वाळवंटातून जात होती. कारवानाचा नायक कलिदेव नांवाचा एक मोठा व्यापारी होता. त्याच्याबरोबर सात आठ लहान मोठे व्यापारी पण निघाले. उंट हाकणारे व नोकर चाकर मिळून आणखी वीस लोक होते.

अर्धीअधिक वाट निर्विघ्न पार पडली. मनशूर नगर बारा कोस दूर होते. एकाएकी एक मोठे वादळ आले. दिवसा देखील काळोख पडला. जे उंटावर बसले होते त्यांना उंटांची डोकी पण दिसत नव्हती. जवळ जवळ बारा तास उंटांच्या अंगावर वाळूचे थर बसत होते. मध्य रात्रीच्या सुमारास वारा थांबला.

त्या संकटातून कलिदेव वाचला. तारे चमकत होते. त्यांच्या अंधूक उजेडात त्याने दृष्टी गेली तितके दूर पाहिले. पण त्याला कोठे उंट दिसला नाही की कोणी माणूस दिसला नाही. वाळूचे ढीगच ढीग दिसत होते. त्याने आपल्या नोकरांना हाक मारून पाहिले. पण नाकातोंडात इतकी वाळू जमा झाली होती की तोंडावाटे शब्दच उमटत नव्हता.

थोड्या वेळाने छान उजाडले. त्याला एक भयंकर दृश्य दिसले. दोन उंट व तीन नोकरां खेरीज बाकी सर्व उंट व मजूर मरून पडले होते. काही उंट व मनुष्य वाळू खाली पुरले गेले होते.

जे जिवंत होते ते कलिदेवला म्हणाले—"मालक, आपण ज्या वेळी घरून निघालो ती वेळ चांगली नव्हती. ही जागा किती अशुभ आहे? आपल्या कित्येक साथीदारांना व उंटांना हिने प्रत्यक्ष गिळून टाकले आहे. एक क्षणभर देखील येथे थांबावेसे वाटत नाही.



पण कलिदेवने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. म्हणाला—"असे कसे बोलता? आपले इतके साथीदार येथे मरून पडले आहेत. त्यांची अंत्यक्रिया केल्याशिवाय निघून जाणे रास्त होईल का? ती झाल्याशिवाय येथून निघायला मी तयार नाही."

त्याच्या आज्ञेप्रमाणे नोकर एका खोलगट जागी खड्डा खणू लागले आणि आश्चर्य म्हणजे थोडे खणल्याबरोबर पाणी लागले, इतके की थोड्याच वेळात तो खळगा पाण्याने भरून गेला व एक लहानसा तलाव त्या जागी झाला. सर्वांनी तेथे आंघोळ केली. त्यांनी चामड्याच्या पिशव्या भरून घेतल्या व उंटांना पाणी पाजले. सर्वांना जिवात जीव आल्या सारखे वाटले. ते पाणी अमृतासारखे गोड होते.

नंतर कलिदेवने आणखी दोन जागी खड्डे खणविले. एका खड्ड्यात त्याने मनुष्यांची प्रेते पुरली व दुसऱ्यात उंट पुरून टाकले. नंतर आणखी एक खड्डा खणून त्या लोकांचे जे सामानसुमान होते ते पुरून ठेवले. उरलेल्या उंटावर माल लादून तो पुढल्या प्रवासाला निघाला.



बरेच दिवस लोटले, खड्ड्यातले पाणी जसेच्या तसेच राहाले. एकदा लुटेऱ्यांची एक टोळी घोड्यावर बसून त्या जागी आली. ते फार दुरून वाळवंटाच्या त्या तलावाजवळ आले होते. सर्व तहानेले होते. सर्वांनी पोटभर पाणी पिऊन घेतले. चोरांचा नायक त्या जागी अमृतासारखे गोड पाणी पाहून चकित झाला. ती सर्व जागा त्याच्या पायाखालची होती. परंतु त्यापूर्वी कधी तो तलाव नजरेस आला नाही. आज एकाएकी हा येथे कसा आला आणि यात इतके गोड पाणी कसे काय आले?










त्याने विचार केला की आता हा चोरीचा धंदा सोडून द्यावा आणि या तलावाच्या काठी राहून आराम करावा. येथे बसल्या बसल्या चांगली मिळकत होईल. एक देवाची पिंडी ठेवून तिची पूजा करावी. लोक भक्तिभावनेने येऊन देवाची पूजा व अभिषेक करतील. त्यात चांगली मिळकत होईल व समाजांत मान पण मिळेल. संन्यास घेऊन भगवी वस्त्रे धारण करून पुढील आयुष्य सुखाने घालवावे. जवळ पासच्या गावात हे तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्ध होईल. असा विचार करून त्याने आपल्या अनुयायांना ते सांगितले. त्यांनी तलावाला एक घाट बांधला व जवळ पासच्या खेड्यापाड्यांत ते एक तीर्थक्षेत्र असल्याचा खूप प्रचार केला.

चोरांना या प्रयत्नात खूप फायदा होऊ लागला. पुष्कळ तीर्थयात्री तेथे येऊ लागले. चोरांचा नायक व चोर साधू म्हणून लेखले जाऊ लागले.

वाळवंटातल्या तीर्थक्षेत्राची कीर्ती दूरवर पसरली. त्याचे पाणी प्याल्याने जुने आजार बरे होत. म्हणून रोगी व म्हातारी कोतारी माणसे तीर्थस्नानासाठी तेथे येऊ लागली. कित्येक देवाच्या सेवेत राहून पुढील आयुष्य घालविण्यासाठी तेथेच घर बांधून राहू लागले.

मनसूर देशाच्या राजाच्या कानावर पण त्या तीर्थक्षेत्राचा महिमा गेल्याशिवाय राहाला नाही. तो देखील तीर्थदर्शनासाठी तिकडे गेला. तेथे जे यात्री जमले होते त्यांच्या तोंडी तीर्थाचा महिमा ऐकून राजाला फार आनंद झाला. तेथे एक नगर वसवावे असे ठरवून राजाने आवश्यक सर्व मदत केली. त्याने आपल्या मुख्य मुख्य अधिकाऱ्यांना पाठवून जागेची पाहाणी करविली. रस्ते आखून धर्मशाळा वगैरे बांधल्या व बाजार पेठेची व्यवस्था करून दिली. स्वतः राजानेच लक्ष घातल्यावर नगराची स्थापना व्हायला कितीसा वेळ लागणार? त्या तलावानजीक शंकर पार्वतीचे सुंदर संगमरमरी देऊळ बांधण्यांत आले. पुजारी, माळी इत्यादिकांसाठी लहान मोठी घरे बांधण्यांत आली. व्यापारांना उतरण्यासाठी ती एक सुंदर पेठ झाली.

तीर्थक्षेत्राची प्राप्ती दिवसे दिवस वाढत गेली. परंतु राजाला एका पैची प्राप्ती देखील होत नसे. चोरांचा नायक सर्व पैसा आपल्या जवळ जमा करीत गेला. चोर व त्यांचा सरदार वर्षानुवर्षे तेथेच राहाले. परंतु राजाने त्यांच्या पोटावर पाय आणला नाही. चोरांचा नायक वारल्यावर राजाने एक अधिकारी देवळाची व्यवस्था करण्यासाठी नेमला. तेव्हां पासून जी प्राप्ती होई त्यातली अर्धी त्या तीर्थक्षेत्राच्या निरनिराळ्या कार्यासाठी खर्च केली जाई व अर्धी सरकारी खजिन्यांत जाई.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा, त्या पापी डाकूने कित्येक लोकांना आयुष्यभर लुबाडण्याचे काम केले होते.









तीर्थक्षेत्राची स्थापना त्याने लोकांना फसवून पैसे मिळविण्याच्या हेतूनेच केली होती. अशा क्षेत्राची उन्नति का व्हावी, हे नाही मला कळत. असे अपवित्र स्थान पवित्र समजून लोक तेथे आले कसे? सर्व काही धर्मविरुद्ध असून हे सर्व कसे होत राहिले? या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"प्रभास क्षेत्र अपवित्र होते असे कसे म्हणता येईल? तेथे जे कुंड झाले ते एका धर्मभीरू माणसाच्या प्रयत्नाचे फळ होते. कलिदेवने आपल्या मृत साथीदारांना मूठमाती दिल्या शिवाय पुढे जायचे नाही असे ठरवून त्यांची अंत्यक्रिया केली व त्यांचा देह अमानुष पणे पक्ष्यांना व कुत्र्यांना खायला नाही सोडला. चोर व त्यांचा सरदार आले त्यापूर्वीच ते एक तीर्थक्षेत्र होऊन गेले होते. म्हणून चोरांची बुद्धी पालटली होती व म्हणूनच त्याने तो धंदा सोडून स्वार्थबुद्धीने का होईना हरिभजनांत पुढील आयुष्य घालविले. तीर्थक्षेत्रात किती पापी येऊन राहू लागले म्हणून तीर्थक्षेत्राचे पावित्र्य का कमी होते? त्या तीर्थक्षेत्री राहून व तेथेच मरण आल्याने त्या चोरांना स्वर्गप्राप्ती झाली असल्यास आश्चर्य नाही. तीर्थक्षेत्री राहून त्यांना जी मिळकत झाली ती त्यांनी कोठे दुसरी कडे नेली नाही. तेथेच शेवटपर्यंत राहाले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





## पूर्वजन्मीची कर्ज फेड

एका गावी रामशास्त्री नावाचा एक ब्राह्मण रहात असे. तो चांगला शिकला सवरलेला होता तसाच निष्ठावान पण होता. त्याची बायको पण त्याच्याच सारखी धर्मभीरू होती. 'तुला मूलबाळ काही नाही की रे' असे कोणी म्हटले तर तो उत्तर देई—"कोणाचे देणे घेणे असले तर ना मुले होणार. पूर्व जन्मी केलेल्या कर्जाची फेड करण्यासाठीच मुले होतात." हे त्याला मनापासून खरे पण वाटत असे.

म्हणून त्याला एक मुलगा झाला तेव्हा तो त्या मुलाला सरळ स्मशानात घेऊन गेला. तेथे त्याने एक खड्डा केला, त्यात त्या मुलाला ठेवून त्यावर प्रोक्षण करून त्याला त्याने विचारले—"बोल तू कोण आहेस? माझ्या घरी का जन्मलास?"

मुलगा म्हणाला—"मी पूर्वजन्मी एक लाकूडफोड्या होतो. तू लाकडाची एक मोळी विकत घेतली होतीस, पण पैसे दिले नव्हतेस. ते वसूल करण्यासाठी तुझ्या पोटी जन्म घेतला आहे."

"तुझे देणें किती आहे?" रामशास्त्र्याने विचारले.

"दोन आणे." मुलगा म्हणाला.

"दोन आणे दिले तर निघून जाशील का?" शास्त्र्याने विचारले.

"हो, जाईन." मुलगा म्हणाला.

रामशास्त्र्याने कनवटीचे दोन आणे काढून त्याच्यावर टाकले. त्या बरोबर त्या मुलाचे प्राणोत्क्रमण झाले. रामशास्त्र्याने त्याच खड्ड्यात त्याला पुरले आणि घरी परत आला.



त्याला दुसरा मुलगा झाला त्याला देखील तो स्मशानात घेऊन गेला. त्याच्या अंगावर मंत्रवलेले पाणी शिपडून तोच प्रश्न त्याने त्या मुलाला विचारला. त्याचे उत्तर त्या मुलाने असे दिले—“मी पूर्वजन्मी एरंडेल विकीत असे. तू एक मण एरंडेल विकत घेऊन त्याचे पैसे दिले नव्हतेस.”

“मी तुला एक मण एरंडेल परत देतो. तू निघून जाशील का?” रामशास्त्र्याने विचारले.

“हो जाईन.” मुलगा म्हणाला.

रामशास्त्री त्याला घरी घेऊन गेला आणि एक मण एरंडेल घरांत आणून ठेवून बायकोला म्हणाला—“हे एरंडेल संपेपर्यंत तुझा हा मुलगा जगेल.” नवऱ्याने सांगितल्याप्रमाणे ती आपल्या मुलाच्या अंगाला ते तेल लावी. त्याला थोडे तेल मधून मधून पाजी. तेल संपत आले व मुलगा आजारी पडला. आजार वाढत गेला.

“त्याचे हे कष्ट पहावत नाहीत मला. आला तसा गेला तर सुटेल बिचारा. आता तर तेल सुद्धा संपले आहे.” रामशास्त्र्याची बायको बोलता मध्येच थांबली. पुढले शब्द तिच्या तोंडावाटे आले नाहीत.

“भांड्याला जे तेल आहे ते निपटून शिपटून त्याच्या अंगाला लावून टाक. त्याचे कर्ज पुरे फिटू दे.” रामशास्त्री म्हणाला. बायकोने त्याप्रमाणे केले व मुलाने प्राण सोडला.

एका वर्षाने आणखी एक मुलगा झाला. रामशास्त्री त्याला देखील स्मशानात घेऊन गेला. त्याला खड्डयात ठेवून पहिल्या दोघां मुलांना विचारला होता तसाच प्रश्न केला. तेव्हा मुलगा म्हणाला—“मी गेल्या जन्मी तुमच्या कडून दोन हजार रुपये कर्ज म्हणून घेतले होते. त्या कर्जाची फेड करण्यासाठी जन्म घेतला आहे.” रामशास्त्री मुलाला घेऊन घरी आला आणि बायकोच्या हातात मुलाला देत म्हणाला—“हा मुलगा, आपला खरा चिरंजीव आहे. पण याच्या कडून तू चुकून सुद्धा काही घेऊ नकोस. कारण तू याच्याकडून काही घेतलेस तर तो पुढे राहीलच याची शाश्वती नाही.”

मुलाचे नाव माधव असे होते. त्याने उत्तम विद्याभ्यास केला व नोकरी करू लागला. तो मोठ्या हुद्द्यावर काम करी. परंतु आई बाप त्याच्या कडून एक पै देखील घेत नसत.

एकदा माधवला एका पिशवीत पैसे ठेवून दूर गावी कोठे तरी जावयाचे होते. तो आंगणात उभा असलेल्या घोड्यावर बसायला निघाला तेव्हा घोडा पुढे पाऊलच टाकी ना. त्याची आई दारांतच उभी होती. “आई, जरा ही पिशवी हातात धर. मी या घोड्याला ठीक करतो आणि मग घेतो थैली.” असे सांगून त्याने पैशाची पिशवी आईच्या हातात दिली आणि घोड्यावर बसायला पुढे झाला. पण घोड्याने त्याला नेमकी छातीत लाथ मारली व तत्काळ माधवचे प्राणोत्क्रमण झाले.

हे सर्व घडले त्यावेळी रामशास्त्री कोठे तरी बाहेर गेला होता. तो बाहेरून घरी परत आला तेव्हा समोर त्याने मुलाचे प्रेत आणि दारांत उभी राहून रडत असलेल्या बायकोला पाहिले. बायकोने पिशवीकडे बोट दाखविले व म्हणाली—“मुलाने ती हातात धरायला दिली होती.” रामशास्त्र्याने पैसे मोजून पाहिले. बरोबर दोन हजार होते. म्हणाला—“त्याने कर्ज फेड केली आणि निघून गेला.”





# चंद्रसेना

चंद्रगिरी येथील राज्याच्या गादीवर उग्रसेन नांवाचा राजा राज्य करीत होता. तो भयंकर क्रूर होता व मूर्ख पण तसाच. त्याच्या राज्यांत काम करणे प्रधानापासून तर सामान्य शिपायापर्यंत प्रत्येकाला कठीण वाटू लागले.

उग्रसेनाच्या बायकोचे नाव शांतादेवी होते. तिला मूलबाळ काही नव्हते. राणीचे औदार्य पाहून प्रजेला वाटे देवाने या देवीवर कां कृपा केली नाही ? पुत्र अपत्य नव्हते म्हणून राणीला जितके दुःख वाटत होते तितकेच, किंबहुना थोडे अधिकच दुःख प्रजेला वाटत होते. कारण युवराजाचा जन्म झाला की त्याला गादीवर बसवून त्याच्या नावे प्रधान राज्य करील व राजाला गादीवरून काढून लावता येईल." याशिवाय जर राजा निपुत्रिक मेला तर राज्यावर मोठे संकट येईल व कोणीतरी राज्य बळकावील ही भीती देखील प्रधानाला वाटत होती.

त्याच सुमारास चंद्रगिरी येथे एक साधू आला. उग्रसेनाने त्याचा सर्व प्रकारे सत्कार करून त्याला आपल्या घरी आतिथ्य स्वीकारून राहण्यास आग्रह केला. राणीने तिला काही अपत्य नसल्याचे कळवून साधूचा आशीर्वाद मागितला. साधू आपल्या कमंडलांतले एक फळ काढून राणीच्या हातात देत म्हणाला—"रात्री हे फळ खाऊन झोप. तुला मुलगी होईल तीच या देशाची राणी होईल."

त्या दिवशी रात्री उग्रसेन तिला म्हणाला—"साधूने दिलेले फळ तू खाऊ नकोस. मुलीचा वर कोणी देतो का ? माझ्या गादीला वारस एक स्त्री झालेली मला मुळीच खपायची नाही."

"मुलगा मुलगी काही अपत्य होऊ तर द्या. त्या साधूने एवढी कृपा करून दिलेले हे फळ खाल्ले नाही तर त्यांचा कोप नाही का होणार ?" राणी म्हणाली.

"त्याने पुत्र व्हावा असा वर न देता मुलगी होईल असा वर का दिला ? माझा अपमान हाच हेतू." असे म्हणत राजाने ते फळ राणीच्या हातांतून हिसकावून घेऊन राजवाड्याबाहेर भिरकावून फेकून दिले. दैवयोग असा की त्याच वेळी एका शेतकऱ्याची बायको हिरवे गवत कापून एका टोपलीत आपल्या गुरासाठी घेऊन राजवाड्या जवळून जात होती व तो आंबा नेमका तिच्या टोपलीत पडला. तिला ते कळले देखील नाही. घरी आल्यावर गुराना गवत घालायला गेली तेव्हा तिने तो पाहिला व कोणत्यातरी देवाची कृपा आपल्यावर झाली आहे असे समजू तिने तो आंबा कापून खाल्ला आणि झोपी गेली.



ती शेतकऱ्याची बायको राणी पेक्षा ही वयाने मोठी होती. तिला पण मूलबाळ नव्हते. पण ते फळ खाल्ल्यानंतर काही दिवसांनी ती गरोदर असल्याचे तिला वाटू लागले व तिने ते फळ खाल्ल्यामुळेच हे झाले असे नवऱ्याला सांगितले. हळूं हळूं शेजारपाजारच्या लोकांना पण ती गोष्ट कळली. परंतु कोणाला ती खरी वाटेना.

यथासमयी शेतकऱ्याच्या बायकोला एक मुलगी झाली. ती मुलीला घेऊन देव-दर्शनाला गेली. त्याच वेळी राणी पण त्या देवळात देवदर्शनाला आली. एका बाईच्या हातात गोंडस मुलगी पाहून राणीचे मातृमन आवरेना. तिने तिला विचारले—"किती दिवसाची आहे मुलगी ?"

श्री. सखाराम कामत



शेतकऱ्याच्या बायकोने तिला ते दिव्यफळ कसे मिळाले हे सांगून त्यामुळेच मुलगी झाल्याचे राणीला सांगितले. राणीला चटकन सर्व गोष्ट आठवली. आपण तो आंबा खाल्ला असता तर आपल्याला मुलगी झाली असती. ती मुलगी शेतकऱ्याच्या बायकोला झाली. त्या मुलीच्या भाग्यात राज्य लिहिलेले आहे. त्या साधूची गोष्ट खरी ठरणार, असे तिला मनापासून वाटले. म्हणून ती त्या शेतकऱ्याच्या बायकोला म्हणाली— “बाई! ही मुलगी तुझीच आहे, पण मी सुद्धा तिला आपली मुलगी म्हणून मानीत जाईन. ह्या मुलीला कोणत्याहि गोष्टीची उणीव भासू देऊ नकोस बरं का! राजकन्येसारखीच तिची सर्व बडदास्त ठेव.”

शेतकऱ्याच्या बायकोने राणीला नमस्कार करून तिचे फार आभार मानले. दोघांनी सायंकाळी देवळात भेटायचे ठरविले.

नंतर शांतादेवीने आपल्या राजवाड्या शेजारी बालक्रीडा मंदिर बांधवायचे ठरविले आणि त्याची राखण करायला त्याच शेतकरी नवराबायकोला नेमले. तेथे गावातल्या मोठमोठ्या घराण्यातली मुले खेळायला जमू लागली. राणी त्यांचा खेळ पाहण्याचे मिष करून त्या बागेत जाऊन तिचे कोडकौतुक करू लागली. तिने तिचे नाव चंद्रसेना असे ठेवले.

चंद्रसेना शेतकऱ्याच्या कुटुंबात जन्मली असली तरी थोर कुटुंबांत जन्मलेल्या मुलासारखीच सर्व लक्षणे तिच्यात दिसत होती. ती सर्वांबरोबर शिकत असे. हळूहळू ती शस्त्रास्त्र विद्याषण शिकू लागली. घोड्यावर बसायला पण ती शिकली. तिचा पोशाख, बोलणे व वागणे पाहून ती शेतकऱ्याची मुलगी असेल असे कोणाला वाटणेच शक्य नव्हते.

चंद्रसेना सोळा वर्षांची झाली तेव्हा राजाला तिच्या जन्माची कथा समजली. त्याने फेकून दिलेले फळ फुकट गेले नाही, हे त्याला कळले. एका खालच्या वर्गाच्या स्त्रीने ते खाल्ले व तिला ही मुलगी झाली. आता आपल्या गादीला तीच वारस होणार. हे त्याला कसे खपणार? राजाला हे देखील कळले की राणीला ही गोष्ट मुलीचा जन्म झाला तेव्हा पासूनच माहीत होती. एवढेच नव्हे तर राणीने त्या मुलीला उत्तम शिक्षण देऊन राज्याला वारस होण्यासाठी आवश्यक सर्व तयारी करून ठेवली होती. म्हणून राजाने राणीला कैदेत टाकले आणि त्या मुलीला ठार करून टाकावे असा हुकूम सोडला. बालक्रीडा मंदिर बंद करण्यात आले आणि चंद्रसेनेच्या आईवडिलांना राज्याबाहेर हाकलून देण्यात आले.

सैनिक चंद्रसेनेचा वध करण्यासाठी तिला घेऊन राजधानीच्या बाहेर घेऊन गेले. परंतु त्यांनी तिचा वध केला नाही. कारण राजाने निरपराध राणीला तुरुंगांत टाकले होते. त्याचा त्यांना राग आला होता. त्यांनी चंद्रसेनेचा वध करण्या ऐवजी तिला एक घोडा देऊन तिला पळून जाण्यास



सांगितले. त्यांनी एका हरणाची शिकार करून चंद्रसेनेचा वध केल्याचे राजाला जाऊन सांगितले.

चंद्रसेना रानटी लोकांच्या वस्तीत जाऊन राहू लागली. ते रानटी लोक नव्हतेच. चंद्रगिरीचे रहिवाशी होते. राजाचा त्यांच्यावर कोप होता. म्हणून ते रानात पळून गेले होते. तेथे देखील राजाने त्यांना स्वस्थ पणे राहू दिले नाही. तेव्हा वेष पालटून ते राहू लागले होते. रानात राहून त्यांनी शस्त्रास्त्र विद्या शिकून युद्धाची तयारी चालू ठेवली होती. राजा कधी त्या









बाजूला आला की ते गुप्तपणे त्याच्यावर हल्ले करून त्याला सतावून सोडीत.

चंद्रसेनेने त्या लोकांना आपली कथा सांगून त्यांची मदत मागितली. म्हणाली– "मी त्या राजाचा दिमाख उतरवणार आहे. तुम्ही जर माझ्या मदतीला आलात तर मी त्या दुष्ट राजाची खोड मोडीन." त्या लोकांनी तिच्या म्हणण्याप्रमाणे वागायचे कबूल करून तिच्या नेतृत्वाखाली चंद्रगिरी वर चालून जाण्यासाठी तयारी केली. त्यांनी आपली शस्त्रास्त्रे लपवून ठेवली होती व निःशस्त्र राजधानीत प्रवेश करीत असल्याचे दर्शविले. चंद्रसेना पुरुषवेष धारण करून घोड्यावर बसून युद्धास निघाली.

चंद्रसेना आल्याची वार्ता राजधानीत 'हा हा' म्हणता पसरली. प्रजा राजाच्या विरुद्ध उलटली. राणीवर होत असलेले अत्याचार पाहून प्रजा चिडली होती. राजावर सूड उगवायाला ही संधी छान मिळाली. चंद्रसेना सरळ राजवाड्यावर चालून गेली. उग्रसेन एकटा तलवार घेऊन पुढे आला. त्याच्या मदतीला कोणी धावला नाही. म्हणून त्या चकमकीत तो ठार झाला. नंतर चंद्रसेनाने स्वतः दरबार भरविला व सर्वानुमते ती गादीवर बसली. शांतिदेवीला कैदेतून सुटका देण्यांत आली. शेतकऱ्याच्या कुटुंबाला आदरपूर्वक राजधानीत बोलावून आणण्यात आले.

चंद्रसेनेचा राज्याभिषेक थाटामाटाने पार पाडला. तिच्या शौर्य साहसाचे पोवाडे लोक गाऊ लागले. रानटी वस्तीत राहणारे लोक परत चंद्रगिरीला आले. त्यांच्याच पैकी एका शूर तरुणाबरोबर तिचे लग्न झाले व दोघांनी मिळून प्रजेला सुखी केले.





# दरमहा पगार

एका गांवी एक शेतकरी रहात असे. तो फार लोभी व कृपण होता. त्याने एक नोकर ठेवला होता. त्याला कामावर ठेवण्यापूर्वी त्याने नोकराला बजावून सांगितले होते की तुला दरमहा पगार चार रुपये देईन. पण तुला मी चार प्रश्न विचारीन त्यांचे बरोबर उत्तर दिले पाहिजे. तू बरोबर उत्तर दिले नाहीस तर चार रुपयांच्या ऐवजी चार टपल्या बसतील लक्षात ठेव. नोकर त्याला कबूल झाला.

एक महिना झाल्यावर शेतकऱ्याने नोकराला बोलावून म्हटले–"होयरे, तुला आज पगार द्यायचा आहे, नाही का? ये मी तुला चार प्रश्न विचारतो. उत्तर देऊन आपला पगार घे." दोघे शेकोटी जवळ गेले. शेजारी मांजर उबेसाठी बसले होते. शेतकऱ्याने मांजराकडे बोट दाखवून विचारले–"हे काय आहे?"

"का, हे तर मांजर आहे." नोकर म्हणाला.

"नाही, ही स्वच्छता आहे. तू एका प्रश्नाचे उत्तर चूक दिलेस. म्हणून एक टपली घे." असे सांगून शेतकऱ्याने नोकराच्या डोक्याला एक टपली मारली. नंतर त्याने विस्तवाकडे बोट दाखवून विचारले–"हे काय?"

"विस्तव!" नोकर म्हणाला.

"नाही. हे सुख आहे. तू उत्तर चूक दिलेस म्हणून घे आणखी एक टपली." एक टपली मारीत शेतकरी म्हणाला.

"नंतर त्याने पाण्याच्या मडक्याकडे बोट दाखवून विचारले–"हे काय आहे?"

सौ. सरस्वतीबाई मोने










"का, मातीचे मडके." नोकर म्हणाला.

"नाही, ते शरीर आहे." असे सांगून शेतकऱ्याने नोकराच्या डोक्यांत आणखी एक टपली मारली. शेवटी त्याने घराच्या छपराकडे बोट दाखवून विचारले—"हे काय आहे?"

"छप्पर!" नोकर म्हणाला.

"नाही! ही उंची आहे." असे सांगून त्याने नोकराला चवथी टपली मारली व म्हणाला—"तू काम केलेस त्याचा पगार झाला. तुला हवे असेल तर याच अटीवर पुढला महिनाभर काम कर."

"तुमच्या प्रश्नांची बरोबर उत्तरे देता येईपर्यंत मी नोकरी सोडून जाणार नाही." नोकर म्हणाला.

थोड्या वेळाने शेतकरी शेतात काम करायला निघून गेला. नोकराने एक फडके तेलात बुडवून ते मांजराच्या शेपटीला बांधले व ती पट्टी पेटवून त्याने मांजराला छपरावर सोडले. छप्पराला आग लागली. नोकर मडक्यातले पाणी छपरावर शिंपडू लागला. शेतकऱ्याची बायको छपराला आग लागलेली पाहून ओरडली—"अरे असे पाणी शिंपडल्याने का आग विझणार आहे? आपल्या मालकाला बोलावून घेऊन ये."

नोकर शेतांत धावत जाऊन मालकाला म्हणाला—"मालक! स्वच्छता सुखाला घेऊन उंचीवर गेली आहे. शरिरातले सर्व पाणी टाकले तरी सुखाचा शेवट झाला नाही." असे सांगून तो निघून गेला. नोकर जे काही म्हणाला शेतकऱ्याला त्याचा अर्थ मुळीच कळला नाही. म्हणून तो घरी गेला नाही. म्हणून त्याचे घर व त्यातल्या सर्व वस्तु जळून गेल्या.





## कसले सुखदुःख

एकदा एक राजा आपल्या मंत्र्याबरोबर वेष पालटून प्रजेच्या सुखदुःखाची माहिती काढण्यासाठी हिंडत होता. एका गांवी एका झोपडीच्या समोर त्यांना एक म्हातारी बसून रडत असलेली दिसली. ती म्हणत होती—"देवा, का नाही बोलावून घेत? किती दिवस हे कष्ट सहन करू मी आता?"

राजाने ते ऐकले आणि जवळ जाऊन विचारले—"आजी? का हो, जगाचा इतका वीट आला काय झाले? काही मदत करण्या सारखी असेलतर सांगा."

"या बाळांनो! दुरून कोठून आलेले दिसता आहा? बसा. आता काय उरले आहे? ह्या जगाचा प्रवास संपत आला. एक नात आहे. येऊन भेटते कधी कधी. तिच्या घरी जाऊन रहावे, म्हणावे तर तिच्या सासूला ते कसे खपणार? म्हणून मी एकटीच राहाते. चार घरी काम करते, त्यावर भरते आहे पोटाची खळगी. देवाच्या बोलावण्याची वाट पाहाते आहे. काय उरले आहे आता या जगाची आशा ठेवायला? म्हातारी म्हणाली.

"या उतार वयांत तुझ्या हातून काय काम होणार? सोड ते. हे पैसे ठेवून घे आणि सुखाने रहा." असे सांगून राजाने तिला शंभर रुपये काढून दिले आणि मंत्र्याबरोबर निघून गेला.

एका आठवड्याने दोघे राजधानीकडे परत जात असता पुन्हा त्या म्हातारीच्या झोपडीसमोर आले. तेव्हां सुद्धा म्हातारी रडत बडबडत होती—"विटला बाई जीव! देवा, घे बोलावून आता."



राजाने म्हातारीत काही फरक न झालेला पाहून विचारले–"आजी, बरं आहे ना? मी दिलेले पैसे आहेत की संपले?"

"मी ते पैसे कोठे खर्च करू व कशा साठी? नातीसाठी ठेवून दिले आहेत, जसेच्या तसे. पण ती आलीच नाही. चोरांनी येऊन चोरी करू नये म्हणून काळजी करावी लागते." म्हातारी म्हणाली.

"आजी, उद्या माझे नोकर येतील. त्यांच्याबरोबर येऊन माझ्या घरी रहा. तुम्हांला कसली काळजी करण्याचे कारण नाही." असे सांगून राजा निघून गेला.

दुसऱ्या दिवशी उजाडताच राजाचे शिपाई एक पालखी घेऊन आले. आपल्या घरी रहायला ज्याने बोलाविले तो स्वत: राजाच होता हे म्हातारीला कळले. राजाचीच आज्ञा होती, म्हणून तिला पालखीत बसून जावे लागले.

राजाच्या नोकरांनी म्हातारीच्या राहण्याची व्यवस्था राजवाड्यातच एक कोपऱ्यातल्या खोलीत करून दिली. तिच्यासाठी जेवणाचे ताट राजवाड्यातूनच येत असे.

आता तरी म्हातारीला कोणती हि काळजी नसावी असे राजाला वाटले. म्हणून ती तिला भेटायला गेला आणि विचारले–"कसे काय आजी? आता तरी सर्व ठीक आहे ना?"

म्हातारी आढे वेढे घेऊन म्हणाली–"येथे कोणत्या गोष्टीची उणीव असणार बाबा? पण माझ्या घरादाराचे काय झालं असेल, देवच जाणे."

"पण तुम्हांला या जागेपेक्षा तुमच्या झोपडीत जास्त आराम होता असे वाटते का?"

"तसं काही मी म्हणत नाही. पण विचार कर, माझी नात मला भेटायला आली



तर तिकडेच येईल आणि मी घरात नाही हे पाहून घाबरून जाईल, आजी गेली कुठे? झालं तरी काय?" म्हातारी म्हणाली.

नातीला भेटण्याची इच्छा दिसते आहे म्हातारीच्या मनात, असा विचार करून राजाने तिच्या नातीला बोलवून घेतले. नात आपल्या तान्ह्या मुलीला घेऊन आली.

राजवाड्यात नातीला करमेना. हिंडा-फिरायला किंवा बोला बसायला जी मोकळीक तिला झोपडीत वाटे ती राजवाड्यात नव्हती. तिची तान्ही मुलगी रडली की राजवाड्यातल्या दासदासी बेजार करून सोडीत. तिला काय करावे हे सुचेना. म्हातारीची पण तीच अवस्था झाली. ती आपल्या नातीला नेहमी रागवे, हे नको करूस, ते नको करूस इत्यादि."

दोन दिवसात नात कंटाळली. मी आपली घरी जाते, आजी!" ती म्हणाली. म्हातारीने दिलेली शंभर रूपयांची पिशवी घेऊन मुली बरोबर म्हातारीची नात निघून गेली.

त्यानंतर म्हातारीच्या जिवाला सुख म्हणून वाटेना. तिला राजवाड्यातल्या जीवनाचा वीट आला. राजवाड्यात ती



होती म्हणूनच नात इतक्या दिवसांनी आली व दोन दिवस सुद्धा राहाली नाही. ती आपल्या घरी असती तर नात जास्त दिवस राहाली नसती का?

राजा पुन्हा काही दिवसांनी आला व त्याने तिला विचारले–"आजी, आतां तरी सर्व आराम आहे ना?"

"कसला आराम बाबा? आपल्या घरी काही काम तरी करायला मिळाले असते. येथे दोन्ही वेळ बसल्या बसल्या खायला मिळतं आहे. आळशासारखं बसून नाही जात अन्न." म्हातारी म्हणाली.

       

"कामाची संवय असणाऱ्या बाईला स्वस्थ कसे बसवेल? कांहीं तरी काम केल्याशिवाय तिच्या जिवाला सुख मिळणे अशक्य, असा विचार करून राजाने आपल्या मुलीकडे म्हातारीला नेले आणि एक न एक काम द्यायला तिला सांगितले.

राजकुमारीकडे म्हातारीला जास्त आराम वाटला. पण सुख नव्हते. तिला तिच्या घराची आठवण जास्त जास्त होऊ लागली. तिला वाटे आपण किती दूर येऊन पडलो आहो? घराच्या किल्ल्या नेहमी कमरेला खोचलेल्या होत्या. त्यांच्यावर नजर गेली की तिच्या डोळ्यांतून टिपे गळू लागत.

"काय आजी, बरं नाही का?" राजकुमारीने विचारले.

"बाळ, आपल्या बाबांना सांग, मला घरी जाऊन येऊ दे. फक्त चार दिवस राहून परत येईन." म्हातारी म्हणाली.

मुलीने सांगितल्या बरोबर राजाने नोकरांकरवी म्हातारीला तिच्या घरी पोचते केले. नोकराबरोबर वेष पालटून, म्हातारी घरी गेल्यावर काय करते हे पाहण्यासाठी स्वत: राजा गेला.

म्हातारी पालखीतून उतरली. कुलुप काढून केर काढला आणि हातरी घालून आडवी होत म्हणाली—"सुटले रे देवा, त्या तुरुंगवासातून" ती ते इतक्या मोठ्याने म्हणाली होती की राजाला पण ऐकू आले.

कष्ट असो की सुख म्हातारीला स्वतंत्रता, आपले घर, आपले काम, आपले जीवन एवढेच हवे होते, हे राजाला कळले व तो आपल्या घरी परत गेला.





# कावळ्यांचे प्रेम

एका गावी रघू नावाचा एक गरीब मुलगा रहात असे. लहानपणीच त्याची आई वारली. त्याचे वय तेव्हां दहा वर्षांचे असेल नसेल. त्याच्या वडिलांचे त्याच वेळी डोळे गेले व त्यांना सर्व जग अंधकाराने भरलेले भासू लागले.

रघू मेहनत मजुरी करीत असे. जी मजुरी मिळे त्याची ज्वार बाजरी किंवा असेच काही धान्य बाजारांत विकत घेऊन तो ते दळून आणी व भाकऱ्या करून वडिलांना खायला घाली आणि स्वत: खाऊन घेऊन उरलेल्या कावळ्यांना घाली.

रघूला मित्र काय ते ते कावळेच होते. कावळे त्याला जीव की प्राण वाटत. रोज जेवतांना तो ओसरात बसून कावळ्यांची गंमत पाही. स्वत: पोटभर खायला मिळाले नाही तरी तो उपाशी राहून कावळ्यांना अवश्य खायला घाली.

एकदा रघूने जितक्या भाकऱ्या केल्या होत्या, त्याच्या बापालाच त्या पुरल्या नाहीत. त्याच्यासाठी किंवा कावळ्यांसाठी एक तुकडा देखील उरला नाही. स्वत:साठी भाकरी उरली नाही, त्याची त्याला फिकीर नव्हती. त्याला वाईट वाटले ते कावळ्यांना खायला घालायला काही उरले नाही याचे.

तो बाहेर आला तेव्हा भिंतीवर कावळे येऊन बसले होते. त्यांना पाहून रघूचा जीव कळवळून आला. तो कावळ्यांना म्हणाला—"काय करणार, आज तुमच्यासाठी काही उरलं नाही." आणि गंमत अशी कीं कावळे पण, तो जे काही बोलला हे त्यांना कळले असावे अशा तऱ्हेने लगेच उडून गेले.










थोड्या वेळाने एक कावळा चोचीत काही [illegible] घेऊन आला आणि रघूच्या समोर ते टाकून उडत निघून गेला. त्याने जवळ जाऊन वाकून पाहिले की काय आहे आणि त्याला आश्चर्य वाटले, ती एक अंगठी होती–खुद्द राजाची मुद्रिका. तो घाबरत घरात गेला आणि वडिलांना हाक मारून म्हणाला–"बाबा, ही अंगठी कावळा येथे टाकून गेला आहे. ही राजाची मुद्रिका असेलशी वाटते. काय करावे, सांगा."

बाप म्हणाला–"राजाची मुद्रिका असेल तर एक क्षणभर देखील जवळ ठेवता कामा नये. तो एक मोठा गुन्हा आहे. राजधानी पर्यंत तुला जाणे शक्य नाही. म्हणून तू गावातल्या फोजदाराला नेऊन दे आणि तुला ती कशी मिळाली हे सांगून राजाकडे पोचती करायला त्यालाच सांग."

म्हणून रघू फोजदाराकडे गेला आणि राजाची मुद्रिका त्याला देऊन, त्याला ती कशी मिळाली हें सांगून ती राजाकडे पोचती करायला सांगितले.

"राजाची मुद्रिका, पुष्कळ दिवस झाले, चोरीला गेली आहे आणि महाराजांची अशी आज्ञा आहे की ही मुद्रिका ज्या कोणा-जवळ मिळेल त्याला धरून आणावे. म्हणून तुला कैद करून मी तुला राजासमोर हजर करणार आहे." फोजदार म्हणाला.

फोजदाराने दोघा शिपायांना बोलवून रघूचे दोन्ही हात बांधवले आणि राजाकडे त्याला घेऊन जायला सांगितले. तो स्वतः मागाहून थोड्या वेळाने येणार आहे असे तो म्हणाला.

अर्ध्या वाटेवर ते पोचले तो पर्यंत सूर्यास्त होऊ लागला. शिपाई एका तलावाच्या काठी थांबले. त्यांनी बरोबर जे काही आणले होते ते काढून खायला बसले. खाऊन पिऊन ते जरा आडवे झाले. तलावावरून गार गार वारा येत होता. त्यांना त्यामुळे लगेच झोप आली व ते गाढ झोपी गेले.

इतक्यात कोठून तरी कावळ्यांची एक टोळी आली. 'काव' 'काव' ओरडल्या शिवाय दोन तीन कावळे रघूजवळ उडत आले. त्याचे हात बांधले होते त्या दोरीची गाठ त्यांनी धरून ओढली. गाठ सुटली आणि कावळे काही ओरडा आरडा केल्याशिवाय आले होते तसे निघून गेले.

प्रथम घरीं जावयाचा विचार रघूच्या मनात आला. परंतु परत जाण्यात अर्थ नाही हे ओळखून तो पाय वाटेने सरळ राजधानीकडे निघाला. राजधानीत पोचल्या-वर तो राजवाड्यात राजाच्या दर्शनाला गेला. त्याने राजाला नम्रपणे नमस्कार करून जे घडले ते खरे खरे सांगून टाकले. म्हणाला–"कावळ्यांनी आणून दिलेली अंगठी मी बापाच्या सल्ल्याप्रमाणे फोजदारा-कडे नेऊन दिली. परंतु फोजदाराने मला कैद केले व शिपायां बरोबर आपणांकडे पाठवून दिले. राजधानीच्या वाटेवर मला कावळ्यांनी सोडविले. म्हणून मीच अंगठी आणली आहे."



राजा सर्व वृत्त ऐकून घेऊन म्हणाला– "कावळ्यांनी तुला जितकी मदत केली आहे त्याचा शतांश देखील मनुष्य जातीने केलेली नाही." असे सांगून त्याने शंभर सुवर्णमुद्रा बक्षिस देऊन त्याला निरोप दिला.

रघूच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. राजाचा निरोप घेऊन तो निघाला तेव्हा राजा त्याला थांबायला सांगून म्हणाला– "अरे पण तू इतके पैसे घेऊन एकटा घरी कसा काय जाशील? थांब मी त्या फोजदारालाच तुझ्याबरोबर सोबत म्हणून पाठवतो.

थोड्या वेळाने तो फोजदार व ते दोन शिपाई येऊन पोचले. फोजदार म्हणाला– "महाराज आपली मुद्रिका मिळाली, परंतु चोर पळून गेला आहे. त्याला लवकरच पकडून...." असे म्हणत म्हणत तो मध्येच थांबला. कारण त्याचवेळी त्याची नजर रघूवर गेली.

राजा स्मित करून म्हणाला–"खऱ्या चोराला धरण्यासाठी तुला आकाशात उड्डाण करावे लागेल. या मुलाने मुद्रिका आणून दिल्याचे सांगितले व त्याला त्याबद्दल बक्षिस पण देण्यात आले आहे. आता त्या मुलाला सुखरूप घरी पोंचता करण्याची जबाबदारी तुझी आहे.

राजाने दिलेले पैसे घेऊन रघू घरी आला. त्याने एक बेताचे घर विकत घेतले आणि आपल्या वडिलांबरोबर त्या घरांत राहून कामधंदा करू लागला. त्याची गोष्ट हळू हळू गावभर पसरली व तो ज्या घरात राहू लागला त्या घराचे नाव 'कावळ्याचे घर' पडले. त्या घरावर कावळे रोज जमत व त्यांना खायला पण मिळे.





# गप्पिष्ट गोपू

एका गांवी एक षड्गप्पिष्ट रहात असे. थापा देणे, हा एकच धंदा तो करीत असे. अशक्य अशा गोष्टी करून दाखविल्याची थाप मारून भोळ्या भाबड्या लोकांना तो फसवी. एकदां तो शेजारच्या गावी त्रिगप्पिष्ट आहे हे ऐकून त्याच्याशी बोलून तीन गोष्टींची पैज जिंकण्याच्या हेतूने तो त्याच्या गावी गेला.

वाटेत गोपू नांवाचा त्रिगप्पिष्टाचा मुलगा शेतांत काम करीत असताना भेटला. त्याने षडगप्पिष्टाला कोण काय व कोणत्या कामावर तो आला असल्याचे विचारून घेतले. त्याने विचार केला की याची व वडिलांची गाठच पडू नये अशी काही तरी युक्ति केली पाहिजे. असं केल्याने त्याच्या वडिलांचा अपमान होणार नाही. म्हणून तो षडगप्पिष्टाला म्हणाला–"अहो षडगप्पिष्ट! माझे त्रिगप्पिष्ट वडील घरी नाहीत. असं झालं की आकाश फाटले तेव्हा ते शिवण्यासाठी, माझे वडील ढेकणांची आंतडी मुग्यांची कातडी आणि वाण्याचा दाभण घेऊन गेले आहेत."

त्रिगप्पिष्टाचा मुलगाच इतका गप्पिष्ट आहे तर बाप त्यांच्याहून वस्ताद असणार, असा विचार करून षडगप्पिष्ट आल्या वाटेने निमूट पणे आपल्या गावी परतला. घरी परत आल्यावर गोपूने बापाला, षड-गप्पिष्ट कोणत्या हेतूने आला होता व त्याला कसे परत जावे लागले, हें सांगितलें. आपण बजावलेली कामगिरी ऐकून बाप पाठ थोपटतील ही आशा बाळगून मुलाने घडलेली गोष्ट सांगितली.

ते ऐकून मुलाचे कौतुक करण्या ऐवजी त्रिगप्पिष्टाला मुलाचा राग आला. इतका

सौ. विमलाबाई पाटकर

की रात्री मुलगा झोपला असता त्याला खाटेसकट उचलून घेऊन तो त्याला विहिरीत फेकून द्यायला निघाला.

वाटेत गोपूची झोप मोडली. बापाच्या मनांतली गोष्ट त्याच्या लक्षात आली. वाटेत वडाची लोंबत असलेली एक पारंबी धरून तो झाडावर चढून जाऊन बसला. त्रिगप्पिष्ट खाट विहिरीत फेकून घरी जाऊन स्वस्थपणे झोपला. दुसऱ्या दिवशीं सकाळी झोप मोडली तेव्हा गोपू गोठा झाडीत असलेला त्याला दिसला. त्याने त्याला हाक मारून विचारले—" काय रे विहिरींतून कसा काय बाहेर आलास?"

" बेडकाच्या तोंडात लगाम घालून त्याच्यावर बसलो आणि टाच मारल्याबरोबर बेडूक उड्या मारीत वर घेऊन आला." गोपू म्हणाला.

ते ऐकून त्रिगप्पिष्टाला जास्तच राग आला. दुसऱ्या दिवशी गोपू झोपला असता बाप त्याला खाटेसकट तलावात फेकून देऊन निघून आला. पण त्या वेळी सुद्धा वडाची पारंबी धरून गोपूने आपले रक्षण करून घेतले.

उजाडल्यावर मुलाला गोठा साफ करीत असता पाहून बापाने विचारले—" कायरे तलावातून कसा काय बाहेर आलास?"

" अक्कल असल्यावर काय अशक्य आहे, बाबा! पाण्यावर आल्यावर मला तलावाच्या दोन्ही बाजूंच्या काठावर दोघे बोलत असलेले दिसले. दोघांच्या आवाजाचे धागे घेऊन मी दोरी विणली आणि ती धरून बाहेर आलो." गोपू म्हणाला.

त्रिगप्पिष्ट मुलाची हुशारी पाहून खूष झाला. मुलगा आपले नाव राखील ही त्याची खात्री झाली.





# त्रिदेव

एका राज्यात निर्जन प्रदेशात तीन मूर्ती एकदा सांपडल्या. तिन्ही एकसारख्या होत्या. तिन्हीत काही एक फरक नव्हता. लोक तेथे येत व भक्तीने पूजा करीत. लोक नवस पण करीत व एक मूर्त बोलत उत्तर देई.

" देव बोलतो. श्रद्धा व भक्ती पूर्वक जे काहीं विचारावे त्याचे बरोबर उत्तर मिळते." दररोज हेच आपसात बोलत लोक घरी निघून जात.

हळू हळू ही गोष्ट राज्यभर पसरली, राजा स्वतः दर्शनाला आला व त्याला तोच प्रत्यय आला. त्याने त्या जागी एक देऊळ बांधले. पूजेसाठी पुजारी नेमला. देवाच्या दर्शनाला लोक येत त्यांच्याकडून दररोज सहस्रावधी रुपयांची प्राप्ती होऊ लागली.

लोक प्रश्न विचारीत व देव त्याची सर्वांची उत्तरे देत. प्रश्नांची काही उत्तरेबरोबर निघत व काही चूक ठरत. म्हणून दर्शनाला येणाऱ्यांची संख्या कमी होऊ लागली व राजाला प्राप्तीपण कमी होऊ लागली. तेव्हां राजाला आश्चर्य वाटलें व त्यानें पुजाऱ्याला बोलावून विचारले—" भक्तांचा देवावरचा विश्वास उडत चालला आहे. कारण काय?"

" महाराज! मला असे आढळून आले आहे की तिथे देव खरे बोलणार नसून त्यांच्यापैकी फक्त एकच खरे बोलतो. एक पूर्ण खोटे बोलतो व एक हुशारी करतो. म्हणजे तो उत्तर देतो ते खरे होऊ शकते किंवा खोटे होऊ शकते." पुजारी म्हणाला.

श्री. वा. ग. सोनार



"त्यांच्यापैकी सत्यवादी कोण आहे हे तुम्हाला कळलं नाही का?" राजाने विचारले.

"तेच कळणं कठीण झालं आहे, महाराज, निरनिराळे लोक देवाला प्रश्न विचारायला जातात. मी काही तेथे नसतो. परत आल्यावर कोणत्या देवाला कोणता प्रश्न विचारला व त्याने काय उत्तर दिले हे नाही सांगत. म्हणून कोणता देव खरा व कोणता खोटा, हे ठरविणं कठीण आहे." पुजारी म्हणाला.

तें ऐकून व विचार करून राजाने एक उपाय योजला आणि "तिघां देवांमध्ये कोण सत्यवादी आहे, कोण असत्यवादी आणि कोण युक्तिवादी हे जो कोणीबरोबर शोध, काढून सांगेल त्याला एक जहागीर इनाम मिळेल," असे त्याने जाहीर केले.

राजधानीतून कित्येक लोकांनी येऊन प्रयत्न करून पाहिला. पण कोणाला शोध लागला नाही. शेवटी एक शेतकरी येऊन राजाला म्हणाला—"मी सांगतो महाराज, खरा देव कोण व खोटा कोण ते."

पुजारी व शेतकरी दोघे देवळात गेले. शेतकऱ्याने पहिल्या देवाला विचारले—"आपल्या शेजारी जो देव आहे तो कोण?"

"सत्यवादी देव!" तो म्हणाला. नंतर शेतकऱ्याने दुसऱ्या देवाला विचारले—तू कसा देव आहेस?"

दुसरा देव म्हणाला—"मी युक्तिवादी आहे." शेतकऱ्याने तिसऱ्या देवाला विचारले—"तुझ्या शेजारी जो देव आहे तो कोण?"

"असत्यवादी आहे." तिसरा देव म्हणाला. शेतकरी बाहेर आल्यावर पुजाऱ्याला म्हणाला—"चला मी सांगतो, कोण सत्यवादी किंवा असत्यवादी की युक्तिवादी ते."



पुजाऱ्याला ते काही कळले नाही. तो शेतकऱ्याबरोबर राजाकडे गेला. शेतकरी राजाला म्हणाला—"महाराज! पहिला देव युक्तिवादी आहे. दुसरा असत्यवादी आहे व तिसरा सत्यवादी आहे." असे सांगून त्याने जे प्रश्न त्यांना विचारले होते ते सांगून त्यांनी जी उत्तरे दिली होती ती देखील सांगितली.

"पण मला नाही उलगडा झाला त्या उत्तरांवरून." राजा म्हणाला.

तेव्हा शेतकरी म्हणाला—"जरा लक्ष-पूर्वक विचार करून पहा. पहिल्या देवाने दुसऱ्याला सत्यवादी म्हटले. पहिला सत्य-वादी तरी असणार नाही तर असत्यवादी किंवा युक्तिवादी. तो स्वतः सत्यवादी असेल तर दुसऱ्याला सत्यवादी म्हणणें शक्य नाही. दुसरा देखील सत्यवादी नाही. कारण तो सत्यवादी असेल तर स्वतःला युक्तिवादी म्हणणे खोटे होईल. म्हणजे तो असत्य-वादीच असला पाहिजे. तो खरोखरीच युक्ति वादी आहे तर तो असे खरे कधी सांगणारच नाहीं की मी युक्तिवादी आहे. युक्तिवादी कदाचित खरे सांगू शकेल असे म्हणता येईल. पण तिसरा देव सत्यवादी ठरलाच आहे त्याच्या म्हणण्या प्रमाणें मधला देव असत्यवादी आहे हे कळते. म्हणून मधला असत्यवादीच असला पाहिजे. म्हणजे पहिला असत्यवादी नव्हता हे सिद्ध होते. तो युक्तिवादी होता म्हणूनच तर त्याने बाजूच्या देवाला सत्यवादी म्हणून त्याला खूष करण्याचा प्रयत्न केला."

राजा शेतकऱ्याची युक्ति व तर्क ऐकून खूष झाला व त्याने त्याला जाहीर केल्या-प्रमाणें एक जहागीर बक्षिस दिली.





# स्तोत्र कोणाचे म्हणावे?

कुरुदेशांत एकदा फार मोठा दुष्काळ पडला. पोटाला पट्टी बांधून लोक काम करीत. पण शेवटी देश सोडून लोकांना जावे लागले.

अशा लोकांमध्ये चाक्रायण गोत्रातला उषस्ती नावाचा एक ज्ञानी पुरुष पण होता. तो वेदांचा मर्मज्ञ विद्वान होता. तो आपली बायको आटकी हिला बरोबर घेऊन स्वतःचे गाव सोडून पुष्कळ दूरच्या एका गावी आला.

त्याला एक माहूत शिजवलेले कुळीथ खात असलेला दिसला. उपाशी उषस्ती जवळ जाऊन म्हणाला—"काय रे बुवा, 'मला देखील थोडे कुळीथ देतोस का?"

"हे उष्टे आहेत व दुसरे कुळीथ माझ्याकडे नाहीत." माहूत म्हणाला.

"उष्टे आहेत तर हरकत नाही. तेच मला दे." उषस्ती म्हणाला. माहूताने थोडे कुळीथ काढून दिले. त्यापैकी थोडे उषस्तीने खाल्ले आणि काही उपरण्यात बांधून ठेवले.

माहूत त्याला आपल्या तांब्यातले पाणी प्यायला देऊ लागला. पण उषस्तीने ते पाणी घेतले नाही व म्हणाला—"हे पाणी उष्टे आहे. मला नको."

"उष्टे कुळीथ तू खाल्लेस ते?" माहूताने, चकित होऊन उषस्तीला विचारले.

"मी हे कुळीथ खाल्ले नसते तर मला उपाशी मरावे लागले असते. खायला कोठे मिळत नाही आणि प्रत्येक जागी पाणी मिळते आहे." असे सांगून उषस्ती निघून गेला.

सौ. सरलाबाई माने

त्याने ते कुळीथ आपल्या बायकोला खायला नेऊन दिले. तिला त्यावेळी भूक नव्हती. म्हणून तिने ते तसेच ठेवून दिले.

उषस्तीनें दुसऱ्या दिवशी बायकोला विचारले—"आहे का काही खायला? काही पोटात पडलं, तर काही तरी काम करायला थोडा उत्साह वाटेल. शेजारी एका गांवी राजा यज्ञ करीत असल्याचे कळते."

"काल तुम्ही कुळीथ दिले होते ना, ते मी तसेच ठेवून दिले आहेत. ते खाऊन घ्या आणि यज्ञ करायला जा." आटकी नवऱ्याला म्हणाली.

उषस्ती ते उष्टे कुळीथ, आता तर ते शिळे पण झाले होते, खाऊन यज्ञ करायला निघाला. यज्ञशाळेत प्रवेश करून तो एका जागी बसला. सामवेद पाठ झाल्यानंतर प्रस्तोता, उद्गाता, प्रतिहर्ता स्तोत्र पाठ सुरू करणार होते.

उषस्ती प्रस्तोताला म्हणाला—"तू ज्या देवाचं स्तोत्र आता म्हणणार आहेस त्या देवाविषयी अज्ञानाने स्तोत्र म्हटलेस तर तुझ्या डोक्याची छकले होऊन जातील."

तेच तो उद्गाता व प्रतिहर्त्या यांना पण म्हणाला. तिघांना काय करावे, हे सुचेना. तिघे परस्परांची तोंडे पाहू लागले.















नंतर प्रस्तोताने उषस्तीला विचारले— "कोण असा देव आहे त्या देवाचे स्तोत्र मी म्हणू? कारण तुम्ही म्हणाला‌त की समजल्या शिवाय मी स्तोत्र म्हटले तर माझं डोकं फुटेल."

"तुझा स्तुत्य देव प्राण आहे. सर्व प्राणी या प्राणापासूनच जन्माला येतात, आणि या प्राणातच शेवटी लीन होऊन जातात." उषस्ती म्हणाला.

नंतर उद्गाताने उषस्तीला विचारले— "मी कोणत्या देवाचे स्तोत्र गावे, म्हणतां?"

"सूर्य! त्या सूर्याच्या कृपेनेच सर्व प्राणी जन्माला येतात." उषस्ती म्हणाला.

प्रतिहर्तानें पण पहिल्या दोघांनी विचारला तसाच प्रश्न केला.

"तुम्ही अन्न देवतेचे स्तोत्र म्हणावे. सर्व प्राणी अन्नदेवतेच्या कृपेनेच या जगात जगतात." उषस्ती म्हणाला.

राजा इतका वेळ ते सर्व संभाषण शांतपणे ऐकत होता. जवळ येऊन आदरपूर्वक उषस्तीला नमस्कार करून त्याने विचारले—"कोण आपण? जरा आम्हाला पण ते कळण्याचे भाग्य द्याव."

"मी चाक्रायण गोत्री आहे. माझं नाव उषस्ती." उषस्ती म्हणाला.

"आपल्या विषयी मला माहिती नव्हती. म्हणून मी इतर ब्राह्मणांना या यज्ञासाठी पाचारण केले होते. आता आपणच हा यज्ञ आरंभ व पूर्ण करण्याची कृपा करावी." राजा म्हणाला व त्याने उषस्तीलाच यज्ञ आरंभ करण्यास विनंती केली. यज्ञ संपल्यानंतर राजाने उषस्तीला सुद्धां ऋत्विकांबरोबर दक्षिणा देऊन त्यांचा सर्वप्रकारे सत्कार केला.





# कृष्णावतार

एकदा कृष्ण त्याचे वडील वसुदेवाच्या घरी असता त्याला एक गोष्ट सुचली. त्याच्या अनुयायांना राहण्यासाठी द्वारका नगरीचा निर्माण झाला. परंतु त्यांना आवश्यक त्या सुखसोयी मात्र होऊं शकल्या नाहीत. म्हणून त्याने शंखनिधीचे स्मरण केले. लगेच ती प्रगट झाली व म्हणाली "प्रभो! माझे स्मरण कशासाठी आपण केले आहे? आज्ञा करावी, लगेच तिचे पालन होईल."

"हे निधिदेवी! दरिद्र हा एखाद्या प्रेतासारखा असतो. माझ्या अनुयायांत कोणी दीन दरिद्र असलेला मला पाहवत नाही. प्रत्येक घरात सर्वदा सुख, शांती व सुबत्ता नांदेल असे काही तरी कर." कृष्ण म्हणाला.

"ठीक!" शंखनिधि म्हणाली व बाकी अष्ट निधींना भेटून तिने कृष्णाने दर्शविलेली इच्छा त्यांना कळविली. लगेच नवनिधी द्वारकेला येऊन राहू लागल्या आणि द्वारकेत सर्वत्र वैभवच वैभव दिसू लागले.

अशाच प्रकारे कृष्णाने एकदां वायूचे स्मरण केले. वायु प्रकट होऊन कृष्णासमोर हात जोडून उभा राहला.

कृष्ण त्याला म्हणाला "वायुदेवा! तुझे बळ आणखी कोणाच्या ही अंगात नाही.



माझे एक काम कर. इंद्रासाठी विश्वकर्म्याने सुधर्म नांवाची एक राज्यसभा निर्मित करून दिली होती. आम्हां यादवांसाठी देखील एका राज्य सभेची आवश्यकता आहे. तूं इंद्राला माझ्या या सूचने विषयी सांगून त्याच्या परवानगीने ती राज्यसभा मला आणून दे."

वायु इंद्रलोकी गेला. त्याने देवांना कृष्णाची इच्छा कळविली. त्यांच्या परवानगीने त्याने सुधर्मनांवाची राज्य सभा आणून कृष्णाला दिली आणि त्याचा निरोप घेऊन निघून गेला.

अशा तऱ्हेने कृष्णाने सर्व लोकांतून उत्तमोत्तम वस्तूंचा संग्रह करून द्वारकेचे वैभव वाढविले. नंतर त्याने स्वतः सर्व गोष्टींचा विचार करून मुख्यमुख्य कामें करण्यासाठी योग्य व्यक्तींच्या नेमणुका केल्या. उग्रसेन हा राजा होता. काश्यप नांवाचा एक ब्राह्मण यादवांचा पुरोहित होता. विकद्रु मंत्री होता. राज्यव्यवस्थेचे दहा विभाग पाडून कृष्णानें हुशार यादवांना त्या त्या विभागाचे काम पाहण्यास नेमले. दारुक हा कृष्णाचा सारथी होता. अस्त्र विद्येत द्रोणाचार्यांप्रमाणेच शूर असा सात्यकी द्वारकेचा सेनापती होता.

अशा प्रकारे प्रजेच्या सुखसोयीची उत्तम व्यवस्था करून दिल्यावर द्वारकेचे वैभव वाढले. ती भूलोकांतला स्वर्ग म्हणून गणली जाऊ लागली. रैवतला रेवती नावाची एक सुंदर मुलगी होती. तिच्याशी बलरामाचे लग्न झाले. त्यानंतर कृष्णाचे रुक्मिणीशी स्वयंवर झाले. त्याची कथा अशी.

विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेला विदर्भ नांवाचा देश आहे. त्याची राजधानी कुंडिन ही नगरी होती. त्यावेळी भीष्मक हा विदर्भ देशाचा राजा होता. त्याला रुक्मी नावाचा एक पराक्रमी मुलगा होता. त्याला द्रुव राजाकडून काही अस्त्रे व परशुरामाकडून ब्रह्मास्त्र मिळाले होते. त्याचे कृष्णाशी पटत नव्हते.

रुक्मीला रुक्मिणी नांवाची एक रूपवती आणि गुणवती बहीण होती. तिच्या सौंदर्याची प्रसिद्धी त्रिलोकात होती. तिच्या थोरपणाविषयी तीन गोष्टी प्रसिद्ध आहेत. सर्वांत प्रथम म्हणजे कृष्णावर तिचे प्रेम जडले होते. स्वतः कामदेव तिच्या पोटी जन्मला होता. ऋषी व मुनी तिला देवी प्रमाणे पूज्य मानीत असत.

रुक्मिणीच्या सौंदर्याचे व गुणाचे वर्णन मित्रमंडळींच्या तोंडी कृष्णाला कळले होते. त्याच प्रमाणे कृष्णाच्या सौंदर्याचे व शौर्याचे वर्णन रुक्मिणीला तिच्या मैत्रिणींकडून कळले होते. अर्थातच दोघांचे परस्परांवर प्रेम जडले. परंतु परस्परांना भेटणे दोघांना शक्य झाले नाही आणि त्यांना त्याचे विरह दुःख फार वाटू लागले.

आपण ज्या मुलीशी लग्न करण्याचा विचार करीत आहो त्याला विघ्न आणण्याची छाती त्रिलोकांत कोण करील, असे कृष्णाला वाटे आणि रुक्मिणी कृष्णाच्या नांवाच्या



मनांतल्या मनांत जप करीत होती. त्याला सोडून दुसरा काही विषय तिच्या मनात येतच नसे.

पण रुक्मीला कृष्ण मुळीच आवडत नाही. गवळ्याच्या मुलाला, गुराख्याने ज्याने काम केले त्याच्याशी आपल्या बहिणीचा विवाह ! ते त्याला कसे पटणार !

मध्यंतरी जरासंधाने मगध देशातून असा निरोप पाठविला की रुक्मिणीचा विवाह शिशुपालाशी करून द्यावा. जरासंधाची इच्छा म्हणजे आज्ञाच होती. शिशुपाल हा जरासंधाचा दत्तक मुलगा होता. त्याच्या



बापाचे नाव दमघोष होते. त्याची आई म्हणजे कृष्णाची आते, वसुदेवाची बहीण श्रुतश्रव. दमघोष व जरासंध हे नात्याने परस्परांचे व्याही होते. म्हणून दमघोषाने आपला सर्वांत मोठा मुलगा शिशुपाल याला जरासंधाला दत्तक दिला होता. शिशुपालाला सुनिधु असेपण एक नाव होते.

जरासंधाचा निरोप कळल्यावर भीष्मक शिशुपालाशी रुक्मिणीचा विवाह करून देण्यासाठी तयारी करू लागला. परंतु त्याला मनापासून तो संबंध पसंत नव्हता. कृष्णच आपला जावई व्हावा असे त्याला वाटत होते. परंतु रुक्मी व कृष्ण यांचे परस्परांशी पटत नाही, हे त्याला माहीत होते. रुक्मिणीचे लग्न शिशुपालाशीच व्हावे असा रुक्मीने हट्ट धरला होता. मुलाशी या गोष्टीवर भांडण करणे त्याला पसंत नव्हते. म्हणून तो जरासंधाच्या इच्छे-प्रमाणे लग्नाला तयार झाला.

लग्नाचा मुहूर्त ठरल्यावर जरासंधाने आपल्या स्नेही व नातेवाईक मंडळीस निमंत्रणे पाठविली. अंग, वंग, कलिंग, पौंड्र, पांड्य, काश, करूष इत्यादि देशांचे राजे लग्नास हजर राहण्यासाठी निघाले. शिशु-पालाबरोबर त्याचा मित्र करूषचा राजकुमार पौंड्रक वासुदेव, एकलव्याचा मुलगा वीर्यवंत, दंतवक्राचा मुलगा सुवक्र इत्यादि अनेक राजकुमार आले होते. या सर्वांसह जरासंध कुंडिन नगर येथे आला.

रुक्मी अनेक रथ, हत्ती, घोडे वगैरे घेऊन जरासंधाच्या स्वागतासाठी सामोरा गेला. वऱ्हाडाला उतरण्याची त्याने उत्तम तयारी ठेवली होती.

मुहूर्त दुसऱ्या दिवशीच होता. सर्व राजे रजवाड्यांनी आपापल्या सैन्याला खूप सजवले होते. शिशुपाल नवरदेवाचा



पोशाख करून आपल्या मित्र मंडळीबरोबर नटून तयार होऊन बसला होता.

तिकडे द्वारकेला नारदाने ही बातमी कृष्णाला जाऊन कळविली होती. त्याचा तो गोरा देह, सोनेरी रंगाचे केस, अंगावर हरिणाजिन, डोक्यावर मयूरपंखांचे छत्र, वायूच्या लहरींबरोबर येणारा गोड वीणेचा आवाज अशा वेषांत येणाऱ्या नारदाला पाहून सर्व द्वारकावासी चकित होऊन पहात होते.

नारद येत असल्याची वार्ता कळल्या बरोबर उग्रसेन, वसुदेव, कृष्ण, बलराम आदिक यादव प्रमुख त्याच्या स्वागतासाठी सामोरे गेले आणि त्याला आदरपूर्वक बोलावून सुधर्म राज्यसभेत घेऊन आले. त्याला सुवर्णासनावर बसायला सांगून त्याचा सर्वप्रकारे सत्कार केला.

कृष्णाने सर्वांना बसायला सांगून नार-दाला विचारले—"नारदा! सर्व सकुशल आहे ना? त्रिलोकांचे रहिवासी सुखासमा-धानाने रहात आहेत ना? तू त्रिलोकात वास करणारा, तुला माहीत नाही असे काय असणार? बरे तर येण्याचे काही विशेष कारण असेल तर बोल. यादव वंशाच्या हिताची काही गोष्ट असणार खात्री मला



तरी संशय नाही. आम्ही तर तुझ्या आगमनाने धन्य झालो."

कृष्णाच्या या गोड बोलण्याने नारद खूष झाला व म्हणाला—"अरे कृष्णा, तू मला हे सर्व विचारतो आहेस. नुसते तुझे स्मरण केल्याने प्राणिमात्राचे हित होते. तुझी कृपा असल्यावर कोणाला कशाची काळजी करण्याचे कारण नाही. असे असून ही तू मला हे विचारतो आहेस ही गोष्टच मला धन्यता वाटण्यास पुरे आहे." असे सांगून नारदाने सूर लावला व वीणावादन सुरू करून सुरांत हरिस्तवन केले. मीन



अवतारापासून रामावतारापर्यंतची कथा सांगितली. नंतर कृष्णाच्या बाललीला, कालियामर्दन इत्यादी पराक्रम, गोवर्धन धारण या सर्वासंबंधाने एकेक गीत म्हणून कृष्णाची स्तुति केली. नारदाचे ते गायन प्रत्येक जण तन्मय होऊन ऐकत होता. कारण कृष्ण हा त्यांचा आत्मीय, नातेवाईक किंवा खेळगडी होता. नारदाने गायन संपल्यावर वीणा एका बाजूला उचलून ठेवली तेव्हा सर्व, तो काय म्हणतो हे ऐकण्यासाठी उत्सुकतेने त्याच्याकडे पाहू लागले.

कृष्णाने नारदाकडे स्मित करून एकदा पाहिले व म्हणाला—"नारदा! तू माझी स्तुती गाऊन दाखविलीस. माझ्या गुणांचे इतके वर्णन केलेस. पण हे सर्व तू फुकटात केले असशील असे नाही वाटत मला. तुझा कांही हेतू असला पाहिजे. मग सांगून टाक."

"कृष्णा, तू अंतर्यामी आहेस. तुला माहीत नाही असे काही आहे का? आता, तू विचारतो आहेस म्हणून सांगतो. दक्षिणेकडे समुद्रकाठी गोकर्ण नावाचे एक तीर्थक्षेत्र आहे. तेथे शंकराचे एक ज्योतिर्लिंग आहे. त्याच्यासमोर वीणावादन करून व गायन करून मी कुबेराच्या दर्शनास जात होतो. वाटेत कुंडिनपुराचा राजा भीष्मक याला भेटलो. त्याने सर्वप्रकारे माझा सत्कार केला. परंतु तेथे जरासंध आदिक कित्येक राजे व चक्रवर्ती बसले होते. भीष्मकाला मी ते सर्व कशासाठी जमले आहेत हे विचारले. तेव्हा तो म्हणाला की त्याची मुलगी रुक्मिणी हिचा विवाह चेदी देशाचा राजा शिशुपाल याच्याशी करण्याचे ठरवून मुहूर्तपण नक्की करण्यात आला आहे. त्या लग्नासाठी सर्व












जमले आहेत. उद्या सकाळचा मुहूर्त धरला आहे. मी ही बातमी तुला कळविण्यासाठी येथवर आलो आहे." नारद म्हणाला.

नारद पुढे म्हणाला—"रुक्मिणीवर तुझे प्रेम आहे व भीष्मकाने तुझ्या शत्रूशी तिचे लग्न करण्यासाठी मुहूर्त धरला आहे. तुझे प्रेम तिच्यावर व तिचे तुझ्यावर आहे ही गोष्ट जगजाहीर आहे. शिशुपालाशी तिचे लग्न झाले तर त्या पेक्षा जास्त अपमानास्पद गोष्ट काय असणार? म्हणून तू उग्रसेन महाराजांना बरोबर घेऊन आणि सात्यकी वगैरे इतर शूर व पराक्रमी साथीदारांना ससैन्य घेऊन कुंडिनपुरी जा. तेथे जमलेल्या राजांची खोड मोडून त्यांचा बेत पार पडू देऊ नकोस. तुझ्या हाती सुदर्शन चक्र असेपर्यंत तुला कोणती गोष्ट अशक्य आहे? आणखी एक गोष्ट सांगून ठेवतो. मी आकाशमार्गे गुप्तपणे जात असता मी एका उद्यानांत आपल्या मैत्रिणीबरोबर बसून रुक्मिणी रडत असलेली पाहिली. अशा प्रसंगी तुझ्याशिवाय ती कोणाचा धावा करणार? ती विरह दुःखाने व इच्छे विरुद्ध तुझ्या शत्रूशी तिचे लग्न होत आहे, या मनःतापाने रडत बसली आहे. तिने खाणे पिणे सोडून दिले आहे. सखीचा हात धरूनच तिला उठता बसता येते. तिला पाहून दगडाला सुद्धा पाझर फुटेल. हे सर्व कष्ट ती केवळ तुझ्या दर्शनासाठी व तुझ्याशी तिचे लग्न होत नाही याबद्दल दुःखामुळे सहन करीत आहे. तूच वाचविलेस तर ती वाचेल. आता तूं आपले कर्तव्य समजून जे योग्य ते कर. बरे तर मी येतो."

असे सांगून नारद कृष्णाचा निरोप घेऊन निघाला.





# अरण्यपुराण

[१९]

माकडे मौवलीला पडक्या गावात घेऊन जाऊन निश्चित झाली. मौवलीचे मित्र त्याच्या मदतीला धावतील ही कल्पना देखील कधी त्यांच्या मनाला शिवली नाही.

मौवलीने कधी मोठ्या वस्तीचे गाव पाहिले नव्हते. ते पडके गाव म्हणजे एक जुने नगरच होते.

फार पूर्वी एका राजाने ते नगर एका डोंगरावर वसविले होते. नगराच्या द्वाराकडे जाण्याच्या वाटेची चिन्हें अद्याप स्पष्ट दिसत होती. दारे मोडून गेली असली तरी चौकटी शाबूत होत्या. बुरूजांच्या खिडक्यांतून रानटी वेली खाली लोंबत होत्या.

टेकडीवर जो राजवाडा होता त्याच्यावर छप्पर नव्हते. अंगणांत जे संगमरमरी दगड बसले होते ते फुटून मधून गवत व इतर लहान लहान झाडे उगवली होती. उघड्या भिंती असलेली अनेक घरे होती. ती घरे मधमाशीच्या काळ्या पोळ्यासारखीं दिसत होती. चौरस्त्यावर एक जुनी तुटलेली मूर्ती की पुतळा होता.

माकडांना ते आपले गांव वाटत होते. त्यामुळे ती इतर जनावरांना आपल्याहून हीन लेखीत. परंतु ही घरे कां बांधली गेली होती व त्यांचा उपयोग कसा करावयाचा हे त्यांना माहीत नव्हते. ती राजाच्या दरबारात उड्या मारीत आणि धांगड धिंगा करीत. कधी येऊन माणसा-



सारखी बसत. आपसात ती भांडत, परस्परांवर धूळ उडवीत पुन्हा राजाच्या बागेत शिरत व तेथील्या फळा फुलांचा नास करीत. त्यातच त्यांना गंमत वाटे. ते राजवाड्याचा काना कोपरा हिंडून येत, पण ते कोठे जाऊन आले हे थोड्याच वेळात विसरून जात.

"आपण माणसांसारखे राहातो नाही का?" ती आपसात बोलत. ती खड्डयातल्या पाण्यात डुंबत. माकडांना जितकी बुद्धि आहे व बळ आहे तितके इतर प्राण्यात नाहीं. ती परस्परांशी नित्य हेच बोलत. त्या नगरात काही दिवस राहल्यावर गंमत वाटेनाशी झाली म्हणजे पुन्हा रानात जाऊन रहात.

मौवली स्वतः रानात इतके दिवस राहालेला. पण त्याला या माकडचेष्टा आवडल्या नाहीत. संध्याकाळी माकडे त्याला घेऊन त्या पडक्या नगरांत घेऊन आली. इतके दिवस ती त्याला ओढून उचलून घेऊन आली होती. पण त्यांनी त्याला कधी स्वस्थपणे बसू की झोपू दिले नाही. त्या दिवशी पण त्यांनी त्याला मधोमध बसविले आणि त्याच्या चारी बाजूला उभी राहून नाचू व उड्या मारू लागली. एका माकडाने एक लांबलचक भाषणपण दिले. ते म्हणाले—"माकडांनी मौवलीला पळवून तेथे आणले ही गोष्ट इतिहासांत सुवर्णाक्षरांनी लिहिली जाईल. मौवली त्यांना वेली व वेळूंच्या चटाया विणायला शिकवील व त्यांची छपरे करून आपल्याला पावसापासून स्वतःचे रक्षण करता येईल."

मौवलीने काही वेली आणून त्यांना विणायला शिकविले. माकडेपण त्याची नकल करून थोडे थोडे विणण्याचे काम शिकू लागली. परंतु लवकरच त्यांना त्या कामाचा कंटाळा येऊ लागला. ती परस्परांच्या शेपट्या ओढीत आणि धावत पळत आणि खिदळत.

"मला भूक लागली आहे. येथल्या राना वनाची मला ओळख नाही. मला खायला तरी आणून द्या, नाही तर शिकार करायला परवानगी द्या." मौवली माकडांना म्हणाला.

त्याला खाण्यासाठी फळमुळे गोळा करून आणायला वीस पंचवीस माकडे निघाली. परंतु त्यांचे आपसांत भांडण झाले आणि वाटेतच ती फळे पडून नास होऊन गेली. उरलेली फळे आणणे कोणाला आवडले नाही.

मौवलीला उपास मारीमुळे राग येऊ लागला होता. तो शिकारीच्या शोधार्थ ओरडत त्या पडक्या नगरात हिंडू लागला. पण त्याच्या आवाजाला कोणाचेच उत्तर मिळत नव्हते.

"इतकी निरुपयोगी जागा आणखी कोठे नसणार. माकडांच्या विषयी अस्वल जे म्हणाले होते ते खरेच ठरले. यांना चाल नाही रीत नाही. काही नियम नाही. शिकार यांना करता येत नाही. यांचा



कोणी नायक नाही. फुकटच्या फुशारक्या मात्र मारतात आणि चोरी करून पोट-भरतात. मी येथे असा उपाशी मेलो किंवा त्यांनी मला ठार केले तर त्याला जबाबदार मीच आहे. काय वाटेल ते करून येथून निसटून पुन्हा जंगलांत जाता आलं तर बरं होणार आहे." मौवलीच्या मनांत हे विचार घोळत होते.

तो नगराच्या तटापर्यंत जेमतेम पोचला असेल, माकडे त्याला पुन्हा परत ओढून घेऊन आली. "तुला स्वतःचे हित कळत नाहीं." वृद्ध माकडे त्याला म्हणाली. मौवलीने दात ओठ चावून मनातला राग मनातच दावून टाकला.

राजवाड्यात एक संगमरमरी दगडाचा एक मंडप होता. शंभर वर्षांपूर्वी अंतःपुरा-तल्या स्त्रिया एका गुप्तद्वाराने येऊन तेथे चांदण्यात विहार करीत असत. मंडपाच्या चारीबाजूला संगमरमराच्या शिळा बस-वलेल्या होत्या. त्यांच्या फटीतून चांदणे आंत येत असे. आता ते छप्पर अर्धे फुटून गेले होते व गुप्तद्वाराचे तोंड बंद होत आले होते. माकडे मौवलीला धरून तेथे घेऊन आली व मोठमोठ्याने ओरडू लागली— "आम्ही वृद्ध, शहाणी व पराक्रमी माकडे आहो. आमच्या मधून तू पळून जातोस? आमच्या विषयी रानांतल्या इतर प्राण्यांना कांही समजावून सांग."

मौवलीला वाटू लागले— "यांना वेड लागलेला कोल्हा चावला असावा. म्हणून ती सुद्धा वेड्यासारखी वरळत होती. तो पहा चंद्रावर लहानसा ढगाचा तुकडा येत आहे. मोठा ढग असता तर मी पळूनच गेलो असतो."

[पुढील गोष्ट पुढील अंकी]



## "७३. नागपुर"

उत्तर अमेरिकेच्या एरिझोना वाळवंटात इ. सनापूर्वी तीन शतके आधी होहोकाम नांवाच्या एका जातीचा लोप झाला. गिला नदीच्या काठीं "नागपुर" नांवाच्या वस्तींत १२०० वर्षे ते रहात होते. प्रस्तर युगांतल्या आयुधांचा ते वापर करीत. त्यांनी शेतकीसाठी कालवे खोदले. त्यांची कोरीव कामें अलीकडे उपलब्ध झाली आहेत.



       

यांच्यासारख्या शत्रूकडे जास्त लक्ष पुरवू शकले. त्याचप्रमाणे निजाम व अवधचा नबाब यांना काबूत राखणे त्यांना शक्य झाले.

हे सर्व असले तरी साल्बाईच्या संधीमुळे इंग्रजांचे पाय हिंदुस्थानात कायमचे रोवले गेले, हे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरेल. इंग्रजांची एका पेच प्रसंगातून सुटका झाली होती, एवढेच. परंतु पेशवे व टिपू सुलतान यांच्याशी त्यांचे कधी जमले नाही. पंजाब, नेपाळ व ब्रह्मदेशात इंग्रजांना आव्हान करू शकणाऱ्या नवीन शक्ती डोके वर काढू लागल्या होत्या.

हेस्टिंग्स निघून गेल्यावर कॉर्नवॉलिस येण्यापूर्वी मॅकफरसन हा गव्हर्नर जनरल नेमून आला. तो योग्य शासक नव्हता. याशिवाय ब्रिटीश पार्लियामेंटने एक नवीन कायदा करून कंपनीच्या अधिकाऱ्यांना राजकीय प्रश्नात ढवळाढवळ करण्यास सक्त मनाई केली होती. म्हणून कॉर्नवालीसच्या हयातीतदेखील राजकीय दृष्ट्या महत्त्वाची अशी एक ही घटना घडली नाहीं.

तिकडे जी मराठा सत्ता थोडीशी डळमळित झाली होती तिचा उद्धार अहिल्याबाई, महादजी शिंदे व नाना फडणीस आदिकांनी केला. अहिल्याबाई राज्यकारभारात फार हुशार होती. त्या काळात तिने बजावलेली कामगिरी व तिची कर्तबगारी खरोखरीच वाखाणण्यासारखी होती. १७९५ मध्ये अहिल्याबाई राणीचा स्वर्गवास झाला तेव्हां तुकोजी होळकर इंदूरच्या गादीवर आला. तो शूर व पराक्रमी होता. परंतु राज्यकारभारात तितका हुशार नव्हता. १७९७ मध्ये तो वारल्यावर इंदूर राज्यांत अराजकता पसरली.





# झाडाचें गूढ

सुवर्ण देशात सुचंद्र नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याने पन्नास वर्षे राज्य केले होते. त्याने जवळपासचा प्रदेश आपल्या राज्यात मिळविला होता. परंतु तेवढ्याने त्याची राज्य तृष्णा तृप्त झाली नव्हती.

एकदा राजा शिकारीला गेला असता त्याच्या राज्याच्या उत्तरेकडील सीमेच्या डोंगराळ प्रदेशात तो हरणांच्या एका कळपाचा पाठलाग करू लागला. तो फार दूर निघून गेला. शेवटी ते हरण अदृश्य झाले. घोडा दमून गेला. राजा पण दमून गेला. दुपारची वेळ होती. राजा एका झाडा खालीं उभा राहून हरणांचा कळप पळून गेला होता त्या बाजूला पाहू लागला.

त्याला जें नैसर्गिक दृश्य दिसले ते पाहून राजा थक्क झाला. उत्तरेकडे त्याच्या राज्याच्या सरहद्दी पलीकडचा प्रदेश अत्यंत रमणीक असा होता. नजर जाई तिकडे मोठमोठे वृक्ष, गालिचासारखी दूरवर पसरलेली कुरणे आणि मधून मधून खळखळ वाहणारा पाण्याचा ओढा. दूर एक सुंदर देवालय व देवळासारखेच सुंदर दिसणारे देवदारूचे वृक्ष होते. एका बाजूला एक टुमदार लहानसे सुंदर नगर राजाला दिसले.

राजा तन्मय होऊन ते सर्व दृश्य पहात असता त्याचे मांडलिक सरदार आले. राजा त्यांच्याकडे वळून म्हणाला—"माझ्या राज्यात इतके सुंदर नगर असेल याची स्वप्नात देखील मला कल्पना नव्हती."

"महाराज! ते नगर आपल्या राज्यात नसून बाहेर आहे. आपण आतां जेथे उभे आहा तेथवरच राज्याची सीमा आहे."

श्री. राजाराम राणे













ते ऐकून राजा चकित होऊन म्हणाला– "ते नगर आपल्या राज्यात नाही म्हणता?"

"होय महाराज. ते आपल्या राज्यात नाही एक स्वतंत्र राज्य आहे. त्यांत खेडवळ लोक राहतात." मांडलिक राजे म्हणाले.

दात ओठ चावून राजा म्हणाला– "गांवढळ आणि स्वतंत्र? आजच्या आज सैन्य पाठवा आणि ते राज्य आपल्या राज्यात सामील करा." त्या सुंदर व स्वतंत्र शहरात सुचंद्रचे सैन्य शिरले आणि जाळपोळ व मोडतोड सुरू झाली. एका तासाच्या आंत साऱ्या शहराचा ध्वंस झाला. स्वच्छ कालव्यांचे पाणी नागरिकांच्या रक्ताने लाल झाले.

त्या देशाचे नागरिक हात जोडून समोर उभे राहतील व त्यांचे स्वातंत्र्य आपल्या चरणी अर्पण करतील असे सुचंद्रला वाटत होते. पण त्याचा अंदाज चुकला. तीन दिवस सतत युद्ध होत राहाले. नगराचे स्मशानात रूप बदलले. परंतु नागरिकांनी माघार घेतली नाही. बायका व मुले सर्वांनी देश रक्षणासाठी प्राणार्पण करण्याची प्रतिज्ञा केली. रात्र पडल्यावर सर्व मिळून डागडुजी करीत, जखमी झालेल्यांचे औषध पाणी करीत आणि दुसऱ्या दिवशीच्या युद्धाची योजना आखून त्यासाठी सर्व तयारी करीत.

चवथ्या दिवशी सुचंद्र आपल्या डेऱ्यात बसून युद्धासंबंधी विचार करीत होता. तेव्हा पाहरेकऱ्यांनी, एक म्हातारा भेटायला आला असल्याचे सांगितले. "कोणी शत्रूचा हेर नसेल तर त्याला आत बोलावून घेऊन ये." असे राजा म्हणाला.

तो म्हातारा फार अशक्त होता. त्याच्या जवळ शस्त्रास्त्र काही नव्हते. म्हणून पाहारेकऱ्यांनी त्याला आत बोलावून आणले.





"कोण तू? काय काम आहे? तुझ्याशी बोलायला माझ्याजवळ जास्त वेळ नाही. एका जरूरी प्रश्नाबाबत मी विचार करीत आहे यावेळी." राजा म्हणाला.

"मी फक्त आपल्या दर्शनासाठी आलो होतो महाराज." म्हातारा म्हणाला.

"शत्रूच्या देशाचा राहणारा आहेस का त्या गांवचा?" राजाने करड्या आवाजांत विचारले.

"नाही महाराज! मी आपलीच एक गरीब प्रजा आहे. माझे झोपडे येथे जवळच आहे." म्हातारा म्हणाला.

"बरं, बरं! कायं पाहिजे तुला?" राजाने त्याला विचारले.

म्हाताऱ्याने एक हाडाचा तुकडा दाखविला आणि म्हणाला–"महाराज, या हाडाच्या वजनाचे सोने आपण दिलेत तर मला दुसरे काही नको."

राजाला त्या म्हाताऱ्याच्या हातात एक हाडाचा लहान तुकडा दिसला. म्हणाला– "बस्स! एवढंच सोने पाहिजे तुला? हे तर एक गुंजभर देखील नाही. हे सोन्याचे, नाणे घे आणि जा." असे म्हणत राजाने एक सुवर्णमुद्रा म्हाताऱ्यासमोर फेकली.

"नाही, महाराज! मला या हाडाच्या वजनापेक्षा रत्तीभर जास्त सोने नको आहे. वजन करून जेवढे भरेल तेवढे द्यावे, मी लोभी नाही." म्हातारा म्हणाला.

म्हाताऱ्याला संतुष्ट करण्यासाठी राजाने एक लहानसा तराजू मागविला. एका पारड्यात हाडाचा तुकडा ठेवला व दुसऱ्यात सोन्याचे नाणे. पण काय आश्चर्य! हाड ज्या पारड्यात होते ते पारडेच खाली गेले. व सोन्याचे नाणे ज्या पारड्यात होते ते वर गेले.. राजा चकित होऊन तराजूकडे पहात राहाला. त्याने आणखी











सोन्याची नाणी पारड्यात टाकलीं. परंतु हाड घातलेले पारडे खाली ते खालीच. त्याने जवळ असलेल्या सर्व सुवर्णमुद्रा ठेवून दिल्या व अंगावरची आभूषणे काढून पारड्यात ठेवली. तरी हाडाचे पारडे जागचे हालले नाही.

"महाराज, आपल्याजवळ या हाडाच्या वजनाचे सोने नसेल तर राहू द्यावे. मी येतो." म्हातारा म्हणाला.

"थांब, यात काही तरी लुच्चेगिरी दिसते आहे. हाडाचा तुकडा इतका लहान आहे व त्याचे वजन इतके कसे?" राजा म्हणाला.

"महाराज! हा हाडाचा तुकडा म्हणजे लोभ आहे. जगातले सर्व सोने आणून जरी आपण ठेवलेत तरी हा तुकडाच जास्त वजनाचा ठरेल." म्हातारा म्हणाला.

"म्हणजे लोभाच्या बरोबरीची वस्तु या जगात नाही असे का तुझे म्हणणे आहे?" राजाने विचारले.

म्हाताऱ्याने शेजारी उभा असलेल्या शिपायाच्या हातात तराजू दिला. नंतर त्याने आपल्या रक्ताचा एक थेंब दुसऱ्या पारड्यात टाकला. लगेच हाडाचे पारडे वर गेले.

"महाराज, मी वृद्ध आहें. माझे रक्त हलके झाले आहे. हाच रक्ताचा थेंब तरुण माणसाचा किंवा कोवळ्या मुलाचा असेल तर किती वजनी होईल!" असे सांगून म्हातारा निघून गेला.

राजा थोडावेळ किंकर्तव्य विमूढ स्थितीत जागच्या जागी उभा राहाला. नंतर तो म्हणाला—"थांबवा युद्ध, सैन्य मागें घ्या."

राजा आपले सैन्य घेऊन राजधानीत परत गेला. पुढे कधी त्याने स्वारी करण्याचा विचार मनात येऊ दिला नाही.






# पडकें देऊळ

पूर्वेकडील डोंगराळ प्रदेशांतल्या अरण्य भागांत शबर जातीच्या लोकांची अनेक गांवे होती. त्यांत कुंभारगड नांवाचे एक गांव होते. त्या गांवचा प्रमुख जिवाजी नांवाचा एक सरदार होता. वयाने तोच सर्वांत मोठा होता. त्याला अठरा वर्षे वयाचा शिखीमुख नांवाचा एक मुलगा होता. तो जन्मला तेव्हां बापाची पन्नाशी उलटली होती. आपल्या मागे मुलगाच सरदार होणार हे ओळखून जिवाजीने लहानपणा पासूनच त्याला शस्त्रविद्या शिकविण्यासाठी योग्य गुरू नेमले होते. शिखीमुखने तलवार चालविण्यांत, धनुर्विद्येंत व जमिनीवर किंवा पाण्यांत कोठे ही शिकार करण्यांत चांगले प्राविण्य मिळविले होते. पंधराव्या वर्षीच त्याला या सर्व विद्या अवगत झाल्या होत्या.

चार लोक मुलाची वाखाणणी करू लागले की जिवाजीला परमानंद होई. या आनंदाबरोबर त्याच्या डोळ्यांत एका गोष्टी बद्दल नेहमी चिंता झळके. त्याला वाटे की आपण स्वतः काही जास्त शिकलो नाही. पण मुलाने तरी नीट विद्याभ्यास करून विद्वान व पंडित व्हावे. परंतु शिखीमुख याचा विद्याभ्यास अक्षरज्ञानाबरोबर संपला.

कुंभारगडच्या जवळपास शें दीडशें मैलाच्या टापूत जिवाजीहून जास्त शिकला



सवरलेला शवर जातीचा कोणी नव्हता. शबर लोक जंगली जातीचे होते. शिकार करणे व पशुपालन हाच एक धंदा त्यांना येत होता. पण शिवाजी तरुण वयांत असतांना मित्र मंडळी बरोबर दूरदूरचे देश पाहून आला होता. त्याने थोडा फार विद्याभ्यास पण केला होता. या सर्वांचा त्याला स्वतःच्या जीवनांत फार उपयोग झाला होता. परंतु या बाबतीत शिखीमुखने आपल्या बापाला निराशच केले.

दररोज उजाडल्यावर धनुष्य बाण व भाला हातांत घेऊन निघते वेळी तो आपल्या बापाला सांगून जाई तो संध्याकाळीच घरी परत येई.

एके दिवशी सकाळी तो शिकारीला जातो असे सांगून निघाला. त्याच्या बरोबर त्याचा शिकारी कुत्रा पण होता. लहानपणापासून त्याला त्याने प्रेमाने वाढविले होते. तो कुत्रा सिंहासारखा शूर व कोल्ह्यासारखा हुशार होता. शिकारीच्या शोधार्थ रानांत हिंडतांना कुत्र्याला व त्याच्या धन्याला परस्परांची पुष्कळ मदत मिळे.

त्या दिवशी शिखीमुख व त्याचा कुत्रा फार दूर वर गेले. सूर्य डोक्यावर आला होता तरी त्यांना एकही शिकार सांपडली नाही. जंगलांत सर्वत्र सामसूम होते. माकडे मात्र मधून मधून दिसत व शिकाऱ्याला पाहून आड पाहून लपून बसत. मधून मधून वाघ दुरून पळून गेल्याचा भास होई.

"सर्व जंगल असे शांत कसें! रानांत रोग राई तर पसरली नाही? वाघ असे पळून कां जात आहेत?" असे म्हणत कुत्र्याकडे शिखीमुखने पाहिले. कुत्रा जमीन हुंगत पुढे पुढे गेला. धन्याला जागच्या जागी थबकलेला पाहून कुत्रा थोडा गुरगुरला.



त्याचा अर्थ शिखीमुखला कळला—"पुढे कां नाही येत?"

शिखीमुख उत्तरादाखल म्हणाला—"उन्हांत हिंडून डोकें फिरलें आहे वाटते? तुझे भुंकणे ऐकून जवळपास जनावरे असतील तर ती पळून नाही का जाणार?"

कुत्रा थोडा वेळ गुपचूप चालत होता. नंतर जमीन हुंगून जोराने पुढे धांवला. परंतु धनी जागच्या जागी उभा आहे हे पाहून तो मागे परतला आणि धन्याच्या चारी बाजूला तीन चारदा फिरला, जणुं काही तो विचारीत होता—"असे उभे का धनी? चला ना पुढे. कुत्र्याची ती वागणूक पाहून शिखीमुखला थोडे आश्चर्य वाटले. तरी एका झाडावर चढून कुत्रा ज्या बाजूला गेला होता त्या बाजूला त्याने दूर वर पाहिले. त्याला कोणी मनुष्य किंवा शिकार काहीच दिसले नाही.

शिखीमुखला कुत्र्याचा स्वभाव चांगला माहीत होता. त्याने कुत्र्याला जवळ ओढून त्याच्या पाठीवर हात फिरवला, आणि कुत्र्याला सोडून कुत्रा कोठे जातो हे झाडावर चढून लक्षपूर्वक पाहू लागला. त्याला दूर एक शिकारी दिसला. तो घोड्यावर बसला होता. त्याच्या अंगा खांद्यावर व घोड्याच्या



पण अंगा खांद्यावर कवच होते. त्याच्या कमरेला एक लांब तलवार होती. उजव्या हातात एक मोठा भाला होता. भाल्याच्या टोकाला पिवळ्या रंगाचा झेंडा वाऱ्या बरोबर फडफड करीत होता.

हा कोण बरे असावा? बाबा पुराणांतल्या गोष्टी सांगत, त्यांत अतिरथी व महारथी यांचे ते वर्णन सांगत, त्यांच्या सारखाच हा कोणी तरी दिसतो आहे. पण याचारथ कोठे दिसत नाही. पण काय तरी पोशाख दिसतो आहे स्वारीचा? असा विचार करीत असता त्याला थोडे हंसू पण आले. कवच



धारण करून युद्धाला निघणाऱ्या क्षत्रियांना त्याने त्यापूर्वी कधी पाहिले नव्हते. त्याने एक दोनदा राजाच्या सैनिकांना पाहिले होते खरें, पण असे कवच त्यांच्या अंगावर त्याला कधी पाहायला मिळाले नव्हते.

शिखीमुख त्याच्याकडे अशा तऱ्हेने चकित होऊन पहात असता त्याला एक विचित्र व भयंकर दृश्य दिसलें. आठदहा जण झाडावर टपून बसले होते त्या घोडे-स्वाराच्या चारी बाजूला. त्यांनी एकदम उडी मारली. त्यांच्या पोशाखावरून ते चोर व लुटेरे दिसत होते. घोडा त्यांना पाहून विचकलेला दिसला. घोडेस्वाराने त्याला सावरले व तलवार उपसून तो त्यांच्यावर सिंहासारखा चवताळून धांवला.

घोडेस्वारावर अचानक ओढवलेला तो प्रसंग पाहून शिखीमुखला वाटले, एकट्यावर आठ दहा जणांनी एकदम हल्ला करणे हे धर्मविरुद्ध आहे. शत्रू जास्त आहेत म्हणून तो घोडेस्वार मुळीच घाबरल्या सारखा दिसला नाही. म्हणून त्याच्या बद्दल शिखीमुखच्या मनात आदर भाव वाढला. त्याने आपल्या कुत्र्याला सावध केले आणि झाडाच्या फांद्यावरून भराभर उड्या मारीत तो मोक्याच्या जागेवर जाऊन पोंचला.

तोंपर्यंत त्या तरुण घोडस्वाराने दोघां तिघांना जमिनीवर लोळवले होते. "या विक्रमकेसरी तलवारीला बळी पाहिजे. नीच, दुष्ट, भित्र्यांनो! पळून जाऊ नका, आज मी आपल्या तलवारीचे पाणी पाजणार आहे एकेकाला. तो जोर जोराने ओरडून सांगत होता. इतक्यात एका चोराने लपून त्याच्या घोड्याच्या एका खुराला नेम धरून बाण मारला. घोडा कळवळून एका बाजूला वळला. त्या हिसक्यामुळे घोडेस्वार खाली जमिनीवर पडला, परंतु घाबरला नाहीं.



एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत भाला घेऊन चोरांवर तुटून पडला.

त्याच वेळी "शबर मातेचा जय असो!" असे म्हणत शिखीमुखने झाडावरून उडी मारली. त्याच वेळी कुत्र्याने एका चोरावर झडप मारली. तो त्या चोराचा गळा धरण्या-साठी उडी मारीत होता. घोडेस्वाराला कळेना की, हा नवा मनुष्य शत्रू आहे की मित्र. तो क्षणभर जागच्या जागी थक होऊन पहात उभा राहिला. परंतु शिखीमुख चोराबर भाला उगारून धावला. ते पाहून तो घोडेस्वार म्हणाला—"मित्रा! या दुष्टां पैकी एकाला देखील जिवंत पळून जाऊं द्यायचे नाही बरं का!

इतक्यांत रानांत शिट्टी वाजली. ती ऐकून चोर पाय काढण्याचा प्रयत्न करू लागले. घोडेस्वाराने कवच घातले होते, म्हणून चोरांचा पाठलाग करणे त्याला शक्य झाले नाही. तरी शिखीमुख व त्याचा कुत्रा दोघांनी चोरांचा पाठलाग केलाच. परंतु ते झाडीत शिरून अदृश्य झाले तेव्हा ते घोडेस्वार होता तेथे परत आले.

घोडेस्वार आपल्या घोड्याला लागलेली जखम पहात होता. शिखीमुख जवळ येऊन म्हणाला—"ते दुष्ट पळून गेले. तुम्ही या रानांत एकट्याने येणे बरोबर नाहीं. तुम्हांला कोठे लागले नाहीं, एवढे बरे झाले. या, घोड्याच्या जखमेवर काही तरी औषध लावू" असे सांगून तो जवळच्या झाडीत शिरला आणि झाडाचा पाला तोडू लागला.

पण घोडेस्वार काहीच बोलला नाही. तो चकित होऊन शिखीमुखाकडे पहात होता. तो एक जंगली शबर जातीचा आहे हे त्याच्या कपड्यावरून सहज कळण्यासारखे होते. संकट समयी तो मदतीला धावून आला होता! "शबर मातेचा जय" असे



म्हणत तो चोरांवर तुटून पडला होता, हे त्याने पाहिले होते. तरमग हा शबर जातीचाच आहे का? खरं आहे का हे सर्व, की काही गुपित या मागे दडले आहे. हे विचार त्याच्या मनात घोळत होते.

शिखीमुख घोड्याजवळ जाऊन त्याच्या जखमेला पाला वाटून त्याचा रस लावीत घोडेस्वाराला विचारू लागला—"आपलं नाव काय? रानात एकटे कां फिरता?"

घोडेस्वाराने चटकन उत्तर दिलं नाही. मागे पुढे करू लागला. "आपण दोघे एकाच वयाचे दिसतो आहो,—अठरा वीसच्या दरम्यानचे. होय की नाहीं? मग 'आपण' म्हणण्याची काय गरज? बरें, पण तुझ्या प्रश्नांची उत्तरे देण्यापूर्वी मी तुला एक प्रश्न विचारतो."

"विचारा ना!" शिखीमुखला आश्चर्य वाटले, तरी त्याने होकार दिला.

"तू शबर जातीचा आहेस म्हणालास नाही का? आणि तुझे नाव शिखीमुख आहे म्हणालास, होय ना?" घोडेस्वाराने विचारले.

"होय, माझे नाव शिखीमुख आहे. आपले....नाही, नाही, तुझे नाव काय?" शिखीमुखने विचारले.



"शिखीमुख!" घोडेस्वाराने चकित होऊन डोके हलवीत विचारले—"पण ते तुझ्या आजोबांचे नांव आहे, नाही का? माझे नाव विक्रम केसरी आहे. ते माझ्या आजोबांचे नाव आहे. तुझ्या वडिलांचे नाव जिवाजी आहे. त्यांच्या तोंडी तू विक्रम केसरीच्या विषयी कधी तरी काही तरी ऐकले असशील. कोठे आहेत ते? खुशाल आहेत ना?" विक्रम केसरीने विचारले.

विक्रम केसरी बोलत होता ते ऐकून शिखीमुखला स्वप्न तर पहात नाही, असे

वाटू लागले. स्वप्नात देखील त्याला कधी वाटले नव्हते की विक्रम केसरीची व त्याची अशी अनपेक्षितपणे भेट होईल. म्हणाला— "माझे बाबा खुशाल आहेत. मी त्यांच्या तोंडी तुझ्या आजोबांविषयी पुष्कळ ऐकले आहे. तू शूरसेन देशाचा राहणारा नाही का? तू आमच्याच गांवी निघाला होतास का? पण हे सर्व मला खरेच वाटत नाही." शिखीमुख म्हणाला.

"आणखी अशा कित्येक गोष्टी तुला खऱ्या वाटणार नाहीत. पण घरी पोचल्यावर त्या सर्व मी तुला सांगणार आहे. माझ्यावर ज्यांनी हल्ला केला होता ते चोर नव्हते. त्यांना माझ्याजवळ ही जी खोगिराला बांधलेली पैशाची पिशवी आहे, फक्त तीच हवी होती असे नाही. त्यांना माझा जीव घ्यायचा होता. म्हणून मी जितक्या लवकर तुझ्या गांवी पोचेन तितके बरे." विक्रमकेसरी म्हणाला.

ज्या ठिकाणी ते लोक उभे होते तो किती भयंकर प्रदेश आहे हे शिखीमुखला तेव्हां कळले. चोर झाडाआडून त्यांच्यावर पुन्हा पुन्हा हल्ला करण्याच्या विचारात होते.

जखमी घोड्याला घेऊन दोघे कुंभार गडाकडे निघाले. वाटेत शिखीमुखने एक रानटी डुकर मारून ते खांद्यावर टाकले. वाटेत चोरांशी त्यांची चकमक घडली नाही. काळोख पडण्यापूर्वी ते गावाजवळ पोचले तेव्हां जिवाजी काही अनुयायांना बरोबर घेऊन मशाली घेऊन येत असतांना दिसले. गांवकऱ्यांनी शिखीमुखला ओळखलें व मोठमोठ्याने ओरडत जवळ गेले.

[पुढे पुढील अंकी.]



# वर फुकट

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाहीं. तो झाडाजवळ गेला, झाडावरचे प्रेत काढून नेहमीप्रमाणे काही बोलल्याशिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"तुझी चिकाटी पाहून मला आनंद वाटतो. परंतु केव्हां केव्हां असे वाटते की हेमंतची मुलगी मालिनी हिला मिळालेला वर जसा फुकट गेला तसं झालं नाही म्हणजे पुरे. तुला रात्रीच्या वेळी कंटाळा वाटू नये म्हणून मी हेमंतच्या मुलींची गोष्ट तुला सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." असें सांगून त्याने गोष्ट सांगायला सुरुवात केली.

जयंती नगरीं हेमंत नावाचा एक सामंत राजा रहात असे. त्याला दोन मुली होत्या. मोठीचे नाव मालिनी होते व धाकटीचे

वेताळाच्या गोष्टी



नलिनी. मालिनी फार हुशार होती, तशीच ती शांत स्वभावाची पण होती. परंतु तितकीशी सुंदर नव्हती. नलिनी फार सुंदर होती. पण स्वभावाने थोडी चिडखोर होती. त्याच प्रमाणे तिला स्वतःच्या सौंदर्याबद्दल गर्व पण होता.

मालिनी व नलिनी वयात आल्यावर त्यांचे लग्न करून देण्याचा विचार हेमंतने केला. परंतु योग्य वर हुडकण्याचे काम तेवढे सोपे नव्हते. पुष्कळ स्थळे सांगून आली. परंतु प्रत्येकाने नलिनीचीच निवड केली. मालिनीशी विवाहाला कोणी तयार होत नव्हता. मोठ्या मुलीचे लग्न झाल्या शिवाय धाकटीचे लग्न कसे करून द्यायचे? हा प्रश्न आईवडिलांसमोर उभा होता. नलिनीचे लग्न करून टाकणे देखील तितके सोपे नव्हते. कारण तिला स्वतःच्या सौंदर्याचा इतका गर्व होता की तिला कोणताच संबंध पसंत नव्हता. म्हणून लहान मुलीचे लग्न करून टाकावं असा विचार हेमंतच्या मनात आला असता तरी तिचं लग्न करून टाकणे शक्य झाले नसते.

मध्यंतरी हेमंतच्या बालमित्राचा माधव वर्मा नावाचा मुलगा कित्येक देशात पर्यटन करीत जयंती नगरी आला. तो हेमंतच्याच घरी उतरला. तो दिसायला सुंदर होता. नलिनीचे मन दुसऱ्याच एका तरुणाकडे वळू लागले होते. परंतु माधव वर्माचे सौंदर्य पाहून तिच्या मनात पालट झाला व तिने माधव वर्मावर आपल्या सौंदर्याची छाप पाडून त्याला आपल्याकडे आकर्षित करण्याची खटपट सुरू केली. परंतु नलिनी घमेंडखोर आहे हे माधव वर्मा ओळखून होता.

माधव जयंती नगरी काही दिवस मुक्काम करून पुढे निघण्याच्या विचारात असता हेमंतने त्याला आपल्या मनातली गोष्ट





विचारली. म्हणाला—"मी व तुझे वडील दोघे बालमित्र होतो. म्हणून आपल्या दोन्ही घराण्यांचा संबंध जुळला तर त्याहून आनंदाची गोष्ट काय होऊ शकेल! तू माझ्या दोघां मुलींना पाहिले आहेस. लहान किंवा मोठी दोघीं पैकीं तुला जिच्याशी लग्न करावेसे वाटेल तिच्याशी कर, मला त्यांत आनंदच आहे."

माधव म्हणाला—"तुम्ही मला पितृतुल्य आहां. परंतु मला निवड करताच येत नाही. कारण माझ्या सहधर्मिणीत सौंदर्य व सौजन्य दोन्ही गुण असावेत असे मला वाटते. तुमच्या दोन्ही मुलीं पैकी एकीत हे दोन्ही गुण नाहीत. मालिनी सुशील आहे तर नलिनी सुंदर आहे. मी एक वर्ष भर हिंडून फिरून परत येईन तो इकडूनच घरी परत जाईन. तोपर्यंत लग्नाचा विचार माझ्या मनात पक्का झाला तर मी तसं आपणांस स्वतःच कळवीन. तूर्त मला क्षमा करा."

माधव निघून गेल्यावर तो जे काही म्हणाला, ते सर्व हेमंतने दोघां मुलींना सांगितले. ते ऐकून दोघींच्या मनात निर-निराळ्या प्रकारे प्रतिक्रिया झाली. खरं बोलावयाचं म्हणजे दोघींना माधवशीच लग्न व्हावे असे वाटे.

माधव जे म्हणाला ते ऐकून मालिनी मुळीच हताश झाली नाही. परंतु नलिनी मात्र हताश झाली. आपल्या स्वभावातली नेमकी एकच एक उणीव इतरांच्या लक्षात कशी येते याचे तिला आश्चर्य वाटे. आपण आपल्या सौंदर्याने मदनाच्या पुतळ्याला देखील भाळून टाकू असे तिला वाटत होते. परंतु माधवने, स्वतःच्या सौंदर्याबद्दल तिच्या मनांत जो गर्व होता त्यामुळेच तिला नापसंत केले हे जेव्हा तिला कळले तेव्हा तिला अर्थातच

चांदोबा



फार वाईट वाटले. तिच्या स्वाभिमानाला फार मोठा धक्का बसला व तिचा गर्व पार उतरला.

या उलट मालिनीने पुढे काय करावयाचे हे देखील मनात ठरवून टाकले होते. माधव परत येण्यापूर्वी तिला रूप लावण्य मिळविता आले तर त्याच्याशी तिचे लग्न नक्कीच होईल असा विचार करून तिने सुंदर रूप मिळविण्याचे मनाशी ठरविले.

ती एका मांत्रिकाकडे गेली. त्याने तिला सहा महिने श्वेताग्नी नावाच्या यक्षिणीची आराधना करण्यास सांगितले. आराधनेत काही दोष किंवा उणीव राहाली नाही तर नक्कीच तुझी इच्छा पुरी होईल असे देखील मांत्रिकाने तिला सांगितले.

मालिनीने, मांत्रिकाने सांगितल्याप्रमाणे सर्व प्रकारचे कष्ट सहन करून सहा महिने त्या यक्षिणीची आराधना केली. तेव्हां यक्षिणीने प्रगट होऊन तिला, काय इच्छा आहे असे विचारले.

"मला माझ्या बहिणीहून जास्त रूप-लावण्यवती करून दे." असा मालिनीने वर मागितला.

"तथास्तु !" असा वर देऊन यक्षिणी अंतर्धान पावली.

त्यानंतर मालिनीच्या रूपात खरोखरीच फरक होऊ लागला. तिचे रूप लावण्य दिवसेदिवस वाढत गेले. रंग उजळ झाला. डोळे हरिणी सारखे मोठे झाले. हेमंत तिचे ते रूप पाहून मनातल्या मनात विचार करू लागला—"आता मालिनी, नलिनी पेक्षा काकणभर जास्तच सुंदर दिसू लागली आहे. काय पण आश्चर्य आहे हे ?"

लोक उघड उघड "मालिनीच जास्त सुंदर आहे," असे म्हणू लागले.

"बहिणीचे भाग्यच मोठे दिसतं. तिला पाहून माधव नक्कीच तिच्याशी लग्नाला तयार होईल." नलिनीला वाटू लागले.

माधव पर्यटन संपवून परत येते वेळी जयंती येथे आला. हेमंतकडेच उतरला. मालिनी व नलिनीजवळ तो पहिल्याप्रमाणेच बोलला चालला. दोन दिवसांनी तो हेमंतला भेटून म्हणाला—"तुमच्या लक्षात असेल, तुमच्या दोघां मुलींपैकी एकेशी मी लग्न करावं अशी तुमची इच्छा होती व मी परत येईन तेव्हां काही तरी नक्की उत्तर देईन असे म्हणालो होतो. आतां मी निश्चय केला आहे. मी आपली धाकटी मुलगी नलिनी हिच्याशी विवाहास तयार आहे."

हेमंतला अपार आनंद झाला. आतां मोठ्या मालिनीशी लग्नाला पुष्कळ लोक तयार झाले होते. माधवने तिची निवड केली नाही, याबद्दल मालिनीला फार राग आला. तिने माधवहून चांगल्या श्रीमंत घराण्यात लग्न करायचे मनाशी ठरवून तसेच केले. हेमंत आपल्या दोघां मुलींची लग्ने करून देऊन मोकळा झाला. दोघी आपापल्या सासरी निघून गेल्या.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा ! मला हे सांग, माधवने मालिनीशी कां लग्न केले नाही ? ती तर यक्षिणीच्या



       



कृपेनें नलिनीहून जास्त सुंदर दिसू लागली होती, नाहीं का ? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमार्क म्हणाला—"सौंदर्य प्राप्तीच्या प्रयत्नांत मालिनी आपले सौजन्य गमावून बसली होती. यक्षिणीकडून सौंदर्य मिळविण्यासाठी तिने तिची जी आराधना केली त्यांत तिचा स्वतःचा स्वार्थ व बहिणीच्या सौंदर्याचा हेवा स्पष्ट प्रगट झाला. याउलट नलिनीला स्वतःची उणीव कळली व तिचा गर्व परिहार झाला होता. याला मुख्य कारण माधववर तिचे अत्यधिक प्रेम होते हे होय. माधव पुन्हा जयंतीपूर येथे आला तेव्हा तो दोघींशी पहिल्या सारखाच बोलला होता. तेव्हां त्याला नलिनी व मालिनी दोघींच्या स्वभावात झालेला बदल आढळला. नलिनीचे सौंदर्य त्याने पहिल्यानेच पाहिले होते व आतां तिच्या स्वभावात जो बदल झाला तो त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहाला नाही. मालिनीचे सौंदर्य पाहून तर तो चकितच झाला. पण तिच्या स्वभावांत झालेला फरक पाहून त्याला जास्तच आश्चर्य वाटले. त्याला फक्त सौंदर्य नको होते. ते त्याला नलिनीत पूर्वीच दिसले होते. आतां ते मालिनीत दिसले. परंतु तिचे सौजन्य नाहीसे झाले होते. म्हणून तिच्याशीं लग्न न करण्याचे ठरवून त्यानें नलिनीशी लग्न करण्याचे ठरविले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतावरोबर नाहीसा झाला व पुन्हा झाडाला धरून लोंबकळू लागला. (कल्पित)





# चंचल लक्ष्मी

मदुरा या सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्री राघव नावाचा एक ब्राह्मण तरुण रहात असे. त्याला स्वतचे असे कोणी नव्हते. तरी तो इतरां पुढे कधी हात पसरीत नसे. तो गावांतल्या सर्व वैष्णव मंदिरांत जाई. तेथील देवांची भक्तिभावे प्रार्थना करी आणि तेथे त्याला जो प्रसाद मिळे त्यावर त्याचा उदर निर्वाह चाले. दिसायला तो तरणाबांड होता व त्याचे शरीर पण पिळदार होते.

एकदा राघवला लक्ष्मी स्वप्नांत दिसली. म्हणाली—"राघवा ! मी तुझ्यावर प्रसन्न झाले आहे. आता मी तुझ्या बरोबरच राहून तुला सर्व ऐश्वर्य देणार आहे."

राघव लक्ष्मीला नमस्कार करून म्हणाला—"देवी, मी तुझा फार आभारी आहे. आज तुझी कृपा झाली आहे. इतके दिवस तुझी कृपा नव्हती म्हणून मी निश्चित होतो. कोणाला माझी फिकीर नव्हती की मला कोणाची नव्हती. पुजारी जे काही दया करून देई तेवढ्याने माझे पोट भरे. तुझ्या भक्तीमुळे नव्हे. शंभर वेळा मी हात जोडून सांगू इच्छितो, तुझ्यावर माझी भक्ति नाहीं."

लक्ष्मीला ते उत्तर ऐकून राग आला. म्हणाली—"मूर्खा ! तू नुसता मूर्ख नसून खुळा पण आहेस. मी तुला असा सोडणार नाहीं."

"ठीक, पण एक विनंती आहे. तूं मला सोडून जायचे ठरविशील तेव्हां थोडे आधी सांग." राघवने विनंती केली.

"जाते वेळी सांगेन," लक्ष्मी म्हणाली आणि अंतर्धान पावली.

दुसऱ्या दिवशी एक कोट्याधीश देवळात पूजेसाठी म्हणून आला. त्याने राघवला

सौ. शारदाबाई भोसले



पाहिले. त्याने राघवला पाहताच त्याला एक धोतर व उपरणे दिले आणि त्याच्या-बरोबर आलेल्या लोकांनी राघवला गळ्यात पुष्पहार घातले. पूजा झाल्यानंतर संतर्पण झाले. राघव पोटभर जेवला. तो प्रसादा! शिवाय पूर्वी दुसरे काही खात नसे. त्या दिवशी पंच पक्वान्नांचे जेवण झाल्यावर त्याला वाटलें की लक्ष्मी म्हणाली होती तसेच सर्व घडत आहे.

रात्री त्या कोट्याधीशाकडेच जेवण झाले. तोपर्यंत राघव त्या कोट्याधीशाच्या जणुं-काही कैदेतच होता. तो त्याच्याकडून निघाला तेव्हा लक्ष्मीच्या तावडींतून निसट-ण्याचा विचार करून सरळ राजाकडे गेला. त्याच्या अंगावरची रेशमी वस्त्रें, कपाळाला त्रिपुण्ड्र गंध, गळ्यांत माळा, सुंदर पिळदार देह पाहून पाहरेकऱ्यांना वाटले की स्वतः विष्णूच राजाला दर्शन द्यायला आला आहे.

म्हणून त्याला कोणी अडवले नाही. तो सरळ राजवाड्यात गेला. कित्येक खोल्या पार केल्यावर त्याला राजाचे शयनागार दिसले. एका पलंगावर राणी व एका पलंगावर दूर राजा झोपला होता. राघवने पुढें जाऊन राजाला पलंगावरून खाली ओढले. त्या बरोबर राणी ओरडली. तो आवाज ऐकून राजा दचकून उठला. राणीला कोणी फरपटत ओढीत असलेले राजाला अंधूक प्रकाशत दिसले. रागाच्या भरात राजाने उशा लगतची तलवार काढली.

इतक्यांत राणीच्या पलंगावर कोठून तरी एक साप पडला. राजाने तलवारीने त्या सापाला मारले. "आमचे प्राण वांचवि-ण्यासाठी मध्यरात्रीच्या सुमारास वैकुंठांतून प्रत्यक्ष विष्णू अवतीर्ण झाला आहे का? आपण कोण?" राजाने विचारले.

"माझे नाव राघव." राघव म्हणाला.

राजाची त्याच्यावर इतकी भक्ति बसली की राजाने राजधानीतच एका मोठ्या राजवाड्यात रहावे अशी त्याच्याजवळ विनंती केली. आता राघवाला वाटले की लक्ष्मीला जिंकणे त्याला तरी शक्य नाही.

राघवला आता राजदरबारांत पण मान मिळाला. त्याच्याकडे रोज नजराणे येऊ लागले. एकाने आपल्या सुंदर मुलीशी त्याचे लग्न करून दिले. राघवला चार मुले पण झाली. मुलांना पण नजराणे येऊ लागले.

लक्ष्मीला राहण्यासाठी राघवने एक मोठी तिजोरी बांधली. लक्ष्मी त्यांत पडून कुजू लागली. अशा तऱ्हेने वीस वर्षे लोटली.

एकदां गुरुवारी सायंकाळी राघवची बायको जिना उतरून खाली येत असता ओरडून म्हणाली—"धूप दीप कांही नाही. कोठे मेले आहेत सगळे!"

लक्ष्मी देवीने जातांना 'मी हेच सांगेन' असे सांगितले होते. ती खूण होती.

राघवने लक्ष्मीला मनातल्या मनात नमस्कार केला आणि म्हणाला—"बरे तर ये आई" नंतर तो आपल्या बायकोला





म्हणाला—“ माझ्या जवळ काही मागू नकोस की मला काही विचारू नकोस. तिजोरीत जे आहे ते घेऊन आपल्या माहेरी मुलांना घेऊन निघून जा.”

राजा शिकारीला जाई तेव्हा बरोबर राघवला पण घेऊन जाई. मुले व बायको निघून गेल्यावर राजा नेहमीप्रमाणे राघवला बरोबर शिकारीला घेऊन गेला. पण त्या दिवशी रात्री चांगली शिकार सांपडली नाही. दुपारपर्यंत राजा व इतर शिकारी दमून भागून विश्रांतीसाठी एका झाडाखाली बसले. राजा राघवच्या मांडीवर डोके टेकून झोपी गेला. शिकारी दूर झाडाच्या सांवलीत जाऊन झोपले.

एका एकी कावळा शिटला तो ठीक राजाच्या गळ्यावर. राजा गाढ झोंपेत होता. म्हणून तो उठला नाही. राजाची झोप मोडल्याशिवाय राजाची मान कशी पुसावयाची या विचारांत राघव बराच वेळ घुटमळला. तेव्हा त्याला राजाच्या कमरेचा खंजीर दिसला. तो घेऊन त्याने ती शिट पुसाण्याचा विचार केला. इतक्यात राजाची झोप मोडली व राघव सुरी गळ्याकडे नेत आहे एवढेच राजाला दिसले. “दुष्ट राजद्रोही!” असा ओरडत राजा उठला.

राजाचे शिंपाई पण धावत आले. राजाने राघवच्या मुसक्या बांधून त्याला कैदेंत टाकायला सांगितले.

राघवला धरून राजधानीत आणण्यात आले.

दुसऱ्या दिवशी राजासमोर राघवच्या अपराधाची चवकशी होणार होती. राजाने भरल्या दरबारांत त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप लावला आणि म्हणाला—“ बोल आता तुझे या विषयी काय म्हणणे आहे ते?”

“मला काहीच बोलावयाचे नाही. महाराजांना वाटेल ती शिक्षा महाराजांनी द्यावी.” राघव म्हणाला.

“तुला फाशीची शिक्षा देण्यांत येत आहे. तरी तुझी काही इच्छा असेल तर बोल. ती पुरी करण्यात येईल.” राजा म्हणाला.

“माझ्या तिजोरींत एक चंदनाची पेटी आहे. तिच्या आंत माझी थोडी संपत्ती आहे. ती एकदा मला डोळे भरून पाहून घेण्याची इच्छा आहे. नंतर आपण मला फांशीची शिक्षा द्यावी.” राघव म्हणाला.

राजाच्या अधिकाऱ्यांनी त्याची तिजोरी उघडली तर ती रिकामी होती. आत फक्त एक चंदनाची पेटी होती ती त्यांनी आणून दाखविली व ती उघडली तर ती पण रिकामी होती. परंतु त्या पेटीत एक जुने धोतर व एक तांब्या होता.

“हीच का तुझी संपत्ती म्हणालास ती?” राजाने चकित होऊन त्याला विचारले.

“होय महाराज! मी जोंपर्यंत यांच्या भरंवशावर होतो तोपर्यंत मला कसलीच उणीव भासली नाही. परंतु माझ्यावर लक्ष्मीची एका एकी कृपा झाली. मला एवढे माहीत होते की लक्ष्मी ही चंचल असते. ती केव्हां रुसून निघून जाईल हे सांगणे अशक्य आहे. म्हणून मी या दोन वस्तू संभाळून तिजोरीत ठेवल्या होत्या. या दोन वस्तू मला दिल्यात तर मी आपल्या घरी निघून जाईन.”

ते वृत्त ऐकून राजा चकित झाला व त्याने त्याचा अपराध माफ केला व त्याला जाण्याची परवानगी दिली.





# आश्चर्य

पूर्वी कधी अवंतीपूर येथे बालादित्त नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राणीचे नाव वसुधा असे होते. त्यांना बरेच दिवस मूलबाळ झाले नाही. ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले की आणखी एक लग्न केले तर अपत्यलाभ होईल. ते ऐकून राजाने इंदुमती नांवाच्या एका राजकन्येशी लग्न केले. ती सुंदर होती व गुणवतीपण होती ती पती व सवत दोघांशी विनम्रपणे वागे. परंतु मोठ्या राणीच्या पोटात इंदुमती विषयी ईर्ष्याग्नि पेटला. कारण ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले होते की तिच्या पोटी राजाला पुत्रप्राप्ति होईल. जो मुलगा होईल तोच गादीचा वारस होईल. म्हणजे धाकटी राणी राजमाता होईल. या शिवाय इंदुमतीचा स्वभावपण चांगला असल्यामुळे राजाचे प्रेम तिच्यावरच दिवसेंदिवस वाढत गेले. सवती मत्सर वाढायला हे देखील कारण झाले.

पुढे काही दिवसांनी इंदुमती गरोदर राहाली. प्रसूत नंतर होणाऱ्या युवराजाचा कसा वध होईल याचा मोठी राणी विचार करू लागली. तिने धाकट्या राणीला मनातला खरा हेतू कळू दिल्याशिवाय तिला समजावून सांगितले की प्रसूतीच्या वेळी तिला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये याची मी खात्री बाळगीन.

एक दिवशीं सायंकाळी धाकट्या राणीच्या पोटांत दुखू लागले. मोठी राणी सुइणीला बोलावून म्हणाली—"धाकट्या राणीला जे मूल होईल त्याला नाहीसे कर. असे सांग की राणीच्या पोटी तर बेडूकच जन्मले. एक टोपलीभर बेडूक पकडून आणून ठेव मुलाच्या जागी." असे सांगून तिने सुईणीला बक्षीस म्हणून एक कंठहार दिला आणि काम फत्ते झाल्यावर जास्त बक्षीस देण्याचे वचन दिले.

सुईणीने मोठ्या राणीच्या इच्छे प्रमाणे एक टोपलीभर बेडूक बाळंतिणीच्या खोलीत आणून ठेवले.

मोठ्या राणीने बाळंतिणीच्या खोलीजवळ बाहेर रस्त्याजवळ एक शिडी लावली व धाकट्या राणीला म्हणाली—"चार पांच वेळा तू डोळ्यांवर पट्टी बांधून या शिडीवर चढ व खाली उतर म्हणजे प्रसव वेदना होणार नाहीं. धाकट्या राणीला ते सर्व खरे वाटले व ती खरोखरच डोळ्यांवर पट्टी बांधून तीन चारदा चढली उतरली. तिसऱ्या-वेळी शिडीवरून उतरत असतां तिला भोंवळ आली. तिला बेशुद्ध स्थितीतच बाळंतिणीच्या खोलीत नेण्यांत आले. तिला दोन जुळी मुले झाली,—एक मुलगा व एक मुलगी. इंद्रमतीला बेशुद्धावस्थेत काहीच कळले नाही.

दोघां मुलांना मोठी राणी बाहेर उचलून घेऊन गेली. नंतर तिने इंदुमतीच्या पलंगावर बेडूक ठेवले. इंदुमतीला शुद्ध आली तेव्हां



मोठ्या राणीने रडण्याचे सोंग करून तिला सांगितले की तिच्या पोटी बेडूकच जन्मले.

नंतर राणीने दोघां जुळ्या मुलांना नदी काठी पुरून टाकायला सांगून एका म्हाताऱ्या दासीला पाठविले. त्या बद्दल तिला मोठे थोरले बक्षिस देण्याचे वचन पण राणीने दिले आणि बजावून सांगितले की या कानाची गोष्ट त्या कानाला कळली तर तिला फाशी देण्यांत येईल.

दासी, राणीने सांगितल्याप्रमाणे रात्री काळोख पडल्यावर दोघां मुलांना उचलून घेऊन नदी काठी गेली. पण गोजिरवाण्या सुंदर

श्री. का. म. वाघाळ



मुलांना जिवंतपणे पुरून टाकणे तिच्या मनाला पटेना. ती मुलांना नदी काठावर ठेवून देऊन निघून गेली. एक कुंभारीण चिकण माती घेऊन जायला तिथे आली होती. ती दुरून ते सर्व पहात होती. तिने त्या दासीला ओळखले. पण ती काही बोलली नाही. दासी निघून गेल्यावर कुंभारणीने-जवळ येऊन पाहिले. दोन मुले नुकतीच जन्मलेली तिला दिसली. ती विचार करू लागली, ही मुले या म्हातारीची असणेच शक्य नाही. तिला हे आठवले की धाकट्या राणीचे बाळंपणजवळ आल्याचे तिने ऐकले होते. पण तिच्या मुलांना दासीने नदी काठी आणून असे कां टाकले हे तिला उमगेना.

तिने जास्त विचार करीत बसण्यापेक्षा राजाच्या त्या दोघां मुलांना प्रथम उचलून त्यांचे रक्षण करण्याचे ठरविले. ती मुलांना उचलून आपल्या घरी घेऊन गेली.

राजधानीभर बातमी पसरली की धाकट्या राणीच्या पोटी बेडूक जन्माला आले. इंदुमतीला सर्वांत अधिक दुःख झाले. पण हे झाले कसे हे तिला कळेना. बेडकांना जन्म देणाऱ्या बाईला राणी म्हणून अंतःपुरात ठेवणे राजाला लज्जास्पद वाटले. त्याने रानात एक घर बांधून तिला तेथे पाठवून दिले.

कुंभारणीच्या घरी दोघं मुले लहानाची मोठी झाली होती. इतकी सुंदर मुलं तिला झाल्याबद्दल लोक कुंभारणीचे अभिनंदन करीत.

कित्येक वर्षे लोटली. राजा इंदुमतीला रानांत सोडून आला त्या दिवसापासून त्याला मानसिक व्याधी झाली. त्याला संसाराचा वीट आला. मंत्री व ज्योतिषी घाबरले. ते राजाला म्हणाले—"ग्रहदशेमुळे हे सर्व होत आहे. म्हणून सोन्याचे बेडूक करून



ब्राह्मणांना त्यांचे दान करावे आणि ग्रह-शांति करावी."

राज्यभर दवंडी पिटविण्यात आली. राजाने संतर्पण आरंभिले आहे. कुंभारणी-कडे वाढणाऱ्या मुलांनी तिला विचारले—"हे संतर्पण म्हणजे काय व राजा ते कां करीत आहे?"

कुंभारणीने अथपासून इतीपर्यंत सर्व खरी गोष्ट सांगून टाकली. म्हणाली—"राजाच्या मोठ्या राणीला मूल झाले नाही म्हणून त्याने दुसरे लग्न केले. तिला एक जुळे झाले. मोठ्या राणीने धाकट्या राणीची मान खाली व्हावी म्हणून त्या दोघां मुलांना नदी काठी नेऊन टाकवले आणि अंथरुणावर बेडूक आणून ठेवून राणीला बेडूक झाल्याचे सांगितले. राजाला वाटले की त्याच्या हातून काही तरी पाप घडले आहे. म्हणून त्याने सोन्याचे बेडूक करून ब्राह्मणांना दान केले आणि त्याबरोबर हे संतर्पण करीत आहे."

"मग राजाची मुले कोठे आहेत?" मुलांनी विचारले.

"आहेत, सुरक्षितपणे व सुखाने कोठे तरी नांदत आहेत, लहानाचे मोठे होत आहेत." कुंभारीण म्हणाली.



"तर मग आपण जाऊ या का संतर्पणाला?" मुलांनी विचारले.

"जाऊ या!" म्हणाली कुंभारीण. पण ती स्वतः गेली नाही. तिने मातीच्या काही बाहुल्या करून त्यांच्याबरोबर संतर्पणाला पाठवून दिल्या व काय करायचे हे त्यांना नीट समजावून सांगितले. दोन्ही मुले बाहुल्या घेऊन संतर्पणाला गेली.

जेवणाच्या वेळी त्यांनी त्या बाहुल्याला व बाहुलीला आपल्या पंक्तीत बसविले आणि वाढणारांना आणखी दोन पाने त्यांच्या-












साठी ठेवायला सांगितली. त्यांना वाढले नाही तर आम्ही सुद्धा जेवणार असे देखील त्यांनी सांगितले.

ती बातमी राजाच्या कानावर गेली. राजा तेथे आला. त्या मुलांना पाहून त्याचे हृदय उचंबळून आले. म्हणाला–"अरे वेड्यांनो! बाहुल्या का जेवतात? असा हट्ट करू नये बाळांनो!"

लगेच मुलांनी विचारले–"कां नाही जेवत? कोणा बाईला बेडूक होतात हे तरी तुम्ही ऐकले आहे का कधी? राजाने धाकट्या राणीला रानात कां पाठविले?"

राजाला आश्चर्य वाटले. तो मुलांना प्रेमाने बोलावून आपल्या महालांत घेऊन गेला आणि त्याने त्यांना विचारले–"कोणी रे सांगितले तुम्हांला की धाकट्या राणीला बेडूक झाले म्हणून?"

"कां, आमच्या आजीने!" मुले म्हणाली.

राजाने कुंभारणीला बोलावून तिला सर्व हकीगत विचारली. तिने नदीकाठी त्या दोघां लहान मुलांना उचलून कसे लहानाचे मोठे केले हे सांगून इतर माहिती म्हाताऱ्या दासीला विचारायला सांगितली. म्हाताऱ्या दासीने भीतभीत सर्व खरे सांगितले. तेव्हां राजाला ती मुले त्याचीच आहेत, हे कळले. त्याने आपल्या धाकट्या राणीला रानांत जाऊन आदरपूर्वक बोलावून आणले आणि मोठ्या राणीला वनवास दिला. त्याने मुलांचा चांगल्या प्रकारे सांभाळ केल्याबद्दल कुंभारणीला बक्षिस दिले.

त्यानंतर राजाची प्रकृती सुधारली व त्याने प्रजाहिताची पुष्कळ कामे केली.





# खूण गाठ पटली

एका गावी शिवू नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याला फार उशिरा पन्नाशी उलटल्यावर एक मुलगा झाला. त्यांनी त्याचे नाव कुमारदास असे ठेवले. कुमारदास लाडात वाढल्यामुळे फार हट्टी झाला होता. त्याला पाचवे वर्ष लागले तेव्हां त्याला अक्षराभ्यास करविण्यांत आला. पण तो शाळेत जायची वेळ झाली की हट्ट करून घरीच बसून राही. मुलगा अशिक्षित राहला तर आयुष्यभर रडत रहावे लागेल असा विचार करून आईवडिलांनी त्याला पुष्कळ समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण सर्व फुकट. शेवटी अगदी नाइलाजाने एकदां बापाने त्याला खूप बडवून काढले. आईसुद्धा पुष्कळ रागावली. त्या दिवशी कुमारदास कोणाला कांही कळविल्याशिवाय घर सोडून निघून गेला. शिवूने पुष्कळ शोध केला, पण कोठे पत्ता लागला नाही.

शिवूला दुसरा मुलगा नव्हता. पण कुमारदास केव्हांतरी परत येईल, असे त्याचे मन सांगे. उतार वय झाले होते. हळूहळू हिंडणे फिरणेदेखील अशक्य वाटू लागले. तेव्हां शिवूने रामू नांवाच्या नोकराला घरी ठेवून घेतले.

रामू, शिवूला कोणत्याहि प्रकारचा त्रास होऊ नये या गोष्टीचा काळजी वाही. अगदी स्वतःचा मुलगाच वागतो तसा रामू वागे. तो विश्वासपात्र तर होताच. हुशार व समजूतदार पण होता. शिवू त्याला 'रामू' ऐवजी रामदास म्हणू लागला. त्याच्यावर त्याचा इतका विश्वास बसला की

सौ. मंगला देसाई





शिवूने रामदासला आपल्या घरच्या सर्व लहान सहान गुप्त गोष्टी सुद्धा सांगून ठेवल्या. शिवूच्या घरी पिढ्यान् पिढ्या एक गुप्त खजिना होता. फक्त शिवूलाच त्या खजिन्याची माहिती होती. एकेदिवशी ते गुपित रामूला शिवूने कळविले.

शिवू व त्याची बायको दोघांना वार्धक्य आले. रामूने सर्व प्रकारे त्यांची बर्दास्त ठेवली. शेवटपर्यंत शिवूला कुमार परत येईल असे वाटत होते व तो आपल्या स्नेहीमंडळी व नातेवाइकांना तसे सांगे पण.

एके दिवशी एक मनुष्य आला. त्याचे वय तीस वर्षांचे असेल. रामूला तो म्हणाला—"मी कुमारदास आहे."

"ओहो, असं का! फार छान आपलं घर पहायला चल, माझ्याबरोबर." असे सांगून रामू त्याला एकामागून एक खोली दाखवू लागला. दोन खोल्यात काही एक नव्हते. एका खोलीत खुंटीला एक सदरा टांगलेला होता. दुसऱ्या एका खोलींत तीन मोठमोठी भांडी होती. एकांत तांदूळ, दुसऱ्यांत तिखट आणि तिसऱ्यांत भुसा होता. त्या खोल्या दाखवल्यावर रामू त्याला म्हणाला—"तू कुमारदास नसून तोतया आहेस. आल्या वाटेने निघून जा. नाहीं तर मी गांवच्या कोतवालाला कळवून अटक करवीन."

तो मनुष्य घाबरून काही वेळ रामूच्या तोंडाकडे पहात उभा राहाला. नंतर कांहीं उत्तर दिल्याशिवाय निघून गेला. तो खजिन्यासाठीच आला होता.

असेच दोघे तिघे स्वतःला 'कुमारदास' सांगून आले. त्यांच्या पैकी काही पंचवीस वर्षांहून मोठे होते. रामूने लगेच त्यांना पण परत पाठविले. तीस वर्षांहून मोठे होते त्यांना रामू दाखवी.



असेच आणखी काही दिवस गेले. रामूला एक मनुष्य व एक बाई एका मुलाला उचलून घेऊन येत असलेले दिसले. बाई इकडे तिकडे पहात येत होती. त्या मनुष्याची नजर मात्र घरावर खिळलेली होती.

रामूला पाहतांच त्या मनुष्याने रामूला विचारले—"हल्ली शिवदास येथे रहात नाहीत का?"

"होय, हे शिवदास यांचेच घर आहे. तुला काय पाहिजे?" रामूने विचारले.

"ते बरे आहेत ना? हिंडतात फिरतात ना? मी व माझी बायको त्यांना भेटायला म्हणून आलो आहों. तो मनुष्य म्हणाला.

"कोण तू?" रामूने विचारले.

"मी कोण व काय याचे तुला काय? मी जगभर भटकतो." तो मनुष्य म्हणाला.

"ठीक, ये माझ्याबरोबर आत. मी शिवदास व त्यांची पत्नी यांची भेट घालून देतो. त्या बाईला व मुलाला बाहेर बऱ्हांड्यात बसू दे." रामू म्हणाला आणि त्या माणसाला घर दाखवू लागला.

रिकाम्या खोल्या पाहून तो मनुष्य काही तरी पुटपुटला. खुंटीवर टांगलेला सदरा हातांत घेऊन मागे पुढे करून नीट पाहिला आणि मनातल्या मनात हसला. नंतर भांड्यांच्या खोलीत तांदळाचे भांडे दिसताच ते पहात बराच वेळ उभा राहाला.



"कसला विचार चालला आहे?" रामूने त्याला विचारले.

"एक गोष्ट आठवली. पण तुला ती सांगण्याची गरज नाहीं." तो मनुष्य म्हणाला.

नंतर रामू त्याला शिवदास व त्याची बायको दोघं होते त्या खोलीत घेऊन गेला आणि त्यांना म्हणाला—"तुमचा मुलगा कुमार आला आहे."

दोघे म्हातारा म्हातारी निरनिराळ्या पलंगावर बसून बोलत होते. त्या माणसाने दोघांकडे न्याहाळून पाहिले व "आई" म्हणत म्हातारीला मिठी मारली.

परंतु शिवदासच्या मनांत शंका राहून गेली व तो तसे म्हणाला—"तू कुमारदास? आजपर्यंत कित्येक जण आले, मीच कुमारदास असे म्हणत. कारण घरात मोठी ठेव आहे हे त्यांना कळले होते. परंतु रामूने त्यांना लबाड चोर आहेत हे ओळखले होते."

"खजिन्यातल्या ठेवी साठीच यायचे असते तर मी या पूर्वीच आलो असतो बाबा. तांदुळाच्या भांड्याखाली आणखी एक भांडे ठेवलं आहे हें मला माहीत नाही का? मी तुम्हा दोघांना फक्त भेटण्यासाठी व नमस्कार करण्यासाठी बायकोला व मुलाला घेऊन आलो आहे. इतक्या दिवसांनी मला तुम्ही ओळखणार नाही याची कल्पना मला होती. परंतु माझा लहानपणाचा सदरा अजून खुंटीला टांगला आहे. त्यावरून तुम्हांला माझी आठवण येत होती असे मला वाटले व खूप आनंद झाला." तो मनुष्य म्हणाला.

आता मात्र शिवदासच्या मनातली शंका दूर झाली. रामूकडे बोट दाखवून तो म्हणाला—"इतके दिवस यानेच तुझ्या जागी राहून आम्हांला म्हातारपणी हातभार दिला. याला आपला भाऊच मानून दोघे आनंदाने रहा."

कुमारदास त्या दिवसापासून बायको व मुलाला घेऊन घरी राहू लागला. नातवाचे कोड कौतुक करण्यात म्हातारपणी म्हातारा व म्हातारी आपले सर्व दुःख विसरले.





# अब्बूखानचा मेंढा

अब्बूखान नांवाचा एक मनुष्य अंगाने धाडदांड होता. त्याला बायको भाकऱ्या भाजून खायला घाली त्या पुरत नसत. म्हणून तो गाव गाव हिंडे व फुकटात जे मिळे ते खाऊन राही. कित्येक दिवस तो घरी फिरकत देखील नसे. दहा दहा बारा बारा दिवस बाहेरच राही.

एकदा तो घरी आला तेव्हां बायको खूप रडली व म्हणाली—"तुम्ही कोठे तरी निघून जाता आणि मला एकटीलां घरात मुळीच करमत नाही. घरांत कुत्रा, बकरी, मांजर असले तरी थोडे करमेल."

अब्बू बाजारात जाऊन एक मेंढा विकत घेऊन बायकोला आणून देऊन म्हणाला—"हा राहील घरी. याला खायला घालीत जा. तुझा वेळ जाईल मजेत." अब्बू म्हणाला आणि पुन्हा निघून गेला.

तो मेंढादेखील अब्बूचा 'मोठा भाऊ'च निघाला. दिवसभर बाहेर हिंडे फिरे आणि शेजारच्या लोकांच्या शेतांत शिरून जे मिळे ते खाई. लोकांच्या तक्रारी येऊ लागल्या. अब्बू परत आल्यावर बायको त्याला म्हणाली—"कशाला ठेवला आहेत बाई हा मेंढा आणून? परसात एक पान राहालं असेल तर शपथ. इतरांच्या कागाळ्या रोज कानावर येतात. विकून कां नाही टाकीत ह्याला कोठे तरी कसायला?"

अब्बूला त्याच वेळी एक मित्र आठवला. तो कोठे तरी कबरस्तानांत रहात होता. कोणी आपल्या आप्तेष्टांला मूठमाती द्यायला आला की त्याला पैसे देत. अब्बू आपला

श्री. बा. रा. पाटील











मेंढा घेऊन त्याच मित्राकडे गेला आणि त्याला म्हणाला–"दोस्त! अल्लाने याद केल्यावर मला त्याच्या हुकमाप्रमाणे त्याच्याकडे जावे लागेल. मला मूठमाती द्यायच्यावेळी तुला जे द्यायचे ते मी आत्तांच देऊन ठेवतो. हा मेंढा ठेवून घे."

अब्बूच्या दोस्ताला त्यात नुकसान काय वाटणार! त्याने ठेवून घेतला मेंढा.

दोनतीन महिन्यांनी अब्बू कबरस्तानाकडे गेला तेव्हां त्याचा मेंढा खाऊन पिऊन खूप माजला होता. त्याला वाटले की आपण मित्राला फुकटांत देऊन टाकला मेंढा हा. म्हणून हा परत घेऊन जायला युक्ती केली पाहिजे.

एके दिवशी रात्री, थोडा उशिरांच अब्बू आपल्या मित्राला भेटायला गेला. म्हणाला–"मित्रा, ऊठ चल लवकर."

"कोठे? कशाला?" अब्बूच्या मित्राने चकित होऊन विचारले.

"मी परदेशी चाललो आहे. मी शेजारच्या आजारी मुलाला औषध म्हणून एक गोळी खायला दिली. तो थोड्या वेळा पूर्वीच मेला. म्हणून येथे राहालो तर जिवावर बेतणार." अब्बू म्हणाला.

"तुला परदेशात जायचे आहे तर जा. मी कशाला येऊ तुझ्याबरोबर रे!" मित्राने चकित होऊन विचारले.

"तुला पुरून टाकलं पाहिजे आधी. मी तुला पहिल्यानेच मेंढा नाही का दिला." अब्बू म्हणाला.

"मला काय करायचा आहे तुझा मेंढा! घेऊन जा तो." मित्र घाबरून म्हणाला.

अब्बू "बरं बाबा!" असं म्हणत आपला मेंढा घेऊन गेला.





# जशास तसें

एका गांवी कामेश नांवाचा एक तरुण युवक रहात असे. त्याला आईवडील नव्हते. त्याला एक बहीण होती तिचे नाव सावित्री होते. तिचे लग्न करून देण्याची जबाबदारी त्याच्यावरच येऊन पडली. त्याने योग्य वर पाहून तिचे लग्न करून दिले. सावित्री आपल्या सासरी निघून गेली.

कामेशच्या बायकोचे नांव शांति असे होते. पण कामेशच्या कौटुंबिक जीवनात शांति नव्हती. त्याला बायकोचा स्वभाव चांगला कळला होता. म्हणून त्याने कधी चुकून देखील बहिणीला माहेरी बोलाविले नाही.

सावित्रीला भावाचे प्रेम तिच्यावर आहे हे माहीत होते. पण तिला नेहमी मनातल्या मनांत दुःख वाटे की भावजयीच्या स्वभावामुळे तिला माहेरी जाणे शक्य नाही.

बराच काळ लोटला. सावित्री तीन मुलांची आई झाली होती. कामेशला पण मुले बाळे होती. त्याला फार वाटे की आपण बहिणीला माहेरी कधी बोलावले नाही. पण बायकोच्यासमोर त्याला हात टेकावे लागत.

एकदां कामेशला सावित्रीचे पत्र मिळाले. तिचा नवरा कोठे बाहेर गेला असता त्यांच्या घराला आग लागली. त्या स्थितीत तिला माहेरी येण्याशिवाय दुसरा उपाय उरला नाहीं. सावित्री घरी आली तर तिला भावजयीची बोलणी ऐकून घ्यावी लागतील, तेव्हां स्वतःच तिच्या गांवी जाऊन तिला जी हवी ती मदत करावी या हेतूने कामेश कोणाकडून तरी कर्ज काढून पैसे घेऊन जावे या विचाराने घराबाहेर पडला. त्याच-

सौ. शांताबाई आगलावे



वेळी सावित्री आपल्या मुलांना घेऊन आली. तिला पाहून शांतीच्या मनांतली शांति लयास गेली.

सावित्रीने आश्याबरोबर घडलेले सर्व वृत्त सांगितले. म्हणाली—"वहिनी! मुलांचे वडील घरात नव्हते व घराला आग लागली, म्हणून यावे लागले. मुलं उपाशी आहेत त्यांना खायला काही तरी दे."

नणंद भिकाऱ्यासारखी दारासमोर येऊन उभी आहे हे पाहून शांती म्हणाली—"काय म्हणावे, हेच सुचत नाही. रानटी उंदरांच्या झुंडीच्या झुंडी घरात शिरून धुमाकूळ घालीत आहेत. इतका की चूल देखील घरात पेटत नाही." असे म्हणत तिने एक तांब्या भरून पाणी आणून ठेवले आणि नणदेच्या मुलांना म्हणाली—"प्यारे बाळांनो!"

सावित्री एक क्षण भर देखील तेथे थांबली नाही, ती उलट पावली एक गाडी भाड्याने घेऊन सासरच्या गावी निघून गेली.

सावित्रीचा भाऊ कामेश कोठून तरी पैसे कर्ज घेऊन परत येत असता त्याला वाटेत बहीण परत जात असलेली भेटली. तिच्या तोंडी त्याला घडलेले वृत्त कळले. त्याने बरोबर आणलेले पैसे तिला दिले आणि म्हणाला—"मी दोन दिवसांनी येऊन सर्व ठीक करतो. असे सांगून त्याने बहिणीला निरोप दिला.

तो घरी आला, पण बायको या ना त्या संदर्भात नणंद येऊन गेल्याचे आपल्या नवऱ्या जवळ बोलली देखील नाही.

दैवयोग असा की दुसऱ्या दिवशीच शांतीच्या माहेरचे एक पत्र आले की तिच्या माहेरच्या घराला आग लागली व सर्वांना रस्त्यावर येऊन रहावे लागले आहे. सुदैवाने कोणी आगीत दगावला नाही.



पत्र वाचून शांती रडू लागली. त्यावेळी कामेश घरी नव्हता. थोड्या वेळाने तो परत आला तेव्हा बायको रडत असलेली त्याला दिसली. त्याने तिला विचारले—"एका एकी असे रडायला काय झाले?"

शांती पत्र वाचायला देऊन म्हणाली—"एक गाडी ठरवून या. गेले पाहिजे मदतीला. आपल्या जवळच्यांना मदत नाही द्यायची तर परक्यांना द्यायची का!"

"अग पण, आपण आतां जाणेबरोबर होईल का! जांवई अशा प्रसंगी एक खटांवर घेऊन आलेले पाहून त्यांना काय वाटेल! त्यांच्या दुःखावर डागण्या देण्या-साठीच मी आलो असं नाही का वाटायचे त्यांना! काय मदत होऊ शकेल हे सांग, मी करतो जाऊन एकटा."

शांतीला थोडे बरं वाटलं. तिने घरांत मोकळी भांडी होती ती सर्व काढून दिली. डाळ, तांदूळ, कणीक, मीठ, मसाला, तेल, तूप जे काही घरात होते ते डब्यात किंवा भांड्यात भरून दिले. कामेश ते सर्व सामान एका गाडीत घालून निघाला.

पण तो ते सर्व घेऊन सासुरवाडच्या गावी गेला नाही. तो आपल्या बहिणीच्या



गांवी गेला. चार दिवस राहून तेथे बहिणीचे घर बांधून झाल्यावर बायकोने दिलेले सर्व सामान बहिणीला देऊन परत घरी निघाला. त्याच सुमारास सावित्रीचा नवरापण घरी परत आला होता. संकटाच्यावेळी मेहुण्याने येऊन जी मदत केली त्याबद्दल त्याने मेहुण्याचे आभार मानले.

तिकडे शांती नवरा आज येईल उद्या येईल म्हणून वाट पहात होती. दोन दिवस तो आला नाही तेव्हा ती स्वतः गाडी ठरवून मुलांना बरोबर घेऊन माहेरी निघून गेली. तिच्या माहेरचे घर जळले











नव्हते. रस्त्यावर किंवा झाडाखाली त्यांना रहावे लागले नव्हते. तिचा नवरापण तेथे आला नव्हता. हे सर्व तिला कळले.

“कोणी सांगितले तुला की घराला आग लागली म्हणून? स्वप्न बिप्न पडलं की काय तुला?” आई वडिलांनी तिला विचारले. नंतर “आलीच आहेस तर रहा चार दिवस आणि जा मग,” असे पण ते म्हणाले. पण ती माहेरी राहाली नाही व उलट पावली घरी निघाली. तोंपर्यंत कामेश वहिणी कडून घरी परत येऊन पोचला होता.

“कोठे गेला होता हो! आणि बरोबर एवढे सामान बांधून दिलं होतं ते सर्व कोठे आहे?” तिने विचारले.

“मी तुझ्या माहेरच्या गावी जात होतो की कावळ्याची एक धाड आली व त्यांनी सर्व सामान फस्ते केले. एक की दोन मी उडवून लावायला हजार तरी असतील. मलाच लचके तोडून खाले नाही, हे नशीब समज. कामेशने लोणकणी थाप दिली ठोकून.”

“कावळे सर्व गाडी घेऊन गेले म्हणे. काय बोलता काय! खरे तरी वाटेल का कोणाला! डोकं आहे ना ठिकाणावर!” बायकोने थोडे रागांतच विचारले.

“या कलियुगात काय होत नाही! कधी उंदरांची धाड तर कधी कावळ्यांची धाड कधी उंदीरांमुळे चूल पेटत नाही घरात तर कधी कावळे गाडीच उचलून नेतात.” कामेश शांतपणे म्हणाला.

ते उत्तर ऐकून सावित्रीला मुस्कुटात मारल्यासारखे झाले. तिने काही उत्तर दिले नाही व घरांत निघून गेली.





# पाहिलें हो पाहिलें

एका गावी एक नास्तिक रहात असे. त्याचा देवावर विश्वास नव्हता. त्याची बायको पण नास्तिक होती व उद्दीपक नावाचा मुलगा पण नास्तिक होता.

एकदा नास्तिकाचा धाकटा मुलगा आजारी पडला. औषध पाणी सर्व झाले, पण गुण पडला नाही. नास्तिकाचा शामलाल नांवाचा एक शेजारी ते ऐकून सांबाच्या देवळांतून अंगारा घेऊन आला. तो देवाचा भक्त होता. थोडा अंगारा, आजारी मुलाच्या कपाळाला लावून तो त्या मुलाला म्हणाला—“बाळ, घाबरू नकोस हो. तू लवकर बरा होशील.” काही दिवसांनी तो खरोखरच चांगला बरा झाला.

नास्तिक आपल्या शेजाऱ्याला म्हणाला—“अंगारा भस्म लावल्याने मुलाला बरे नाही वाटले. पहिल्याने दिलेल्या औषधाचा थोडा उशिरा गुण पडला असावा.”

परंतु नास्तिकाचा मुलगा उद्दीपक याच्या मनात देवावर विश्वास बसू लागला. तो पहाटे उठून स्नानादि आटोपून देवदर्शनाला जाण्याचा विचार करू लागला. पण बापाची भीती त्याला वाटत होती. म्हणून त्याने शामलालचा सला घेतला. शामलाल म्हणाला—“देवाच्या दर्शनालाच गेलं पाहिजे असं नाही. मनांत विश्वास असला व नामस्मरण घरात बसून केलं तरी देव पावतो. नित्य नियमितपणे देवदर्शन करून येणाऱ्या भक्ताच्या कपाळी लावलेले भस्म पाहिलं तरी देवदर्शन झाल्याचे पुण्य लागते.”

त्या दिवसापासून उद्दीपक स्नान करून शामलाल घरी परत येईपर्यंत त्याच्या

श्री. मा. गो. पाटील

दर्शनासाठी वाट पहात दारात बसून राही. पाण्याचा एक थेंब देखील पीत नसे.

काही दिवसांनी शामलाल कोठेतरी बाजारांत उद्दीपकला भेटला त्याने त्याला विचारले—"मग चालू झालं का देवदर्शन?"

"तुम्ही सांगितल्याप्रमाणे देवदर्शन घडत नाही पण भक्तदर्शन नियमितपणे घडत आहे. भक्त दर्शन झाल्याशिवाय मी तोंडांत पाणी देखील घेत नाहीं." उद्दीपक म्हणाला.

"ठीक, देव तुझे कल्याण करील, चल आज दोघे देवळात जाऊ." शामलाल म्हणाला.

दोघे देवळापर्यंत गेले. पण उद्दीपक देवळात गेला नाही. म्हणाला—"मला देवाची पूजा कशी करायची हे देखील माहीत नाहीं." तो देवळा बाहेर एका झाडाखाली शामलाल येईपर्यंत वाट पहात उभा राहाला. तो उभा राहून पायाखालची जमीन बोटाने उकरीत होता. तेव्हां त्याच्या पायाला टणक काही तरी लागले. त्याने ती जागा चांगली उकरून ती वस्तु हातात घेतली. ते एक सोन्याचे नाणे होते.

शामलाल देवळाबाहेर आला तेव्हां उद्दीपकने त्याला ते नाणे दाखविले व म्हणाला—



"मला हे झाडाजवळ सापडले. तेव्हां शामलाल त्याला म्हणाला—"पाहिलेस तुला तुझ्या भक्तिभावनेचे फळ मिळू लागले आहे." शामलालने नंतर ते चांगले न्याहाळून पाहिले. त्याला वाटले की कदाचित जेथे हे नाणे सापडले त्या जागी जमिनींत पुरलेला मोठा ठेवा सापडेल.

दुसऱ्या दिवशी पहाटे काळोखातच शामलाल त्या जागी आला. त्याने ती जागा खणून काढली तेव्हा त्याला एकावर एक ठेवलेले दोन हंडे सापडले. तो ते हंडे घरी घेऊन जाण्याच्या विचारात होता. त्याच वेळी दुसऱ्या एका झाडाच्या आडून उद्दीपक म्हणाला—"पाहिलं हो पाहिलं." असे सांगून तो तेथून निघाला.

त्याने फक्त शामलालचे भस्म लावलेले कपाळ पाहिलं होते. त्याच्या हातात दोन हंडे होते हे पाहिलं नव्हते. त्याला नित्य नियमितपणे होणारे भक्ताचे दर्शन घडले नाही तेव्हा तो शामलालच्या शोधार्थ देवळापर्यंत आला व झाडाआड उभा राहून त्याने त्याला पाहिले. पण शामलाल मात्र घाबरला. उद्दीपकला एक हंडा देत म्हणाला—"हा घे देवाचा प्रसाद. एक हंडा तुला व एक मला.

परंतु देवाचा प्रसाद दोघांना सारखा सारखा मिळाला नाही. शामलालच्या हंड्यात फक्त खापरे होती आणि उद्दीपकच्या हंड्यांत सोन्याची नाणी.

उद्दीपकला देवाचा प्रसाद म्हणून सोन्याची नाणी मिळाली असल्याचे जेव्हा उद्दीपकच्या वडिलांना कळले तेव्हा तो आपला नास्तिकपणा सोडून भक्त झाला.





# ईर्ष्या

एका गावी मारुती नावाचा गरीब मनुष्य रहात असे. त्याचे स्वतःचे घर नव्हते व नातेवाईक पण कोणी नव्हते. कोणी काही काम सांगितले की तो करी. गांवांत पूर्णसिंह नांवाचा एक दुष्ट मनुष्य होता. त्याच्याकडे थोडी शेतजमीन होती. तरी त्याला सदा न कदा कसली तरी काळजी असे. मारुतीला निश्चितपणे व शांतपणे आपले काम करीत असलेला पाहून त्याच्या जणुंकाही पोटात दुखे. त्याचे आणखी एक कारण म्हणजे लोक मारुतीची वाखाणणी करीत व पूर्णसिंहला कोणी विचारीत सुद्धा नव्हते. तो नेहमी मारुतीची मान खाली व्हावी यासाठी संधी पहात होता.

कोणता तरी सण होता. पूर्णसिंह सणासाठी नवे कपडे विकत घेण्यासाठी काहीं पैसे खिशांत घेऊन उजाडताच बाजारात निघाला. गावाबाहेर पडतांच त्याला समोर मारुती दिसला.

त्याने त्याला हांक मारून विचारले– "अरे मारुती ! कोठे रे निघालास !"

"पाटलांनी बाजारांतून काही सामान आणायला सांगितले आहे ते आणायला चाललो आहे." मारुती म्हणाला.

"मी सुद्धा बाजारातच जात आहे. चल, बरोबरच जाऊं पूर्णसिंह म्हणाला.

दोघे बरोबर जात असता पूर्णसिंहाच्या मनांत एक दुष्ट विचार आला. त्याने विचार केला, हे जमले तर नक्कीच मारुतीची गावभर नाचक्की होईल.

ऊन वाढले तेव्हां पूर्णसिंह मारुतीला म्हणाला–"आतां फार नको चालायला. चल थोडा वेळ झाडाखाली बसू. थोडा आराम करून जाऊ पुढे."

मारुतीने होकार दिला. त्याने खांद्या-वरचा पंचा काढून अंथरला आणि आडवा झाला. स्वभावाने निश्चित असल्यामुळे जमिनीला अंग टेकताच त्याला झोप लागली आणि तो घोरू लागला. पूर्ण-सिंहाने त्याच्या खिशातून पैसे काढून घेतले आणि आपल्या खिशांत ठेवले.

पूर्णसिंहने हे काम चोरी करण्याच्या हेतुने केले नव्हते. बाजारातून सामान आणायला पैसेच नसले म्हणजे काय सामान आणणार ? पाटलांच्या चागल्या शिव्या खाव्या लागतील. पूर्णसिंहनेच मारुतीच्या खिशांतले पैसे काढून घेतले असे कोणी म्हणेल ही. मारुतीला संशय आला तरी आपल्याला चोर म्हणण्याची त्याची छाती होणार नाही, हे पूर्णसिंहाला चांगले माहीत होते.

मारुती उठण्यापूर्वी तो निघून गेला असता तर संशय करायला जागा मिळाली असती. म्हणून तो पुढे गेला नाही. बाजार येईपर्यंत बरोबर जाऊन नंतर निराळे व्हायचे त्याने मनाशी ठरविले होते.




सौ. विमला काळोखे

ते झोपले होते त्या झाडावर दोन माकडे बसली होती. मारुतीच्या खिशातून पूर्णसिंहाने पैसे काढले ते माकडांनी पाहिले होते. किती झाले तरी ती माकडेच. पूर्णसिंहचा डोळा लागल्यावर माकडे झाडावरून खाली उतरली आणि त्याच्या खिशातून पैसे काढून त्यांनी ते पैसे मारुतीच्या खिशात ठेवून दिले. नंतर झाडावर चढून परस्परांकडे पाहू लागली, जणुंकाही त्यांनी कांहीतरी मोठे काम केले होते.

काही वेळाने पूर्णसिंह व मारुती दोघांच्या झोपा मोडल्या. दोघे बाजारांत निघाले. बाजारांत पोचल्यावर "आतां तू आपले काम कर मी आपल्या कामाला जातो." असे सांगून पूर्णसिंहाने पाय काढला.

तो कापडाच्या दुकानांत गेला. एक धोतरजोडी निवडली. पैसे देण्यासाठी खिशात हात घातला तर खिसा रिकामा.

मारुतीने पाटलांनी ज सांगितले होते ते सर्व सामान विकत घेतले. तरी खिशात पैसे उरले होते व ते पुष्कळ होते. त्याने स्वत:साठी पण थोडे कापड विकत घेतले आणि पाटलांना जाऊन म्हणाला—"काय सांगू पाटील? माझ्या खिशांत एकदम इतके पैसे निघाले की मी स्वत:साठी पण कापड विकत घेतले.

पूर्णसिंह रिकाम्या हाताने बाजारांतून घरी परत आला. पैसे चोरीला गेल्याचे तो कोणाजवळ काही बोलला नाही. त्याने विचार केला मारुतीसारख्या निष्पाप माणसाला फसविण्याचा विचार मनांत आपल्याबद्दल देवानेच ही शिक्षा दिली असावी.





# कृष्णावतार

रुक्मिणीच्या लग्नाची बातमी सांगून नारद निघून गेला. कृष्णाने आपल्या स्नेही व सहकारी मंडळींना बोलाविले आणि त्यांना म्हणाला—"नारद मुनींनी जे काही सांगितले ते सर्व तुम्ही सर्वांनी ऐकलेच आहे. मग चला आपण सर्व कुंडिनपुराला निघू या. तुम्ही सर्व आपली वाहने व सैन्ये सज्ज करा. सैन्याच्या अग्रभागी सात्यकीने रहावे, मध्यभागी बलरामाने आणि सर्वांच्या शेवटी उग्रसेनाने. मी आपली शस्त्रास्त्रे घेऊन दारुक बरोबर पुढे जातो. शिशुपाल व रुक्मीचा समाचार घेऊन रुक्मिणीचे हरण करतो."

कुंडिनपुराला सर्वांनी निघावयाचे आहे हे जाहीर करण्यात आले. सर्व तयारीला लागले. कृष्ण पुढे निघाला. तो कुंडिनपुरानजीक आला तेव्हां राजा भीष्मक कृष्णाच्या स्वागतासाठी सामोरा आला. त्याने त्याचा सर्वप्रकारे सत्कार करून नगराबाहेर त्याची उतरण्याची व्यवस्था केली.

विवाहासाठी हजर असलेले इतर राजे कृष्णाला आलेला पाहून निरनिराळ्या प्रकारे तर्कवितर्क करू लागले.

"कृष्ण, शिशुपालाच्या आतेचा मुलगा आहे ना? म्हणून आला असेल त्याचा विवाह पाहायला." असा कित्येकांनी तर्क लावला.



"छे....! शक्यच नाही. कृष्णाचे जरासंधाशी किंवा शिशुपालाशी कधीच पटले नाही. मग तो कसा काय येईल या लग्नाला?" कित्येकांनी ही शंका प्रगट केली.

"पण आम्हांला असे कळले आहे की रुक्मिणीने कृष्णाला मनाने वरले आहे." इतर काही जणांनी हा तर्क लावला.

कृष्ण यादव मित्रांबरोबर आला असल्याचे जेव्हां रुक्मिणीला कळले तेव्हां उन्हाने तापलेल्या जमिनीवर पावसाचे पाणी पडावे तसे रुक्मिणीला वाटले. माझे प्रियकर मला या संकटातून सोडविण्यासाठीच आले आहेत, माझा जन्म सार्थक झाला. आता दर्शनाचे भाग्य केव्हां बरे लाभणार? रुक्मिणीच्या मनात हे विचार चालू होते. त्याच्या शौर्याचे व साहसाचे वर्णन करून ती आपल्या सखींना व मैत्रिणींना सांगू लागली. तिच्या मनाचे दुःख ओसरू लागले. तिच्या फिकट चेहऱ्यावर पुन्हा गुलाबी छटा झळकू लागली.

कृष्णाने इतर कोण आले आहेत, लग्न समारंभ केव्हा आहे वगैरे गोष्टींकडे दुर्लक्ष केले. रुक्मिणीची व आपली भेट केव्हां व कशी घडू शकेल! रुक्मिणीचे अपहरण करणे हा एकच एक उपाय तिला या संकटातून सोडविण्यास शक्य होईल, असे त्याला वाटले. हे सर्व करण्याचा मी विचार करीत आहे खरा, पण रुक्मिणीचे माझ्यावर खरोखरच प्रेम आहे की नाही, नको का कळायला? तिच्या डोळ्यात माझ्यावरच्या प्रेमाची एक झळक जरी दिसली तरी पुरे. स्वतः ब्रह्मदेव आडवा उभा राहला तरी तिला मी सोडवून आणीन.

दिशा फाकू लागल्या. भोवरे कमळावर गुंजार करू लागले. चक्रवाकांच्या डोळ्यावरची रात अंधेरी लोपली. हंस सरोवरात विहार करू लागले. सूर्योदय पण झाला.





कृष्ण स्नानादि आटोपून व वस्त्रालंकार धारण करून रथात बसून आपल्या अनुयायांसह निघाला.

राजवाड्यात रुक्मिणीला सजविण्यात आले. तिला पालखीत बसवून तिच्या सर्व सखी गौरीदर्शनासाठी तिला घेऊन निघाल्या.

देवळासमोर पालखी ठेवून सर्व मैत्रिणींबरोबर रुक्मिणी देवीच्या दर्शनाला देवळात गेली. तिने देवीसमोर मस्तक ठेवून मनातल्या मनात प्रार्थना केली—"हे देवी! माझ्यावर कृपा कर व श्री कृष्णच माझे पती होतील असा मला वर दे."

देवीचे दर्शन करून रुक्मिणी देवळाबाहेर आली. देवळाच्या पायऱ्या उतरत होती. तेवढ्यात कृष्ण रथात बसून तेथे आला. त्याने अगदी प्रथम त्याच वेळी रुक्मिणीला डोळे भरून पाहिले. सर्व सखींच्या मध्यभागी उभी असलेल्या रुक्मिणीला पाहून, क्षीरसागरातून लक्ष्मी बाहेर यावी तशी ती कृष्णाला भासली. त्रिलोकात तिच्या सारखी दुसरी कोणी सुंदर असणे शक्य नाहीं, असे त्याला वाटले. त्याने तिच्या सौंदर्या विषयी पुष्कळ ऐकले होते, पण प्रत्यक्ष पाहाल्यावर ती त्याला त्याहून जास्त सुंदर दिसली. आता मनाला आवरणे शक्य नव्हते. ती आपलीच व्हावी असे असेल तर तिचे हरण करण्यास याहून सुंदर संधी व स्थान मिळणे शक्य नाही, असे त्याने मनाशी ठरविले.

रुक्मिणीने पण त्याच क्षणी कृष्णाला सर्वांत प्रथम पाहिले. तिच्या सखींनी हाच कृष्ण म्हणून तिला दाखविल्यावर तिने डोळे भरून त्याला पाहिले व त्याची मूर्ति आपल्या हृदयमंदिरांत स्थापन केली. आजपर्यंत ज्या कृष्णाचे ध्यान ती करीत होती त्याला प्रत्यक्ष डोळ्यासमोर पाहून ती देहभानच विसरली. तिची ती स्थिति पाहून तिच्या मैत्रिणी थोड्या घाबरल्या.



इतक्यात बलराम सात्यकी इत्यादिकां-बरोबर तेथे येऊन पोचला. कृष्णाने मनांत जे कांही योजले होते ते त्याला कळविले, आणि जास्त वेळ विचार करण्यात न घालविता तो रुक्मिणी होती तेथे धावला. त्याने रुक्मिणीला भेटून तिला उचलून फुला-सारखे रथात ठेवले. रुक्मिणीच्या सर्व सखी घाबरून गेल्या. रुक्मिणीच्या रक्षणासाठी उभे असलेले सैनिक धावले. पण बलरामाने एक मोठे झाड उपटून मध्ये टाकले आणि त्यांना अडविले. नंतर त्याने त्याच झाडाने त्या सर्वांना झोडपून काढले. ते सर्व पळून गेले.

या सर्व घटनेचे वृत्त उग्रसेन, सात्यकी शतद्युम्न, विदूरथ, प्रसेनजित इत्यादिकांस कळले. ते सर्व बलरामाच्या मदतीला सैन्य घेऊन धावले. ते कृष्णाला म्हणाले—"तू इकडची काळजी मुळीच करू नकोस. रुक्मिणीला घेऊन तू सरळ द्वारकेला जा."

इकडे कृष्ण निघून जाण्याच्या तयारीत असता व यादव वीर युद्धाला तयार होऊन सज्ज उभे असता तिकडे रुक्मिणीच्या रक्षणासाठी गेलेले अंगरक्षक स्वतःचा जीव वाचवून राजाकडे धावले व त्यांनी कृष्णा-कडून रुक्मिणी हरण झाल्याची वार्ता भीष्मक, जरासंध व शिशुपाल आदिकांस दिली. असे अनपेक्षित काही घडेल याची स्वप्नात देखील कोणाला कल्पना नव्हती. "आपण इतके अतिरथी व महारथी येथे असता कृष्णाने इतके साहस करावे हा आपणां सर्वांचा अपमान आहे. त्याला स्वतःच्या शौर्याचा गर्व झाला असेल तर तो उतरविलाच पाहिजे." सर्व आपसात हे बोलू लागले.

रागाने जरासंधाचा चेहरा लाल बुंद झाला होता. तो म्हणाला—"एक गवळ्याचा पोर येऊन राजकन्येला पळवून नेतो काय



आणि आपण सर्व हा अपमान गिळून स्वस्थ बसतो काय? हे सर्व असह्य वाटते माझ्या मनाला. मी आपले सर्व सैन्य घेऊन जाऊन त्याच्यावर स्वारी करतो. तुम्हाला वाटल्यास तुम्ही पण बरोबर मदतीला या."

जरासंधाने प्रतिज्ञा केली, "कृष्ण समुद्रात बांधलेल्या द्वारकेत रुक्मिणीला घेऊन गेला तर मी द्वारकेवर स्वारी करून रुक्मिणीला सोडवून घेऊन येईन. कृष्णाला व त्याच्या लबाड साथी मित्रांना ठार केल्याशिवाय मला चैन पडणार नाही."

परंतु पौंड्र वासुदेव याने जरासंधाला अडविले व म्हणाला—"मी तुझा दासानुदास येथे हजर असता तू स्वतःवर ही जबाबदारी घेण्याचे कारणच काय? मी जातो आणि त्या कृष्णाला ठार करून पक्ष्यांना व कोल्ह्या-कुत्र्यांना मेजवानी देतो. या भूमीवर दोन वासुदेव राहणेच शक्य नाही. मी तरी जिवंत राहीन नाहीतर तो तरी जिवंत राहील. हे पुरे झाले की तुझा हेतू पण सिद्ध होईल. याहून जास्त काय पाहिजे तुला, सांग."

इतक्यात शिशुपाल शस्त्र धारण करून उभा राहाला व म्हणाला—"थांबा! कोणी



जाण्याचे कारण नाही. हा अपमान माझा आहे. मी लग्नासाठी म्हणून येथे आलो. त्याने माझा उत्साह भंग केला. मी ह्या एका शस्त्राने कृष्णाचा व सर्व यादवांचा ध्वंस करीन आणि जरासंधाचा एक दास म्हणून कीर्ति संपादन करीन. कोणी खरा क्षत्रिय असेल तर तो परस्त्रीकडे कधी नजर तरी फिरवील का? या गवळ्याच्या पोराने आम्हा क्षत्रियांचा अपमान केला आहे. गुरां ढोरांत वाढलेला कृष्ण पशूसारखाच वागणार! म्हणून त्याचा वध करून रुक्मिणीचा उद्धार करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे."



त्यानंतर जरासंध आदिकांनी कवच धारण केले आणि रथात बसून युद्धाला निघाले. त्यांच्या पाठीमागून सर्व सैन्य निघाले. रणवाद्ये वाजू लागली. त्यांनी कृष्णाला व यादव सैन्याला वाटेतच गाठले.

बलराम व सात्यकी दोघांनी आपले सैन्य मागे वळविले व जरासंध व त्याच्या सैन्याबरोबर युद्ध सुरू झाले. यादवांचे सैन्य लहान होते व जरासंधाचे सैन्य मोठे होते. तरी जरासंधाच्या सैन्याचाच जास्त संहार होत चालला होता. नंतर द्वंद्वयुद्ध सुरू झाले. एकी कडे सात्यकी व जरासंध यांचे द्वंद्वयुद्ध चालू होते तर दुसरीकडे शकदेव व अक्रूराचे दंतवक्त्राशीं झाले. शिशुपाल एकटा तीन यादव वीरांशी युद्ध करीत होता. कृतवर्य व पौंड्रक वासुदेव यांचे आपसात युद्ध झाले.

बलरामाने सर्वांत अधिक शत्रूचा संहार केला. जरासंधाने पण घोर युद्ध केले. शेवटी बलरामानेच गदायुद्धात त्याला मूर्च्छित केले. त्याचा सारथी त्याला उचलून घेऊन रथांत दूर कोठेतरी घेऊन गेला. जरासंध अदृश्य झाल्यावर सैन्याचा धीर सुटला आणि त्याचे सैन्य पळू लागले. सात्यकीने पळणाऱ्या सैन्याला पिटाळून लावले. सात्यकीच्या शंखाचा आवाज ऐकून कृष्णाला कळले की जरासंधाचा पराभव झाला. म्हणून कृष्णाने आपला पांचजन्य वाजविला.

कृष्ण, रुक्मिणीचे हरण करून निघाल्याचे व जरासंध सैन्य घेऊन त्याच्याशी युद्ध करण्यास गेल्याचे रुक्मीला कळले. त्यावेळी तो राजवाड्यात आपल्या महालात होता. तो, त्याचे वडील राजा भीष्मक व इतर आप्तेष्टांसमोर उभा राहून म्हणाला–"मी रुक्मिणीला सोडवून आणीपर्यंत राजधानीत पाय ठेवणार नाही." तो आपल्या खास खास अनुयायांसह युद्धाची तयारी करून

निघाला. त्याच्या बरोबर दक्षिणेकडील कित्येक राजे होते.

त्यांना कृष्णाचा रथ नर्मदेच्या काठी दूरून जात असलेला दिसला. रुक्मी बाकी लोकांना मागे सोडून एकटा आपल्या रथांत बसून कृष्णाचा पाठलाग करण्यासाठी गेला. जवळ येतांच त्याने कृष्णाला युद्धास आह्वान केले व म्हणाला—"ए गवळ्याच्या पोरा! पळपुट्या, कोठे रे निघालास परस्त्रीचे अपहरण करून? मला तू ओळखले नाहीस वाटते! मी रुक्मी आहे, रुक्मी. तुला जिवाचं भय असेल तर रुक्मिणीला निमूटपणे परत दे. नाही तर ये, माझ्याशीं द्वंद्वयुद्ध कर." असे सांगून तो कृष्णावर, शरवृष्टि करू लागला. कृष्णाने क्षणार्धात प्रथम त्याच्या सारथ्याला ठार केले व रुक्मीला स्वतः क्षत विक्षत केले.

रुक्मीची ती अवस्था पाहून दक्षिणेकडचे जे राजे त्याच्या मदतीस आले होते ते धावले व त्यांनी कृष्णावर एकदम हल्ला केला. काही वेळ जोराचे युद्ध झाले. थोड्या वेळाने रुक्मी शुद्धीवर आला. तो दुसऱ्या एका रथात बसून कृष्णाशी युद्ध करू लागला. कृष्णाने नेम धरून त्याच्या छातींत तीन बाण मारले व पुन्हा त्याला बेशुद्ध केले. भावाला बेशुद्ध स्थितीत रथातून जमिनीवर पडलेला पाहून रुक्मिणीला भोवळ आल्यासारखे झाले व ती रडू लागली.

कृष्णाने रुक्मिणीचे सांत्वन केले. रुक्मीला अभयदान देण्याचे रुक्मिणीने कृष्णाकडून वचन घेतले. रुक्मी आपला रथ घेऊन स्वदेशी परतला व कृष्ण द्वारकेकडे निघाला.





# अरण्यपुराण

[२०]

किल्ल्याच्या तटाला लागून असलेल्या खंदकात बसून काबा व काळा वाघ तो ढग केव्हा चंद्रावर जातो याची वाट पहात बसले होते.

"मी पश्चिमेकडच्या भिंतीवरून खाली सरकत येतो. माकडे माझ्यावर हल्ला करतील याची शक्यता नाही." काबा म्हणाला.

"बरोबर म्हणतोस! या वेळी अस्वल पण असते तर किती बरे झाले असते! चंद्रावर तो ढग येतांच मी देखील आत उडी मारतो." काळावाघ म्हणाला.

"शिकार साधावयाची आहे!" म्हणत काबा पश्चिमेकडील भिंतीवरून उतरू लागला.

त्याच वेळी चंद्रावर काळा ढग आला. काळ्या वाघाने गुपचुप आत उडी टाकली आणि मौवलीच्या चारीबाजूला बसलेल्या माकडांना आपल्या पंजांनी व अणकुचीदार दातांनी ठार करू लागला.

माकडे रागाने मोठमोठ्याने ओरडू लागली—"एकटाच आहे एकटा. करा ठार लेकाला!" आणि वाघावर एकदम दहादहा पाचपाच अशी उड्या मारू लागली.

पांचसहा माकडांनी मौवलीला धरले व त्याला संगमरवरी दगडाच्या मंडपाकडे ओढून घेऊन गेली. त्या मांडवाच्या भिंतीला एक वेताची फट होती. त्यातून मौवलीला त्यांनी आत ढकलले.

"रहा तेथेच. तुझ्या मित्रांना ठार करून येतो आम्ही तुझ्याशी खेळायला. होय, पण या अवधीत तुला या विषारी किड्यांनी

       



(सापांनी) ठार केले नाही तर....” माकडे मौवलीला असे सांगून निघून गेली.

मौवली सापांच्या भाषेत त्यांना म्हणाला— “मी व तुम्ही एकच आहो.”

“आपली फडा करा खाली.” सहासाप एकदम परस्परांना म्हणाले. “आणि तू जागचा हालू नकोस. नाही तर आम्हांला तुडवशील.” ते मौवलीला म्हणाले.

भिंतींच्या फटीतून मौवली बाहेरचे दृश्य पहात होता. तेथे काळ्या वाघाशी माकडांची झुंज चालू होती. माकडे पाळी पाळीने येऊन वाघावर हल्ला करीत होती. वाघ सुद्धा तसा लेचापेचा नव्हता. तो उड्या मारमारून त्यांना ओरबाडून किंवा चावून जमिनीवर लोळवीत होता.

मौवलीला वाटले की काळा वाघ एकटा आला नसावा. जवळपास कोठे तरी अस्वल असणार. . तो ओरडला—“पाण्याच्या कुंडा-कडे वळ. मोठी टाकी आहे. उडी मार.”

मौवलीचा आवाज ऐकून काळ्या वाघाला जास्त चेव चढला व तो जोर जोराने माकडांना ठार करू लागला. तो माकडांना ढकलीत ठार करीत किंवा मारीत टाकी होती तिकडे उड्या मारीत गेला.

इतक्यात जंगलाच्या बाजूने व भिंतीच्या बाजूने त्याला अस्वलाचा हुंकार ऐकू आला. ते त्याला शक्य झाले तितक्या वेगाने तेथवर आले होते.

“आलो रे बाबा! मी येतो वर, हे दगड माझ्या पायाखालून सरकत आहेत.” असे म्हणत अस्वल देखील आत आले.

ते दिसतांच माकडे त्याच्या चारी बाजूला घोळका करून जमा झाली. अस्वल समोर येईल त्या माकडाला आपल्या नखांनी आवळून ठार करू लागले. त्याने माकडावर जणुकाही हल्लाच सुरू केला.



त्याच वेळी पाण्यात काही तरी मोठी वस्तु पडल्यासारखा आवाज झाला. त्या-वरून काळ्या वाघाने टाकीत उडी टाकल्याचे मौवलीला कळले. माकडांना त्याच्याजवळ जाणे आता शक्य नव्हते. पाण्याच्या चारी बाजूला उभी राहून दम धैत उभा राहिलेल्या वाघाकडे ती पहात होती. पाण्यात पाऊल टाकण्याची हिंमत एकाच्यात नव्हती.

संधी साधून काबाने पाय काढला असेल असा विचार करून वाघ दुसऱ्या सापांजवळ ‘मला सोडा रे’ अशा विनवण्या करू लागला. ते ऐकून अस्वल, माकडांवर हल्ला करीत स्वत:चा बचाव करीत होते तरी त्या गडबडीतही आपले हसू आवरू शकले नाही.

परंतु काबा पळून गेला नव्हता. पश्चिमेकडील भिंतीवर चढण्यासाठी त्याला थोडा वेळ लागला. एवढे मोठे शरीर त्याचे वर चढणे सोपे नव्हते. पण वर चढल्यावर मात्र जेव्हा तो खाली सरकला तेव्हा त्याच्या वजनानेच कित्येक दगड खाली पडू लागले व माकडांचा चेंदामेंदा होऊ लागला. येथ-पासून माकडे होती तेथपर्यंत उतरून जाणे कठीण नव्हते. त्याने शरिराला आडवे



तिडवे करून पाहिले की कोठे जखम तर लागलेली नाही.

अस्वलाशी माकडांची झुंज चालू होती. वाघाच्या चारी बाजूला हौदाजवळ माकडे ओरडत होती. वटवाघूळ ते सर्व पाहून “मांग....मांग....” असे ओरडत रानटी जनावरांना खाली जे काही घडत होते ते सर्व सांगत होते. रानटी पशू युद्धाचे ते ते वर्णन लक्षपूर्वक ऐकत होते. हत्ती एकदा मोठ्याने ओरडला सुद्धा. माकडे रानात जेथे जेथे म्हणून होती ती जागी झाली आणि झाडावरूनच उड्या मारीत

       

आपल्या बंधुमित्रांच्या मदतीला त्या पडक्या नगराकडे धावली. जवळपासच्या झाडां-झुडपांवर जे पक्षी झोपले होते त्यांच्या झोपा मोडल्या.

काबा बाणासारखा वेगाने सरकत खाली येत होता. तो ज्याच्यावर वार करी त्याला आपल्यावर मोठा डोंगरच कोसळला कीं काय, असे वाटे. कारण इतके वजन होते त्याच्या शरिराचे. चारफूट लांब अजगरच मनुष्याच्या छातीवर डोकें ठेवून पडला तर त्या वजनाने त्या माणसाच्या छातीच्या बरगड्या मोडून जातील. मग तीस फूट लांब अजगराचे वजन किती असू शकेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे.

काबाने सर्वांत प्रथम अस्वलावर हल्ला करणाऱ्या माकडांचा समाचार घेतला. दहावीस माकडे त्याच्या एका फटक्यानेच गार झाली. उरलेली. "काबा, काबा, पळा, पळा!" असे ओरडत पळून गेली.

काबा कोणत्या युगात जन्मला व त्याचे वय किती हे दोघा तिघां म्हाताऱ्या माक-डांना थोडे थोडे माहीत होते. तो होता हुशार. आवाज केल्याशिवाय तो झाडावर चढे व किती मोठे माकड असले तरी त्याला ते आवळून ठार करी. झाडावर त्याला पाहून दुरून माकडांना वाटे की वाळकी वेल असेल एखादी. त्याच्या अंगात किती शक्ति आहे याचे अनुमान लावणे माकडांच्या बुद्धी बाहेर होते. त्याच्या विळख्यात एकदा सांपडल्यावर कोणी जिवंत सुटून निघालेला कोणाच्या ऐकिवांत नव्हता. माकडांपैकी एकाचीही अजगराच्या नजरेशी नजर भिडविण्याची छाती नव्हती. म्हणून माकडे पळून छपरांवर जाऊन बसली.



फोटो : ओ. पी. शर्मा

पुरस्कृत
जोडनांवें

अनेक कुसमें तुझी परी त्यां,
संरक्षणी तूं निर्बल दिससी!

प्रेषक :
इंद्रपाल अहेरकर-हिवरा

परंतु आतल्या आत वैरभाव वाढत होता. टिपूची भीती कमी होतांच पेशवे, दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर व नागपूरचे भोसले सर्वांनी मिळून निजामावर स्वारी केली. १७९५ च्या मार्च महिन्यात निजामाचा पराभव झाला. त्याने पुष्कळ धन देऊन संधीप्रमाणे आपला प्रांतदेखील मराठ्यांना देऊ केला. इंग्रजांनी निजामाला कोणत्याहि प्रकारचे सहाय्य केले नाही.

इंग्रज व म्हैसूर यांचे परस्परांशीं युद्ध होण्याचे कारण, अठराव्या शतकाच्या अखरीला हैदर व टिपू इंग्रजांच्या उन्नतीच्या वाटेवर राहू व केतू सारखे उभे होते.

हैदर अशिक्षित होता, परंतु साहसी व शूर होता. तो म्हैसूरच्या सैन्यांत एकएक पायरी चढत अनेक लढाया जिंकून उच्च पद.वर आला होता. हळूहळू म्हैसूर राज्याचे सर्व अधिकार त्याने हस्तगत करून घेतले. त्याचे हे यश इंग्रज, मराठे व निजाम यांच्या डोळ्यात सलत होते.

सन १७६५ मध्ये—मराठ्यांनी त्याच्यावर स्वारी केली तेव्हां हैदरने त्यांच्याशी संधी केली व नुकसान भरपाई म्हणून ३२ लाख रुपये आणि गुत्ती व सावनूरचा प्रांत मराठ्यांना दिला. १७६६ च्या नोव्हेंबर महिन्यात मद्रासच्या इंग्रज सरकारने निजामाकडून 'सरकार जिल्हे' मागून घेतले व त्या बद्दल हैदरवर स्वारीच्या वेळी निजामाला मदत देण्याचे कबूल केले. अशा तऱ्हेने हैदरच्या विरुद्ध मराठे, इंग्रज व निजाम यांची फळी उभी झाली. परंतु हैदरने मराठ्यांशी आधींच बोलणी करून त्यांना धन दिले व त्या पेच प्रसंगातून स्वतःची सोडवणूक करून घेतली.






# विचित्र भूत

फार जुनी गोष्ट आहे, एका लहानशा गावी यमुनादास व लक्ष्मी नावाचे नवरा बायको रहात असत. यमुनादास शेतकीचे काम करी. लक्ष्मी घरचे काम पाहून दूध व दही विकण्याचे काम करी.

काही काळ लोटल्यावर त्यांनी स्वस्तात एक जुने घर विकत घेतले आणि दुरुस्ती करून घेऊन गृह प्रवेश केला.

घरात पाऊल टाकताच विचित्र विचित्र गोष्टी घडू लागल्या. एकदा सकाळी लक्ष्मीला थंडी वाजून ताप आला. त्याच्या आदल्या दिवशी यमुनादास शेजारच्या गांवी गेला होता. लक्ष्मीने विचार केला की नवरा येण्यापूर्वीच पहाटे उठून दही घुसळून लोणी काढून घ्यावे व सैपाक वगैरे उरकून घ्यावा. परंतु तिला उठवेना. थोड्या वेळाने तिची झोप मोडली तेव्हा मोठ्या कष्टाने ती सैपाक घरात गेली. तेथे जाऊन पाहते तर दही घुसळलेले व लोणी काढून मडक्यात ठेवलेले दिसले.

दारे सर्व बंद होती. आत कोण व कोठून आले आणि हे सर्व काम कसे झाले हे तिला कळेना. यमुनादास आल्यावर तिने त्याला ते सर्व सांगितले. पण बायको जे म्हणाली ते ऐकून तो हंसू लागला.

आणखी काही दिवस गेले. लक्ष्मी गरोदर होती. तिला सर्व कामे होत नव्हती. काही कामे ती अर्धीच करून सोडून देई. परंतु काही वेळाने ती कामे पुरी झालेली दिसत. नंतर एकदा तिच्या मनात विचार आला की ही सर्व कामे भुते तर करून जात नसतील. तसे ती नवऱ्याला म्हणाली












देईल. पण तो म्हणाला—"ही सर्व निव्वळ तुझ्या डोक्यातली कल्पना आहे."

लक्ष्मीला नववा महिना लागला. तिने मदतीला आपली आई पार्वती हिला बोलाविले. पण तिने उलट निरोप पाठविला की अलीकडे माझी तब्येत बरी नसते, म्हणून मी येईनच असे काही सांगत नाही. लक्ष्मी घाबरली की आई आली नाही तर मदतीला कोण येणार? परंतु बाळंतपणाच्या एक दिवस आधी पार्वती हजर झाली. दोघा नवराबायकोला आनंद झाला. बाळंतपणानंतर पार्वती परत निघून गेली.

दुसऱ्या दिवशी पार्वती पुन्हा आली. त्यांना आलेल्या पाहून यमुनादासला फार आश्चर्य वाटले.

"बाळंतपणाला येऊ शकले नाही, बाई! काय करणार? महिनाभर झाला, अंथरुणाला खिळून होते. दोनचार दिवसापूर्वीच चार पावले चालू लागले, आणि आज मोठ्या मुश्कीलीने आले आहे." पार्वती म्हणाली.

लक्ष्मी व यमुनादास पार्वतीकडे पाहून आश्चर्य करीत होते. पण तिला कारण समजेना. म्हणून तिने विचारले—"बाळंतपणाला येऊ शकले नाही, म्हणून रागावलीस वाटते? पाहू दे तर नातवाला."

"आई! असं ग काय बोलतेस? तूच नाही का स्वतः येऊन माझं सर्व बाळंतपण केलेस? आणि आता कधी पूर्वी न आल्यासारखे बोलते आहेस?" लक्ष्मीने विचारले.

पार्वतीला ते सर्व ऐकून आश्चर्यच वाटले. लक्ष्मीच्या तोंडी सर्व वर्तमान ऐकून ती म्हणाली—"तर मग माझं रूप घेऊन भूत-बीत आले होते की काय?"

आता मात्र यमुनादासला पण भूतच असावे असे वाटू लागले. सासूच्या रूपाने आलेल्या बाईला त्याने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले होते.

"पार्वती त्यांना म्हणाली की भूत प्रेत असेल तर असे स्वस्थ बसून कसे चालेल?" सासूचं म्हणणं ऐकून तो शेजारच्या गांवी मांत्रिकाकडे गेला.

त्या दिवशी रात्री जोराचा पाऊस पडू लागला. पाऊस पडू लागल्याचे ऐकून लक्ष्मी घाबरून उठून बसली. कारण तिने परसात मिरच्या वाळत टाकल्या होत्या. त्या भिजून जातील म्हणून ती घाबरली होती. यमुनादास असते तर घेऊन आले असते. आता काय करावे? स्वत ती बाळंतीण. पावसात जाता कामा नये. जे व्हायचे असेल ते होईल, असे मनाशी ठरवून ती पावसात बाहेर गेली नाही.

परंतु सकाळी उठल्यावर पाहते तर पडवीत मिरच्यांचं पोते भिंतीला टेकून ठेवलेले होते. म्हशींना देखील कोणी तरी ओसरीत बांधून ठेवलेले होते. लक्ष्मी व पार्वती दोघींची तोंडें भीतीने पांढरी फट्ट झाली. दोघी परस्परांची तोंडे पाहू लागल्या.

थोड्या वेळाने यमुनादास मांत्रिकाला बोलावून घेऊन आला. सर्व प्रकार ऐकून



घेऊन मांत्रिक म्हणाला—" या सर्व तुम्हांला नुसत्या गप्पा वाटत असतील. परंतु हे भूत परोपकारी स्वभावाचे दिसते आहे. परंतु भूत चांगले असले तरी घरात ठेवणे बरोबर नाही. कारण त्याला पाहून दुसरी भूतं घरात शिरायची. तुमच्यावर आज पर्यंत ज्या भुताने उपकार केले त्याचा पूर्णनाश करण्यासाठी मारणहोम करणे पण बरोबर नाही. परंतु त्याची भुताटकी बंद करण्यासाठी व त्याला घरा बाहेर काढण्या साठी थोडे पैसे खर्च करावेच लागणार. त्यासाठी जेवढा खर्च होईल, त्या पेक्षा तुम्ही हे घर सोडून जाणेच जास्त फायद्याचे होईल." असे सांगून मांत्रिक निघून गेला.

लक्ष्मी नुसते भुताचे नाव ऐकून घाबरत असे. म्हणून ती म्हणाली—" या घरात आपल्या मुलाला त्रास होण्याची शक्यता आहे. हे घर नाही लाभले आपल्याला. मी एक क्षणभर देखील या घरात रहायला तयार नाही."

दुसऱ्यादिवशी संध्याकाळ पर्यंत यमुनादासने एक झोपडी शाकारून उभी केली आणि सर्व सामान त्या झोपडीत पोचते केले. एक जुनी उखळी काय ती त्याच्या जुन्या घरात राहून गेली. नव्या घरात पाऊल टाकल्य.वर लक्ष्मीला जिवात जीव आला. " उखळी गेली तर जाऊ दे." ती म्हणाली.

रात्री तिला शांत झोप लागली. दुसऱ्या दिवशी सकाळी ती परसात गेली तेव्हां तिला तिच्या नव्या घराच्या परसात ती उखळी ठेवलेली दिसली. अशा परोपकारी भुताच्या भीतीने घर सोडावे लागले याबद्दल लक्ष्मीला फार वाईट वाटले. त्यानंतर तिला ते भूत कधी दिसले नाहीं.





# पडकें देऊळ

[ २ ]

[ शिखीमुख नावाचा एक शबर तरुण रानात शिकारीला गेला असता त्याला कवचधारी एका घोडेस्वारावर, काही चोर व लुटेरे हल्ला करीत असल्याचे दिसले. तो त्या तरुणाच्या मदतीला धावला. त्याचे नाव त्याने विक्रमकेसरी असे सांगितले. काळोख्या रात्री दोघे शबर वस्तीजवळ पोचले. तेव्हां गावकरी त्यांच्याकडे धावत आले. —पुढे ]

शिखीमुखला, गावकरी असे एकाएकी धावत आलेले पाहून आश्चर्य वाटले. त्या सर्वांच्या हातात शस्त्रास्त्रे होती. काही जणांच्या हातात जळत्या मशाली पण होत्या. ते पहिल्याने त्याच्याजवळ पोचले आणि मोठ्याने ओरडत नाचू लागले.

" काय झालं काय, सर्व गाव जमा व्हायला !" शिखीमुखने त्यांना विचारले.

" गावात बातमी आली की जंगलात तुला व एका पोलादी माणसाला डोंगरी डाकूंनी ठार केले. म्हणून सर्व तुमच्या शोधार्थ निघालो होतो. पण आता तुम्हांला पाहून गुराख्यांचे म्हणणे खोटे ठरलं आहे. कदाचित तू व या पोलादी घोडेस्वाराने त्या दुष्टांना पळून लावले असावे." ते लोक सांगत होते.



शिखीमुख जोराने हसला व विक्रम-केसरीजवळ जाऊन म्हणाला–"पाहिलेस, आमच्या गावकऱ्यांनी कसा पराचा कावळा केला तो ? आपल्याला डाकूंनी ठार केले, असे गुराख्यांच्या पोरांनी जाऊन सांगितले. त्या मुलांनी तू पोलादाचा मनुष्य आहेस असे सांगितले होते."

विक्रमकेसरीला ती सर्व एक गंमत वाटली. त्याच बरोबर गावकऱ्यांत आपसांत ऐक्य आहे आपल्या नायकाच्या मुलावर त्यांचे प्रेम आहे हे पाहून त्याला विशेष आनंद वाटला. या शवर जातीची मदत मिळाली तर, बाबांनी स्वतःच्या शिरावर साहसाच्या एका कामाची जी जबाबदारी घेतली आहे ते नक्कीच यशस्वी होईल, याची त्याला खात्री वाटली.

जिवाजी आपल्या काही अनुयायांबरोबर त्याचा मुलगा उभा होता तेथे आला. त्याला येत असलेला पाहून शवर जातीचे सर्व लोक बाजूला सरकले व त्याला पुढे यायला जागा दिली. जिवाजीने पुढे येऊन आपल्या मुलाला वात्सल्याने पोटाशी धरले. त्याच वेळी त्याची नजर मशालीच्या उजेडात विक्रमकेसरीवर पडली.

जिवाजी क्षणभर चकित होऊन विक्रम-केसरीकडे पहात राहाला. नंतर चार पावले पुढे जाऊन म्हणाला–"कोण ? धनी विक्रम-केसरी ?" त्याच्या आवाजात आनंद व आश्चर्य दोन्ही स्पष्ट झळकत होते.

विक्रमकेसरीने नमस्कार केला व म्हणाला–"मी विक्रमकेसरीच आहे. पण माझी आपल्याशी ओळख नाही."

जिवाजीने ते उत्तर ऐकून, कानावर जणुकाही विश्वासच बसेना अशातऱ्हेने विक्रमकेसरीकडे पाहिले व म्हणाला–"बरो-बर ! चाळीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. ते धनी पण माझ्याच वयाचे आहेत. म्हातार पण आले असेल त्यांना. आम्ही दोघे तुझ्या वयाचे असताना चक्रवर्ती महाराजांच्या सैन्यात भर्ती होऊन. उत्तरेकडे ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात जयजयकार करीत शिरलो होतो. त्या युद्धांत आमच्या महाराजांना अलोट धन व यशप्राप्ती झाली होती. तुला पाहून मला माझे जुने धनीचसमोर उभे आहेत असे वाटत आहे."

"मी त्या विक्रमकेसरींचा नातू; माझे नाव पण विक्रमकेसरीच आहे. मी आपल्या वडिलांच्या आज्ञेने आपल्याला भेटून त्यांचा निरोप सांगायला व आपला सल्ला घ्यायला आलो आहे." विक्रमकेसरी म्हणाला.

"काय पण विचित्र ! तुझे आजोबा कैलासवासी झाले असे मी ऐकले. परंतु तुला पाहून ते पुन्हा कसे या जगात आले याचे आश्चर्य वाटते. तुझा तोंडावळा उंची, रंगरूप सर्व कसे हुबेहूब तसेच आहे. तुझे बाबा जयपाल खुशाल आहेत ना ? त्यांना या गरीब म्हाताऱ्या शवराची नुसती आठ-वणच नव्हे तर निरोप पाठवून सल्ला घ्यायला त्यांनी आपल्या स्वतःच्या मुलाचा जीव धोक्यात घातला ! म्हणून मला आश्चर्य



वाटत आहे. तुझे वडील एका राज्याचे अधिपती आहेत. माझ्यासारख्या सामान्य शवराचा सल्ला घेण्यासारखं असं काय आहे ?" जिवाजीने विचारले.

"ते सगळं मी गावात तुमच्या घरी पोचल्यावर सांगतो. तुमच्या गावात मला प्रवेश मिळू नये यासाठी काही दुष्टांनी मला जंगलात अडवलें." विक्रमकेसरी म्हणाला.

"ते कळले म्हणूनच आम्ही सर्व निघालो होतो. पण शिखीमुखाबरोबर माझ्या जुन्या धन्याचा नातू पण भेटेल याची स्वप्नात देखील मला कल्पना नव्हती. पोरांनी



पोलादाचा मनुष्य म्हणून तुझं वर्णन सांगितले. बरं तर दोघे खुशाल आहात म्हणून हायसे वाटलं चला," जिवाजी म्हणाला.

अर्ध्या तासाने सर्व गावात येऊन दाखल झाले तेव्हा जिवाजीच्या घरासमोर बायकांचा घोळका दिसला. त्या मोठमोठ्याने काहीतरी बोलत होत्या. त्यांच्या हातात पाण्याने भरलेल्या घागरी व मडकी होती. जिवाजीने जवळ जाऊन त्यांना विचारले—"काय भानगड आहे?" तेव्हां त्यांच्यापैकी काही पुढे येऊन सांगू लागल्या की सर्व तलावावर पाणी आणायला गेल्या होत्या काही अनोळखी परदेशी त्यांना दिसले. त्यांनी जिवाजींचे घर कोणते म्हणून विचारलं. त्या सर्वांच्या हातात शस्त्रे होती व ते दुष्ट हेतूने गावात शिरले होते. विचारल्यावर त्या बायकांनी त्या लोकांचा पेहराव कसा होता हे सांगितले. गुराख्यांनी वर्णन केलं होतं त्यात व यात साम्य होते. जिवाजी जास्त वेळ न घालविता घरात गेला. व विक्रम केसरीला म्हणाला "ते खिलंदर चोर दिसतात. अगदी अनोळखी अशा प्रदेशात शिरून शबर जातीच्या वस्तीवर हल्ला करण्याची हिंमत! ठीक, त्याना याची फळं चाखावी लागतील."

त्यांनी या घरावर हल्ला करण्याचा विचार केला आहे तर त्याला कारण तुम्ही नसून मी आहे. मी शिखीमुखावरोबर तुमच्या गावाकडे निघालो तेव्हां त्यांनी आम्हांला पाहिले असावे. त्यांना माझ्या प्राणापेक्षा माझ्या या पिशवीतले सामान हवे आहे." असे म्हणत घोड्याच्या खोगिराजवळ बांधलेली एक पिशवी काढून विक्रमकेसरीने जिवाजीच्या हातात दिली.

जिवाजीने ती पिशवी नेऊन काळजी पूर्वक खोलीतल्या एका कोपऱ्यात ठेवलेल्या



मूर्तीच्या समोर ठेवली व म्हणाला—" रात्रभर बोलू सावकाशपणे. पहिल्याने खाऊन पिऊन घेऊ." त्यानंतर सर्व एकत्र बसून जेवले. मांस व दारूवर सर्वांनी खूप हात मारला. जिवाजी भिंतीला टेकून बसला व हुक्का पिऊ लागला. समोर पांगडीवर विक्रमकेसरी व शिखीमुख बसले होते. त्यांच्याकडे पहात हंसून तो म्हणाला—" तुम्हां दोघांना शेजारी शेजारी बसलेले पाहून मला माझे जुने धनी विक्रमकेसरी आठवतात. त्यांचा नातू माझ्या घरी पाहुणा म्हणून कधी येईल याची कल्पना स्वप्नात देखील मला नव्हती. याबद्दल मला जो आनंद होत आहे तो वर्णन करून सांगू शकत नाही." "माझ्या वडिलांना तरी इतक्या दूर मला प्रवास करावा लागेल याची कल्पना कोठून असणार? ते मला तुमच्या व आजोबांच्या विचित्र आठवणी नेहमी सांगत. परंतु आज मी एक नवीन बातमी तुम्हांला सांगणार आहे. माझे आजोबा विक्रमकेसरी वीस वर्षांपूर्वी पुन्हा एकदा ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातल्या कामाख्या नगरी गेले होते. तेव्हां पासून आज पावेतो त्यांचे दर्शन आम्हांला घडले नाही. आम्हांला वाटत होते की त्यांनी या जगचा निरोप घेतला असावा. परंतु दोन महिन्या-पूर्वी जी बातमी मिळाली त्यावरून ते जिवंत असावेत से वाटते." विक्रमकेसरी म्हणाला.

ते ऐकून व चकित होऊन विक्रमकेसरी कडे पहात जिवाजीने विचारले—" धनी विक्रमकेसरी पुन्हा ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात गेले होते म्हणतोस? वीस वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे तर मला कोणाच्या तोंडी हे कळविले असते तर मी देखील त्यांच्या-बरोबर गेलो असतो. मला कां नाही कळविले त्यांनी? काही कळत नाही बुवा! इतकं दूर त्यांना पुन्हा कां जावे लागलं."

" त्याचं काही तरी गुप्त कारण होतं. व ते त्यांना मरण येण्यापूर्वी करणे अगत्याचं होते असं त्यांनी माझ्या बाबांना तेव्हां सांगितले. या पलीकडे त्यांनी काहीच सांगितलं ना[illegible] आम्हांला देखील कळू न देण्याजोगी कोणती गोष्ट होती हे आता त्यांचे त्यांनाच ठाऊक. परंतु दोन महिन्या-पूर्वी आमच्या दरबारांतले एक पंडित उत्तरेकडून परत आले व त्यांनी माझ्या आजोबांच्या म्हणून सांगून काही वस्तू बाबांना आणून दिल्या. त्यात ताडपत्रावर लिहिलेल्या काही गोष्टी आहेत. त्याच्या सांगण्यावरून आमचे आजोबा तेथल्या डोंगराळ प्रदेशात संन्यास घेऊन रहात आहेत. त्याने प्रमाण असे काही दिले नाही." विक्रमकेसरी म्हणाला.

जिवाजी काही वेळ विचारात गर्क झाला. नंतर म्हणाला—" तू म्हणतोस ते सर्व ऐकून माझं डोकं फिरल्यासारखं झालं आहे, बघ. माझे धनी तिकडे गेलेच कशाला? त्यांत गुपित असे काय होते? आणि त्या गुप्त वस्तु त्या पंडिताला मिळाल्या कशा?"

विक्रमकेसरीने थोडक्यात त्या पंडिताने सांगितले ते सुरवातीपासून शेवटपर्यंत



सांगितले. तो पंडित लहान पणीच घरून तीर्थयात्रेला निघाला. अनेक विद्या संपादन करून उतारवयांत घरी परतला. ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात तो बरेच दिवस फिरला. त्या प्रदेशातल्या जंगली लोकांना तो औषध-पाणी देई. अनेक जातीचे व अनेक भाषा बोलणारे लोक त्या प्रदेशात राहतात. त्यात इम्भ् नावाच्या हत्तीला माणसाळवणाऱ्या एका जातीशी त्याची ओळख झाली. पंडिताच्या तोंडी त्याच्या गावाचे नाव ऐकून त्यांनी त्याच गावचा विक्रमकेसरी नावाचा एक क्षत्रिय आपल्या एका नोकराबरोबर











जवळच राहातो असे सांगितले आणि असे देखील सांगितले की औषधी वनस्पती आणायला दोघे रानात गेले असता वाघाने त्यांना खाऊन टाकले. त्याच्या वस्तू म्हणून सांगून त्या लोकांनी ताडपत्रे, एक सुरी व दुसऱ्या काही वस्तू त्या पंडिताला दिल्या. तो पंडित रानांत पुढे गेला तेव्हां लोकांनी सांगितले की विक्रमकेसरी नावाचा एक क्षत्रिय अघोरी नावाच्या साधूंबरोबर डोंगराळ प्रदेशात राहातो. त्याला त्यांनी पुष्कळदां पाहिले देखील होते. त्या पंडिताने त्या साधूंजवळ पुष्कळ चवकशी केली. पण सर्व त्या जंगलातच आहे असे सांगत, पण कोठे आहे हे नक्की कोणी सांगितले नाही. हे कळल्यावर आजोबांच्या सर्व वस्तू देऊन बाबांनी मला तुमच्याकडे पाठविले आहे. ताडपत्रे वाचल्यावर कोणत्या गुप्त कामासाठी इतके दूर गेले होते हे कळेल. त्यावरून आजोबा जिवंत आहेत की नाही हे कळेल."

जिवाजी सर्व ऐकून विचारात गर्क झाला. थोड्या वेळाने म्हणाला—" ते गुपित पडक्या देवळा संबंधीचे तर नाही ? त्या देवळापर्यंत पोचण्या पेक्षा हिमालय पर्वतावर चढून जाणे सोपे आहे. शिखीमुख आण ती पिशवी."

शिखीमुख ती पिशवी घेऊन आपल्या वडिलांच्या हातात देऊ लागला. इतक्यात गल्लीच्या बाजूच्या दरवाज्यात सावली सारखे काहीतरी दिसले. एक मूर्त हलल्या-सारखी भासली. काळा पोशाख केलेला, सहा सात फूट उंचीचा व सडपातळ बांध्याचा एक मनुष्य घुबडाच्या आकाराचे शिरस्त्राण घालून त्यांच्या समोर येऊन उभा राहाला. जिवाजी, शिखीमुख व विक्रमकेसरी त्या विकृत मनुष्याकडे चकित होऊन पाहू लागले.



विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर टाकले आणि स्मशानाच्या दिशेने नेहमी प्रमाणे गुपचूप चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—" राजा ! तू कोणाचे तरी वाईट इच्छून तर हे सर्व कष्ट सहन करीत नाहीस ना ? तसे असेल तर गुर्जर देशाचा चक्रवर्ती शूरसेन याच्या सारखा स्वतःच्या हातानेच तुझा पराभव होईल. तुला रात्रीच्या वेळी कंटाळा येऊ नये म्हणून मी एक गोष्ट सांगतो, ऐक."

प्राचीन काळी गुर्जर देशाच्या गादीवर सम्राट शूरसेन असता त्याच्या दरबारात कित्येक मांडलिक राजे होते. त्या प्रत्येकाचे एकेक राज्य होते. त्यांच्या पैकी शक्तिमंत याचे पण सुंदरपुर नावाचे एक राज्य होते.



शक्तिमंत हा एक प्रजावत्सल राजा होता. प्रजेच्या सुखासाठी तो जातीने नित्य काळजी वाही. एक कुशल शासक म्हणून दरबारातले इतर सहकारी मांडलिक त्याचा आदर करीत. सुंदरपुर राज्यात नेहमीच शांतता व सुबत्ता नांदत असे. शक्तिमंत शूर व पराक्रमी पण तसाच होता. म्हणून त्याच्या राज्याकडे वक्रदृष्टीने पाहण्याची कोणाची छाती नव्हती. उलट ते आपल्या राज्य कारभारासंबंधी त्याचा सल्ला घेत.

एका मांडलिकाचा इतका आदर झालेला शूरसेनाला असह्य वाटू लागला. प्रथम त्याची कीर्ती वाढत चालली म्हणून त्याला हेवा वाटे पुढे शक्तिमंत त्याचे राज्यच गडप करतो की काय अशी भीति वाटू लागली. म्हणून शक्तिमंतचा शेवट करण्याचे ठरवून त्याने सुंदरपुरावर स्वारी केली. त्याने शक्तिमंतकडे दूत पाठवून त्याला कळविले की युद्धाला तयार रहा.

शक्तिमंताने उत्तरादाखल उलट निरोप पाठविला—"मी आपला एक मांडलिक, आपल्या वतीने व आपल्या इच्छेने सुंदरपूरला राज्य करीत आहे. काही चूक घडली असल्यास कळवावे."

पण शूरसेनचा विचार बदलला नाही. त्याने शक्तिमंतला कळविले कीं तू प्रजेला आपल्याकडे वळवून माझ्याविरूद्ध फितुरी चालविली आहेस. म्हणून तुझे राज्य आपल्या राज्यात कायमचे मिळवून टाकण्याचे मी ठरविले आहे.

युद्ध थांबविण्याचा शक्तिमंतने अनेक प्रकारे यत्न करून पाहिला. पण त्याला त्यात यश मिळाले नाही. ती गोष्ट सुंदरपूरच्या प्रजेला पण कळली. प्रजेने आपले सर्वस्व अर्पण करून आपल्या राजाची लाज राखण्यासाठी चंग बांधला. त्यामुळे शूरसेनला जय मिळण्याची आशा उरली नाही. त्याच्या अनुयायांनी पण कमी उत्साह दर्शविला. त्यांना ते युद्ध म्हणजे केवळ राजाचा हट्ट वाटला. म्हणून सैन्यात बंडाळी होते की काय याची शूरसेनला भीती वाटू लागली.

एकट्याने युद्ध केल्यास जय मिळणे अशक्य वाटून शूरसेनने आपल्या इतर मांडलिक राजांना निरोप पाठवून मदतीला बोलाविले. परंतु कोणी यायला तयार होईना. काहींनी तयारीला कमीत कमी एक आठवडा मागितला तर काहींनी एक महिना. सर्वांनी काहीतरी कारण सांगून अंग काढून घेतले.

शेवटी शूरसेनने हात टेकले व तहाची बोलणी सुरू केली. म्हणाला—"शक्तिमंता, तू किती झालास तरी माझा मित्र व सखा आहेस. फक्त तुझी परीक्षा घेण्यासाठी मी आलो होतो. या पलीकडे माझ्या मनात दुसरा एक ही उद्देश नव्हता व नाही. तू खुशाल राज्य कर." असे सांगून शूरसेन सैन्य घेऊन माघारी गेला.

ही बातमी कळल्यावर इतर मांडलिक मंडळींना आपल्या सम्राटाच्या तऱ्हेवाईक वागणुकीबद्दल राग आला. त्यांच्या पैकी एकजण आपल्या मित्रांना उघड म्हणाला—



"हा शूरसेन आम्हा मांडलिकांचा पदोपदी अपमान करतो. स्वतःच युद्धासाठी आह्वान करून गेला व पराभव झाल्यावर समेटाची भाषा बोलत माघारी आला. एका सामान्य मांडलिकाच्या हाती ज्याचा पराभव झाला त्याला आपण आपला सम्राट कां बरे मानावे? आज त्याने शक्तिमंताच्या राज्यावर स्वारी केली, उद्या तो आपल्या राज्यावर करणार नाही कशावरून? म्हणून याला गादीवरून काढून टाकू या." त्याप्रमाणे निश्चय करून त्यांनी शूरसेनाच्या राजधानीला वेढा दिला. शूरसेन जंगलांत पळून गेला

आणि जाताना आपल्या गादीवर शक्तिमंतला बसवावे असे सांगून गेला.

परंतु शक्तिमंत त्याच्या गादीवर बसण्यास कबूल झाला नाही. त्याने सर्वांकडून मैत्रीचे संबंध राखण्याची प्रतिज्ञा करवून सर्वांना स्वातंत्र्य दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"शूरसेनाचे असे पतन होण्यास मुख्य कारण त्याच्या मनातील हेवा होता, नाही का? शक्तिमंताने त्याला किती समजावून सांगितले की मी तुमचीच एक प्रजा म्हणून राज्य करीत आहे. पण तेवढ्याने त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याने स्वारी करून स्वतःच्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली. त्याने असा हट्टीपणा का दाखवावा? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"शूरसेन तसे वागण्याचे कारण निव्वळ हेवा होता असे नाही. शक्तिमंत आपणाहून जास्त शूर व पराक्रमी आहे हे जेव्हां शूरसेनाला कळले तेव्हां त्याच्या मनात साहजिकच ही शंका उद्भवली की हा कधी न कधी आपले राज्य देखील बळकावील. म्हणून त्याच्याहून जास्त आपले बळ वाढविले पाहिजे असे त्याला वाटले. पण ते शूरसेनला शक्य नव्हते. म्हणून शक्तिमंताचा काटा दूर करणे त्याला आवश्यक वाटले. त्यात अपशय आले, म्हणून त्याचे पतन झाले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# चोरांचा नायक

फार पूर्वी विंध्य पर्वताच्या दऱ्याखोऱ्यात चोरांची एक टोळी रहात असे. टोळीचा म्हातारा नायक अर्धांगवायु झाल्यामुळे देवाच्या निरोपाची वाट पहात होता.

म्हाताऱ्याने आपल्या साथीमित्रांना बोलाविले व म्हणाला—"तुम्ही लवकर आपला नायक निवडून घ्या. मी आयुष्यात पुष्कळ चोऱ्या केल्या व अनेक धाडसाची कामे केली. परंतु प्रयत्न करून ही तीन चोऱ्या मला शक्य झाल्या नाहीत तुमच्या पैकी जो कोणी त्या करील तो तुमचा नायक बनण्यास योग्य ठरेल."

"त्या तीन चोऱ्या अशा—गोपू धनगराच्या कळपातली मेंढरे नागोजी पाटलाचे जरीची नक्षी काढलेले जोडे आणि राजाच्या गळ्यात सतत राहणारी नक्षत्र माळा चोरून आणणे, ह्या तिन्ही गोष्टी मला जमल्या नाहीत. ह्या तिन्ही चोऱ्या जो करील त्याला तुम्ही आपला नायक नेमा." एवढे सांगितल्यानंतर त्याने एकदा "हे राम" म्हणून कायमचे डोळे मिटले.

चोरांच्या टोळीत एकाहून एक धाडशी तरुण होते. त्यांनी त्या तिन्ही चोऱ्या करण्याची शिकस्त करून पाहिली. त्यांच्यापैकी भूपती नावाचा एक हुशार तरुण होता.

त्याने सर्वात प्रथम गोपू धनगराच्या मेंढरांकडे लक्ष दिले. तो लागोपाठ तीन दिवस गोपू सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत काय करतो हे पहात राहिला. तेव्हां त्याला, गोपू रात्रंदिवस जागा राहून पाहारा देत असतो, हे कळले. उजाडताच कळप चरायला नेतो. रात्री कुंपणात आणून सोडतो



तो व काठीवर हनुवटी ठेवून उभा राहून रात्रभर पाहारा देतो.

भूपतीला हे कळेना की हा माणूस मुळीच झोपत कसा काय नाही? एकदा तो गोपूच्या बायकोला जाऊन विचारू लागला—"मावशी! तुमची मेंढरे कोणी चोरून नेली आहेत का?"

"तो वेडपट आहे ना, हनुवटी खाली काठी ठेवून उभा? म्हशीसारखा उभाच झोपतो." गोपूची बायको म्हणाली.

त्याच दिवशी रात्री भूपती गोपूच्या कळपातली चार मेंढरे उचलून घेऊन गेला आणि चोरांना दाखवून म्हणाला—"ही पहा, गोपूची मेंढरे आणली आहेत चोरून. आता जातो नागोजी पाटलाकडे त्याचे जोडे चोरून आणायला. ते घेऊनच मी परतेन."

नागोजी पाटील आठवड्यातून एकदा जंगल ओलांडून मामलेदाराच्या कचेरीत जाई. तो नागदेवाचा भक्त होता. हे कळल्यावर भूपतीने एक युक्ति योजली.

जंगलातून जाणाऱ्या वाटेवर एका जागी सापाचे बीळ होते. भूपतीने त्याच्या चारी बाजूला एक कुंपण केले. आत जायला एक लहान दरवाजा ठेवला. बिळावर फुले वाहून ठेवली. तेव्हां पासून दररोज तो बिळावर हळदी, कुंकू, गंध व फुले वाहू लागला. दररोज लोक येऊन त्या बिळाची पूजा करतात असे वाटे.

एक आठवडा लोटला. नागोजी पाटलाला मामलेदार कचेरीत जावयाचे होते. तो त्या बिळाजवळ येऊन पोचला. तो थांबला आणि त्याने आत वाकून पाहिले. कित्येक दिवसापासून नागराजाची पूजा चालू असल्याचे त्याच्या दृष्टीस आले. तो चार फुले घेऊन आला, जरीचे जोडे बाहेर दारात काढून ठेवले आणि आत बिळाजवळ गेला. त्याने भक्तीपूर्वक नागाच्या बिळाला फुले वाहिली.

झुडपाआड लपून बसलेला भूपती चटकन बाहेर आला व जोडे उचलून घेऊन झाडीतून पळत चोरांची टोळी होती तेथे येऊन आपल्या साथी चोरांना म्हणाला—"हे पहा, नागोजी पाटलाचे जोडे. आता राजाच्या गळ्यातली नक्षत्रमाळा आणून दाखवतो."

भूपतीने सरळ राजधानीत जाऊन नक्षत्रमाळा चोरण्यासाठी अनेक युक्त्या योजल्या. राजाला तीन मुली होत्या. पण मुलगा एक देखील नव्हता. ते लक्षात ठेवून त्याने नक्षत्रमाळा उडविण्याची युक्ती योजली.

तो लागोपाठ तीन महिने साधूंच्या संगतीत हिंडत राहिला. बैराग्या सारख्या त्याने दाढी व मिशा वाढवल्या व त्यांच्या सारखा थोडाफार बोलू लागला. एक हरणाजिन खाकोटीला व कमंडलू आणि कुबडी हातात घेऊन राजवाड्यात गेला. "बदरिकाश्रमातून राजाला आशीर्वाद देण्यासाठी आलो आहे," असे सांगून राजाला कळवायला सांगितले.

राजा भूपतीला भेटायला आला. राजाच्या गळ्यात ती नक्षत्रमाळा होती. भूपती हात



उचलून राजाला आशीर्वाद देत म्हणाला—"युवराज कोठे आहेत? त्यांना सुद्धा आशीर्वाद देऊन आम्ही पुढल्या प्रवासाला निघू."

राजाचा चेहरा एकदम उतरला व लाजत लाजत म्हणाला—"मला मुलगा नाही, बुवा. तीन मुलीच आहेत."

भूपती आश्चर्य वाटल्यासारखे दाखवीत म्हणाला—"ही नक्षत्रमाळा ज्याच्या गळ्यात आहे त्याला मुलगा व्हायला पाहिजे."

त्या पूर्वी ती गोष्ट कोणी राजाला सांगितली नव्हती. ती भूपतीच्या डोक्यातली

कळली होती. परंतु ते ऐकून राजा चकितच झाला.

"पाहू का मी जरा ती नक्षत्र माळा?" असे म्हणत भूपतीने धीटपणे राजाच्या गळ्यातून ती नक्षत्रमाळा काढली आणि लक्षपूर्वक पाहण्याचा थोडा अभिनय केला व म्हणाला—"मला संशय होता तेच खरे ठरले. ही ओवताना एक दोन चुका राहून गेल्या. नक्षत्रांच्या प्रकाशातच तपासून चुकीची दुरुस्ती करावयाची असते. त्या नंतर महाराजाना पुत्र अपत्य नक्की आहे, एवढे मी सांगू शकतो."

रात्री भूपती राजवाड्यातच राहाला. रात्रभर तो नक्षत्रांच्या प्रकाशात बसून नक्षत्रमाळा पहात म्हणत राहला—"रेवती नक्षत्राचा उदय झाला नाही. रोहिणी नक्षत्राचा उदय झाला नाही." वेळ घालवण्यासाठी या सर्व गप्पा होत्या. जे अधिकारी नक्षत्र पहात बसले होते ते पेंगू लागले.

तीन प्रहर रात्र लोटली. तोपर्यंत सर्व छान झोपी गेले तेव्हां भूपती नक्षत्रमाळा घेऊन राजवाड्याबाहेर पळून गेला.

भूपतीने नक्षत्रमाळा आणून दाखविल्यावर चोरांच्या टोळीने त्याला आपला नायक नेमला.

इकडे राजाने भूपतीच्या चातुर्यावर खूष होऊन दवंडी पिटविली की त्याला मोठ्या हुद्यावर नेमले जाईल.

भूपती आपल्या टोळीच्या सर्व चोरांना बरोबर घेऊन राजदरबारात आला. राजाने त्याला चोरांना धरून देण्याच्या कामावर नेमले. भूपतीच्या नजरेत धूळ फेकून चोरी करणे राज्यातल्या चोरांना अशक्य झाले. राज्यात सर्वत्र शांतता नांदू लागली.





# तीन प्रश्न

फार प्राचीन काळी अवध प्रांतात एका राजाला एक सुंदर मुलगी होती. तिच्या सौंदर्याचे वर्णन ऐकून दूरदूरच्या देशांचे राजकुमार तिच्याशी विवाह करण्याच्या हेतूने येऊ लागले. राजकन्या त्यांच्याशी कांही वेळ बोले व नंतर त्यांना निराश करून निरोप देई. तिने कोणते प्रश्न विचारले हे एकाहि राजकुमाराला कळले नाही.

काही जणांना वाटले की बोलता बोलता संदर्भाने तिने प्रश्न विचारले असतील व त्यांची समाधान कारक उत्तरे न मिळाल्याने आपल्याला निराश होऊन परत यावे लागले असावे. ते काही असो, राजकुमारीने त्यांच्या पैकी एकाला देखील लग्न करण्याचा विचार केला नाही.

त्या राजकुमारीच्या रूपलावण्याचे वर्णन काशीच्या युवराजाने पण ऐकले होते. तो काशीहून निघाला. वाटेत त्याला अनेक कष्ट सहन करावे लागले. एक जंगलाच्या वाटेने जात असता त्याला भूक लागली. त्याने हरणाच्या एका शावकाची शिकार करून त्याला भाजून खाण्याच्या हेतूने आग खुलवली. पण ती विझली. सोसाट्याच्या वाऱ्याने आग जास्त जळण्या ऐवजी विझे. शेवटी त्याने खाण्याचा विचारच सोडला.

इतक्यात दोन झाडे परस्परांना घासून ठिणग्या पडल्या व जंगलाला आग लागली. त्या वणव्यातून स्वतःचा जीव वांचवून तो जंगलाबाहेर उघड्या मैदानात येऊन पोचला. ऊन वाढत होते. दूर त्याला एक झोपडी दिसली. झोपडीबाहेर एक बाई तीन दगड









मांडून चूल पेटवून मडक्यात पेज शिजवीत होती. सात मुले पेज पिण्यासाठी घोळका करून बसली होती.

राजकुमारा जवळ जाऊन त्या बाईला म्हणाला—"बाई, मी दिवसभर उपाशी आहे. भूकेने जीव कासावीस झाला आहे."

"थांब हं बाळ! पेज तयार होते आहे, आमच्या बरोबर एक घोट तू पण पी." ती बाई म्हणाली.

पेज तयार झाल्याबरोबर त्या बाईने प्रथम युवराजाला पोटभर पेज प्यायला दिली. नंतर आपल्या मुलांना पाजली. पण मुलांचे पोट भरले नाही. त्या बाईला प्यायला एक थेंबभर पेज सुद्धा उरली नाही.

"उद्या सकाळी पोटभर पाजीन बरं का बाळांनो, आता झोपा." तिने आपल्या मुलांची समजूत घातली.

तिची ती गरीबी पाहून युवराजाच्या हृदयाला पाझर फुटला. ती रात्र त्या गरीब म्हातारीच्या घरी काढून तो दुसऱ्या दिवशी पुढे निघाला तेव्हा त्याने जवळ जे काही होते ते सर्व म्हातारीला देऊन टाकले.

नंतर तो अवधच्या राजधानीत सुखरूप येऊन पोचला.



राजकन्येने इतर राजकुमारांप्रमाणेच त्याची चांगली ओळख करून घेतली. बोलता बोलता तिने सहज विचारले—"समुद्रात वडवानल कसा राहातो बुवा?"

युवराज त्या गरीब म्हातारीचे उदाहरण देऊन म्हणाला—"दारिद्र्याचे दुःख जसे त्या म्हातारीने आपल्या हृदयात लपवून ठेवले आहे तसाच वडवाग्नी समुद्राच्या पोटात दडून राहातो.

पुढे राजकन्येने विचारले—"कोण मित्र किंवा शत्रू दोन्ही असू शकतो?"

युवराजाला जंगलातील अनुभव आठवला. ज्या वाऱ्याने, त्याने पेटवलेला विस्तव विझवला त्याच वाऱ्याने जंगलांत वणवा पेटला होता. ते उदाहरण देऊन युवराज म्हणाला—"अग्नि व वायु दोघे ही मित्र किंवा शत्रू दोन्ही असू शकतात."

आणखी पुढे बोलत असता राजकन्येने विचारले—"पंखाशिवाय कोणाला उडता येते?"

युवराज स्मित करून म्हणाला—"मनाला! त्याला पंख लागत नाही व ते वाटेल तिकडे उडू शकते. मला तुझ्या रूपलावण्याविषयी वर्णन ऐकायला मिळाले तेव्हां माझ्या मनाने येथपर्यंत धाव घेतली. ते केव्हा येथे आले हे मला कळलेदेखील नाही. त्याचा शोध काढीत तुझ्याकडे मी येथवर आलो आहे. मी ह्या गोष्टीची बातमी आपल्या मनाला दिलीसुद्धा नाही."

आपल्या प्रश्नांची उत्तरे काशीच्या युवराजाने स्वतःच्या अनुभवाने दिली असल्यामुळे व ती सयुक्तिक वाटल्यावरून राजकन्येने त्याच्याशी लग्न करण्यास होकार दिला. दोघांचे लग्न थाटामाटाने झाले.





# बुद्धीला औषध

काकतीय साम्राज्यातील एका नगरी श्रीकंठ नावाचा एक राजा राज्य करीत असे. तो विलक्षण स्वभावाचा होता.

श्री कंठला दोन मुलगे होते. त्यांच्या शिक्षणासाठी त्याने एका गुरूला नेमले. काही दिवस गेल्यावर श्रीकंठने गुरूला बोलावून विचारले—"मुलांचा विद्याभ्यास कसा काय चालला आहे?"

"मोठा मुलगा चांगली प्रगती करीत आहे. पण धाकट्याचे मन अभ्यासाकडे मुळीच नाही." गुरू म्हणाला.

"काय कारण असावे?" राजाने विचारले.

"धाकटा मुलगा थोडा मंदबुद्धि आहे." गुरू म्हणाले.

"मग मी तुम्हांला कशाला नेमले? त्याला बुद्धी नसेल तर ती उत्पन्न करणे तुमचे काम आहे." राजा म्हणाला.

"तसे नव्हे महाराज! उपजतच मनुष्यात जी बुद्धी असेल तिला खाद्य देऊन फक्त तिचे पोषण करणे गुरूला शक्य आहे. पण कोणाला मुळात बुद्धीच नसेल तर ती उत्पन्न करणे गुरूला कसे काय शक्य होईल? सर्वच लोक बुद्धिमान असतात असे पण नाही." गुरू म्हणाला.

ते ऐकून श्रीकंठ विचार करू लागला. 'म्हणजे आपल्या प्रजेत देखील मंदबुद्धि लोक आहेत तर. अशा लोकांना बुद्धि येणे अगर वाढविणे शक्य नाही. सर्व बुद्धिमानच असावेत. या साठी काय बरे करावे?'

राजाने प्रधानाला बोलावून त्याचा सल्ला घेतला. मंत्री म्हणाला—

"महाराज! असे ऐकतो की काही औषधे घेतली तर बुद्धीचा विकास होतो. वैद्यांचा सल्ला घेऊन पाहू या." राजाच्या निमंत्रणावरून मोठमोठे वैद्य हजर झाले.

राजा वैद्यांना म्हणाला—"निरनिराळ्या औषधांची तुम्हांला माहिती आहे. तर मग सांगा की मंदबुद्धीवाल्याला बुद्धी यावी या साठी काही औषध आहे का?"

"महाराज! काही कारणामुळे कोणाला बुद्धिभ्रम झाला असेल तर औषधपाणी करून काही सुधार करविणे शक्य आहे. पण बुद्धीचा नवीन निर्माण करण्यास औषध असल्याचे आमच्या ऐकिवात तरी नाही." वैद्यांनी एक मताने हा सल्ला दिला.

राजाला वैद्यांचे म्हणणे मुळीच पटले नाही. बुद्धीभ्रम झाला असेल तर तो दूर करण्यास औषध आहे तर नवीन बुद्धी उत्पन्न करणारे औषध कसे काय नाही? असे वाटून राजाने दवंडी पिटविली की "मंदबुद्धीच्या माणसाला कुशाग्र बुद्धी येण्यास काही औषध असेल तर आणून द्यावे. असे औषध आणून देणारास मोठे पारितोषिक देण्यात येईल."

काही दिवस लोटल्यावर राजाकडे एक मनुष्य आला व म्हणाला—"महाराज!



माझा जन्म धन्वंतरीच्या वंशात झाला आहे. माझे नांव वज्रनाभ. मूर्ख व मंदबुद्धीच्या माणसाला कुशाग्र बुद्धी मिळवून देणारे औषध मला माहीत आहे. पाहिजे तर परीक्षा करून पहावी."

त्याच्या बोलण्यावर श्रीकंठचा विश्वास बसला. राजा त्याला म्हणाला—"परीक्षा करून व्यर्थ वेळ घालविणे मला पसंत नाही. किती दिवसात गुण पडतो एवढे सांग."

"एका वर्षांत मूर्खाला खात्रीने बुद्धी येईल." वज्रनाभ म्हणाला—

“तर मग ठीक. ते औषध मोठ्या प्रमाणात तयार करण्याची व्यवस्था कर. त्यासाठी जो खर्च होईल तो खजिन्यांतून दिला जाईल.” राजा म्हणाला.

नंतर राजाने दवंडी पिटवून जाहीर केले की राज्यातल्या मूर्ख माणसांनी वज्रनाभ याच्याकडून औषध घेऊन त्याचे सेवन करावे. एका वर्षानंतर कोणी मूर्ख आढळला तर त्याचे डोके उडविण्यात येईल.”

राजाज्ञेच्या भीतीने सर्वच लोकांनी अकलेचे औषध विकत घेऊन त्याचे सेवन केले. वज्रनाभला खूप फायदा मिळू लागला. एक वर्ष लोटले. राजाने अजून कोणी मूर्ख आहे का याची पाहणी करण्यासाठी काही अधिकारी नेमले. त्यांनी परत येऊन राजाला सांगितले की आता देशात सर्व लोक कुशाग्रबुद्धी झाले आहेत.

श्रीकंठने वज्रनाभचे अभिनंदन केले व त्याला काकतीय चक्रवर्तीकडे पाठविले. सम्राटाने, श्रीकंठने वज्रनाभा विषयी जे लिहून कळविले होते ते वाचून दाखवून त्याला विचारले—“तू कित्येक मूर्खांना बुद्धिमान केले आहेस. तू कित्येक मूर्खांना पाहिले असशील, त्यात तुला मूर्ख शिरोमणी कोण दिसला?”

तो म्हणाला—“मला प्रशस्तीपत्र देणाऱ्या श्रीकंठासारखा मूर्ख मला कोठे भेटला नाही. मी हे खरे बोलत आहे, या बद्दल क्षमा करावी.”

“तू खरोखरच हुशार व बुद्धिमान आहेस. तुला मी आपल्या पदरी एक मंत्री म्हणून नेमतो.” राजा म्हणाला.

वज्रनाभने थोड्याच दिवसात एक हुशार मंत्री म्हणून दरबारात मान मिळविला.





# चवथी सूक्ती

एका गांवी एका श्रीमंताला दोन मुलगे होते. मरणसमयी दोघा मुलांना जवळ बोलावून त्यांच्या हातात एक पत्र देत तो म्हणाला—“तुमच्या आजोबांनी मला हे पत्र दिले होते. या पत्रात सुखा समाधानाने आयुष्य घालविण्यासाठी चार सूक्ती लिहिल्या आहेत. त्यापैकी प्रथम तीन सूक्तींचे नीट पालन केलेत तर चवथ्या सूक्तीचा अवलंब करण्याची गरजच उरणार नाही.” असे सांगून त्याने या जगाचा निरोप घेतला.

बापाची अन्त्येष्टी संस्कार वगैरे संपल्यावर मुलांनी ते पत्र काढून वाचले. त्यात चार सूक्ती होत्या :— (१) चवीने जेवण जेवावे. (२) सर्व काही विसरून झोपावे. (३) साथी बरोबर असल्या शिवाय हिंडायला जाऊ नये. (४) गंगा व गोदावरी या दोन्ही नद्यांना जोडणारा एक कालवा खणावा.

मोठ्या मुलाने त्या सूक्ती वाचून पुष्कळ वेळ विचार केला. पण धाकटा म्हणाला—“यात विचार करण्यासारखे आहे काय?”

“यात काही गूढ अर्थ नसेल तर आजोबांनी बाबांना हे कां दिलं? नंतर बाबांनी ते इतके दिवस गुपित ठेवून आजच आपल्याला कां सांगितले?” मोठा भाऊ म्हणाला.

“पहिल्या तीन सूक्ती सहज लक्षात येतात. खूप जेवावे, निश्चिंतपणे झोपावे व मित्रमंडळीबरोबर हिंडावे आणि फिरावे. चवथी सूक्तीच जरा कठीण वाटते. धाकटा भाऊ म्हणाला.

मोठा भाऊ धाकट्या भावाला म्हणाला—“थोडा विचार करून काम कर.” परंतु

धाकट्याने सूक्तींचा अर्थ त्याला वाटला तसा लावून खाण्यापिण्यात, झोपण्यात व मित्रां-बरोबर हिंडण्याफिरण्यात त्याला बापाच्या इस्टेटीतून जे काही मिळाले होते ते सर्व खर्च करून टाकले.

काही दिवसांनी तो मोठ्या भावाच्या घरी जाऊन म्हणाला—"आजोबांनी जे लिहून ठेवले होते त्याचे मी तंतोतंत पालन केले आणि माझी ही दशा त्या मुळेच झाली आहे. तू आजोबांच्या उपदेशांप्रमाणे वागला नाहीस तरी सुखी आहेस हे कसे काय?"

"मी आजोबांच्या उपदेशांचा ठीक ठीक अर्थ समजून वागलो म्हणून आज सुखी आहे."

"चवीने जेवावे याचा अर्थ असा की भूक लागली म्हणजे जेवावे. हा पहिला उपदेश. त्याचप्रमाणे खूप मेहनत करणाऱ्यालाच झोपते वेळी देहाचा व जगाचा विसर पडतो. हा दुसऱ्या सूक्तीचा अर्थ झाला. साथी बरोबर असेल त्यावेळी हिंडायला जावे याचा अर्थ काठी सारखा रक्षण करणारा साथी मित्र असेल तेव्हां हिंडावे. उडाणटप्पू मित्रांच्या संगतीत राहू नये. मी या तिन्ही सूक्तींचे पालन केले." मोठा भाऊ म्हणाला.

"तरमग मला गंगेपासून गोदावरीपर्यंत कालवा खोदण्याचे काम करावे लागणार." धाकटा म्हणाला.

"त्याचा अर्थपण तुला कळला नाही. गंगेचा अर्थ विहीर आहे आणि गोदावरीचा अर्थ गुरांचा गोठा. या दोन्हीच्या मध्ये खणल्यावर आजोबांनी सांगितलेल्या चवथ्या सूत्राचा अर्थ कळेल." मोठा भाऊ म्हणाला.

मोठ्या भावाने सांगितल्या प्रमाणे विहीर व गोठ्याच्या मध्य भागी खणल्यावर आजोबांनी पुरलेला ठेवा सापडला.





# चंदनाचे झाड

उदयपूरच्या राजाला एक मुलगी होती. तिचे नाव चंपकगंधी असे होते. ती राजाची फार लाडकी होती. मोठी झाल्यावर एकदा ती आपल्या सखी-मैत्रिणीं-बरोबर वनभोजनासाठीं गेली. सर्व पक्वान्ने सर्वांनी मिळून फस्त करून टाकली. दहीभात घरून तयार करून नेलेला तेवढा उरला. राजकन्येने तो खड्डा खणून एका जागी पुरून ठेवला आणि मैत्रिणींबरोबर राज-वाड्यात परत आली.

पुढे काही दिवसांनी राजकन्या आपल्या वडिलांबरोबर फिरत त्याच जागी आली. तेथे तिला एक विचित्र झाड उगवलेले दिसले. त्या झाडाकडे ध्यान देऊन राजकन्या बराच वेळ पहात उभी राहिलेली पाहून राजाने तिला विचारले—"बाळ! हे कसले झाड आहे? तू इतका वेळ इतके ध्यान देऊन काय पाहते आहेस?"

चंपकगंधीने आपल्या वडिलांना वनभोजन झाले त्या दिवसाची हकीगत थोडक्यात सांगितली. त्यांचे संभाषण जवळच एका झाडा-वर बसून एक तरुण युवक ऐकत होता. तो पक्ष्यांना धरण्यासाठीच झाडावर चढून बसला होता. तो राजा व राजकन्या यांचे संभाषण पाना आड बसून ऐकत होता. कोणी तेथे लपून त्यांचे संभाषण ऐकत असेल याची कल्पना देखील दोघांना नव्हती.

त्यानंतर आपल्या वडिलांबरोबर घरी परत येते वेळी राजकन्या आपल्या वडिलांना म्हणाली—"जो कोणी या झाडाचे नांव सांगेल मी त्याच्याशीच लग्न करीन."










मुलीचे सर्व लाड पुरवणाऱ्या राजाने तसे जाहीर केले. त्याने आपल्या मंत्र्याला बोलावून मुलीच्या स्वयंवराची व्यवस्था करायला सांगितलें आणि राज्यभर दवंडी पिटवून जाहीर करायला सांगितले की जो कोणी त्या विचित्र झाडाचे नाव सांगेल त्याच्याशी राजकन्येचा विवाह होईल.

मंत्र्याने राजाच्या आज्ञेप्रमाणे दवंडी पिटविली. अनेक राजा, सरदार व शूर राजकुमार स्वयंवरासाठी आले. राजा त्या सर्वांना राजधानी बाहेर बोलावून घेऊन गेला आणि त्यांना ते झाड दाखवून म्हणाला— "त्या झाडाचे नाव बरोबर जो कोणी सांगेल त्याच्या बरोबर माझी मुलगी चंपकगंधी हिचा विवाह करून देण्यात येईल."

त्यांच्या पैकी एकाला देखील झाडाचे नाव बरोबर सांगता आले नाही. काही जणांनी कधी न ऐकलेल्या किंवा पाहिलेल्या झाडांची नावे सांगितली. परंतु कोणालाच बरोबर नांव सांगता आले नाही. बरोबर त्याच वेळी जंगलांत राहणारा तो तरुण युवक पुढे येऊन म्हणाला—"मी सांगतो झाडाचे नाव." त्या दिवशीसुद्धा तो रानात पक्षी पकडून न्यायला आला होता आणि तेथे गर्दी पाहून गंमत बघत उभा राहाला होता.

राजाने त्याला विचारले—"तर मग सांग, त्या झाडाचे नाव काय आहे ते."

"दही भाताचे झाड आहे." रानटी युवक म्हणाला.

तो म्हणाला, ते बरोबर असल्याचे राजाने मान्य केले. दूर दूरच्या देशातून आलेल्या मोठमोठ्या राजांच्या व सरदारांच्या माना खाली झाल्या. सर्व आपापल्या गावी निघून गेले.

राजाने जो निर्णय दिला होता, त्याबद्दल त्यालाच वाईट वाटू लागले. कारण राज-कन्येचे लग्न एका रानटी जातीच्या माणसाशी करून देणे राजाला कसे पसंत पडणार! परंतु त्याने स्वतःच जी गोष्ट जाहीर केली होती त्या विरुद्ध करणे आपलाच शब्द मोडल्यासारखे होईल. म्हणून मुलीचे लग्न त्या रानटी माणसाशी करून देणे आवश्यक होते. सुदैवाने सर्व राजे जा आपापल्या घरी निघून गेले होते. म्हणून राजाने आपल्या मुलीचा हात त्या तरुणाच्या हातात दिला व म्हणाला—"राजकन्येला आपल्या गावी बोलावून घेऊन ने आणि तिच्याशी लग्न करून घे."

चंपकगंधीला तिच्या पोरकटपणाबद्दल चांगलीच शिक्षा झाली. तिच्या वडिलांनी तिचे सर्व लाड पुरवले. तिच्याच इच्छेप्रमाणे राजाने स्वयंवराच्या अटी जाहीर केल्या आणि आज तिला एका अशिक्षित रानटी तरुणाशी लग्न करावे लागत आहे. तिला वाईट वाटले. पण निरुपाय होऊन ती त्या तरुणाबरोबर त्याच्या गावी निघून गेली.

तो तरुण युवक राजकन्येला पुष्कळ दूर आपल्याबरोबर घेऊन गेला आणि तिला एका चंदनाच्या झाडाखाली बसवून म्हणाला—"आमचे गाव येथून जवळच आहे. तू येथेच बस. मी आपल्या नातेवाइकांना बोलावून घेऊन येतो." असे सांगून तो जवळ जवळ पळतच निघाला.



चंपकगंधी त्या चंदनाच्या झाडाखाली बसून रडू लागली. डोळ्याची धार थांबतच नव्हती. चंदनाच्या झाडातून एक यक्षिणी बाहेर आली व तिने तिला विचारले—"कोण बाळ तू? अशी एकटी कशी? रडायला काय झाले?"

चंपकगंधीने घडलेली सर्व हकीगत सांगितली:



“तरमग त्या रानटी तरुणाशी लग्न करण्याची इच्छा नाही म्हणतेस?” यक्षिणीने विचारले.

“मुळीच नाही.” चंपकगंधी म्हणाली.

“तर मग! तू या झाडात प्रवेश कर. यात आरामात राहण्यासाठी मी सर्व सुखसोयी करून घेतल्या आहेत. तू यात रहा मी दुसऱ्या झाडात प्रवेश करते.” असे सांगून यक्षिणी चंपकगंधीला झाडाच्या आत घेऊन गेली. तेथे कसे रहायचे हे समजावून सांगून ती दुसऱ्या झाडाच्या शोधार्थ निघून गेली.

तिकडे तो रानटी तरुण आपल्या गावी गेला व आपल्या वडीलधाऱ्या मंडळींना, एका राजकन्येशी त्याचे लग्न होणार आहे हे सांगून तिला वाजत गाजत आपल्या गावी घेऊन येण्यासाठी बरोबर येण्यास आग्रह करू लागला. कोणाला ते सर्व खरेच वाटले नाही. डोके फिरले आहे की काय तुझे, असे देखील काहीजण म्हणाले. परंतु त्याचा आग्रह पाहून सर्व वाजंत्री घेऊन त्या चंदनाच्या झाडाजवळ आले.

पण तेथे राजकुमारी नव्हती. सर्वांनी सर्व रान पालथे घातले. राजकुमारीचे कोठे चिन्हच त्याना दिसेना. त्या तरुणाला ‘मूर्ख, खुळा’ म्हणून सर्व परत गेले.

चंपकगंधी चंदनवृक्षाच्या आत रहात होती. बाहेर कोणी नाही असे पाहून ती त्या झाडाच्या आतून बाहेर येई आणि रानांतली फळे तोडून आणून त्यांवर आपली भूक भागवी. कधी कधी यक्षिणीची पण गाठ पडे.

अशीच एक दोन वर्षे लोटली. त्या जंगलापलीकडे दुसरे एक राज्य होते. तेथील राजाला एक मुलगा होता. त्याच्या लग्नासाठी मुली सांगून येत होत्या.

राजकुमाराला जंगलात व रानावनात हिंडण्या फिरण्याची आवड होती. त्याने आपल्या राज्यात एक सुंदर उद्यान तयार करविले होते. त्या उद्यानात त्याने सर्व तऱ्हेची झाडे लावली होती. एक नव्हते ते चंदनाचे झाड. म्हणून त्याने आपल्या नोकरांना चंदनाचे झाड कोठे आहे का हे पाहण्यासाठी त्याच जंगलात पाठविले. त्यांना चंपकगंधी रहात असे तेच चंदनाचे झाड दिसले. त्यांनी ते मुळासकट उपटून नेऊन राजकुमाराच्या उद्यानात लावले.

चंपकगंधीला ते काही कळले नाही. ती नित्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी झाडाबाहेर आली तिला जंगलाऐवजी एक सुंदर उद्यान दिसले. थोड्या अंतरावर एक सुंदर सरोवर होते व त्यात कमळे होती. काठावर फळझाडे होती.

चंपकगंधीने त्या सरोवरात स्नान केले. त्याच वेळी राजकुमार त्या बाजूला आला. परस्परांची दृष्टादृष्ट झाली. चंपकगंधीने त्यापूर्वी कधी इतक्या सुंदर तरुणाला पाहिले नव्हते. राजकुमाराला हे कळेना की इतकी सुंदर स्त्री उद्यानात कोठून आली?



त्याने धीर करून तिला विचारले— “कोण तू, आणि इकडे आलीस कशी?”

पण सर्व सांगावे कसे हे तिला कळेना. तिला थोडी लाजच वाटली. कारण स्वतःच्या फोरकटपणामुळे जंगली जातीच्या एका तरुणाशी लग्न करण्याची पाळी आली होती व एका यक्षिणीच्या कृपेने त्यातून सुटका मिळाली आणि शेवटी चंदन वृक्षाबरोबर त्या उद्यानात ती आली होती. म्हणून ते सर्व न सांगता तिने आपले नाव चंपकगंधी असल्याचे सांगून चंदनवृक्षात तिचे घर असल्याचे सांगितले.



राजकुमाराने तिच्याशीच लग्न करण्याचे मनाशी ठरविले. परंतु चंदनाच्या वृक्षात निवास करणाऱ्या मुलीला यक्षिणी समजून तिच्याशी लग्न करून घ्यायला आईवडील मान्य करणार नाही. असा विचार करून त्याने तिच्याशी गंधर्वविवाह करून घेण्याचे ठरविले. तिने कोणाशी लग्न झालेले नाही हे कळल्यावर त्याने त्याच्याशी लग्न करायला ती तयार आहे का विचारले व चंपकगंधीने ते आनंदाने मान्य केले. परंतु त्याने तिला हे देखील सांगितले की काही दिवस तिला त्या चंदन वृक्षातच रहावे लागेल. तिने त्या गोष्टीसपण होकार दिला. राजकुमाराने घरी गेल्यावर आपल्या आई-वडिलांना सांगितले की त्या चंदनवृक्षाशीच लग्न करून घेण्यास परवानगी द्यावी.

राजा व राणी दोघांना वाटले की राज-कुमाराला वेड तरी लागले असावे किंवा भूत बाधा तरी झाली असावी. त्यांनी त्याला अनेक तऱ्हेने समजावून सांगितले की एकाहून एक सुंदर मुली सांगून येत आहेत व त्यांच्या पैकी आवडेल तिच्याशी त्याने लग्न करावे. परंतु राजकुमाराने साफ नकार दिला.

राजाने मंत्र्याचा सल्ला घेतला. मंत्र्याने खोल विचार करून सल्ला दिला की, राजकुमाराच्या इतर व्यवहारात कोठेच वेडेपणा आढळून येत नाही. याच बाबतीत त्याने हट्ट केला आहे तर त्याच्या मुळाशी काही तरी गुप्त कारण असणार. म्हणून राजकुमाराची इच्छा विक्षिप्त वाटली तरी ती चंदनाच्या झाडाशीच लग्न करून द्यावे.

राजाने कोणाला निमंत्रण वगैरे पाठविल्या-शिवायच मुहूर्त ठरवून राजकुमाराचे लग्न त्या चंदनवृक्षाशीच करून दिले.



राजकुमाराने त्या चंदन वृक्षाच्या चारी बाजूला एक सुंदर राजवाडा बांधला व त्यात राहू लागला. त्या उद्यानात कोणाला प्रवेश नसल्याचे त्याने जाहीर केले.

एका वर्षानंतर चंपकगंधीला एक मुलगा झाला. राजकुमाराने आपल्या वडिलांना पुत्ररत्न झाल्याचे कळवून नामकरण संस्कार गुप्तपणे करण्याची गरज नसल्याचे सांगितले.

राजाला आश्चर्य वाटले. तरी राजाने आपल्या सर्व नाते वाईक मंडळीस व मित्र मंडळीस बोलावणे पाठविले. त्याच दिवशी राजकुमार चंपकगंधी व आपला मुलगा दोघांना घेऊन आपल्या घरी आला.

राजकुमाराच्या सुंदर पत्नीला पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. राजा व राणी दोघांनी चकित होऊन विचारले—"कोण ही मुलगी व तुझे हिच्याशी लग्न केव्हां झाले!"

"ज्या चंदन वृक्षाशी माझे लग्न झाले त्यात ही राहते, याहून जास्त मला सुद्धा काही माहीत नाही." असे राजकुमार म्हणाला.

परंतु नामकरण संस्काराला हजर असलेल्या राजांबरोबर चंपकगंधीचे वडील पण आले होते. त्यांनी मुलीला ओळखून चकित होऊन विचारले—"मुली तू येथे कशी? आम्हांला वाटत होते तू रानांतच कोठेतरी फिरत असणार?"

परंतु चंपकगंधीने सविस्तर सर्व गोष्ट सांगितल्यावर सर्वांच्या मनाचे समाधान झाले. एका राजकन्येशी आपल्या मुलाचे लग्न झाल्याचे कळल्यावर राजकुमाराच्या आईवडिलांना व मुलीचे लग्न राजकुमाराशी झाल्याचे ऐकून चंपकगंधीच्या आईवडिलांना आनंद झाला.









# वाईटाचे फळ वाईट

विश्वगिरी नावाच्या गावी रामदास नावाचा एक दर्यावर्दी व्यापारी रहात असे. त्याला रविदेव आणि चंद्रदेव असे दोन मुलगे होते. त्यांना व्यापाराचा अनुभव व्हावा या हेतूने बापाने त्यांना सारखे सारखे भांडवल दिले व म्हणाला—"तुम्ही कोठे तरी स्वतःच्या पायावर उभे राहून व्यापार करा."

दोघे भाऊ बापाने दिलेले भांडवल घेऊन पाच कोसावर असलेल्या एका बंदरात गेले. तेथे रविदेवने काही माल विकत घेतला व तो घरात आणून ठेवला. पण चंद्रदेव काय करावे हे ठरवू शकला नाही.

तेव्हां रविदेव आपल्या धाकट्या भावाला म्हणाला—"हे पहा चंद्र! मी एकदां घरी जाऊन बाबांना भेटून यावे म्हणतो. येथे जो माल आहे त्याच्यावर थोडी दृष्टी असू दे." असे सांगून तो निघून गेला.

त्या रात्री चंद्रदेवला झोप आली नाही. तो आपल्या घरासमोरच्या आंगणात बसून काही तरी विचार करीत समुद्राकडे पहात होता. त्यावेळी कोणीतरी साधू चंद्रदेवला पाहून थांबला.. तो चंद्रदेवला म्हणाला—"क्या बात है बेटा? कसला विचार करीत आहेस? तुझे तोंड असे उदास उतरलेले कां? तुझ्या वडिलांनी तुला जे भांडवल दिले होते ते कोठे कोणत्या कामात लावलेस? की कोठे लावावे हे सुचत नाही?"

त्या मुनीला दिव्य दृष्टीने सर्व काही कळले आहे असे चंद्रदेवला वाटले. म्हणून चकित होऊन तो म्हणाला—"होय, मुनिवर्य! आपण बरोबर म्हणालात."

"जे भांडवल आहे त्याचे धान्य विकत घेऊन त्याची समुद्रात पेरणी कर. त्यानंतर काय होते ते तुला लवकरच कळेल." असा सल्ला देऊन साधू निघून गेला.

दुसऱ्या दिवशी चंद्रदेवने जवळचे सर्व भांडवल खर्च करून धान्य खरेदी केले व त्या सर्वांची समुद्रात पेरणी केली.

इतक्यात रविदेव घरी परत आला. भावाचा मूर्खपणा ऐकून तो त्याला खूप रागावला. म्हणाला—"तू मूर्ख आहेस मूर्ख! अरे बाबांनी एवढी मेहनत करून जे पैसे मिळविले ते असे पाण्यात टाकण्यासाठी का? त्यांना ही गोष्ट कळली तर ते तुझे तोंड सुद्धा पाहणार नाहीत. अन्नाचा तू असा नास केलास हे राजाला कळले तर तो तुला नक्कीच फांशीची शिक्षा करील."

चंद्रदेव भीतीने थरथर कापू लागला. इतक्यात जहाज निघण्याची वेळ झाली हे कळले. म्हणून रविदेवने आपला माल भरला आणि परदेशी निघून गेला.

चंद्रदेवाच्या मनात घरी जायचा विचार आला की त्याच्या सर्व अंगाला घाम सुटे. म्हणून तो समुद्रकाठी त्याच मनः स्थितीत हिंडत राहाला.



त्याच वेळी एक विचित्र गोष्ट घडली. पाहता पाहता समुद्रातून किनाऱ्याकडे वहात असलेल्या अनेक वस्तू दिसल्या. लाटावरोबर त्या वस्तु किनाऱ्यावर येऊन लागू लागल्या. चंद्रदेवाने ते काय आहे हे उचलून पाहिले तर शिंपल्या. रात्रभर तो शिंपल्या उचलून आपल्या खोलीत जमा करीत राहला.

दुसऱ्या दिवशी त्यातून मोती निघाले ते काढून तो विकू लागला. सर्व विकून झाल्यावर त्याने हिशोब करून पाहिला तर बापाने जेवढे भांडवल दिले होते त्याच्या सहा पट पैसे जमा झाले होते. सर्व पैसे घेऊन तो आपल्या गावी आला.

रविदेवचे जहाज वादळात सापडून बुडाले. त्याचा सर्व माल पाण्यात बुडून गेला. कसाबसा जीव वाचला. तो घरी परत आला तो पर्यंत अनेक रोग त्याला झाले होते. त्याला पाहून सर्वांना दया आली.

घरी परत आल्यावर रविदेव आपल्या धाकट्या भावाला कडकडून भेटला व म्हणाला—"चंद्र, मी तुझे वाईट इच्छिले त्याचे हे फळ भोगीत आहे. मला माफ कर." असे सांगत असता त्याच्या डोळ्यातून डळडळा अश्रू गळत होते.

चंद्रदेवने चकित होऊन विचारले—"दादा! तू केव्हां रे माझे वाईट इच्छिलेस?"

"मी घरी जातो म्हणून खोटे सांगून वेष पालटून तुझ्याकडे आलो होतो. मीच तुझ्या करवी सर्व भांडवल खर्ची करवून सर्व धान्य समुद्रात फेकविले होते." रविदेव म्हणाला.





# नाचो भूता

कदलीपूर येथे मित्रवर्धन नावाचा एक राजा राज्य करीत असे. तो एक योग्य शासक होता. रात्रीच्या वेळी राजा वेश पालटून गावात हिंडत असे आणि प्रजेच्या सुख दुःखाची माहिती काढीत असे.

एकदा राजा एका गरिबाच्या झोपडी जवळून जात असतां झोपडीत कोणी बोलत असल्याचा भास झाला. त्याने बाहेर उभा राहून संभाषण ऐकले.

बायको नवऱ्याला म्हणत होती—"या गरीबीचे ओझे किती दिवस वाहायचे? आपले महाराज दयाळू आहेत. जाऊन त्यांना भेटा व त्यांनी स्मशानात जरी थोडी जागा दिली तरी ती घ्या."

ते ऐकून घेऊन राजा तेथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी तो राजाच्या दर्शनास गेला. नमस्कार करून म्हणाला—"महाराज! गरिबाचे पोट भरत नाही. मरण यायचेच बाकी आहे. स्मशानात का होईना थोडी जागा देण्याची कृपा करावी."

राजाने त्याला थोडी जागा स्मशानातच दिली. घरी आल्यावर त्या गरीब माणसाने बायकोला राजाकडून स्मशानात जागा मिळाल्याचे सांगितले.

"तेथे झाडे झुडपे असतील ती तोडून विका. जे पैसे मिळतील ते पोटापाण्याला खर्च करू. नंतर ती जागा नांगरून पीक काढूं या."

तो गरीब मनुष्य खांद्यावर कुऱ्हाड टाकून स्मशानात गेला. तेथे एक मोठे चिंचेचे झाड होते. तो ते झाड तोडू लागल्याबरोबर शंभरावर भुते खाली उतरून आली










आणि म्हणाली—" अरे गृहस्था ! या झाडावर आम्ही राहातो. हेच आमचे घर आहे. कृपा करून आमच्या घरावर असा घाला घालू नकोस."

एकदम इतकी भुते आलेली पाहून तो गरीब मनुष्य प्रथम घाबरून गेला, पण भुते हात जोडून विनवण्या करीत आहेत हे पाहून त्याला थोडा जोर चढला. म्हणाला— "सर्व झाडे व झुडपें तोडून मी जमीन नांगरणार आहे व पीक काढणार आहे. आलं लक्षात ?" असे म्हणत त्याने पुन्हा कुऱ्हाड हातात घेतली.

"अशी घाई करू नकोस. तुला ही मेहनत करण्याची गरजच नाही. तुला पाहिजे तेवढे धान्य आम्ही देतो." सर्व भुते म्हणाली.

"ठीक, कबूल. दोन महिन्यांच्या आत धान्य माझ्या घरी पोचतं झालं पाहिजे. समजलं ?" असे सांगून तो गरीब मनुष्य घरी परत आला आणि त्याने सर्व हकीगत बायकोला सांगितली.

एकदा त्या झाडावर एक नवे भूत येऊन राहू लागले. पण भुते धान्य जमा करू लागलेली पाहून त्या नव्या भुताने त्यांना



विचारले हे सर्व काय मांडले आहे तुम्ही ? आपल्याला धान्याची गरजच काय ?"

भुतांनी त्याला सर्व हकीगत सांगितली.

त्या भुतानें चकित होऊन त्यांना विचारले—"एका सामान्य माणसाची भीती आपल्याला ! मी त्याला वाटेला लावून येतो." असे सांगून ते भूत निघाले.

गरिबाच्या अंगणांत भाजीपाला लावला होता. दररोज रात्री एक म्हैस येऊन खाऊन जात असे. तिला मारण्यासाठी तो मनुष्य एक दांडके घेऊन आड लपून बसला होता. इतक्यात ते नवे भूत त्याच्या घरात शिरले. त्या गरिबाला चालण्याची चाहूल लागली तेव्हां त्याने दणादण दांडक्यानें मारीत म्हटले "मर ! मर !"

नवे भूत मोठ्याने ओरडले—"बापरे ! मेलो !" ती म्हैस नाही हे कळायला त्या गरिबाला वेळ लागला नाही. ते भूत आहे हे त्याने ओळखले. त्याने दरडावून विचारले—"कशाला आला आहेस इथे ?"

"विशेष काही नाही. मला हे विचारायला पाठवले आहे की तुम्हांला भात हवं की तांदूळ." ते म्हणाले.

"अस्सं ! सांग जाऊन तांदूळच हवे म्हणून." गरीब मनुष्य म्हणाला.

नव्या भुताने चिंचेच्या झाडावर जाऊन आपल्या स्नेही भुतांना ते जाऊन सांगितले. म्हणाला—"त्याला भात नको आहे. तांदूळच हवे आहेत, म्हणे !"

"शहाणा आहेस, शहाणा. भात जमविणेच आम्हाला कठीण होते, आणि आता हे नवीन काम लावून आला आहेस." भुतांनी त्या नव्या भुतावर खूप तोंडसुख घेतले.





# आळशी दरबारी

एका गांवी एक शेतकरी रहात असे. त्याला दोन मुलगे होते. ते पहिल्या नंबरचे आळशी होते. एकाचे नाव होते सोमू व दुसऱ्याचे रामू. बापाने त्यांना पुष्कळ शिकवून पाहिले, पण त्यांना एक काम येईल तर शपथ. शेवटी रागारागांत त्यांना म्हणाला—"तुम्हांला फुकटाचे खायला घालायला मी नाही तयार."

दोघे हिंडत हिंडत एका गावाजवळ येऊन पोचले. वाटेत सोमूला एक पावली दिसली. पण वाकून उचलण्याचा आळस, म्हणून तो आपल्या भावाला म्हणाला—"अरे रामू, ही बघ पावली. घे उचल."

रामूने ती उचलली नाही. त्याने विचार केला पहिल्याने ती मोठ्या भावाला दिसली होती. म्हणून त्यानेच ती उचलली पाहिजे.

दोघे गावात गेले. दोघांच्या पोटात कावळे कोकलू लागले. एका दुकानाजवळ थांबले. तेथे केळी विकायला ठेवली होती.

"केळी कशी दिलीत हो?" सोमूने दुकानदाराला विचारले.

"दोन आण्याला डझन." दुकानदार म्हणाला.

"साली काढून केळी तोंडात ठेवायला काय घ्याल?" सोमूने विचारले.

"एक पावली." दुकानदार म्हणाला.

"तरमग, आम्हा दोघांच्या तोंडात साली काढून प्रत्येकी सहासहा केळी ठेवा." सोमू दुकानदाराला म्हणाला.

दुकानदाराने त्या प्रमाणे प्रत्येकाच्या तोंडात सहासहा केळी घातली.

"अरे रामू! देऊन टाक पावली दुकानदाराला." सोमू म्हणाला.

"कोठली पावली रे?" रामूने विचारले.

"मी तुला उचलायला सांगितली होती ती पावली." सोमू म्हणाला.

रामू काहीच बोलला नाही. दुकानदाराला, दोघांच्याकडे पैसे नाहीत हे कळले. त्याने दोघाना धरून एका खांबाला बांधून ठेवले. तेवढ्यात तेथे राजाचे शिपाई आले. सोमू व रामूच्या विरुद्ध तक्रार ऐकून शिपायांनी दुकानदाराला पावली दिली आणि सोमू व रामू दोघांना धरून घेऊन गेले.

राजाच्या मनात एकदा विचार आला की आपल्या दरबारात आळशी दरबारी पण असावेत. तो विचार मनात आल्याबरोबर त्याने काही शिपाई आळशी लोकांना धरून आणण्याच्या कामावर नेमले. रामू व सोमूला धरून नेणारे त्यांच्या पैकीच दोघे होते.

सर्व आळशी लोक जमा झाल्यावर राजा त्यांना म्हणाला—"तुमच्या पैकी जो आळशी असेल त्याने हात वर उचलावा."

कोणी पुरा हात वर केला. काही जणांनी अर्धाच हात वर केला. पण सोमू व रामूने हात वर केलाच नाही.



ते पाहून राजाने त्यांना विचारले—"काय रे तुम्ही आळशी नाही का? मग हात कां नाही वर करीत?"

"इतकी मेहनत कोण करणार प्रभो!" दोघांनीं तेच उत्तर दिले.

राजा त्यांचे उत्तर ऐकून इतका खूष झाला की त्याने दोघांना आपले दरबारी म्हणून नेमायचे ठरविले. राजाची इच्छा कळताच मंत्र्याने त्याला विचारले—"महाराज! या दोघांचीच निवड ठरली आहे, म्हणावयाचे ना?"

"नाही, नाही. आणखी दोन परीक्षा घेणार आहे मी यांच्या." राजा म्हणाला.

राजाचे नोकर त्या दोघांना एका खोलीत घेऊन गेले. तेथे निरनिराळी पकान्ने मोठ मोठ्या थाळ्यात भरून ठेवली होती. पण खायला पाने किंवा पत्रावळी नव्हत्या.

"तू जाऊन पत्रावळी घेऊन ये रे!" सोमू रामूला म्हणाला.

अर्धा तास झाला तरी ते दोघें खोडा सारखे जागच्या जागी बसून राहाले. इतक्यात एक कुत्रे आले खोलीत. त्याने सर्व पकान्ने खाऊन टाकली.

हे सर्व गुप्त पणे राजा पहात होता. त्याला दोघांच्या आळशीपणाची खात्री पटू लागली. म्हणाला—"दोन परीक्षा पास झाले हे दोघे. एक परीक्षा उरली आहे."

राजाच्या नोकरांनी दोघांना विचारले— "झालं का दोघांचे जेवण?" दोघांनी नकारार्थी उत्तर दिल्यावर त्यांना एका झोपडीत पोचते केले आणि खाण्याची व्यवस्था करून दिली.

इतक्यात झोपडीला आग लागली. दोघे जेवून खाऊन आराम करण्यासाठी आडवे होऊ लागले. झोपडीला आग लागल्याचे दोघांनीं पाहिले. एक जण म्हणाला— "झोपडीला आग लागली आहे वाटते?"

"अरे आग अजून पुष्कळ दूर आहे रे! आमच्या जवळ येऊ दे. नंतर पाहून घेऊ." दुसरा म्हणाला.

"एवढ्यात राजाचे नोकर विझवतील." सोमू म्हणाला.

राजाला फार आनंद झाला. त्याने त्यांना बोलावून घेऊन येण्यास नोकर पाठविले. त्या दिवसापासून राजाने त्यांना आळशी दरबारी म्हणून नेमले.





# कृष्णावतार

यादवांनी जरासंध आदिक राजांचा पराभव करून त्यांना परतवले आणि जयजयकार करीत द्वारकेकडे निघाले.

कृष्ण रुक्मणीला घेऊन निघून गेल्यावर श्रुतपर्व रुक्मीला आपल्या रथात बसवून परत निघाला. परंतु रुक्मीने, रुक्मिणीला सोडवून परत आणल्याशिवाय कुंडीनपुरात प्रवेश करणार नाही, अशी प्रतिज्ञा केली होती. ती प्रतिज्ञा भंग होऊ नये म्हणून भोजकटक नावाचे नवीन नगर स्थापन करून तो त्यात निवास करू लागला.

जरासंधाने शुद्धीवर आल्यानंतर पांगापांग झालेल्या आपल्या सैन्याची जमवाजमव केली आणि अपमानित शिशुपालाला बरोबर घेऊन स्वदेशी निघून गेला.

यादव वंशी वृद्ध वडील मंडळींनी कृष्ण रुक्मिणीच्या विवाहासाठी मुहूर्त ठरवून आप्तेष्ट व मित्रमंडळी सर्वांस निमंत्रणे पाठविली. रत्नखचित भिंती व खांब धासून पुसून स्वच्छ करण्यात आले. त्यांच्या चकमकीने डोळे दिपून जात होते. मखमलीच्या झालरीखाली भिंतीवर व खांबांवर जे कोरीव काम होते ते धुवून पुसून चकचकीत करविण्यात आले. कस्तूरी, चंदनादि द्रव्ये घालून सडा घालण्यात आला. मोत्यांची व हिऱ्या माणकांची रांगोळी



काढण्यात आली. केळ्यांचे व सुपारीचे खांब जागोजागी उभे करण्यात आले. आंब्याच्या पानांची तोरणे बांधण्यात आली. सोनेरी रंगाच्या पताका झळकू लागल्या.

कृष्णाच्या विवाहाला त्याचे नातेवाईक, राजे व सरदार मंडळी आपापल्या रथात व हत्तीवर बसून हजर झाली. कृष्ण रुक्मिणीच्या दर्शनाने आपला जन्म सार्थक होईल असे वाटून कित्येक ऋषी व मुनी पण लग्नाला आले. चार ही वर्णाचे दूर-दूरच्या देशातली थोर मंडळी लग्नसमारंभास आली. सात्यकीने सर्वांच्या आतिथ्य सत्काराची जबाबदारी स्वतःवर घेतली.

विवाह मुहूर्ताच्या दिवशी ब्राह्मणांनी वेदपाठ सुरू केला. चारण व भाट आपापल्या धन्याची स्तुती गाऊ लागले. रत्नाभूषणे धारण करून चालणाऱ्या तरुण व प्रौढ स्त्रियांच्या हालचाली बरोबर त्यांचा पायंजणांचा गोड आवाज होऊ लागला. या बरोबरच घोड्यांचे खिंकाळणे, वाजंत्री, आकाशात गंधर्वादिक देवांची वाजणारी वाद्यें यांचा एक मिश्र आवाज कृष्ण रुक्मिणी विवाहाची ग्वाही सर्व जगाला देत होता.

बोहोल्याच्या चारी कोपऱ्याला सोन्याचे खांब उभे करून ते रत्नमाणकांनी व फुलांनी सजविण्यात आले आणि सुंदर रांगोळी काढण्यात आली. कृष्ण रत्नखचित चौरंगावर बसला. त्याच्या चारीबाजूला उग्रसेन, वसुदेव, बलराम, यदुवंशी वृद्ध, ऋषी व मुनी बसले. पुरोहितांनी मंगलाष्टक म्हणायला सुरवात केली.

मंगलाष्टक संपवून ठीक मुहूर्तावर पुरोहितांनी 'तदेवलग्नं' म्हणून अंतरपाठ बाजूला केल्याबरोबर सौंदर्य व सौभाग्य



दोहोंची जणु मूर्तीच अशा रुक्मिणीने आपल्या नाजुक हातांनी कृष्णाला वरमाला घातली व कृष्णाने रुक्मिणीला हार घातला. सर्वांनी अक्षतरूपे वधुवरांस आशीर्वाद दिला. कृष्ण रुक्मिणीने आईवडिलांना नमस्कार करून सर्व थोर वडील मंडळींस नमस्कार केला. त्यानंतर कृष्णाने ब्राह्मणांना, हत्ती, घोडे, रथ व गाई यांचे दान केले. दास-दासींना इनामे वाटली. सारथी, नट व भाट चारण यांस वस्त्रालंकार व पारितोषिके देऊन त्यांचा सत्कार केला. नंतर पंच-पक्वान्नांचे जेवण झाले. कृष्णाच्या आप्तेष्टांनी आणि राजे व सरदार मंडळींनी अहेर व नजराणे दिले.

रुक्मिणी कृष्णाची पट्टराणी झाली. नंतर कृष्णाने सत्यभामा, जांबवती इत्यादि अनेक राजकन्यांशी विवाह करून आपल्या अंतःपुराची शोभा वाढविली.

विधिनियमाप्रमाणे रुक्मिणीला डोहाळे लागले. तिचे डोहाळजेवण आदि संस्कार आनंदाने पार पडले. एका शुभदिनी ती बाळंत झाली व तिच्या पोटी स्वतः कामदेव जन्मला. मागे शंकराचा शाप झाल्यामुळे कामदेव भस्म झाला होता. त्याचा अशा-तऱ्हेने उद्धार झाला. बारशाच्या दिवशी प्रद्युम्न असे त्याचे नाव ठेवण्यात आले.

शंबर नावाच्या राक्षसाला पहिल्यापासून ही गोष्ट माहीत होती की त्याचे मरण रुक्मिणीच्या पोटी जो जन्म घेईल त्याच्या हाती आहे. म्हणून मध्यरात्रीच्या वेळी रुक्मिणीजवळ झोपलेल्या तान्ह्या प्रद्युम्नाला शंबर उचलून घेऊन गेला आणि त्याने त्याला समुद्रात नेऊन टाकला. त्याला एका माशाने गिळून टाकले. तो मासा एका कोळ्याच्या जाळ्यात सापडला. त्याने आपल्या देशाची राणी मायावती म्हणजे शंबर राक्षसाची बायको हिला नजराणा म्हणून तो मासा आणून दिला.

मायावतीने स्वतः तो मासा कापला तेव्हां त्यातून एक सुंदर बालक बाहेर निघालेला पाहून तिला परमानंद झाला. तिने त्याला प्रेमाने वाढविले व त्याचे सर्व लाड पुरविले. शंबरला मूल बाळ नव्हते. म्हणून त्या मुलाला पाहून त्याला पण फार आनंद झाला.

मायावतीच्या देखरेखीखाली प्रद्युम्नने राक्षसांची सर्व माया व मंत्रविद्या अवगत करून घेतली. चांगला वयात आल्यावर तो इतका सुंदर दिसू लागला की त्याला मातेसारखे वात्सल्याने ज्या मायावतीने वाढवले होते तिने त्याच्याजवळ लग्न करण्याची इच्छा दर्शविली.

प्रद्युम्न समजूतदार होता. तो तिला म्हणाला—"तू माझी आई व मी तुझा मुलगा. तुझ्या मनात हा हीन विचार कसा काय आला? त्याचे काही कारण असेल तर सांग."

मायावती म्हणाली—"तुझे वडील यादव वंशाचे उद्धारक श्रीकृष्ण आहेत. तुझी आई रुक्मिणी आहे. तू लहान तान्हा असतांनाच शंबरने तुला आईच्या जवळून





उचलून नेऊन समुद्रात टाकले. सुदैवाने कोळ्याने मला एक मासा आणून दिला, त्याच्या पोटातून तू जिवंत निघालास. मी आजपर्यंत तुझे रक्षण केले. तू अदृश्य झालास त्या दिवसापासून तुझी आई पुत्र-विरहाने दुःखी आहे. तू तिला जाऊन लवकर भेट. मी तुझ्याशी लग्नाचा विचार केला आहे. शंबरला मी आजवर त्याची पत्नी म्हणून फसवीत आले. तो तुझा शत्रू आहे. तुझ्या हाती तो ठार होईल."

ते कळल्यावर प्रद्युम्नने शंबरला द्वंद्व युद्धास आह्वान केले. प्रद्युम्नने सात माया-विद्यांचा प्रयोग करून शंबरला ठार करण्याचा यत्न केला. पण आठव्या वेळीच त्याला त्याला यश मिळाले.

त्यानंतर मायावतीला बरोबर घेऊन प्रद्युम्न मायाविद्येनेच आकाशमार्गे प्रवास करीत सरळ कृष्णाच्या अंतःपुरात पोचला. एका पुरुषाला असा एकाएकी आलेला पाहून कृष्णाच्या अंतःपुरात खळबळ उडून गेली. त्याचे सौंदर्य पाहून सर्व औत्सुक्याने त्याच्याकडे पाहू लागल्या. त्याला पाहून रुक्मिणीला वाटले की आपला मुलगा जिवंत असता तर असाच मोठा व सुंदर झाला असता. जास्त लक्षपूर्वक तिने त्याच्याकडे पाहिले तेव्हा तिला त्याच्यात कृष्णाच्या रूपाचा भास झाला व तिचा मुलगाच तर हा नव्हे अशी एक शंका तिच्या मनात आल्याशिवाय राहाली नाही. कृष्णाने पण त्याला पाहिले व रक्ताची ओढ त्याला पण वाटू लागली.

त्याच वेळी नारदाने प्रवेश करून प्रद्युम्नाची सर्व कथा वर्णन करून सांगितली. त्याच्याकडून कृष्ण रुक्मिणीला कळले की प्रद्युम्नरूपे कामदेव व मायावती रूपे कामदेवाची पत्नी रती जन्माला आली. म्हणून त्यांचे लग्न झाले आहे. कामदेव भस्म झाल्यावर शंबर रतीला धरून घेऊन गेला. तेव्हांपासून ती त्याची पत्नी म्हणून त्याच्याबरोबर राहण्याचे कबूल करून ही इतके दिवस स्वतःच्या पातिव्रत्याचे रक्षण करीत आली होती.

ती सर्व कथा ऐकून कृष्णा रुक्मिणीला व कृष्णाच्या अंतःपुरातील इतर स्त्रियांना परमानंद झाला.

प्रद्युम्नानंतर रुक्मिणीला आणखी नऊ मुलगे व शेवटी एक मुलगी पण झाली. मुलांची नावे अनुक्रम चारुदेष्ण सुदेष्ण, सुषेण चारुगुप्त, चारुवाहन, चारुविंद, चारुभद्र, चारुगर्भ, चारु अशी होती आणि मुलीचे नाव चारुमती होते. कृष्णाला इतर बायकांच्या पोटी भानु, मानपिंद, संग्रामजित, दीप्तिमंत वृक वगैरे मुलगे आणि मित्रवती आदिक मुली झाल्या.

रुक्मिणीच्या पोटी प्रद्युम्न जन्मला त्याच महिन्यात जांबुवतीच्या पोटी सांब जन्मला. त्याला बलरामाने स्वतःच्या मुलासारखे लहान पणापासून वाढवले आणि त्याला सर्व शस्त्रास्त्रविद्येत पारंगत केले. बलरामाची बायको रेवती हिच्या



पोटी त्याला निशात व उल्मक नामक दोन मुलगे झाले.

विदर्भ देशात रुक्मिणीचा रुक्मी भाऊ याला शुभांगी नावाची मुलगी झाली. ती लग्नास योग्य झाली तेव्हां रुक्मीने तिच्या लग्नासाठी स्वयंवर रचले. इतर राजपुत्रां-बरोबर प्रद्युम्नपण आईवडिलांच्या परवानगीने स्वयंवराला हजर झाला. शुभांगीने प्रद्युम्नच्या सौंदर्याचे वर्णन पूर्वीच ऐकून त्याच्याशीच विवाह करण्याचे मनाशी ठरविले होते. म्हणून तिने त्याच्याच गळ्यात वरमाला घातली. तिची निवड पाहून सर्वांना आनंदच झाला.










प्रद्युम्न शुभांगीशी विवाह करून द्वारकेला परत आला. काही काळ लोटल्यावर त्यांना अनिरुद्ध नावाचा मुलगा झाला. अनिरुद्ध आपल्या बापासारखाच सुंदर होता. त्याने सर्व अस्त्रशस्त्रविद्या शिकून घेतल्या. तो पण लग्नाला योग्य झाला.

रुक्मिणीचा भाऊ रुक्मी याच्या मुलाला रुक्मवती नावाची एक मुलगी होती. ती जितकी सुंदर होती तितकीच स्वभावाने सुशीलपण होती. म्हणून आईवडिलांबरोबर घरच्या इतर मंडळींची ती फार लाडकी होती. ती लग्नाला योग्य झाली तेव्हां रुक्मीने एका शूर व सुंदर राजकुमाराशी तिचा विवाह करण्याचे ठरवून वरशोधनास सुरवात केली. ही वार्ता श्रीकृष्णाला मिळाली तेव्हां त्याने तिन्ही पिढ्यांचा संबंध कायम रहावा या हेतूने आपला मुलगा प्रद्युम्न याला ती गोष्ट सुचविली. प्रद्युम्नला पण ती सूचना आवडली व त्याने रुक्मीकडे त्यासंबंधी निरोप पाठविला. रुक्मीला पण निरोप ऐकून आनंद झाला व त्याने त्या विवाहास आपली संमती दिली. लग्नाचा मुहूर्त ठरला. श्रीकृष्ण बलराम, प्रद्युम्न, रुक्मिणी व सर्व यादव प्रमुख विवाहास आले. लग्न समारंभ थाटा माटाने उरकला.

सर्व आनंदात असता वेणुधारी, श्रुतपर्व, अंशुमंत, जयत्सेन वगैरे रुक्मीच्या काही दाक्षिणात्य सहकारी मित्रांनी त्याला सुचविले—“ मित्रा ! तू द्युतात प्रवीण आहेस. बलरामाला द्युताचा छंद आहे. तो कधीच नकार देणार नाही. तू आह्वान तर कर. द्युतात त्याचा पराभव करून मागे झालेल्या अपमानाची भरपाई करून घेता येईल.”





# अरण्यपुराण

[ २१ ]

माकडे काबाला पहाताच अस्वलाला सोडून पळून गेली. ते पाहून अस्वलाला जिवात जीव आल्यासारखे वाटले. काबाने आपले भयंकर तोंड उघडून जोराने फूत्कार केला. माकडे जागच्या जागी परस्परांना बिलगून बसून राहाली. मौवलीला आनंद झाला.

काळा वाघ दम लागल्यासारख्या आवा-जात ओरडला—“ माझे काम संपले. मनुष्याच्या पोराला त्या मांडवातून बाहेर दे फेकून. त्याला घेऊन जाऊ. नाहीतर माकडे पुन्हा आडवी येतील.

“ भुस्स्स ! थांब ! माझ्या आज्ञे शिवाय माकडांना जागचे हालता येणार नाही.” असे म्हणत काबा काळ्या वाघाला म्हणाला—“ मित्रा, तू कोणाला तरी बोलवीत होतास नाही का ?”

“ मारामारी चालू असता कदाचित मीच हाक मारली असेल. अस्वलदादा, फार लागले का तुला ?” काळ्या वाघाने विचारले.

अस्वल आपले हात पाय झाडीत त्यांच्याकडे पहात म्हणाले—“ माझी शंभर छकले करून शंभर अस्वले करण्याचा विचार होता त्यांचा. बाप रे बाप ! माझी चटणी करून टाकणार होती की काय नकळे. काबा, खरोखरच आज तू आम्हा दोघांचा जीव वांचविलास.”

“ अरे, त्यात काय मोठेसे ? माणसाचे ते पोर कोठे आहे ?” काबाने विचारले.

“ हा काय इथे आहे मी, मला वर चढून



"येता येणार नाही." मौवली म्हणाला.

"घेऊन जा याला. मोरासारखा नाचतो आहे, आमच्या पोरांना चिरडून टाकील." मंडपाच्या आतून साप म्हणाले.

"ओहो! या माणसाच्या पोराशी सर्वांचीच मैत्री दिसते आहे. ए पोरा! सरक थोडा बाजूला. अरे ए विषारी सापांनो लपून बसा कोठे तरी. मी ही भिंत पाडणार आहे." काबा म्हणाला.

त्याला संगमरमरी दगडावर नक्षी केलेल्या भिंतीला चीर पडलेली दिसली. त्याने नेम धरल्यासारखे हळूच आपले तोंड त्या फटीत घालून काढले. नंतर आपले शरीर सहाफूट वर उचलून सहा वेळ त्या भिंतीवर प्रहार केला. नक्षी केलेली मोडून गेली व एक मोठे भगदाड पडले. मौवली त्यातून बाहेर येऊन एक हात अस्वलाच्या खांद्यावर व दुसरा काळ्या वाघाच्या पाठीवर ठेवून दोघांना बिलगला.

अस्वल मौवलीला प्रेमाने भेटले. त्याने त्याला विचारले—"बाळ! तुला फारसे लागले बिगले तर नाही!"

"लागलं काय व किती हे सोड. मला कडकडीत भूक लागली आहे बघ. बाप रे बाप! तुम्हां दोघांना पण बरेच लागल्या-सारखं दिसत आहे. अरे आणि हे रक्त पण वाहते आहे." मौवली म्हणाला.

पाण्याच्या टाक्या व घराच्या आसपास दडून पडलेल्या माकडांना पाहून काळा वाघ जिभेने ओठ चाटीत म्हणाला—"काय नाही लागलं ते आम्हांलाच."

"हरकत नाही. जीव तर वाचला. 'शिर सलामत तर पगडी पचास.' तू जिवंत आहेस हीच किती आनंदाची गोष्ट आहे. आम्ही आपलं सर्व दुःख विसरलो पहा." अस्वल म्हणाले.

"ते सर्व नंतर पाहू. पहिल्याने काबाचे आभार मानले पाहिजेत. तो नसता तर आज आपण यशस्वी झालो नसतो व तू पण वांचला नसतास." काळा वाघ म्हणाला.

मौवली काबाकडे वळला. काबाचे डोके वर, मौवलीच्या डोक्यावर एक फूट उंच होते. "अस्सं! माणसाचे पोर ते हेच का? होय, याचं शरीर किती नरम आहे. अंधूक उजेडात तुला पाहून मी माकडच समजेन कदाचित. सावध रहा बाळ!" काबा म्हणाला.

मौवलीने काबाचे आभार मानले आणि असे देखील सांगितले की कधी शिकारीच्या वेळी मदतीची गरज भासल्यास मदत देईन. काबा मौवलीच्या खांद्यावर आपली मान ठेवून जणुकाही आशीर्वादच देत म्हणाला—'या पुढे संभाळून रहा जरा. चंद्र मावळायला झाला आहे. तू आपल्या मित्रांच्या बरोबर जा आणि आराम कर. येथे होणारे या पुढचे कांड तू पाहण्यासारखे नाही."

चंद्र डोंगरा आड मावळू लागला होता. अस्वल पाणी प्यायला निघून गेले होते. वाघ आपले अंग झाडून पुसून साफ करीत होता. काबा सरपटत निघून गेला. माकडे त्या अंधुक उजेडत परस्परांना बिलगून भिंतींवर बसली होती.

"चंद्र मावळला. तुला काही दिसते का?" काबाने विचारले.

"दिसलंय की काबा." माकडांनी उत्तर दिले.

"हलू नका जागचे आणि गंमत पहा." काबा म्हणाला आणि आपलं डोकं आजू बाजूला हलवीत दोन तीनदां गोल फिरला. नंतर आपले अंग विचित्र तऱ्हेने स्वतः भोवतीच पिळवटू लागला. कधी इंग्रजीच्या आठाची, कधी तिनाची नाहीतर सहाची



आकृती दिसे. अस्वल व काळा वाघ दोघे ते दृश्य चकित होऊन पहात होते. भीतीने त्यांच्या सर्वांगला कांपरे सुटले होते.

"माकडांनो, जरा या की पुढे." काबा म्हणाला.

माकडे एक पाऊल पुढं आली, जणुकाही कोणी त्याना ओढीत होते. त्यांच्या बरोबर अस्वल व वाघ पण थोडे पुढे ओढले गेले.

"या आणखी पुढे." काबा जोराने गरजला.

मौवलीने अस्वलाच्या व काळूच्या पाठीवर हात ठेवून खूण केली. दोघे मागे सरकले.

"हात काढून घेऊ नकोस. नाहीतर मी काबाच्या समोर जाऊन पडेन." काळा वाघ हळूच मौवलीच्या कानात म्हणाला. "अरे, पण इतके भिण्याचं काय कारण? काबा गंमत म्हणून आढेवेढे घेत आहे." मौवली म्हणाला.

ते जंगलातल्या झाडीत आले तेव्हां अस्वल निःश्वास सोडून म्हणाले—"नको रे बाबा या काबाची संगत!"

"अरे, त्याचे काही विचारू नकोस. मी पळ भर उशीर केला असता तर त्याच्या घशात गेलो असतो." वाघ म्हणाला.

"चंद्र पुन्हा उगवेल तो पर्यंत किती जणांची शिकार तो करील, कोण जाणे." अस्वल म्हणाले.

मौवलीला आपल्या मानेवर बसवून काळा वाघ निघाला. मौवली तेथल्या तेथेच झोपला. अस्वलाने आणि काळ्या वाघाने त्याला गुहेत पोचता करून लांडग्याच्या जवळ केव्हां झोपवले, ते देखील त्याला कळले की नाही शंकाच.



# "अयुध्य"

थायलंड देशाचे 'अयुध्य' (अजिक्य) नगर चार शतके त्या देशाची राजधानी राहिले आहे. तेथल्या देवळात प्राचीन काळच्या राजांच्या अस्थी पुरलेल्या आहेत. आज हे देऊळ पूर्णपणे पडले आहे. १७६७ मध्ये हे 'अयुध्य' नगर बर्मी लोकांनी लुटले.

मराठे यांनी इंग्रजांशी एक संधी करून घेतली. त्यानंतर म्हैसूरचे तिसरे युद्ध झाले.

दोन वर्षे हे युद्ध चालू होते. वस्तुतः तीन युद्धे झाली. पहिल्या युद्धात टिपूने इंग्रजां पेक्षा जास्त चातुर्य दाखविले. म्हणून दुसऱ्या युद्धाच्या वेळी कॉर्नवॉलीस याने युद्धाची सूत्रे स्वतःच्या हाती घेतली. त्याने वेल्लूर व आंबूर मार्गे कूच करीत २१ मार्च ११९१ या रोजी बंगलूरला वेढा दिला व ते काबीज करून १३ मे रोजी तो अरिकेला येथे पोचला. हे स्थान टिपूची राजधानी श्रीरंग-पट्टण पासून नऊ मैल पूर्वेला होते. या युद्धात देखील टिपूने अपूर्व चातुर्य व पराक्रम दाखविला.

नंतर टिपूने ३ नोव्हेंबरला कोईंबतूर काबीज केले. परंतु त्याच्या राजधानीच्या वाटेवरचे डोंगरी किल्ले कॉर्नवॉलीस याने मुंबईच्या सैन्याच्या मदतीने सर करण्यासाठी वेढा दिला आणि ५ फेब्रुवारी १७९२ या रोजी खुद्द श्रीरंगपट्टणलाच वेढा दिला.

टिपूने राजकारणी धोरण दाखवून स्वतःचे रक्षण करून घेतले. परंतु इंग्रजांशी सतत युद्ध करीत राहाल्याने फायदा नाही हे पण त्याने ओळखले. म्हणून १७९२च्या मार्च महिन्यांत श्रीरंगपट्टण येथें तह झाला. या तहाअन्वये टिपूला आपले अर्धे राज्य सोडून द्यावे लागले. कृष्णा नदीच्या काठा पासून पेन्नार नदीपलीकडचा प्रदेश निजामाला व दुसरा प्रदेश मराठ्यांना द्यावा लागला. अशा तऱ्हेने मराठ्यांचे राज्य तुंगभद्रा नदीला येऊन भिडले. मलबार, कुर्ग राजांवर अधिकार, दिंडुगल व आजूबाजूचा प्रदेश आणि नुकसान भरपाई ३० लाख सुवर्णमुद्रा इंग्रजांच्या वांट्याला आले.





# कर्णार्जुनांची जन्मकथा

देवांचा प्रमुख दक्ष प्रजापती याने एकदा महायज्ञ करण्याचा संकल्प केला. त्याने, ब्रह्मा, विष्णु, महेश, गंधर्व, किन्नर आदि-कांस निमंत्रणे पाठविली. यज्ञशाळेत देव आणि नारदादि मुनि हजर होते.

यज्ञ सुरू होण्यापूर्वी, त्रिमूर्ती पैकी कोणाला तरी आधिपत्य द्यावयाचे होते; पण कोणाला द्यावयाचे हा प्रश्न उभा होता. कारण ब्रह्मदेव साक्षात सृष्टिकर्ताच; विष्णु सर्व शक्तिमान व सर्वांत चतुर; शंकर हा फार उदार पण महाक्रोधी. तिघांपैकी कोणाला ही आधिपत्य दिले तर इतरांना राग येणार. तेव्हां या संकटांतून काही मार्ग काढून द्यायला दक्ष प्रजापतीने नारदाला एका बाजूला बोलावून विचारले.

नारद दक्षाला म्हणाला—"तुला कशाला ही भानगड. तू तांबूल म्हणजे विडा नेऊन तिघांसमोर ठेव आणि त्यांनाच म्हण—'त्यांच्या पैकी कोणी ही आधिपत्य स्वीकारून विडा उचलावा."

दक्षाने तसेच केले. त्रिमूर्तींनी परस्परांकडे पाहिले. ब्रह्मदेवाने कोणाला आधिपत्य देण्याची गरजच काय, असे सांगून आपले अंग काढून घेतले. विष्णु व महेश दोघांनी परस्परांकडे दुसऱ्याच्या मनातला हेतू ओळखण्यासाठी पाहिले. कारण दोघांना वाटत होते की दुसऱ्याने नकार दिला की आपण विडा उचलावा.

शेवटी विष्णूने हिंमत करून विडा उचल-लाच. आपल्याला विचारल्या शिवाय विष्णूने विडा उचलेला पाहून शंकराला राग आला.

त्या रागाच्या भरात शंकराने आपले त्रिशूळ उचलून जमिनीत रोवले. त्यामुळे पृथ्वीतून एक भयंकर रूप धारण करून एक महाकाय पुरुष प्रकट झाला. त्याच्या देहावर सात कवचे, कर्णकुंडल व धनुष्य-बाण होते.

शंकराने त्या महाकाय पुरुषाला आशीर्वाद दिला व विष्णूकडे बोट दाखवून "त्याचा समाचार घे!" असे सांगितले. त्यानंतर शंकर कैलास लोकी निघून गेला. त्या महाबाहूने रौद्ररूप धारण करून विष्णूवर हल्ला केला. विष्णु घाबरून पळू लागला. त्या शिवशक्तीने त्याचा पाठलाग सुरू केला.

दोघे पळत पळत एका मैदानात पोचले. तेथे विष्णूने महाशक्तीवर व त्याने विष्णूवर शरवृष्टी सुरू केली. विष्णूच्या बाणाचा त्या महाशक्तीच्या देहावर काही परिणाम होत नव्हता. कारण त्याच्या देहावर सात कवचे होती. परंतु महाकायाचे बाण विष्णूला लागत. त्याचे शरीर क्षत विक्षत झाले व रक्ताची धार वाहू लागली.

विष्णू चतुर होताच. म्हणून तो विचार करू लागला की या संकटातून सोडवणूक कशी करून घ्यायची? शंकराची शक्ति शंकराहून जास्त शक्तिशाली कशी काय झाली. ती तर मातीतून जन्मली आहे. त्या शक्तीचा नाश करण्यासाठी मातीतूनच दुसरी शक्ति निर्मिली पाहिजे.

असा विचार करून विष्णूने त्याच्या रक्ताने भिजलेली थोडी माती उचलून एक लहान बाहुली तयार केली व तिच्यात प्राण ओतला. ती विष्णूची शक्ति धनुष्य बाण घेऊन शिवाने निर्मिलेल्या महाशक्तीसमोर उभी राहिली. दोन्ही शक्तींचे परस्परांशी घोर युद्ध झाले.

विष्णूच्या शक्तीच्या प्रत्येक बाणाने शिवशक्तीचे एकेक कवच तुटून खाली पडले. सहा बाणांच्या आघाताने सहा कवचे तुटून खाली पडली. आता शिव-शक्तीच्या शरिरावर एकच एक कवच उरले. तेव्हां त्या पुरुषाने मैदानांतून पाय काढला आणि सूर्याकडे जाऊन सूर्यमंडळात आश्रय मागितला. शरणागताला आश्रय देणे सत्पुरुषाचे लक्षण आहे. म्हणून शिवशक्तीला सूर्याने आश्रय दिला.

इतक्यात शिवशक्तीचा पाठलाग करीत विष्णू सूर्यमंडळापर्यंत आला व शिवशक्तीला मंडळाबाहेर काढून टाकायला त्याने सूर्याला सांगितले.





तेव्हां सूर्याला कळले की विष्णूच्या कोपाला भिऊन शिवशक्तीने सूर्यमंडळात आश्रय मागितला होता. म्हणून सूर्याने कापऱ्या हातांनी नमस्कार करून विष्णूची क्षमा मागितली व म्हणाला—"प्रभो! तुझा कोप झाल्याने हा पळून माझ्या आश्रयाला धावला आहे हे मला माहीत नव्हते. म्हणून मी त्याला अभयदान दिले. मी त्याला सोडून दिले तर मला कायमचा एक कलंक लागेल. म्हणून आपणच आम्हा दोघांची लाज राखण्यास काही तरी उपाय सुचवावा.

विष्णु थोडा वेळ विचार करून म्हणाला—"ठीक, तसेच काही तरी करू या. तू शिवशक्तीला आपल्या जवळच ठेवून घे. पुढे द्वापर युगात महाभारत युद्ध होईल. त्यात धृतराष्ट्र व पांडु या दोघां भावांच्या मुलांचे आपसांत युद्ध होईल. पांडूची बायको कुंती कन्या असतानाच तुझी परीक्षा घेण्यासाठी तुझ्या जवळ वर मागील. तेव्हां तू ही शिवशक्ती पुत्ररूपाने तिला दे." असे सांगून विष्णू निघून गेला.

त्यानंतर विष्णु आपली शक्ती घेऊन इंद्राकडे गेला आणि म्हणाला—"देवेन्द्रा! ही विष्णुशक्ति आहे. तू आपल्या जवळ ही ठेव. पुढे द्वापर युगात कुंती पुत्रप्राप्तीचा वर मागील तेव्हां तू ही शक्ति तिला दे."

सूर्य व इंद्र दोघांनी विष्णूच्या आज्ञेप्रमाणें कुंतीला पुत्ररूपे शिवशक्ति व विष्णुशक्ति दिली आणि अनुक्रमे कर्ण व अर्जुन जन्मले. पुढें विष्णूनेच द्वापर युगांत कृष्णावतार घेऊन महाभारत युद्धात अर्जुनाला सहाय्य करून कर्णाचा वध करविला व अशा तऱ्हेने शिवशक्तीचे निर्मूलन झाले.





# पडकें देऊळ

[ ३ ]

[जिवाजी बरोबर सर्व गावकरी पुन्हा शबरांच्या वस्तीत आले. विक्रमकेसरीने जिवाजीला ताडपत्रांची पिशवी दाखवून त्याचे आजोबा पुन्हा ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात गेले असल्याचे सांगितले. जिवाजीने ती पिशवी आणायला सांगितले. त्याच वेळी एक विचित्र आकृतीचा मनुष्य एकाएकी प्रगट झाला. सर्व चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले.—पुढे]

तो भयंकर आकृतीचा मनुष्य एकेक पाऊल पुढे टाकीत जिवाजीजवळ आला व म्हणाला—"तुम्हांला स्वतःवर आपले मरण ओढवून घ्यावयाचे नसेल तर ती पिशवी मला द्या. मी गेली एक हजार वर्षे त्या पडक्या देवळाचा पुजारी आहे. ते पाहण्यासाठी जो कोणी ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्याकडे गेला तो जिवंत परतला नाही." असे म्हणत त्याने पिशवीसाठी हात पुढे केला.

जिवाजी प्रथम घाबरला, पण थोड्या वेळाने स्वतःला सावरून व डोळे वटारून करड्या आवाजात म्हणाला—"घरी आलेल्या पाहुण्याचा, मग तो आगांतुक असला व तोंडाला येईल ते बोलत असला तरी त्याच्याशी सद्व्यवहारच करतात. म्हणून

       





तू आलास तसा परत निघून जा. नाहीतर जे होईल त्याला तूच जबाबदार!"

"बरे तर जातो. पण जातांना बजावून सांगून ठेवतो की तू पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला अजून ओळखले नाहीस. या अपमानाचा परिणाम तुला भोगावा लागेल. या पिशवीत जे कागतपत्र आहेत ते तुझ्या व विक्रमकेसरीच्या नाशाला कारण होतील." असे म्हणत तो भयंकर आकृतीचा मनुष्य दाराबाहेर गेला व अदृश्य झाला.

त्याने दार केव्हा उघडले व केव्हा बंद केले हे कोणाला कळले नाही. शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी चटकन पुढे होऊन दार उघडले. पण बाहेर काळोख होता. घराच्या सभोवती जे कुंपण होते त्याच्या चारी बाजूला चार शबर पाहरेकरी पाहरा देत होते. शिखीमुखने जवळ जाऊन त्यांना विचारले—"भुतासारखी लांब व काळे कपडेवाला इकडून कुठे गेला!"

"काळे कपडेवाला! असा कोणी मनुष्य नाही आला बुवा या बाजूला." चकित होऊन पाहारेकरी म्हणाले. इतक्यात काळे कुत्रे भुंकत तलावाकडे पळू लागले. विक्रमकेसरी व शिखीमुख दोघांनी विचार करण्यात जास्त वेळ न घालवता त्या दिशेने त्याचा पाठलाग सुरू केला.

दोघे तलावाजवळ पोचले तेव्हां त्यांना तलावात काहीतरी मोठी वस्तु पडल्याचा आवाज ऐकू आला. सरोवराच्या चारी बाजूला दाट झाडीच्या आड सावली सारख्या मनुष्य-आकृती फिरत असलेल्या त्यांना दिसल्या. विक्रमकेसरी हळूच म्हणाला—"शिखीमुख! जंगलात माझ्यावर एकाएकी हल्ला कर-णाऱ्यांचा पुढारी हा विचित्र व भयंकर आकृतीचा मनुष्यच असावा असा मला संशय येत आहे. त्याला किंवा त्याच्या अनुयायांपैकी



कोणा एकाला धरले तर त्या भयंकर माणसाचे गूढ कळण्याची शक्यता आहे."

"ठीक, तर मग आपण दोघे एकाच बाजूला न जाता दोन दिशांनी जाऊ या." असे म्हणत शिखीमुख डाव्या बाजूने व विक्रमकेसरी उजव्या बाजूने निघाले.

दाट झाडीच्या आडून शिखीमुखला त्यांचे बोलणे व वाळलेल्या पानांवर त्यांच्या पावलांचा आवाज ऐकू येत होता. दूर त्याचा तांबडा कुत्रा भुंकत होता. त्याने विचार केला, त्या बाजून त्या सर्वांचा पुढारी पुढे जात असावा कुत्र्याला बोलावले तर त्याला मदत मिळेल. पण चोरांना कोणीतरी पाठलाग करीत असल्याचे कळेल. गाव-कऱ्यांना पहिल्यानेच कळविले असते तर त्यांच्या मदतीने चोरांना पकडता आले असते. फक्त दोघेच घराबाहेर पडलो व इतके दूर निघून आलो हे देखील चुकले.

असा विचार करीत तो हळूहळू चालत असता एक चोर आपल्या साथीदारांना जे म्हणत होता ते त्याला ऐकूं आले. "चला. चला पुढे. पुजाऱ्याने आपला तिसरा डोळा उघडला आहे." त्यानंतर थोड्याच वेळाने चोर झाडांच्या आडून घाई घाईने सरोवरा-



पासून थोड्या अंतरावर एका आमराईच्या बाजूला धावू लागले.

पुजाऱ्याने तिसरा डोळा उघडला म्हणजे काय बुवा? चकित होऊन शिखीमुख आमराईच्या बाजूला पाहू लागला. तेथे एका झाडाशेजारी सहासात फूट उंचीची ज्वाळा एकदम प्रज्वलित होऊन मंद झालेली दिसली. तोच का पुजाऱ्याचा तिसरा डोळा? आश्चर्य आहे! गेली हजारवर्षे तो त्या देवळाचा पुजारी आहे, म्हणे आता तो तिसरा डोळा उघडून बंद करतो आहे, म्हणजे काय? हे सर्व खरे आहे की खोटे?



शिखीमुख या विचारात गर्क असता एकाएकी कुत्रा जोराने काहीतरी लागल्या-सारावा कळवळून ओरडला. तो आवाज ऐकून शिखीमुखला स्वतःला आवरून धरणे अशक्य वाटू लागले. तो त्याचा लाडका कुत्रा होता. चोरांपैकी कोणीतरी त्याला मारले असावे व कुत्र्याला चांगले लागले असावे असे त्याला वाटले. त्या दुष्टाचे रक्त पिईन. त्या पुजाऱ्याच्या छातीत भाला भोसकून त्याचे काळीज बाहेर काढीन, वाटले काय त्याला, असे स्वतःशीच काही वेळ बडबडत देहभान विसरून तो ओरडला—

“जय शबर माते चंडी!” आणि आमराईच्या बाजूला जी ज्वाळा लहान मोठी होत असलेली दिसत होती तिकडे धावला.

आमराईच्या जवळ पोचताच ती ज्वाळा दिसत नाहीशी झाली. त्याच वेळी चौघापाच जणांचा चालण्याचा व आपसात बोलण्याचा भास शिखीमुखला झाला. सावधपणे स्वतःची चाहूल न देता तो त्या दिशेने चालू लागला. त्याच बरोबर शत्रू आपल्यावर झाडीतून भाला बरछी वगैरे काही तरी फेकून एकदम हल्ला करतील कदाचित असे वाटले त्याला. शिखीमुखला बोलणारांचा आवाज जास्त जास्त स्पष्ट ऐकू येऊ लागला. एकजण म्हणाला—“तो कुत्रा नाही, भूत आहे भूत! पुजाऱ्याला पाहताच त्याचं तोंड बंद झाले.”

तो चोर शिखीमुखच्या लाल कुत्र्या-विषयीच बोलत होता. तरमग या दुष्टांनी त्याला ठार तर नाही केले! तो विचार मनात येताच तो स्वतःला सावरू शकला नाही आणि जोराने ओरडून म्हणाला—“दुष्टांनो! थांबा! माझ्या भाल्याचा वार हा पहा आला तुमच्या वर!” असे म्हणत शिखीमुख जोराने चार पावले टाकीत पुढे गेला. पण त्याच्या डाव्या पायाखालची जमीन एकाएकी खाली धसली. तो खाली पडता पडता वाचला. उजव्या पायाच्या बळावर तो डावा पाय वर काढू लागला. पण त्याच्या पायात एकदम दोरीचा फास पडलेला त्याला कळला. दुसऱ्या क्षणाला तो उलटा झाडाला टांगला गेला. सुदैवाने अद्याप त्याच्या हातातला भाला खाली पडला नव्हता. त्याने तो जास्त जोराने घट्ट धरून ठेवला.

आपल्या समोर आणखी काय काय वाढून ठेवले आहे हा विचारात तो असता त्याला त्याला कोणाचे तरी राक्षसी हास्य ऐकू आले व एक जण म्हणाला—“पुजारी महाराज! मला वाटत होते की हा सिंहाचा छावा असेल. पण आपण एका सशाला धरलं आहे जाळ्यात.”

“त्याचे चामडे काढण्याची गर्दी करू नका. तो आपल्या पासून अजून दूर आहे. आणखी जवळ आला की माझ्या तिसऱ्या डोळ्याच्या ज्वाळेत भस्म होऊन जाईल.” असे म्हणत तो भयंकर आकृतीवाला झाडाच्या आडून बाहेर आला. शिखीमुखने पाहिले की तो आपला तिसरा डोळा हळू हळू उघडू लागला आहे. तो पडक्या



देवळाचा पुजारीच तर नव्हे? तो आपल्या घरात शिरला तेव्हा त्याचा हा तिसरा डोळा आपल्याला दिसला नव्हता. तो थोडा माझ्या भाल्याच्या समोर आला तर किती बरे होईल? असा विचार करीत शिखीमुखने भाला जास्त घट्ट धरला व झाडाच्या फांदीला लोंबत असलेल्या आपल्या देहाला झोका देऊन त्याच्या जवळ पोचण्याचा यत्न करू लागला. त्याचा तो डाव ओळखून तिथे चौघे चोर शिखीमुखच्या जवळ येऊन उभे राहिले.

“ओहो! हा रानटी किडा मला या गवताच्या काडीने भोसकण्याच्या विचारात



आहे होय?" असे म्हणत पुजारी जोराने हसला व म्हणाला–"अरे मूर्खा! अजून तुझा गर्व उतरला नाही तर! घाई नको करूस." असे म्हणून काही वेळ तो काही बोलला नाही व नंतर टाळ्या वाजवीत म्हणाला–"तुला डोके हालविता येते का पहा जरा. तुझ्या शबरवस्तीला आग लावून मी भस्म करून टाकलं आहे."

शिखीमुखने मोठ्या कष्टाने डोके वळवून पाहिले. खरोखरच शबरवस्तीला आग लागली होती. ते पाहून भिऊन जाण्याऐवजी तो स्वतःला सोडवून घेण्यासाठी धडपड करू लागला. नंतर दात ओठ चावून म्हणाला–"दुष्टा! तू आपल्या अनुयायां-करवी आमच्या वस्तीला आग लावली आहेस. लक्षात ठेव; तुझे मरण जवळ आले आहे. माझ्या वस्तीचे सर्व लोक थोड्या वेळात येऊन तुझ्या शरिराचे तुकडे तुकडे करून कोल्ह्यां कुत्र्यांना खायला घालतील."

पुजारी राक्षसी हास्य करून म्हणाला–"तुझ्या वस्तीतल्या लोकांना येथवर येता येऊ नये एवढ्याच साठी तर मी आग लावली आहे वस्तीला. सर्व आपापली झोपडी विझविण्याच्या फिकीरीत आहेत. तुला मी जिवंत सोडायला तयार आहे. पण एका अटीवर. ती ताडपत्रांची पिशवी मला आणून पोचती केली पाहिजे."

"तुला ताडपत्राची पिशवी आणून देण्यापेक्षा तुझे डोके विक्रमकेसरीच्या चरणी भेट करीन." असे म्हणत त्याने आपला भाला नेम धरून पुजाऱ्याच्या अंगावर फेकला. परंतु त्याच वेळी त्याचा एक अनुयायी समोर आला. म्हणून तो पुजाऱ्याला न लागता त्या अनुयायाच्या खांद्याला लागला. व तो जागच्या जागी ठार झाला.










"हा मूर्ख आहे, पण धाडसी दिसतो खरा. त्याच्या पायाचा फास सोडून याच्या गळ्यात घालून आणा याला. मी या झाडांवरून मधल्या वाटेने दूर जंगलांत निघून जातो." असे सांगून पुजारी पुन्हा झाडाच्या आड अदृश्य झाला.

पुजारी निघून गेल्यावर चोरांनी आपल्या साथीदारांच्या जखमांना पाला वाटून लावला व वर पट्टी बांधली. जखमी झालेल्यापैकी एक जण म्हणाला—"मित्र हो! चला आता आपण या पुजाऱ्याचा नाद सोडून . निघून जाऊ या. याच्या मुळे आपल्या जिवालाच धोका आहे."

"तोंड बंद कर. भितरी भागूबाई कुठली. त्या पुजाऱ्याने आपल्याला एवढे सोने दिले आहे ते विसरलास वाटते? आपण शपथ नाही का घेतली त्याच्या समोर. ती शपथ मोडायची का?" एक साथीदार दटावीत म्हणाला.

"हा रानटी मनुष्य आला म्हणून सर्व त्रास होत आहे आपल्याला. याला बरोबर धरून नेण्याचा विचार सोडू या. नसती उठाठेव नको आपल्याला. पुजाऱ्याला आपण सांगू की तो निसटून पळू लागला म्हणून त्याला भाला भोसकून ठार केले म्हणजे झाले. मी आपला भाला मारतो चला." असे म्हणत त्याने आपला भाला उचलला. परंतु शिखीमुखने आपल्या भाल्याने त्याला ढकलून त्याला भाला मारला. त्याच्या पाठीत भाला भोसकला गेला. तो जोराने ओरडत जमिनीवर पडला. इतर चोर रागाने "याला ठार करा," असे ओरडत शिखीमुखवर आपला भाला फेकायला तयार उभे राहाले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी.)



# मित्र द्रोह

विक्रमार्काने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे स्मशानाच्या दिशेने काही बोलल्याशिवाय मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू असा श्रम करण्याचे वचन देऊन त्याचे पालन करण्यासाठी एवढा यत्न करीत असशील तर तो खरोखरच स्तुत्य आहे. कृतवर्मा याने मित्रद्रोह केला तसा करणे उचित होणार नाही. तुझा हा श्रम तुला थोडा हलका वाटावा म्हणून मी तुला कृतवर्म्याची गोष्ट सांगतो, ऐक." असे सांगून तो गोष्ट सांगू लागला—

प्राचीन काळी स्वर्णपुरीच्या गादीवर कुलपर्णी नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या मंत्र्याचे नाव कुंतलकर्णी असे होते.















राजाचा मुलगा सुदर्शन व मंत्र्याचा मुलगा कृतवर्मा दोघे समवयस्क होते. नेहमी दोघे बरोबर खेळत व हिंडत फिरत. विद्याभ्यासदेखील दोघांचा एकाच गुरूकडे झाला. दोघांना सोळावे वर्ष लागले.

विद्याभ्यास संपल्यावर राजपुत्र सुदर्शन याच्या मनांत देशाटनाची इच्छा उत्पन्न झाली. त्याने आपल्या वडिलांना विचारले तेव्हां त्यांनी परवानगी दिली नाही. एवढेच नव्हे, तर मुलाने सरहद्दीबाहेर जाऊ नये यासाठी राजाने विशेष काळजी घेतली.

राजाने इतका कडकपणा दाखविला, त्याला एक कारण होते. सुदर्शनच्या लहानपणी राजाने एका ज्योतिष्याला मुलाची जन्मकुंडली दाखविली होती. ज्योतिष्याने सतराव्या वर्षी धोका आहे. युवराजाने राज्याभिषेक होईपर्यंत राज्याबाहेर जाऊ नये, राज्याबाहेर तो गेला तर त्याला गादी मिळणार नाही, असे ज्योतिष्याने भविष्य वर्तवले होते. राजाने ती गोष्ट कधी कोणाला सांगितली नव्हती. मंत्र्याने पण ती मनातच ठेवली होती.

राजाने परवानगी न दिलेली पाहून राजपुत्राला फार वाईट वाटले. त्याच्याशिवाय सर्व राज्याबाहेर जायला स्वतंत्र आहेत, ते कां! त्याला कळेना. त्याने आपला मित्र कृतवर्मा याचा सल्ला घेतला व दोघांनी परकाय प्रवेश विद्या शिकून घ्यायचे ठरविले. त्या प्रमाणे दोघांनी एका सिद्ध गुरूजवळून ती विद्या शिकून घेतली.

नंतर राजपुत्र आपल्या मित्राला म्हणाला—"मित्रा! मी तुझ्या देहात प्रवेश करतो व तू माझ्या देहात कर. मला कोणी ओळखणार नाही व मी देशाटन करून घरी परत येईन."

कृतवर्मा राजकुमाराचा तो विचार ऐकून प्रथम भ्याला. तरी मनाशी काही ठरवून तो म्हणाला—"मित्रा! आपण दोघांनी मिळून राजाची आज्ञा भंग केली असे नाही का होणार. तरी पण मी तुझ्या इच्छेविरुद्ध नाही. सहा महिन्याच्या आत तू परत आले पाहिजेस व माझा देह मला परत देऊन स्वतःच्या देहात प्रवेश केला पाहिजेस. तू शपथ घेऊन ही गोष्ट कबूल कर."

सुदर्शनने त्याप्रमाणे शपथ घेतली. दोघांनी परस्परांच्या देहांत प्रवेश केला. मित्राच्या देहात प्रवेश झाला असल्या कारणाने सुदर्शन निर्विघ्नपणे सरहद्दीबाहेर निघून गेला. त्याला कोणी ओळखले नाही. कृतवर्मा राजकुमारासारखा राजवाड्यात येऊन राहू लागला व अंतःपुरात मोकळेपणे हिंडू फिरू लागला.

मुलगा शिकारीला जातो असे मंत्र्याला सांगून गेला होता. पण बरेच दिवस झाले तरी परत न आलेला पाहून मंत्र्याला काळजी वाटू लागली. त्याने पुष्कळ शोध केला पण जंगलात त्याचे प्रेतदेखील सापडले नाही.

त्याच सुमारास राजा एकाएकी आजारी पडून वारला. राजकुमाराच्या देहात प्रवेश



केलेल्या कृतवर्म्याचा राज्याभिषेक झाला. राज्याची सर्व जबाबदारी त्याच्या बापावर म्हणजे मंत्र्यावरच होती. परंतु पुत्रविरहाने व त्याच्या काळजीने मंत्र्याची तब्येत खालावत गेली.

कृतवर्म्याला बापाच्या आजाराचे कारण माहीत होते, तरी त्याला काही बोलता येत नव्हते. कित्येकदा खरे काय ते सांगून टाकावे असे त्याच्या मनात आले. परंतु ती गोष्ट ओठापर्यंत येऊन थांबे. वस्तुस्थिति कळल्यास बापाला राग येईल व तो एक क्षणभर देखील आपल्याला गादीवर राहू



देणार नाही. नीति विरुद्ध कार्य त्याला कधी खपणार नाही, हे त्याला माहीत होते. गादीवर कोणी नसेल तर शत्रू स्वस्थ बसणार नाहीत. म्हणून तो आपल्या वडिलांजवळून खरी गोष्ट लपवून त्यांना राजासारखा धीर देत राहला. म्हणाला– "कृतवर्म्याला देशाटन करावे असे वाटले असावे व तो लवकरच परत येईल."

कृतवर्मा त्याचा मित्र केव्हां परत येईल या काळजीत होता. त्याला प्रत्येक दिवस एका वर्षासारखा जात होता. सहा महिने झाले तरी राजकुमार परत आला नाही.

मंत्री इतका आजारी पडला की त्याला अंथरूण सोडणेच अशक्य झाले. मरण जवळ आलेले पाहून त्याने राजाच्या रूपात असलेल्या आपल्या मुलाला जवळ बोला-विले व म्हणाला–"बाळ! मला माझा मुलगा व तू सारखेच आहां. माझा मुलगा देश भ्रमणाला निघाला त्या दिवसापासून मी तुलाच आपला मुलगा मानून चालत आहे. आजपर्यंत मी यथाशक्ति राज्याचा भार संभाळीत आलो. यापुढे तुलाच स्वतः राज्यकारभार पाहावा लागणार. थोरले महाराज व मी दोघे धर्माला साक्षी ठेवून आणि नेहमी प्रजेच्या हिताला मुख्य समजून राज्यकारभार पहात राहालो. तू देखील आपल्या वडिलांप्रमाणे धर्माला जागून राज्य-कारभार करशील असे मला वचन दे, म्हणजे मी निश्चित होऊन सुखासमाधानाने डोळे मिटीन.

मंत्र्याने इच्छिल्याप्रमाणे कृतकर्म्याने शपथ घेतली आणि मंत्र्याने डोळे मिटले.

कृतवर्म्याने आपल्या वडिलांसमक्ष जी शपथ घेतली होती त्याप्रमाणे वागला. त्याच्या उत्तम राज्यकारभारामुळे प्रजा आपल्या जुन्या राजाला व मंत्र्याला विसरून गेली.

राजकुमार एक वर्ष लोटले तरी परत आला नाही. एकदा कृतवर्मा शिकारीला गेला असता रानात एक पोपट उडत त्याच्या खांद्यावर येऊन बसला. पोपट म्हणाला–"मित्रा! तू मला ओळखले नाहीस वाटते? मीच सुदर्शन. आज स्वतःची गोष्ट तुला सांगायला मला चांगली संधी मिळाली आहे. सहा महिन्याच्या आत येईन असे मी तुला वचन दिले होते. नाही का? परंतु मी देश भ्रमणाला निघाल्यावर मला नवीन नवीन प्रदेश बघावे असे वाटू लागले. घरी परत यावेसे वाटेच ना. खरे पाहिले तर आहे काय आपल्या राज्यात? मी जगात अनेक विचित्र गंमती पाहील्या. एक गंमत पहात असता मी एक धोक्यात सापडलो. एका रानात एका राक्षस रहात असे. त्याने मला धरले व आपल्या गुहेत घेऊन गेला. तो मला खाणार हे मला माहीत होते. तेव्हां मी या पोपटाच्या देहात शिरलो. तेव्हां तर हे जग पहायला मला जास्तच चांगली संधी मिळाली. मी तुला कळवायला कदाचित आलो नसतो की तुझा देह त्या राक्षसाच्या घशात गेला आहे. पण मी तुझ्याजवळ माफी मागण्यासाठी



आलो आहे. आता मला निरोप दे." एवढे सांगून पोपट उडत निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! कृतवर्म्याने राजकुमाराचे शरीर त्याला देऊन स्वतः आणखी कोणाच्या तरी देहात प्रवेश कां केला नाही? हा मित्रद्रोह नाही तर काय? असा मित्रद्रोह त्याने कां केला? राज्याचा लोभ म्हणावयाचा की राक्षसाने त्याचा देह खाऊन टाकला या बद्दलचा राग आहे हा! या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमार्क म्हणाला–" कृतवर्म्यावर मित्र-द्रोहाचा आरोप लावणे बरोबर होणार नाही. राज्य कारभार संभाळायला लागणारी लायकी सुदर्शनच्या अंगी दिसून येत नाही. ही गोष्ट ज्योतिष्याने पण प्रथम सांगितली होतीच की त्याच्या जिवाला धोका आहे. राज्य करण्यापेक्षा भ्रमण करण्याची इच्छा त्याच्या मनात शतपटीने जास्त होती. कृतवर्म्याला राज्यलोभ असता तर तो मित्र येण्याची इतक्या उत्कंठेने वाट पहात राहीला नसता. याशिवाय त्याने आपल्या बापाला दिलेल्या वचनाचे तंतोतंत पालन केले. मित्राला फसविणे किंवा लुबाडणे हा विचारच कधी त्याच्या मनाला शिवला नाही. म्हणून त्याने राजकुमाराला त्याचा देह परत दिला नाही, त्यात काही गैर मला तरी दिसत नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





एका गावी एक शेतकरी नवराबायको रहात असत. त्यांचे एक शेत होते व लहानसे घर पण होते. शेतात जे पीक येई तेवढ्या वर दोघांचा उदरनिर्वाह आनंदात चाले. शेतकऱ्याची बायको विसरभोळी होती. म्हणून शेतकऱ्याला फार कष्ट सहन करावे लागत. तो सर्व गुपचुप सहन करी.

एकदा शेतकरी शेतावर कामाला निघाला तेव्हां बायकोला म्हणाला–"दुपारी जेवण घेऊन ये." आणि शेतावर निघून गेला.

थोड्या वेळाने शेजारीण गप्पा मारायला येऊन बसली. गप्पागोष्टीत शेतकऱ्यांची बायको शेतावर जेवण घेऊन जायची गोष्ट पार विसरून गेली. दुपार झाली तरी गप्पाष्टक चालूच होते. शेजारीण निघून गेल्यावर शेतकऱ्याच्या बायकोला नवऱ्याने जेवण घेऊन यायला सांगितले होते ते आठवले. घाई घाईने ती सैपाकाला लागली.

तिकडे शेतकरी बायको येईल म्हणून बराच वेळ वाट पहात राहिला. शेवटी कंटाळून तो घरी आला. त्याच वेळी बायको चूल पेटवायला लाकडे घेऊन जात असलेली त्याला दिसली. शेतकरी तिला खूप रागावला आणि तिच्याच हातातले एक लाकूड घेऊन त्याने तिला खूप बडविले. नंतर त्याने स्वतः सर्व सैपाक केला व खाऊन शेतात निघून गेला. शेतकऱ्याची बायको खाटेवर पडून रडत राहीली.

दुसऱ्या दिवशी शेतकरी पुन्हा शेतावर निघताना बायकोला बजावून जेवण घेऊन यायला सांगून गेला.

परंतु दुसऱ्या दिवशी सुद्धा शेजारणीने येऊन गप्पा गोष्टीत तिला अडकवून ठेवले. ती गेली तेव्हां दुपार उलटून गेली होती. तेव्हां कोठे शेतकऱ्याच्या बायकोला नवऱ्याने सांगितलेली गोष्ट आठवली. तिला वाटले की आज खूपच मार बसणार. विचार करता करता तिला एक युक्ति सुचली. तिने एका ताटात थोडे तांदूळ आणि एका वाटीत भाजी चिरून ठेवली आणि ते सर्व एका फडक्यात बांधून शेतावर निघाली.

बायको बराच वेळ न आलेली पाहून शेतकऱ्याने घरी निघण्याचा विचार केला. त्याच वेळी दुरून बायको येत असलेली त्याला दिसली.

तो तापला होताच. म्हणून जवळ जाऊन खसकन ओरडून म्हणाला—"कुठे ग होतीस इतका वेळ? विसरभोळी! तुझी चामडी लोळवतो बघ आता." असे म्हणत त्याने मागे पुढे पाहिले नाही आणि बायकोच्या तोंडात एक भडकावली.

शेतकऱ्याच्या बायकोने ताट खाली ठेवून सूर्याला नमस्कार केला व म्हणाली—"हे सूर्यनारायणा! "नको रे हे जिणे. नवऱ्याने माझे असे हाल चालवले आहेत त्याबद्दल तू साक्षी आहेस. मी पतिव्रता असेन तर मी आणलेला भात व भाजी, तांदूळ व कच्ची भाजी होऊन जातील."

शेतकऱ्याने जेवणाचे गाठोडे सोडून पाहिले. त्यात तांदूळ व कच्ची भाजी त्याला दिसली. शेतकरी बायकोच्या त्या भोळसट पणाबद्दल खूप हसला. तिला मारहाण करून काही उपयोग नाही, असे त्याने ठरविले. त्या नंतर त्याने आपल्या बायकोला कधी मारले नाही.





## [illegible]

कांपिल्य नगराबाहेर एका जंगलानजीक एक म्हातारी लहानसे झोपडे बांधून त्यात रहात असे. मेहनत मजुरी करून कशीबशी ती आपल्या पोटापाण्यापुरते मिळवीत आली होती. पण उतारवय झाल्यामुळे तिला काम पण होतनासे झाले. एकदां काही चोर तिच्या घरी आले व तिला पुष्कळ पैसे देऊन खायला करून घाल असे म्हणाले.

त्या दिवसापासून चोर दररोज रात्री उशिरा त्या म्हातारीच्या घरी जेवायला येऊ लागले. परत जाऊ लागले. असे बरेच दिवस चालू होते. एकदां म्हातारीला कळले की गावात गेले काही दिवस चोऱ्या फार वाढल्या आहेत. तरी ती काही बोलली नाही. कारण चोरांच्या कृपेने मेहनत केल्या शिवायच म्हातारीचे दिवस मजेत चालले होते.

कांपिल्य देशाचा राजा सत्यवर्मा मोठा पराक्रमी होता. त्याला तीन राण्या होत्या. पण अपत्य म्हणून एकच एक मुलगी होती. तिचे नाव कनकसुंदरी होते. नावाला साजेल असे सौंदर्य पण तिला लाभले होते.

दूर दूरच्या राजांनी व राजकुमारांनी कनकसुंदरीच्या सौंदर्याचे वर्णन ऐकून तिला मागणी घातली. परंतु राजकन्येने सर्वांना नकार दिला. अशा तऱ्हेने तिरस्कृत लोकांत सुनीर देशाचा राजा चंडवर्मा हा पण होता. चंडवर्मा असा अपमान सहन करून स्वस्थ बसायला तयार नव्हता. लग्न करायचे आणि ते तिच्याशीच, असे त्याने मनाशी ठरविले. त्याच्याजवळ मोठे सैन्य असते तर त्याने

श्री. ना. मा. राऊत



कांपिल्य नगरावर स्वारी केली असती. परंतु ते त्याला स्वप्नात देखील शक्य नव्हते. कारण सत्यवर्माने आपल्या बलाढ्य सैन्याच्या मदतीने चंडवर्माच्या सैन्याचा धुव्वा उडवला असता. म्हणून त्याला दुसरा एकादा उपाय योजावा लागला.

कनकसुंदरीवर कटक देशाचा युवराज महीधर याचे पण प्रेम होते. तो वेष पालटून देशभ्रमण करीत कांपिल्य नगरी आला. राजकुमारी आपल्या उद्यानात बसली होती. तिचे सौंदर्य पाहून तो चकित झाला. त्याच वेळी राजकन्येने पण त्याला पाहिले. इतर राजे व राजकुमारांपेक्षा तिला तोच तरुण जास्त सुंदर वाटला.

राजकुमारी आपल्या सखीबरोबर निघून गेली तेव्हां महीधर तिच्याच विचारात मग्न होऊन अन्यमनस्कपणे चालत चालत त्या म्हातारीच्या झोपडीजवळ येऊन पोचला. त्याला फार तहान लागली होती. म्हणून त्याने म्हातारीजवळ प्यायला पाणी मागितले. त्याच वेळी म्हातारी चोरांसाठी सैंपाकाला बसली होती.

म्हातारीने दिलेले पाणी पिऊन महीधरने तिला विचारले—"आजी, या झोपडीत आणखी सुद्धा लोक आहेत वाटते! तुम्ही सैंपाक पुष्कळ जणांसाठी करीत आहां म्हणून विचारतो."

"मला स्वतःचे असे कोण आहे बाबा! हा सर्व सैंपाक मी एका सोनेरी टोळीसाठी करते आहे. एक महिना झाला ते लोक माझ्याकडे जेवतात खातात. आजपासून त्यांच्या तावडीतून माझा जीव सुटणार. ते ज्या कामासाठी आले आहेत, बहुतेक ते आज पुरे होईल." म्हातारी म्हणाली.

"त्या टोळीतले लोक कोण आहेत? कुठले राहणारे आहेत? ते कोठे राहतात"





कांपिल्य नगरावर स्वारी केली असती. परंतु ते त्याला स्वप्नात देखील शक्य नव्हते. कारण सत्यवर्माने आपल्या बलाढ्य सैन्याच्या मदतीने चंडवर्माच्या सैन्याचा धुव्वा उडवला असता. म्हणून त्याला दुसरा एकादा उपाय योजावा लागला.

कनकसुंदरीवर कटक देशाचा युवराज महीधर याचे पण प्रेम होते. तो वेष पालटून देशभ्रमण करीत कांपिल्य नगरी आला. राजकुमारी आपल्या उद्यानात बसली होती. तिचे सौंदर्य पाहून तो चकित झाला. त्याच वेळी राजकन्येने पण त्याला पाहिले. इतर राजे व राजकुमारांपेक्षा तिला तोच तरुण जास्त सुंदर वाटला.

राजकुमारी आपल्या सखीबरोबर निघून गेली तेव्हां महीधर तिच्याच विचारात मग्न होऊन अन्यमनस्कपणे चालत चालत त्या म्हातारीच्या झोपडीजवळ येऊन पोचला. त्याला फार तहान लागली होती. म्हणून त्याने म्हातारीजवळ प्यायला पाणी मागितले. त्याच वेळी म्हातारी चोरांसाठी सैंपाकाला बसली होती.

म्हातारीने दिलेले पाणी पिऊन महीधरने तिला विचारले—"आजी, या झोपडीत आणखी सुद्धा लोक आहेत वाटते! तुम्ही सैंपाक पुष्कळ जणांसाठी करीत आहां म्हणून विचारतो."

"मला स्वतःचे असे कोण आहे बाबा! हा सर्व सैंपाक मी एका सोनेरी टोळीसाठी करते आहे. एक महिना झाला ते लोक माझ्याकडे जेवतात खातात. आजपासून त्यांच्या तावडीतून माझा जीव सुटणार. ते ज्या कामासाठी आले आहेत, बहुतेक ते आज पुरे होईल." म्हातारी म्हणाली.

"त्या टोळीतले लोक कोण आहेत? कुठले राहणारे आहेत? ते कोठे राहतात"

चांदोबा



त्याचा इतका आनंद झाला होता की त्याच्या रंगात ते दारू पीत होते.

महीधर झाडावरून खाली उतरून आला. त्याने त्या गाठोड्याला हात लावून पाहिले. आत कोणी मनुष्य असावा असे त्याला वाटले, त्याचे त्याला अर्थातच फार आश्चर्य वाटले. त्याने चाचपून पाहिले तर आंत एक स्त्री हात पाय बांधून ठेवलेली. ती दुसरी कोणी नसून राजकन्या कनकसुंदरी होती. महीधरने तिला मुक्त केले आणि तिला हळूच समजावून सांगितले की चोर निघून जाईपर्यंत या झोपडीच्या मागे कोठे तरी लपून बस. नंतर झोपडीत जाऊन बैस. झोपडीत राहणारी म्हातारी चांगली आहे. उजाडण्यापूर्वी घेऊन मी तुला राजधानीत पोचती करीन."

राजकुमारी स्वभावाने घाबरट नव्हती. ती रडली किंवा ओरडली नाही. त्या तरुणाने सांगितल्याप्रमाणे ती त्या झोपडी आड झाडीत लपून बसली. महीधर स्वतः गाठोड्यात स्वतःला बांधून घेऊन स्वस्थ पडून राहाला. बऱ्याच वेळानंतर चोर झिंगून झोपडी बाहेर आले आणि घोड्यावर बसून निघाले. जंगलाच्या वाटेने ते एका घराजवळ आले. त्यांनी ते गाठोडे सावकाश उचलून एका कोपऱ्यात आणून ठेवले. नंतर झोपून घोरत पडले.

चोर घोरू लागले आहेत हे ओळखून महीधर गाठोड्याबाहेर आला. प्रत्येक चोराचे हात बांधून ठेवले. प्रत्येकाला घोड्याच्या पाठीवर आडवे टाकले व स्वतः एका घोड्यावर बसून सर्व चोरांना घेऊन राजवाड्यात पोचला. तोंपर्यंत छान उजाडले होते. तोपर्यंत राजकन्या अदृश्य झाल्याची गोष्ट राजवाड्यात सर्वांस कळली होती व सर्व लोक काळजी करीत होते.

"हेच ते राजकन्येला उचलून घेऊन नेणारे चोर. राजकुमारी एका जागी सुरक्षित आहे, काळजी करू नका. मी तिला जाऊन घेऊन येतो." असे सांगून महीधर म्हातारीच्या झोपडीकडे निघाला. तिकडे तो येऊन पोचला तोपर्यंत राजकन्या व म्हातारी त्याची वाट पहात बसली होती.

महीधर दोघींना घेऊन राजवाड्यांत यथावेळीं पोंचला. आपल्या मुलीला वाचविणारा दुसरा कोणी नसून वेष पालटून फिरणारा कटक देशाचा युवराज आहे हे जेव्हां कनकसुंदरीच्या वडिलांना कळले तेव्हां त्यांनी त्यालाच आपला जांवई करून घ्यायचे आपल्या मनाशी ठरविले. मुलीच्या डोळ्यात महीधरशीच लग्न करण्याची इच्छा स्पष्ट झळकत असलेली राजा दिसली.

चवकशी करता असे कळले कीं ते चोर नसून चंडवर्माने नेमलेले हेर होते. त्यांनी सुरवातीला चोऱ्या करून राजाच्या शिपायांचे लक्ष तिकडे वेधून घेतले. राजवाड्यावरचा पाहारा कडक राहाला नाही हे पाहून राजकन्येला चंडवर्म्याच्या आज्ञेने उचलून घेऊन गेले. चोरांना शिरच्छेदाची शिक्षा देण्यात आली.

सत्यवर्माने दरबार बोलावून महीधरचा जाहीर सन्मान केला व त्याच्याशी राजकन्येचे लग्न ठरले असल्याचे जाहीर केले. म्हातारीला राजाने मोठे इनाम देऊन तिचा पण सर्व प्रकारे सत्कार केला. सुमुहूर्तावर महीधर व कनकसुंदरी यांचा विवाह थाटा माटाने पार पडला.

चंडवर्म्याच्या राज्यावर सत्यवर्माने स्वारी करून ते जिकले व त्याचा शिरच्छेद केला.





# नाव बदलले

एका गांवी एका गरीब बाईला गोवर्धन नावाचा एक मुलगा होता. गोवर्धनचा बाप एक दिवशी कोणाला काही सांगितल्या शिवाय घरून निघून गेला. त्यावेळी गोवर्धन एक तान्हा मुलगा होता. त्याच्या आईनेच हालात दिवस काढून त्याला लहानाचे मोठे केले. दोघे मायलेक खूप मेहनत करीत पण दोघांना पोटा पाण्यापुरेशी मजुरी मिळत नसे. त्यात गोवर्धनने लग्न करण्याचे ठरविले. पण गरिबाला आपली मुलगी कोण देणार? लग्न होत नाही हे पाहून गोवर्धन बापासारखाच कोणाला काही सांगितल्या शिवाय घर सोडून निघून गेला.

तो एका गावी गेला. गावातल्या बाजारात खायला म्हणून त्याने दोन लाडू विकत घेतले व गावाबाहेरच्या तळ्याच्या काठी खायला बसला. तेथे राजाचे धोबी राजवाड्यातले कपडे धुवायला घेऊन आले होते. त्याने त्यांना विचारले–"तुम्ही सुद्धा लाडू आणणार नाही का?"

"कोठून?" त्यांनी विचारले.

"शेजारच्या गांवी जमीनदाराला मुलगा झाला आहे. म्हणून सर्व गांवकऱ्यांचे तोंड गोड करायला तो लाडू वाटीत आहे."

"होय का? तर मग आम्ही पण जातो लाडू आणायला. आमची ही गांठोडी आम्ही येईपर्यंत पाहतोस का?" धोबी गोवर्धनला म्हणाले.

"बरे, पाहतो. पण लवकर या बरं का, कारण मला पुष्कळ काम आहे." गोवर्धन म्हणाला.

"हो पण तुमचं नाव काय राव?" धोब्यांनी त्याला विचारलें.

"वादळ!" गोवर्धन म्हणाला.

धोबी डोळ्यासमोरून दूर होताच गोवर्धन त्यांची कपड्यांची गाठोडी घेऊन पळून गेला. धोब्यांनी जमीनदार कोठे राहतो, चवकशी करून पाहिले तर तसा कोणी जमीनदार नव्हताच. वादळाने आपल्याला फसविले असा विचार करून ते परतले तर त्यांची गाठोडी नाहीशी झालेली दिसली. त्यांनी राजाकडे गाऱ्हाणे नेले की वादळाने सर्व कपडे नेले.

राजाने गाऱ्हाणे ऐकले व म्हणाला–"वादळाने कपडे नेले तर त्यात तुमचा काय दोष? तुम्हांला मी माफ करतो."

तिकडे गोवर्धन कपडे घेऊन पुष्कळ दूर निघून गेला. त्याने गाठोड्यातून राजाचे कपडे काढून अंगात घातले आणि बाकी कपडे टाकून निघून गेला.

वाटेत गोवर्धनला एक घोड्याचा व्यापारी घोडे विकायला घेऊन चाललेला दिसला. गोवर्धनने त्याला थांबायला सांगितले आणि घोड्यांपैकी एक उत्तम अरबी घोडा निवडून त्याची किंमत विचारली.



व्यापारी म्हणाला–"मालक! हा अस्सल जातीचा अरबी घोडा आहे. याची किंमत कमीत कमी पांचशे रुपये होईल."

गोवर्धन घोड्याकडे निरखून पाहून "हूं" म्हणाला व व्यापाऱ्याकडे वळून म्हणाला–"घोडा दिसतो आहे खरा चांगला. पण चालतो कसा हे एकदा पाहिले पाहिजे."

"आपले नाव काय, मालक?" व्यापाऱ्याने विचारले.

"माझे नाव होय? कर्जदार!" गोवर्धनने निस्संकोच उत्तर दिले.

व्यापाऱ्याने विचार केला, जगात किती विचित्र विचित्र नावे असतात आणि "बसून पहा!" असे म्हणाला.

गोवर्धन घोड्यावर बसला व टाच मारली. त्याबरोबर घोडा भरधाव पळू लागला. व्यापारी बराच वेळ वाट पहात उभा राहिला व आपण फसलो असा विचार करून डोके धरून बसला. त्या रस्त्याने जाणाऱ्या येणाऱ्यांनी त्याला विचारले—"काय रे झाले दुःख करा यला?"

"कर्जदाराने माझा घोडा पळवून नेला आहे हो." व्यापारी म्हणाला.

"कर्जदार नेणार नाही तर कोण नेणार?" असे म्हणत ते पुढे निघून गेले.

गोवर्धन घोड्यावर बसून आणखी थोडा पुढे गेला. वाटेत त्याला एक कालवा लागला. कालव्यापलीकडे जाण्यासाठी एक म्हातारी व एक तरुण मुलगी काठावर बसल्या होत्या. एक होडके खुंट्याला बांधलेले दिसले. पण होडीवाला नव्हता.

गोवर्धन म्हातारीला सहानुभूति दाखवीत म्हणाला—"आजी! मी तुम्हांला पलीकडे घेऊन जातो. पहिल्याने तुमच्या नातीला घेऊन जातो व मग तुम्हांला."

"तुझे नाव काय बाळ?" म्हातारीने विचारले.

"नवरा!" गोवर्धन म्हणाला.

नंतर गोवर्धन म्हातारीच्या नातीला घोड्यावर बसवून जो कालव्यापलीकडे गेला तो परतला नाही.

म्हातारी गोवर्धन नातीला घेऊन पळून जात असलेला पाहून ओरडली—"माझ्या नातीला घेऊन नवरा पळून गेला हो!" ते ऐकून सर्व हसू लागले. तिच्या बोलण्याकडे कोणी लक्ष दिले नाही.





# मूर्ख नवाब

एकदा एक नवाब साहेब गावाबाहेर फिरायला निघाले. थोडे अंतर चालून गेल्यावर नवाबसाहेबांना एक तरुण युवक वडाच्या झाडावर चढून वडाची पाने तोडीत असलेला दिसला. नवाबसाहेबांनी त्या मुलाला लगेच खाली उतरायला सांगून विचारले—"कोण रे तू? आणि झाडाची पाने कां तोडीत आहेस?"

तो तरुण युवक म्हणाला—"मी एक गरीब ब्राह्मण आहे. जेवायला पत्रावळीसाठी पाने तोडीत आहे."

नवाबसाहेबांची अशी समजूत होती की प्रत्येक ब्राह्मण कवि असतो. म्हणून ते त्याला म्हणाले—"तू ब्राह्मणाचा मुलगा आहेस, मग माझ्यावर एक कविता करून म्हणून दाखव पाहू."

त्या ब्राह्मणाला लिहिता वाचता पण बेताचेच येत होते. कविता करता येत नाही सांगावे तर नवाबाला राग येणार. म्हणून धाडस करून त्याने नवाबसाहेबांना त्यांचे नाव विचारले.

नवाबसाहेबांनी आपले नाव बुल्बुल खान असल्याचे सांगितले.

ब्राह्मणाने सुरात काव्य पाठ सुरू केला—"अहो बुल्बुल खान! ओहो बुल्बुल खान! आमचे बुल्बुल खान! अहाहा बुल्बुल खान! शाबास बुल्बुल खान! धन्यवाद बुल्बुल खान!

एकाच कवितेत आपल्या नांवाचा इतक्या वेळा उल्लेख ऐकून नवाबसाहेब खूष झाले आणि त्या ब्राह्मणाला एक हजार सोन्याची नाणी द्यायला एका अधिकाऱ्याला सांगितले.

तो ब्राह्मण सोन्याची नाणी घेऊन घरी आला व घडलेली गोष्ट त्याने आपल्या आईला सांगितली. मुलाची ती कविता ऐकून त्याची आई खूप हसली आणि तिखट मीठ लावून तिने मुलाच्या काव्य शक्तीची वाखाणणी शेजारी पाजारी केली.

त्या ब्राह्मणाच्या शेजारी रामशास्त्री नावाचा एक विद्वान-पंडित रहात असे. त्याच्या बायकोने आपल्या शेजारणीच्या मुलाने मिळवून आणलेल्या बक्षिसाची गोष्ट आपल्या नवऱ्याला सांगितली व म्हणाली—"काय उपयोग तुमच्या एवढ्या पांडित्याचा! अहो तो गावंढळ मुलगा पहा, किती पैसे मिळवून घेऊन आला आहे तो."

"असे होय? तर मग मी सुद्धा जातो नबाबाकडे आणि त्याच्यावर कविता रचून म्हणून दाखवितो." रामशास्त्री म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी रामशास्त्री नबाबाच्या दरबारात गेला आणि नबाबसाहेबांना वाकून सलाम केला. नंतर त्याने नबाबसाहेबावर एक सुंदर व सरस कविता रचून म्हटली. शेवटी नबाबसाहेबाच्या नावाचा उल्लेख संबोधनार्थ केला.



नबाबसाहेबांना कविता समजण्यापुरेशी त्यांच्यात बुद्धी नव्हती. म्हणून ते कविता ऐकून म्हणाले—

"अरे, ही कसली रे कविता! काल एका तरुण ब्राह्मणाने कविता म्हणून दाखविली, तिच्यात माझे नाव प्रत्येक शब्दात होते. तुझ्या कवितेत शेवटी टोकाला नाव आले आहे. चालता हो!" नबाबसाहेब म्हणाले. रामशास्त्री निराश होऊन घरी निघून गेला.

* * *

एकदा नबाबसाहेब फिरत फिरत चमेलीपूर नामक गावी आले. गावच्या पाटलाने नबाबसाहेब व त्यांच्या कुटुंबाची राहण्याची व खाण्यापिण्याची बरदास्त फार उत्तम राखली.

नबाबसाहेबांचे जेवण वगैरे आटोपल्यावर पाटील व कुळकर्णी त्यांच्या दर्शनासाठी गेले. वाटेत कुळकर्णी पाटलांना म्हणाला—"हे पहा पाटील! नबाब आपल्या गांवी किती दिवस राहणार, हे आपल्याला किंवा मला काय कळणार? एक वेळेच्या खाण्या-लाच इत खर्च झाला की एक आठवडाभर नबाबसाहेब राहाले तर आपले दोघांचे दिवाळेच निघेल. आता जाऊन हे विचा-



रायचे पण कसे, की ते किती दिवस राहणार आहेत ?

"एक उपाय मला सुचला आहे. तो पत्थ्यावर पडला तर आपला जीव वाचेल." पाटील म्हणाला.

दोघे नवाबसाहेब उतरले होते त्या जागी पोचले व हात जोडून नमस्कार करून बसले.

"कसे काय पाटील साहेब ? आपल्या गावचे वर्तमान सांगा. सर्व ठीक आहेना ? कोणत्या गोष्टीची कमतरता तर नाही ना ?" नवाबसाहेबांनी विचारले.

"आतां आपल्या पासून काय लपूवून ठेवायचं आहे. मालक ! आपल्या कृपेने सर्व ठीकच आहे. गुरे खूप आहेत. पण त्यांना प्यायला तलाव, नदी जवळपास काही नाही. एक ल्हानसा तलाव आहे. तेच पाणी गुराना व गांवकऱ्यांना प्यायला व धुवायला आहे. त्या तलावाचें पाणी पिऊन ज्या म्हशी दूध देतात त्यांच्या दुधाचे दही ताक काही खावे तर लगेच थंडी भरून ताप येतो. काही लोक त्यात मेले देखील. गाव सोडून तरी कोठे जायचं ?" पाटील म्हणाला.

ते ऐकून नवाबसाहेब घाबरले. कारण त्यांनी त्याच तलावाचे पाणी प्यायला वापरले होते व गांवच्या म्हशींच्या दुधाचे दहीच त्यांना खायला घातले होते. म्हणून आपला मुनीम कासीम खान याला म्हणाले— "अरे, येथून पळून जाण्यासाठी जे करावयाचे असेल ते कर."

संध्याकाळी नवाबसाहेबांना गांवच्या वेशीपर्यंत निरोप देऊन पाटील व कुळकर्णी परत आले. त्यानंतर आयुष्य भरांत एकदा देखील नवाबसाहेब त्या गांवच्या बाजूला फिरकले नाहीत.





# खरा न्याय

एका गांवी महादू व शिवू नावाचे दोन शेतकरी रहात असत. दोघे मित्र होते. महादू महादेवा सारखा उदार व दयाळू होता. परंतु शिवूचा स्वभाव याच्या उलटा होता. दुसऱ्याला मदत करणे म्हणजे त्याला जिवावरचे एक संकट वाटे. दुसऱ्याचं बरे झालेले पाहून त्याच्या पोटात दुखूं लागे.

दोघे एकदां शेताच्या कडेला बसून बोलत होते. तेव्हा एक गरीब मनुष्य येऊन हात जोडून म्हणाला—"दादा ! मी एक गरीब माणूस आहे. मुलेबाळे पुष्कळ आहेत. बायको आजारी आहे. तिचे औषध पाणी करावयाचे आहे. पण जवळ एक फुटकी कवडी सुद्धा नाही. थोडा हातभार लावलात तर गरिबाचा उद्धार होईल."

"तुझ्या सारख्यांना पैसे वांटायला सुरवात केली तर आमच्या हाती पण तुझ्यासारखीच करवंटी येईल. जा, जाऊन काही तरी काम कर. भीक मागायला लाज नाही का वाटत तुला ?" शिवूने त्याला दटावून विचारले.

त्या गरीब माणसाने महादूकडे केविलवाण्या नजरेने एकदा पाहिले. महादूच्या हृदयाला पाझर फुटला. त्याने खिशातून दहा रुपयाची नोट काढून त्याच्या हातात देत म्हटले—"जा बाबा ! लवकर जाऊन बायकोचे औषध पाणी कर.

तो मनुष्य महादूचे आभार मानून निघून गेल्यावर शिवू महादूला म्हणाला— "अशा फुकट्या उपटसुंभ्याना पैसे वाटून त्यांना आळशीपणा शिकवणें बरोबर नाही."



महादू काहीच बोलला नाही. पण शिवूच्या मनात ती गोष्ट डाचत होती. त्याला वाटत होते की आपला अपमान करण्यासाठीच महादूने हे दान केले.

पुढे काही दिवसांनी महादू शेतावर गेला तर त्याला कालव्यात एक वासरू वाहात येत असलेले दिसले. त्याने पाण्यात उतरून वासराला बाहेर काढले आणि त्याला उचलून घरी घेऊन गेला. त्यावेळी तेथे कोणी नव्हते. महादूच्या बायकोने ते वासरू पाहिले. तिला फार आनंद झाला.

दुसऱ्यादिवशी शिवूने जाऊन ते वासरू पाहिले. वासराच्याविषयी चवकशी वगैरे काही केल्याशिवाय लगेच तो घरी निघून गेला आणि विचार करू लागला की महादूच्या घरी गाय तर दिसत नाही, मग हे वासरू कोठून बरे आले असावे? त्याने चोरून कोठून तरी आणले असावे. गावच्या पाटलाच्या कानावर ही चोरीची गोष्ट गेली तर महादूला गावात तोंड दाखवायला जागा उरणार नाही.

त्याप्रमाणे त्याने पाटलाकडे महादूने चोरी करून कोणाचे तरी वासरू आणल्याचे कळविले. म्हणाला—"पाटील! काल रात्री माझं वासरू चोरीला गेलं हो! आज महादूच्या घरी जाऊन पाहिलें तर तेथे होते वासरू. ते माझ्या वासरासारखंच आहे. त्याच्याकडे एक गाय देखील नाही, मग वासरू कोठून येणार? तुम्हीच न्याय निवाडा करावा."

"लगेच पाटलाने महादूला वासरू घेऊन चावडीवर हजर व्हायला निरोप पाठविला. पाटलांचा निरोप कळताच महादू वासराला घेऊन आला. तेथे शिवूला पाहून महादूला आश्चर्य वाटले.

"काय रे महादू? आणलेस का वासरू? किती गाई आहेत रे तुझ्याकडे?" पाटलांनी विचारले.

"आपल्याकडे एक देखील गाय नाही बुवा." महादू म्हणाला.

"गाय नाही तर हे वासरू कोठून आणलेस रे?" पाटलाने विचारले.

"कालव्यात वहात चालले होते. मला दिसलं. देवानेच दिलं असे समजून उचलून घेऊन आलो." महादूने खरे ते सांगितले.

शिवू मध्येच बोलला—"महादू! पाटलां-समोर उगाच खोटे कशाला बोलतोस?"

पाटील शिवूला गप्प बसायला सांगून महादूला म्हणाले—"महादू! कालव्यांतून कोणी वासरू वहात जात असता पाहिले तर विश्वास करता येईल. शिवूकडे गाई आहेत. तो म्हणतो की त्याचे वासरू हरवलं आहे."

"पाटील, मी खरे ते सांगितले. मला ते सापडले त्यावेळी जवळपास दुसरे कोणी नव्हते. मग मी साक्ष म्हणून कोणाला उभा करू?" महादू म्हणाला.

पाटील थोडा वेळ विचारात पडल्या-सारखे दिसले. म्हणाले—"शिवू! या वास-राची आई कोठे आहे घेऊन ये."

शिवू एका गाईला घेऊन आला. पाटलाने वासराला गाईजवळ नेऊन सोडले. परंतु ते गाईजवळ गेले नाही की गाईने पण त्याच्याकडे वळून पाहिले नाहीं. उलट ती मारायला डोके हलवू लागली.

पाटील शिवूकडे वळून म्हणाले—"हे वासरू या गाईचे नाही. त्याचा अपमान करण्यासाठीच तू त्याच्यावर खोटा आरोप लावलास. म्हणून मी तुला दंड करतो."

शिवूची मान सर्वां समोर खाली झाली.





# बिरबलाचे चातुर्य

एकदा अकबराने बिरबलाला विचारले—"बिरबल, जगातला सर्वांत इमानदार आणि सर्वांत विश्वासघातक प्राणी कोण हे आणून दाखतोस का?"

बिरबल आपल्या जांवयाची कानउघाडणी करण्याच्या विचार पुष्कळ दिवसापासून करीत होता. बिरबलकडेच म्हणजे सासुरवाडीच तो रहात होता म्हणून बिरबल आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन निघाला. निघताना जांवयाला पण बोलावले.

बादशाहाने बिरबलाला विचारले—"बिरबल! मी तुला इमानदार व बेइमान प्राणी आणून दाखवायला सांगितले होते. मग घेऊन आला आहेस का?"

"होय, जहांपनाह! हा माझा कुत्रा आहे. इमानदार आहे. याच्याबरोबरीचा इमानदार प्राणी दुनियेत कोठे मिळणार नाही. चार शिळे तुकडे समोर टाकले तरी शेपूट हलवून आनंदाने सर्व खाऊन टाकतो." बिरबल म्हणाला.

"बरे पण! बेइमान जनावर, आणले नाहीस का?" बादशाहाने विचारले.

"हे पहा, माझे जांवई बापू! यांना किती पंचपक्वान्ने करून खायला घाला, कधी यांच्या मनाचे समाधान होईल तर शपथ." बिरबल म्हणाला.

"अस्सं! तर मग मी यांचे डोके उडवितो. माझ्या राज्यात बेइमान लोकांना जागा नाही." बिरबल काय उत्तर देतो हे पाहण्यासाठी बादशाह म्हणाला.

"अशी घाई करू नये, बादशाह! आपण सर्वच कोणाचे तरी जांवई नाही का?" बिरबल म्हणाला. अकबर बिरबलाचे उत्तर ऐकून खूष झाला.

*　　*　　*

बिरबलाचे हास्य कधी कधी फार जास्त मर्यादेबाहेर होई. एकदा त्याने बादशाहाला विचारले—"बादशाह, हा सूर्य पश्चिमेकडेच कां हो अस्ताला जातो?"

"असले प्रश्न कोणा तरी मूर्खाला जाऊन विचार." बादशाह रागाच्या भरात म्हणाला.

"म्हणूनच तर मी आपल्यालाच हा प्रश्न विचारला." लगेच बिरबल म्हणाला. अकबराने बिरबलाच्या चातुर्याबद्दल त्याची पाठ थोपटली.

*　　*　　*

एकदां बादशाहाने दरबाऱ्यांना विचारले—"सतावितांतून नऊ काढून टाकले तर काय उरते?"

सर्वांनी शाळकरी विद्यार्थ्यांच्या तोंडी हिशोबासारखे एकदम उत्तर दिले—"अठरा!"

अकबराने बिरबलाकडे वळून पाहिले—"पूज्य राहील." बिरबल म्हणाला.



सर्व चकित होऊन बिरबलाकडे व बादशाहाकडे पाहू लागले. "कसे रे पूज्य उरेल?" अकबराने पुन्हां बिरबलाला विचारले.

एका वर्षात एकंदर सत्तावीस नक्षत्रे असतात. त्यांतली पावसाळ्याची नऊ नक्षत्रे काढून टाकली तर बाकी असून नसून शून्यच." बिरबल चातुर्य दाखवीत म्हणाला.

*　　*　　*

एकदां अकबराचा मंत्री अबुल फजल बिरबलाला दरबारांत म्हणाला—"बादशाह तुला राज्यातल्या सर्व कुत्र्यांवर अधिकारी नेमण्याचा विचार करीत आहेत."

श्री. मा. न. मानकामे

"तर मग मी आपल्यावर पण अधिकार गाजवू लागेन." बिरबलने निधडकपणें उत्तर दिले. त्यानंतर अबुल फजल बिरबलाच्या वाटेला कधी गेला नाही.

* * *

एकदा अकबर बादशाहाने बिरबलाला एक मोठी जहागीर देण्याचे वचन दिले. बिरबलाने आठवण करून दिली की बादशाह खांदे हलवून जणु काही ती गोष्ट आपल्या गावीच नाही असे दाखवी.

एकदा बादशाहाने बिरबलाला विचारले— "बिरबल उंटाची मान इतकी वांकडी कां रे?"

"त्याने कोणाला तरी जहागीर देणाचे वचन देऊन विचारल्यावर खांदे उडवू लागला असेल. त्यामुळे झाली असेल मान वांकडी." बिरबलाने तावडतोब उत्तर दिले. बिरबलाला लगेच जहागीर मिळाली.

* * *

एकदां बिरबलाच्या एका नातेवाईकाने काही तरी गुन्हा केला. बादशाहने त्याचा न्याय निवाडा करून त्याला मृत्युदंड दिला. त्या दिवशी बिरबल दरबारात हजर नव्हता. परंतु मृत्युदंड देण्याची जी जागा होती त्या जागी हजर झाला. बादशाहाजवळ जाऊन उभा राहला.

"बिरबल! तू काय विचारणार आहेस हे मला माहीत आहे. पण मी तुझी विनंती मान्य करणार नाही. तरी देखील विचार विचारावयाचे आहे ते." बादशाहा म्हणाला.

"सरकार! आरोपीला माफ करू नये, एवढीच विनंती आहे." बिरबल म्हणाला.

बिरबलाचे ते चातुर्य ओळखून व खूष होऊन बादशाहाने आरोपीला सोडून देण्यास शिपायांना सांगितले.





# तीन घमेंडखोर

एका गावी एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याचे नाव नारायण असे होते. जवळ पासच्या एका ही गावात त्याची बरोबरी करू शकणारा एकही श्रीमंत नव्हता. म्हणून नारायणाला आपल्या श्रीमंतीचा गर्व चढला.

त्या गांवा शेजारी गोपाळ नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्याकडे शंभराहून जास्त गुरे होती. जवळपासच्या गावात त्याच्या इतकी गुरे एकाच्या ही घरी नव्हती. त्या गोष्टीचा गोपाळ गर्व करी.

त्या दोन्ही गावालगतच्या गावी, भीमू नावाचा एक मल्ल रहात असे. त्याच्या इतका बलवान मनुष्य जवळपास दुसरा कोणी नव्हता. म्हणून त्याचा गर्व पण कळसाला पोचला होता.

एकदा भद्राचलाच्या राममंदिरांत रामनवमीची तयारी चालू होती. तिघे गर्विष्ठ रामनवमीची जत्रा पहायला निघाले. काही दिवस प्रवास केल्यावर ते एका गावी एका धर्मशाळेत येऊन उतरले. त्याच दिवशी त्या धर्मशाळेत आणखी एक गृहस्थ येऊन उतरले होते. त्याने तिघांना विचारले— "कोण तुम्ही? आणि आलात कोठून?"

नारायण म्हणाला—"कदाचित आपण मला ओळखले नसेल. पण माझे नाव अवश्य ऐकले असेल. मला नारायण म्हणतात. माझ्या गावच्या आसपास पुष्कळ दूरपर्यंत माझ्या इतका श्रीमंत कोणी नाही."

असेच आपल्या गुरांच्याविषयी गोपाळने उत्तर दिले व म्हणाला—"मला न ओळखणारा आसपास कोणी नाही!

श्री. रा. मा. सरदेसाई












भीमूचे एक पाऊल पुढे होते. म्हणाला—" माझ्या हातचा फटका खाऊन न गेलेला पहिलवान विरळाच आढळेल."

सर्वांनी आपापली थोरवी गाऊन रामनवमीच्या जत्रेला निघाल्याचे सांगितले.

" आमच्या गावावरूनच मद्रासला जायची वाट आहे. गांवी याल तेव्हां विसरल्याशिवाय मला तुमच्या आतिथ्य सत्काराचा लाभ दिला पाहिजे बरं का!" तो मनुष्य मोठ्या प्रेमाने म्हणाला.

त्या गर्विष्ठांनी त्या नवीन अनोळखी व्यक्तीचे नाव गाव विचारले नाही आणि आपल्याच घमेंडीत म्हणाले—" पाहू पाहू!"

तिथे धर्मशाळेतच झोपले. सकाळी उठून पाहातात तर तो मनुष्य तेथे नव्हता.

दुपारचा सुमार होता. ऊन वाढले होते. त्याच वेळी त्यांना रस्त्याच्या बाजूला एक मोठे मैदान दिसले. त्याच्या चारी बाजूला कुंपण होते व त्यात सहस्रावधी गुरे चरत होती. ते कुंपण इतके मोठे होते की नजर पोचे तोपर्यंत कुंपणच कुंपण दिसत होते.

इतक्यात त्यांच्यासमोर एक मनुष्य येऊन हात जोडून उभा राहिला. गोपाळने त्याला विचारले—"काय रे ही गुरे किती गांवची रे?"

" किती गांवची! ही सर्व गुरे आमचे धनी शंकरराव यांची आहेत. हे सर्व कुरण त्यांचेच आहे." तो मनुष्य म्हणाला. गोपाळचा चेहरा ते उत्तर ऐकून पांढरा फट्ट पडला.

" शंकरराव कोठे राहतात रे?" नारायणने त्याला विचारले.

दूर बोटाने दाखवीत तो म्हणाला—" ती झाडे दिसतात ना, ती त्यांच्या घराच्या भिंतीच्या चारी बाजूला आहेत."

तिथे आणखी थोडे पुढे गेले.



गुरे चरत होती ते कुरण पार करून ते थोडे पुढे गेले तेव्हां त्यांना किल्ल्याच्या कोटासारखी भिंत दिसली व एक मोठा दिंडी दरवाजा दिसला. दरवाज्यावर एक पहिलवान पाहारा देत होता.

"हे कोणाचे घर रे?" भीमूने त्या पाहरेकऱ्याला विचारले.

"शंकररावांचे!" पाहरेकरी म्हणाला.

भीमू आत जाऊ लागला.

"थांब, आत कोठे निघालास?" असे म्हणत पाहरेकऱ्याने भीमूचा हात धरला. आणि त्याला अडवले.

भीमूच्या रागाचा पारा चढला. त्याने त्याचा हात झटकून आपला हात सोडवून घेण्याचा विचार केला. पण काही उपयोग झाला नाही. नंतर दोन्ही हातांनी त्याला ढकलून जाण्याचा विचार केला व प्रयत्न पण केला, पण निरुपयोग. भीमूच्या सर्वांगाला घाम सुटला. इतक्यात घोड्यावर बसून तो धर्मशाळेत भेटलेला मनुष्य तेथे आला.

" आलात? यावे, यावे, आत यावे. मी आधी पोचावे म्हणत होतो. पण शेवटी उशीर झालाच. या गरिबाचे माझे घर." तो घोडेस्वार म्हणाला.

ते तिथे घरात पोचले. ते घर नव्हते इंद्रभुवन होते. तेथे हस्तीदंती खुर्च्या, सोन्याचांदीची भांडी व हिरे माणके जडलेल्या तसविरी व चित्रे होती.

शंकररावाने त्या सर्वांना सोन्याच्या ताटात जेवायला वाढले. थोडा वेळ आराम करून तिथे विनम्रपणे शंकररावांचा निरोप घेऊन पुढच्या प्रवासाला निघाले.

त्यानंतर त्यांनी आपल्या मोठपणाचा टेंभा कोणासमोर गायिला नाहीं.





# प्रयत्न व प्रारब्ध

एका गावी दोन भाऊ रहात होते. आपल्या घराच्या परसात भाजी पाला लावून, ती विकून मोठा भाऊ स्वत:च्या व धाकट्या भावाच्या पोटापाण्याला लागतील एवढे पैसे मिळवीत असे. धाकटा भाऊ मोठ्या भावाच्या कामाला कधी हातभार लावीत नसे. त्याचे उपकार देखील मानीत नसे.

असेच काही दिवस गेले. एकदा मोठ्या भावाने धाकट्या भावाला बोलावून सांगितले की "तू हातपाय हालवीत नाहीस की काही काम करीत नाहीस. मी किती दिवस तुझी 'चाकरी करू?"

धाकट्या भावाने मोठ्या भावाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व म्हणाला—"प्रारब्धात असेल तर सर्व काही होते. मनुष्याचा प्रयत्न फुकट असतो. मी कोणत्याहि प्रकारचा प्रयत्न करायला तयार नाही."

ते ऐकून मोठ्या भावाला राग आला. त्यावर दोघांची आपसात बाचाबाची पण झाली. मोठा म्हणाला—"प्रारब्धाने कधी कांही हाती लागते का? प्रयत्नांती परमेश्वर असे थोरा मोठ्यांचे म्हणणे आहे."

दोघांचा वादविवाद बराच वेळ चालू राहाला. शेवटी दोघे राजाकडे गेले व आपापली बाजू मांडून न्याय निवाडा करायला सांगितले.

राजाने दोघांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व म्हणाला—"कोणाचं म्हणणे बरोबर आहे, हे सांगणे मला कठीण वाटते. "त्याने मंत्र्याला न्याय निवाडा करायला सांगितला.

"महाराज, आजची रात्र मला विचार करू द्या. दोघांचा तर्क मी ऐकला आहे. पण उद्या सकाळी बरोबर उत्तर देतो." मंत्री म्हणाला.

रात्री मंत्र्याने दोघा भावांना कालीच्या देवळांत बंदी करून ठेवले. देवळांत काळोख होता. हाताला हात दिसत नव्हता. आपण मूर्खपणा करून राजाकडे तक्रार नेली असे दोघांना वाटले. रात्र वाढत गेली तसतसे त्यांच्या पोटात कावळे पण कोकलू लागले. भाग्यावर भरवसा ठेवणारा धाकटा भाऊ जागच्या जागी पडून राहाला. पण प्रयत्नावर विश्वास करणारा मोठा भाऊ बाहेर जायला कोठे वाट आहे का पाहू लागला. काळोखात त्याने सर्व मंदिर पालथे घातले.

चाचपत जात असता त्याचा हात एका ताटाला लागला. त्यात खिरीचा वास येत होता. त्याने चव घेऊन पाहिली. त्याला वाटले की काली मातेला दाखविलेला नैवेद्य असावा. नंतर त्याने सर्व खीर पिऊन टाकली. पीत असता त्याला खड्यासारखे काही तरी लागले ते काढून तो दूर फेकू लागला. ते त्याच्या धाकट्या भावाच्या अंगावर जाऊन पडूं लागले. खीर संपली व मोठ्या भावाची भूक पण भागली. त्याला



मनातल्या मनात फार आनंद झाला की त्याचा धाकटा भाऊ एका जागी पडून आहे. त्याला भूक लागली असणार त्याला चांगला दंड मिळाला. त्याला प्रयत्नाचे मोल कळले असणार.

दुसऱ्या दिवशी मंत्र्याचे शिपाई आले. त्या दोघांना कैदेतून सोडवून दरबारात घेऊन गेले.

मंत्र्याने स्मित करून विचारले—"रात्र कशी गमतीत गेली ना?"

"प्रत्येक कार्याला मानवाचा प्रयत्न आवश्यक आहे. काळोखात चाचपत गेलो तर माझ्या हाताला एक वाढलेले ताट लागले. त्यांतली खीर खाऊन मी आपली भूक भागवली आणि छान झोपलो."

मंत्र्याने धाकट्याला विचारले—"तू काय रे केलेस?"

"मी काही केले नाही. एका कोपऱ्यात बसून राहालो. थोड्या वेळाने माझ्या मोठ्या भावाने माझ्या अंगावर खडे फेकायला सुरवात केली, ते खडे मी जमा करून ठेवले." धाकटा म्हणाला.

"ते खडे आहेत का तुझ्याजवळ? दाखव, बघू." मंत्री म्हणाला.

धाकट्या भावाने एका फडक्यात बांधलेले खडे काढून सोडून दाखविले. ते दगड नसून हिरे होते. मंत्री म्हणाला—"महाराज, मी दोघांची परीक्षा घेतली. मोठ्या भावाने जो प्रयत्न केला त्याच्या मानाने त्याला फळ फार थोडे मिळाले. एवढेच नव्हे तर त्याने स्वतःच्या हातांत आलेली रत्ने फेकून दिली. कारण त्याच्या नशिबात ती नव्हती."

राजाने ती रत्ने धाकट्या भावालाच ठेवून घ्यायला सांगितले.





# कृष्णावतार

दक्षिणेकडील स्नेही मित्रांचा सल्ला रुक्मीला फार आवडला. लगेच त्याने एका सुंदर सभामंडपात सोंगट्यांचा डाव मांडला व सोन्याचे फासे मागवून तयार ठेवले. त्यानंतर त्याने बलरामाकडे निरोप पाठवला की थोडा वेळ करमणुकी खातर द्यूत खेळू या. द्यूताचे वेड ज्या कोणाला होते ते सर्व हजर झाले.

बलराम व रुक्मी दोघांनी द्यूत खेळावे असे दाक्षिणात्य राजांच्या सूचनेवरून ठरले. सोने, चांदी, हिरे व माणके यांच्या राशी प्रत्येकाने आणून उभ्याल्या व द्यूताला सुरवात झाली. बलरामाने सुरवातीला दहा हजार सुवर्णमुद्रा पणाला लावल्या व त्या घालवून बसला. नंतर पुन्हा तितक्याच मोहरा घालवून बसला. अशा तऱ्हेने बलरामाची बाजू पडती होत गेली.

शेवटी बलरामाने एक कोटी सुवर्ण मुद्रा लावून डाव जिंकला. पण रुक्मी ओरडला—"मी डाव जिंकला व बलराम हारला. बलरामाला फासे टाकतांच येत नाहींत. मीच जिंकलो."

'हो' ला 'हो' मिळवीत त्याचा मित्र कलिंगचा राजा दात काढून म्हणाला—"बरोबर आहे. रुक्मीच जिंकला."

त्याचा बलरामला आला राग. तरी स्वतःला आवरून तो तेथे हजर होते त्या



सर्वांना संबोधून म्हणाला—"तुम्हीच सांगा, हा अन्याय आहे की नाही? जिंकलो मी आणि ह्यांचे म्हणणे की हे जिंकले. खरे काय ते तुम्हीच सांगा."

सर्व माना खाली करून बसले. कोणी उत्तर दिले नाही.

रुक्मीला जोर चढला. तो बलरामाला म्हणाला—"मीच जिंकलो. उगाच खोटे कशाला बोलतोस?"

आता या उघड खोटेपणाला उत्तर काय द्यायचे? इतक्यात आकाशवाणी झाली—"बलरामाचे म्हणणेच बरोबर आहे. रुक्मी खोटे बोलतो आहे. तुम्ही ठोकळ्या सारखे गप्प कां बसला आहा!"

तरी कोणाच्या तोंडावाटे शब्द निघाला नाही. आता बलरामाला स्वतःला आवरणे अशक्य झाले. त्याने रागाच्या भरात रुक्मीला असे बदडले की रुक्मी जागच्या जागी थंड झाला. लाकडी पट उचलून त्याने कलिंग देशाच्या राजाच्या मारला कपाळांत. त्याचे डोके फुटले. इतर लोक बलरामावर तुटून पडले तेव्हां बलरामाने त्यांच्या तलवारींचे तुकडे तुकडे करून टाकले एकेकाला धरून जमिनीवर आपटले. बलरामाचा तो राग पाहून जे जिवंत होते त्यांनी घाबरून पळ काढला.

बलरामाने सभामंडप अशा तऱ्हेने उधळून टाकला आणि परत आल्यावर ते सर्व वृत्त कृष्णाला सांगितले. कृष्ण त्यावर काहीच बोलला नाही. आनंद झाल्याचे किंवा दुःख झाल्याचे त्याच्या तोंडावरून कळण्यासारखे नव्हते. परंतु इतर यादवांनी बलरामाची वाखाणणी केली. त्यानंतर सर्व वधुवरांसह द्वारकेला परत आले.

बलरामाच्या शौर्य व पराक्रमाची कीर्ती जगभर होती. लोक म्हणू लागले की कधी बलराम व भीम दोघांचे द्वंद्व युद्ध होण्याचा प्रसंग आलाच तर त्यात भीमालाच जय मिळेलच असे नक्की सांगता येणे कोणाला शक्य होईल का?

एकदां कृष्णाचा मुलगा सांब दुर्योधनाची मुलगी लक्षणा हिला उचलून घेऊन पळाला. तेव्हां कौरवांनी सांबाचा पाठलाग करून त्याला पकडले व हस्तिनापूरच्या बंदीशाळेत कैदी म्हणून त्याला आणून ठेवले. ते ऐकून बलरामाला राग आला. तो सरळ हस्तिना-पूरला गेला व सांबाला तत्क्षणी सोडून द्यायला त्यानें सांगितले. पण कौरवांनी त्याचे ऐकले नाही.

बलरामाने त्या बद्दल कौरवांची खोड मोडायचे ठरवून सर्व हस्तिनापुराला उचलून गंगेत फेकून देतो अशी प्रतिज्ञा केली व आपल्या नांगराचा फाळ जमिनीत रोवून हस्तिनापूर जमिनीतून उपटून टाकण्याचा यत्न करू लागला.

दुर्योधन घाबरून गेला. सांबाला मुक्त करून कौरवांनी बलरामाचा राग शांत केला. त्याच बरोबर बलरामाचे शिष्यत्व घेण्याचे कबूल करून दुर्योधनाने गुरुपूजा केली. बलरामाने ज्या बाजूने हस्तिनापूर उचलण्याचा यत्न केला होता ती बाजू वर झाली व हस्तिनापूर तसेच वांकडे राहून गेले. दुर्योधनाने बलरामाकडून गदायुद्ध शिकून घेऊन त्यात प्राविण्य मिळविले.



त्याच सुमारास नरकासुर नांवाच्या एका राक्षसाने जगभर धुमाकूळ माजवायला सुरवात केली. प्राग्ज्योतिषपुर येथे त्याची राजधानी होती. तो भूदेवीचा मुलगा होता. त्याला ब्रह्मदेवाकडून वरप्राप्ती झाली होती. त्याला जिंकणे देवांना अशक्य होते. त्याच्या त्रासाने त्रिलोक हादरून गेला.



सर्व प्रथम त्याने इंद्राच्या राजधानीवर, म्हणजे अमरावतीवर स्वारी केली. त्याने मुष्टिप्रहार करून अमरावती कोटाची दारें फोडली आणि सिंहनाद करून स्वतः इंद्राला द्वंद्व युद्धास आव्हान केले. इंद्र ऐरावतावर बसून व वज्रायुध धारण करून समोर येताच नरकासुराने त्याला न भितां त्याच्यावर शस्त्रप्रहार सुरू केला. इंद्राच्या मदतीला यम, कुबेर व वरुण पण आपापले सैन्य घेऊन आले.

तिकडे नरकासुराच्या मदतीला हयग्रीव, त्रिशंभू, मुर नामक तिघे राक्षस वीर आपापले सैन्य घेऊन आले. त्यांत हयग्रीवाशी वरुणाचे युद्ध झाले. त्या वेळीं हयग्रीवाने वरुणाचे डोकेंच फोडले. रक्ताची धार वाहू लागली. तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. शुद्धी आल्यावर तो रणांगणावरून पळून गेला. त्याच्या पाठोपाठ त्याचे सैन्यपण पळून गेले. नरकासुराच्या शस्त्रप्रहारासमोर इंद्र देखील टिकाव धरू शकला नाही व त्याने पण रणांगणावरून पाय काढला. नरक सुराने इंद्रपुरीत प्रवेश करून त्याचा जय झाल्याचे जाहीर केले.

नंतर त्याने इंद्राचे सिंहासन बळकाळले. आणि उर्वशीला बोलावून म्हणाला—"मी सर्व दिक्पालकांना जिंकून आज देवांचा राजा झालो आहे. तेव्हां या पुढे तुला माझ्या अंतःपुरात राहून माझी दासी म्हणून माझी सेवा करावी लागेल."

उर्वशी म्हणाली—"कबूल! पण, ऋषी व मुनी यज्ञ करून जशी इंद्राची आराधना करतात तशी तुझी आराधना करायला तयार असतील तर मी पण तुझी दासी व्हायला तयार आहे."

नरकासुराने ती अट कबूल केली. नंतर त्याने सर्व अमरावती लुटली व उध्वस्त केली. सुमेरु पर्वतात जो रत्नांचा साठा



होता तो सर्व खणून काढला. आठ हजार देवकन्यांना कैद केले. विश्वकर्म्याच्या मुलीला पण बंदी केले आणि आपल्या राजधानींत परत आला.

नरकासुराच्या आज्ञेने राक्षसांनीं चवदा भुवनांत लुटालूट सुरू केली. जी जी मूल्यवान वस्तु मिळे ती आणून ते आपल्या राजाला देऊ लागले. त्यांनी घोर अत्याचार सुरू केला. सर्व अप्सरा, सोळाहजार एकशे गंधर्वकन्या, कित्येक लाख यक्षकन्या, असंख्य किन्नर, सिद्ध, साध्य व विद्याधर स्त्रिया या सर्वांना बंदी करून सर्व राक्षस प्राग्ज्योतिषपूरला आले.

प्राग्ज्योतिषपुराच्या रक्षणार्थ मुर, हयग्रीव निशुंभ व पंचजन हे चार राक्षस चार दिशेला उभे होते. मुरासुराला कित्येक हजार मुलगे होते. त्यांच्या पराक्रमामुळे नरकासुराच्या राजधानीकडे कोणाची वक्रदृष्टी वळणे शक्य नव्हते.

नरकासुराचा गर्व वाढत गेला. त्याने ब्राह्मणांचा छळ सुरू केला व यज्ञ ध्वंस करू लागला. धर्माचा ध्वंस करणे हेच एक ध्येय समोर ठेवून त्याने सर्व पृथ्वी पादाक्रांत केली.



एकदां तो बदरीवनात शिरला. त्यावेळी तेथे ऋषी व मुनी यज्ञ करीत होते. यज्ञ पाहून नरकासुराला उर्वशीची आठवण झाली. त्याने मुनींना विचारले—"तुम्ही हे सर्व कोणाला प्रसन्न करण्यासाठी करीत आहां?"

"आम्ही, वेदांत सांगितल्याप्रमाणे इंद्राची आराधना करण्यासाठी यज्ञ करीत आहो." ऋषी म्हणाले.

ते ऐकून नरकासुर म्हणाला—"मी इंद्राचा व आणि वरुण, यम, कुबेर इत्यादिकांचा पराभव केला आहे आणि मी



त्रिलोकाचा राजा झालो आहे. यापुढे तुम्ही माझी आराधना केली पाहिजे. मी तुमच्या सर्व इच्छा पुऱ्या करीन."

ऋषींनी नरकासुराला उत्तर दिले—

"आम्ही इंद्रालाच आराध्य मानीत आलो आहो व त्याचीच आराधना करीत राहणार. तू दुष्ट राक्षस आहेस. तुझी पूजा किंवा आराधना आम्ही करणार नाही."

ते ऐकून नरकासुराला राग आला. त्याने आपल्या अनुयायांना आज्ञा केली की माझा उपमर्द करणाऱ्या या ऋषींचा यज्ञ ध्वंस करावा. त्याप्रमाणे राक्षसांनी यज्ञ मंडपात शिरून यज्ञ भंग केला. यज्ञ पशूंना ठार केले. उद्गाताला ठार केले. अन्नाच्या राशी पायाखाली तुडविल्या. मुनि-पत्नींचा मानभंग केला. अशा तऱ्हेने बदरी-वनाचा नाश करून नरकासुर प्राग्ज्योतिषपुरी परत आला.

त्यानंतर वशिष्ठ, वामदेव, कपिल, कश्यप जाबाली, भरद्वाज इत्यादी मुनींनी एकत्र बसून विचार केला की अशातऱ्हेने यज्ञ भंग झाला, तर पुढे काय? पतिव्रता मुनिपत्नींचा मानभंग होऊं लागला तर तो कसा काय सहन करावयाचा? अशा दुष्ट राक्षसाचे पारिपत्य करणारा कोणी नाही काय? शेवटी विचार करता त्यांना श्रीकृष्णाची आठवण झाली व ते द्वारकेला निघाले.

सर्व ऋषी दक्षिण दिशेला तीर्थ स्नान करीत तीर्थक्षेत्रातील देवांचे दर्शन करीत भागीरथी नदीच्या काठी आले. भागीरथीत स्नान करून प्रायश्चित केले. नंतर मजल दर मजल करीत स्वर्गाहून सुंदर व वैभव शाली अशा द्वारकापुरीला आले. द्वारकेचे सौंदर्य पाहून कौतुक करीत ते श्रीकृष्णाच्या राजवाड्यात आले आणि कृष्णाला निरोप





त्रिलोकाचा राजा झालो आहे. यापुढे तुम्ही माझी आराधना केली पाहिजे. मी तुमच्या सर्व इच्छा पुऱ्या करीन."

ऋषींनी नरकासुराला उत्तर दिले—

"आम्ही इंद्रालाच आराध्य मानीत आलो आहो व त्याचीच आराधना करीत राहणार. तू दुष्ट राक्षस आहेस. तुझी पूजा किंवा आराधना आम्ही करणार नाही."

ते ऐकून नरकासुराला राग आला. त्याने आपल्या अनुयायांना आज्ञा केली की माझा उपमर्द करणाऱ्या या ऋषींचा यज्ञ ध्वंस करावा. त्याप्रमाणे राक्षसांनी यज्ञ मंडपात शिरून यज्ञ भंग केला. यज्ञ पशूंना ठार केले. उद्गाताला ठार केले. अन्नाच्या राशी पायाखाली तुडविल्या. मुनि-पत्नींचा मानभंग केला. अशा तऱ्हेने बदरी-वनाचा नाश करून नरकासुर प्राग्ज्योतिषपुरी परत आला.

त्यानंतर वशिष्ठ, वामदेव, कपिल, कश्यप जाबाली, भरद्वाज इत्यादी मुनींनी एकत्र बसून विचार केला की अशातऱ्हेने यज्ञ भंग झाला, तर पुढे काय? पतिव्रता मुनिपत्नींचा मानभंग होऊं लागला तर तो कसा काय सहन करावयाचा? अशा दुष्ट राक्षसाचे पारिपत्य करणारा कोणी नाही काय? शेवटी विचार करता त्यांना श्रीकृष्णाची आठवण झाली व ते द्वारकेला निघाले.

सर्व ऋषी दक्षिण दिशेला तीर्थ स्नान करीत तीर्थक्षेत्रातील देवांचे दर्शन करीत भागीरथी नदीच्या काठी आले. भागीरथीत स्नान करून प्रायश्चित केले. नंतर मजल दर मजल करीत स्वर्गाहून सुंदर व वैभव शाली अशा द्वारकापुरीला आले. द्वारकेचे सौंदर्य पाहून कौतुक करीत ते श्रीकृष्णाच्या राजवाड्यात आले आणि कृष्णाला निरोप

चांदोबा



# अरण्यपुराण

[ २२ ]

मौवली मनुष्यांच्या वस्तीत काही दिवस राहून परत अरण्यात आल्यानंतर ही काबाशी त्याची मैत्री पहिल्यासारखीच कायम राहाली. ज्या वेळी माकडे त्याला उचलून त्या पडक्या नगरात घेऊन गेली होती त्या दिवशी काबाने त्याचे रक्षण केले होते, ही गोष्ट मौवली कधी विसरला नाही.

एकदां काबा आपली कात टाकत आहे हे ऐकून मौवली त्याला भेटायला निघाला. कात टाकून झाल्यावर नवीन कात अंगावर चांगली बेईपर्यंत काबा निस्तेज होत असे.

मौवली आता लहान मुलगा राहला नव्हता. अरण्यातील इतर जनावरांप्रमाणे काबाने पण त्याला आपला पुढारी मानले. दुपार झाली. काबा वेटोळे करून बसल्यावर मौवली त्याच्यावर आराम खुर्चीसारखा घेऊन बसला. काबाची लांबलचक कात हातात घेऊन तो पाहू लागला.

"डोक्यावरची कात कशी साफ आहे पहा." मौवली म्हणाला.

"तुझ्या अंगावरचे चामडे जुने झाल्या-वर कधी कडक वाटट होत नाही का!" काबाने विचारले.

"मला तसे काही वाटले की मी आंघोळ करतो. घाम सुटला की पाण्यात डुंबतो. थंडीच्या दिवसात अंग खरखरीत होते. पण पुन्हा मऊ होऊ लागते.

"मी कात टाकतो व आंघोळ सुद्धा करतो. माझी नवी कात कशी आहे!" काबाने विचारले.







मौवली त्याच्या अंगावर हात फिरवीत म्हणाला–" कासवाची पाठ हिच्याहून जास्त टणक असते. पण ती एवढी सुंदर नसते. फुलपाखरांच्या पंखावरच्या रंगासारखे तुझ्या अंगावर कसे सुंदर ठिपके आहेत ?"

"पाण्यांत जाऊन आल्याबरोबर माझे अंग अगदी मऊ होऊन जाते. चल पाण्यात जाऊन थोडा वेळ डुंबू या." काबा म्हणाला.

"मी तुला उचलून नेऊ का ?" असे म्हणत मौवली काबाला पोटाच्याजवळ धरून उचलू लागला. पण ते वजन त्याला का उचलणार ? काबा गंमत पहात होता.

ते दोघे नियमितपणे व्यायाम करीत, कुस्ती खेळत. दोघे परस्परांच्या शक्तीची व युक्तीची परीक्षा करून पहात. दोन्हीत काबाचाच नंबर वर असे. मौवलीचे शरीर हळू हळू वाढत गेले तसतशी शक्ती वाढ-वायला काबानेच त्याला शिकवण दिली. एकदा काबाने मौवलीला पायापासून डोक्या-पर्यंत विळखा घालून त्याला स्वतः सोडवून बाहेर यायला सांगितले. मौवलीने स्वतःचा हात सोडवून घेऊन काबाचा गळा धरून आवळण्याचा यत्न केला. म्हणून काबाचा विळखा सैल केला. काबा जोराने आपले डोके वर उचलून मौवली वर आपटू लागला. मौवली शिताफीने स्वतःचा बचाव करून त्याचे डोके बाजूला ढकलीत होता. पण कधी कधी स्वतःला वाचविणे त्याला कठीण जाई. शेवटी काबाने मौवलीला धरून दूर फेकून दिले. तेव्हा दोघांची कुस्ती संपली. नंतर दोघे एका खडकाळ डबक्यात पोहोत राहाले.

"यातच आनंद आहे. यावेळी मनुष्यांच्या वस्तीत राहणारे मोकळ्या उघड्या हवेत न राहता दारे खिडक्या बंद करून लाकडाच्या फळ्यांवर पडून लोळत असतील. घाणेरडे

नंतर उठून भुयारात पुढे निघालो. तेथे मला एक पांढरा फण दिसला त्याने मला अनेक नव्या गोष्टी सांगितल्या व नव्या वस्तू दाखविल्या." काचा म्हणाला.

"नवे प्राणी आहेत का शिकार करण्या लायक?" मौवलीने विचारले.

"त्यांची शिकार नाही करीत. शिकार करायला गेलास तर सर्व दात पडतील. मनुष्य तर त्याला पाहण्यासाठी धाव घेतील. ती पांढरी फडा आहे." काचा म्हणाला.

"जाऊन पाहून येऊं या. मी तरी कधी काळी मनुष्यच होतो." मौवली म्हणाला

"ठीक ठीक, त्या पांढऱ्या फणाचे वय काय असेल से वाटते तुला! या जंगलाचे जितके वय आहे तितके आहे त्याचे. मी त्याला तुझ्या विषयी सांगितले. तो म्हणाला– "मनुष्याला पाहून एक युग झालं. तुला बोलावून घेऊन यायला त्याने सांगितले आहे. त्याच्याकडे ज्याज्या वस्तू आहेत त्यांच्यावर तू आपला जीव ओवाळून टाकशील बघ." काचा म्हणाला.

"तर मग शिकार करण्यासारखीच वस्तू आहे म्हणावयाची." मौवली म्हणाला.

"मी कोणत्या शब्दात त्यांचे वर्णन करू हे नाही मला कळत." काचा म्हणाला.

"तर मग जाऊ या. मी आजपर्यंत एक देखील पांढरा नाग पाहिला नाही. त्याला पण पाहून येऊ." काचा म्हणाला.

"त्यांच्यात जीव नाही. त्यांचे तो रक्षण करतो म्हणे." काचाने समजूत घालण्याचा यत्न केला.

"चल तर!" असे म्हणत मौवली पाण्याबाहेर आला. दोघे पडक्या गावाकडे निघाले.



# [illegible] जपानांतील तोरण

जपानांतील सुप्रसिद्ध शिंटो मंदिरांच्या द्वारांवर अशा तऱ्हेची तोरणे असतात. चित्रातले तोरण (तोरिंयि) इत्सु कुशिमु तीर्थक्षेत्राचे द्वार आहे. हे तीर्थक्षेत्र ॲटम बॉंब पडल्याने नष्ट झालेल्या हिरोशिमा नगरापासून आग्नेय दिशेकडे आहे. हे तोरण कापराच्या झाडाच्या लाकडाचे आहे. हे तोरण हिरोशिमा खाडीवर पन्नास फूट उंचीवर उभे आहे.



सैन्यांनी मिळून त्यांना रोहिलखंडाबाहेर पिटाळले. परंतु रोहिल्यांनी वचन दिल्याप्रमाणे ४० लाख रुपये दिले नाहीत. हे मिश काढून शुजाउद्दौलाने इंग्रजांच्या मदतीने रोहिलखंडावर स्वारी करून १७७४ मध्ये तो प्रदेश जिंकून आपल्या राज्याला जोडला.

यासंबंधी वॉरन हेस्टिंग्स याने चेतसिंग विषयी जे निर्णय घेतले त्याची ब्रिटीश पार्लमेंटांत पुष्कळ निंदा झाली. वाराणसीचा राजा चेतसिंग हा अवधच्या नबाबाचा एक मांडलिक होता. त्याने १७७५ च्या जुलै महिन्यांत कंपनीशी एक गुप्त संधी केली होती. त्या संधी प्रमाणे त्याने कंपनीचे आधिपत्य स्वीकारून कंपनीला साडे बावीस लाख रुपये देण्याचे कबूल केले होते. १७७८ मध्ये इंग्रज व फ्रेंच यांचे युद्ध सुरू झाले तेव्हां हेस्टिंग्सने चेतसिंगाकडे ५ लाख रुपये जास्त मागितले. त्याने कोणत्याही प्रकारचा विरोध केला नाही व ती रक्कम दिली. हेस्टिंग्स पुन्हा पुन्हा धन मागत गेला व चेतसिंग देत गेला. पुढे हेस्टिंग्सने मागितल्याप्रमाणे तो घोडेस्वारांचे सैन्य पाठवू शकला नाही. या क्षुल्लक कारणावरून त्याला अपराधी ठरवून हेस्टिंग्स स्वतः वाराणसीवर चालून गेला व त्याने चेतसिंगाला कैद केले. चेतसिंगाचे शिपाई खवळले व त्यांनीं हेस्टिंग्सच्या तिघां सेनापतींचा व अनेक सैनिकांचा वध केला. असे काही झाले असेल हे चेतसिंगाला माहीत देखील नव्हते. त्याचा काही दोष नसूनही तो इंग्रजांच्या भीतीने ग्वाल्हेरला पळून गेला.

दरवर्षीं ४० लाख रुपये ब्रिटीश कंपनीला देण्याची कबुली करून घेऊन इंग्रजांनी चेतसिंगाच्या जागी त्याच्या पुतण्याला नेमले.





# दुष्टाचे औदार्य

फार पूर्वी एक राजा होता. त्याला एकच एक मुलगा होता. राजकुमाराबरोबर एक वाण्याचा मुलगा व एक राजपुरोहिताचा मुलगा एकाच गुरुगृही विद्याभ्यास करीत होते. तिघांचे लक्ष विद्याभ्यासाकडे नव्हते.

एकदा राजा युवराजाला बोलवून फार रागावला. ही गोष्ट त्याने आपल्या दोघां सवंगड्यांना सांगितली.

"काय करावे, कळत नाही, माझे वडील देखील आज रागावले मला." अशी दोघांनी आपापल्या वडिलां विषयी तक्रार सांगितली.

"आतां मला नाही राहायचं या गावी. बाबांच्या दररोज शिव्या खाण्या पेक्षा मोकळेपणाने परगावी कोठे रहावे असे मी ठरविले आहे." युवराज म्हणाला.

"तूं निघालास तर आम्ही सुद्धा येऊ तुझ्याबरोबर." राजकुमाराचे दोघे मित्र म्हणाले.

तिघांनी देशभर भ्रमण करावयाचे ठरविले.

"देशभर भ्रमण करायचे म्हणजे पैसे पाहिजेत. नाहीतर उपाशी मरावे लागेल." वाण्याचा मुलगा म्हणाला.

"पैसे किती न्यायचे बरोबर? हिरे माणके बरोबर घेऊन जाऊ या. मी तिघांसाठी एकेक हिरा घेऊन येतो." राजकुमार म्हणाला. त्याप्रमाणे तो तीन हिरे घेऊन ठरल्या जागी आपल्या मित्रांना भेटला. तिघे प्रवासाला निघाले.

फिरत फिरत ते तिघे एका रानात आले. "येथे चोर व डाकू असतील नाहीं.

श्री. काशीनाथ महादेव सोनार



"ते आपल्या जवळचे हिरे घेऊन जातील." वाण्याचा मुलगा म्हणाला.

"प्रत्येकाने एकेक हिरा गिळून टाकावा. मग हे जंगल पार होईपर्यंत आपल्याला कोणाचीच भीती वाटण्याचे कारण नाही." पुरोहिताचा मुलगा म्हणाला.

त्याप्रमाणे तिघांनी तीन हिरे गिळून टाकले.

एका चोराने तिघांचे बोलणे झाडाआडून ऐकले होते. त्यांच्या जवळचे हिरे काही तरी युक्ती काढून बळकावले पाहिजेत हे त्याने मनाशी ठरविले. ते तिघे पुढे निघाल्यावर चोर दुसऱ्या वाटेने पुढे गेला व त्यांच्यासमोर येऊन उभा राहून म्हणाला—"दादा! मी गरीब भिकारी आहे. तुम्ही श्रीमंत सावकार दिसता. तुमची होईल ती सेवा करीन. तुम्ही खाल ती मीठभाकर खाऊन पडून राहीन."

तिघे वयाने लहान होते. जंगलाची वाट. अर्थातच त्यांना भीती वाटत होती. त्यांनी विचार केला एक धडधाकट मनुष्य दिसतो आहे. असा मनुष्य नोकर म्हणून बरोबर असला तर वेळ प्रसंगी उपयोग होईल. म्हणून त्यांनी त्या चोराला बरोबर चलायला सांगितले,

त्या दिवशी संध्या काळी ते एका रानटी लोकांच्या वस्ती जवळ येऊन पोचले. वाट भिल्लांच्या सरदाराच्या झोपडीजवळून जात होती. त्या झोपडीबाहेर एका खांबाला बांधलेल्या पिंजऱ्यात एक राक्षसी पोपट होता. त्या चौघांना त्या वाटेने येत असलेले पाहून पोपट बोलू लागला. तो बोलू लागला याचा अर्थ चौघाजवळ पैसे आहेत असे होते. त्या शिवाय तो कधी बोललाच नसता. म्हणून पोपटाचे बोलणे ऐकून भिल्लाचा सरदार झोपडी बाहेर आला व त्या चौघांना दरडावून म्हणाला—"उभे रहा, एक पाऊल



देखील पुढे टाकलेत तर पहा. तुमच्याजवळ जे काही धन किंवा मूल्यवान वस्तू असेल ती मुकाट्याने माझ्यासमोर ठेवून पुढे चालू लागा. नाही तर माझ्याशी गाठ आहे, लक्षात ठेवा."

त्या तिघांबरोबर जाणारा चोर म्हणाला—"बाबारे आमच्याजवळ काही एक नाही. पाहिजे तर आमची झडती घेऊन पहा."

त्या भिल्ल सरदाराने त्या तिघांची लक्षपूर्वक झडती घेतली. त्या तिघांजवळ त्याला काही मिळाले नाही. मग पोपट कां बोलला त्याला कळेना. म्हणाला "बरे तर तुम्ही जा."

ते चालू लागल्यावर पोपट आणखी जोरजोराने ओरडू लागला, जणुकाही त्याचा पिंजराच कोणी उचलून घेऊन चालला आहे. आता मात्र भिल्ल सरदाराला वाटू लागले की खात्रीने या तिघांकडे काही तरी असलेच पाहिजे. त्यांनी ते लपवून ठेवले आहे. असा विचार करून भिल्लाने आपल्या नोकरांना बोलावून त्या चौघांना झोपडीत कैद करून ठेवायला सांगितले व म्हणाला—"रात्री घरी परत आल्यावर मी येतो यांच्या समाचाराला."



"भिल्लांनी त्या चौघाना एका गोलाकार झोपडीत कोंडून ठेवले. त्या झोपडीला एकच दार होते. ते त्यांनी बाहेरून बंद केले.

दरवाज्या बाहेर भिल्ल भाले घेऊन पाहारा देत होते. मध्यरात्रीच्या सुमारास भिल्ल सरदार परत आला. त्याने झोपडीचे दार उघडले व कैद्यांना म्हणाला—"तुम्ही पैसे किंवा काही मूल्यवान वस्तु लपवून ठेवली आहे, यात मला शंका नाही. तुमच्या अंगाखांद्यावर काही दिसत नाही. कोठे आहे ते खरे खरे सांगा नाही तर एकेकाचे पोट चिरून काढायला सांगेन."










चोराला वाटले की भिल्लांचा सरदार जे म्हणतो आहे ते करायला मागे पुढे पाहणार नाही. आपल्या पोटात काही नाही. या तिघांच्या पोटात हिरे आहेत. सरदार त्या तिघांपैकी प्रथम कोणाचे तरी पोट चिरून पाहणार. हिरा सापडला की एकेकाचे पोट चिरणार. आपण तरी कसे सुटणार ? तो सर्वांचा जीव जाणार हे निश्चित. पण समजा, त्याने सर्वात आधी आपलेच पोट चिरले तर त्याला आत काही मिळणार नाही आणि आपला जीव गेला तरी तिघांचा तरी जीव वांचेल.

असा विचार करून तो साहस करून म्हणाला—"सरदार ! आमच्याजवळ काही एक नाही हे आम्ही तुला सांगितले. तुझा आमच्यावर विश्वास नसेल तर पहा, माझे पोट चिरून."

भिल्लांच्या सरदाराला जास्तच राग आला. त्याने कंबरेची कट्यार काढून चोराचे पोट चिरले. चोर जागच्या जागी ठार झाला. त्याच्या पोटांतून सरदाराला रत्तीभर सोने देखील मिळाले नाही. आपण विनाकारण एका गरिबाचे पोट चिरून त्याचा जीव घेतला असे सरदाराला वाटले. आपल्या हातून या पोपटामुळेच हा दुष्टपणा घडला असे वाटून सरदाराने मनातल्या मनात पोपटाला शिव्या दिल्या व त्या तिघांना सोडले.

त्यानंतर त्या तिघांना प्रवासाची भीती वाटू लागली. ते परत त्याच वाटेने आपल्या गावी आले. त्यानंतर त्यांनी आपापल्या वडिलांच्या व मोठ्यांच्या आज्ञे-प्रमाणे विद्याभ्यास करून पुढे नाव लौकिक मिळविला.





# पडकें देऊळ

[ ४ ]

[ पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला शोधार्थ शिखीमुख व विक्रमकेसरी दोघे वेगवेगळ्या दिशेने निघाले. शिखीमुखने आमराईत पाऊल टाकल्याबरोबर त्याच्या पायात एकदम दोरीचा फास पडला आणि त्याला झाडाला उलटे टांगण्यात आले. पुजाऱ्याला शिखीमुखने भाला मारण्याचा अयशाची यत्न करून पाहिले. नंतर त्याला ठार करण्यासाठी पुजाऱ्याचे अनुयायी धावले—पुढे ]

पुजाऱ्याच्या अनुयायांनी शिखीमुखवर भाले रोखले तेव्हां आपले मरण जवळ आल्यासारखे त्याला क्षणभर वाटले. परंतु त्याचा धीर खचला नाही. रानात राह-णारा, अस्वलांवाघांची शिकार करणारा तो, असा भितो का ! उलट मरणापूर्वी या दुष्टां-पैकी एका दोघाला ठार करावे असे त्याने मनाशी ठरविले. त्याने शबरमातेचा एकदा जयजयकार करून क्षणार्धात त्याच्या पायाला जी दोरी बांधली होती तिचा नेम धरून भाला मारला. दोरी अर्धी अधिक तुटली व उरलेली त्याच्या वजनाने तुटली. तो थोडा देखील असावध राहाला असता तर त्याचे डोके जमिनीवर आपटले असते



व त्याला कपाळमोक्ष मिळाला असता. परंतु त्याने माकडासारखी उडी मारली व तोल जाऊ नये म्हणून जमिनीत भाला रोवला.

त्याचे ते चकित करून सोडणारे साहसाचे काम पाहून पुजाऱ्याचे अनुयायी जागच्या जागी थबकले. त्यांपैकी एकाच्या तोंडून शिखीमुखच्या त्या साहसाचे कौतुक करणारे हे शब्द पडलेच—“हा रानटी माणूस असला तरी पहा, किती हुशार दिसतो आहे. असला मनुष्य आपला टोळीत सामील झाला तर आपली सर्व कामे फत्ते होतील.”

“हा मनुष्य नसून माकड आहे रे, जमिनीला पाय लावल्या शिवाय हा आकाशांत उडत विन्ध्य पर्वतापर्यंत जाईल. पाहता काय करा ठार याला.” दुसरा म्हणाला.

काही वेळ पुजाऱ्याचे अनुयायी किंकर्तव्य विमूढ स्थितीत जागच्या जागी उभे राहाले. कोणी त्याला भाला मारला नाही. त्यामुळें शिखीमुखला चांगलीच संधी मिळाली. त्याने एकाच्या गुढघ्याला जोराने लाथ मारली व तो खाली पडणार इतक्यात त्याच्या आडून निसटून पळून गेला.

पुजाऱ्याचे अनुयायी शिखीमुख पळून जात असलेला पहात होते. पण त्यांच्या पैकी एकाने देखील त्याला अडविलें नाही. कोणी त्याच्यावर भाला फेकला नाही की तलवारीचा उपयोग केला नाही. शिखीमुख थोडेच अंतर चालत गेला असेल, इतक्यात पुजाऱ्याचे अनुयायी एकदम ओरडले—“अरे पहा, तो पळाला, धरा, ठार करा त्याला.” आणि त्याला चारी बाजूंनी धरण्यासाठी धावले.

त्याच वेळी दुरून एक शिट्टी झाली. ती पुजाऱ्याने वाजवलेली खुणेची शिट्टी होती. ती ऐकून एक जण म्हणाला—“पुजारी बोलावीत आहेत. चला, काही तरी जास्त जरूरीचे काम असेल.”

“अरे होय, पण या शबर पोराला असेच सोडून द्यायचे? त्याला धरून न्यायचे नाही का?” एकाने शंका केली.

या प्रश्नाचे उत्तर दुसरा देणार इतक्यात त्यांना तांबड्या कुत्र्याचे जोर जोराने भुंकणे ऐकू आले व त्याच्या पाठपोठ शबरांचा आवाज ऐकू आला. विक्रमकेसरी—“शिखीमुख! शिखीमुख!” अशा हाका मारीत त्याच बाजूला धावत येत असलेला दिसला.

यावेळी पुजाऱ्याची शिट्टी जास्त जोराने ऐकू आली. ही धोक्याची सूचना होती. ती ऐकून चोर जखमी होऊन पडलेल्या एका दोघा साथ्यांना खांद्यावर उचलून घेऊन पळाले.

शिखीमुखने तांबड्या कुत्र्याला जोराने हाक मारली. त्याचा आवाज ओळखून कुत्रा त्याच्या जवळ धावत येऊन उभा राहाला. त्याच्या पाठीमागून विक्रमकेसरी व चार पांच शबर जातीचे लोक पण येऊन पोचले.

“तू संकटात सापडला असावास व तुझ्या जिवाला धोका असावा अशी माझी समजूत होती.” विक्रमकेसरी शिखीमुखला म्हणाला.



“मी खरोखरच एका मोठ्या संकटात सापडलो होतो. भाग्य बलवत्तर म्हणूनच वाचलो. ते दुष्ट याच जंगलात दबा धरून बसले होते व मला एकटा पाहून माझ्यावर तुटून पडले. मला उलटा झाडाला टांगून ठार करण्याच्या विचारात होते ते. ते सर्व मी सवडीने सांगेन. प्रथम आपल्याला त्या दुष्टाची लपून बसण्याची जागा कोणती हे हुडकून काढले पाहिजे. एक दोघेच का असेत ना, त्यांचा पाठलाग करून उजाडण्या पूर्वी या सर्वांचा संहार केला पाहिजे.” शिखीमुख म्हणाला.











“रानात हे लोक कोठे राहातात या गोष्टीची माहिती काढायला आपण दोघे पुरे आहोत. त्यांचा वास घेऊन वाट दाखवायला कुत्रा आहेच बरोबर. उजाडे-पर्यंत आपल्या वस्तीतले लोक येतीलच मदतीला.” असे सांगून विक्रमकेसरी शबर अनुयायांकडे वळून म्हणाला—“आता तुम्ही परत फिरा. त्या दुष्टाचे अनुयायी वस्तीला आग लावायला पुन्हा येतील कदाचित. आम्ही दोघे त्या दुष्टांचा माग लावून येतो. कोणी तरी एक जण येऊन कळवील.”

शबर अनुयायी परतले. शिखीमुख व विक्रमकेसरी रानात शिरले. पुढे कुत्रा जमीन हुंगत वाट दाखवीत चालला होता. कुत्रा चोर कोठे लपून बसले आहेत नक्की वाट दाखवू शकेल यात दोघांना शंका उरली नाही. कुत्रा त्यांना रानातल्या एका डोंगर-वजा उंचवट्यापर्यंत घेऊन आला. एका मोठ्या झाडाजवळ उभा राहून काही वेळ जमीन हुंगून पहात राहाला. नंतर झाडाच्या चारी बाजूला दोन तीनदा घिरट्या घालून वर झाडाकडे पाहू लागला.

विक्रमकेसरीला कुत्र्याची ती हालचाल आश्चर्याची वाटली. तो काही बोलणार इतक्यात शिखीमुखने त्याला खुणेने चुप करून झाडावर फांद्यांच्या आड लक्षपूर्वक पाहिले. तेथे पानाच्या आड लपून बसलेली एक माणसाची आकृती त्याला दिसली. तो पुजाऱ्याचा अनुयायीच असावा याबद्दल शिखीमुखला थोडी देखील शंका नव्हती. तो झाडाच्या फांदीच्या आधारे स्वत:ला बांधून घेऊन चित्त झोपला होता. त्याच्या कमरेला एक तलवार लोंबत होती.

शिखीमुखने तिकडे बोटाने खूण करून विक्रमकेसरीला दाखविले व हळूच म्हणाला—



“विक्रम! हा पुजाऱ्याचा पाहारेकरी दिसतो आहे. याला पुजाऱ्याने झाडावर लपून राहून येणारा जाणारावर नजर ठेवायला सांगितले असेल. परंतु बिचारा रात्रभर जागत राहून आता घोरत पडला असावा.”

“याला जिवंत पकडून नेले पाहिजे. याच्या मदतीने पुजाऱ्याचे सर्व गूढ कळेल.” विक्रमकेसरी म्हणाला.

“त्याला नुसते पकडून काय उपयोग? हा ओरडला तर पुजाऱ्याला कळेल की आपण येथवर आलो आहो. सूर्योदयाची वेळ झाली. तू झाडाखालीच रहा. मी चाहूल दिल्याशिवाय झाडावर चढून जातो व त्याला खाली ओढून घेऊन येतो.” असे सांगून शिखीमुखने रानटी वेलींची वळून एक दोरी घेतली व आपली चाहूल दिल्याशिवाय झाडावर चढून गेला. एका हाताने पुजाऱ्याच्या नोकराचा कंठ आवळून दुसऱ्या हाताने त्याच्या छातीवर भाला रोखला.

तोंपर्यंत सूर्योदय झाला होता. पाहरेक-ऱ्याने दचकून डोळे उघडून पाहिले तर डोळ्यासमोर त्याला भाल्याचे चकाकणारे पाते दिसले. तो अंग हासडून ओरडणार इतक्यात शिखीमुखने त्याचा गळा आवळून



म्हटले—“ओरडलास तर भाला आरपार गेलाच समज. जीव हवा असेल तर तोंडा वाटे चकार शब्द काढल्याशिवाय झाडावरून खाली ये. असे सांगून शिखीमुखने त्याच्या म्यानेतली तलवार काढून घेतली. त्या असहाय स्थितीत पुजाऱ्याच्या अनुयायाला खाली उतरून येणेच भाग होते.

शिखीमुखने खाली आल्यावर पुजाऱ्याच्या अनुयायाला झाडाला टेकून बसवले आणि विचारले—“तू त्या पुजाऱ्याचा नोकर आहेस ना? खरे बोलला नाहीस तर हा लाल कुत्रा करवी तुला फाडून खाववीन. खरे



सांग या डोंगरातल्या कोणत्या गुहेत तो राहतो.

बिचारा नोकर घाबरून जाऊन थरथर कापत होता. म्हणाला—"या गरिबाला वाचवा. मी खरे तेच सांगतो. पुजारी या डोंगरात राहतात, पण एकाच गुहेत रहात नाहीत. काल संध्याकाळी भुतासारख्या त्या मोठ्या दगडाआड गुहा आहे, तिच्यात लपून बसले होते. आता ते तेथेच आहेत की नाही हे नाही मला माहीत.

"तू खरे बोलतो आहेस ना?" शिली-मुखने दरडावून विचारले.

"पुजारी लुच्चा व लबाड आहे. त्याचा नोकर निराळा कसा असणार! लाल कुत्र्याला सोड त्याच्या अंगावर." विक्रम-केसरी म्हणाला.

शिलीमुखने 'छू' म्हटल्याबरोबर कुत्र्याने त्या पाहरेकऱ्यावर झडप मारली. त्याच्या छातीवर पाय ठेवून त्याच्या कंठाचा लचका तोडू का, जणु काही हेच विचारण्यासाठी त्याने आपल्या मालकाकडे वळून पाहिले.

"अरे, हा कुत्रा नसून नुसत्या खुणेवर काम करणारा मनुष्यच आहे." विक्रमकेसरी म्हणाला.

पुजाऱ्याच्या नोकराने ओरडण्यासाठी तोंड उघडले इतक्यात त्याच्यावर भाला रोखून शिलीमुख म्हणाला—"ओरडू नकोस. खरे बोललास तर कुत्रा काही करणार नाही."

"मी खरेच सांगितले. मला वाचवा." पाहरेकरी हात जोडून रडू लागला.

त्याच्या डोळ्यांत पाणी आलेले पाहून विक्रमकेसरी म्हणाला—"शिलीमुख हा खरे बोलतो आहे. चल आपण त्या गुहेत डोकावून पाहू या. पुजारी आपल्या नोकरांना तरी खरे सांगेलच कशावरून! याला देखील सर्व माहीत नसावे."

शिखीमुखने लाल कुत्र्याला आवरले व त्या पाहरेकऱ्याला म्हणाले–"आम्ही तू सांगतो ते खरे आहे की नाही, हे पाहून येतो. तोंपर्यंत तुझ्या तोंडांत बोळे कोंबून तुला येथे झुडपांत बांधून ठेवतो. परत आल्यावर तुला सोडवू." असे सांगून दोघांनी त्याच्या तोंडात कपडे कोंबले. वेलांच्या दोरीने त्याला गाठोड्यासारखे बांधले व त्याचे मुटकुळे करून एका झडपाआड त्याला नेऊन ठेवले.

त्यानंतर दोघे लाल कुत्र्याला घेऊन चोराने सांगितलेल्या गुहेकडे निघाले. कुत्रा जमीन हुंगत पुढे चालत होता. वाटेत त्यांना पावलांची चिन्हे दिसली. ती पाहून दोघे थोडे दूर पुढे गेले. तेव्हां त्यांना चारपांच जण मिळून जाण्या लायक एक डोंगरी रस्ता व रस्त्याच्या मधोमध एक लाकडी पुतळा दिसला. त्या पुतळ्याच्या हातात रक्ताने माखलेला त्रिशूळ होता.

विक्रमकेसरी तो पुतळा पाहून चकित झाला. तरी न भिता पुढे निघाला. त्याला शिखीमुखने अडवले व म्हणाला–"त्याच्या हातातला तो त्रिशूळ पाहिलास ना! रक्ताने माखलेला आहे. त्याच्या पाया खालून गुहेत आपल्याला जावे लागेल.

ते दोघे बोलत होते व तिकडे लाल कुत्रा त्या पुतळ्या जवळ जाऊन त्याच्याकडे पहात काही वेळ उभा राहिला. नंतर त्याच्या पाया खालून पलीकडे जाऊ लागला. इतक्यात तो पुतळा जोर जोराने हालू लागला. त्याच्या हातातला त्रिशूल विजेच्या वेगाने जमिनीकडे 'झूम' असा आवाज करीत खाली जाऊ लागला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# खरा शिष्य

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे काही बोलल्याशिवाय स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुला पाहून मला अयोध्येचा राजा धर्मपाल हा आठवतो. राज्याची सर्व कामे सोडून देऊन त्याने देखील पुष्कळ कष्ट सहन केले होते. तुला हे कष्ट सहन करणे हलके व्हावे म्हणून मी त्याची गोष्ट सांगतो, ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

अयोध्येचा राजा धर्मपाल हा विद्वान व अभ्यासू होता. राज्यकारभाराची सर्व कामे संभाळून तो विद्वानांची सभा बोलवी व त्यांच्या बरोबर तत्वज्ञाना विषयी विचार





विनिमय करी. हळू हळू त्याला वाटू लागले की ज्ञान हे अगाध आहे आणि गुरूकृपेशिवाय ज्ञानप्राप्ति अशक्य आहे.

म्हणून धर्मपालाने आपल्या राज्यात दवंडी पिटविली की "कोणी सद्‌गुरू नाही काय?" या दवंडीचा अर्थ काय हे कोणाला कळेना. परंतु राजधानी बाहेर एका झोपडीत राहणाऱ्या एक महाराने दवंडी पिटवणाऱ्याला जवळ बोलावून राजाने त्याला जी दवंडी पिटायला आज्ञा केली होती त्या ऐवजी अशी दवंडी पिटण्यास सांगितले, 'खरा शिष्य कोणी नाही.'

दवंडी पिटणारा त्या प्रमाणे दवंडी पिटीत परत राजवाड्याजवळ आला. राजाने त्याला जवळ बोलावून तशी दवंडी पिटायला त्याला कोणी सांगितले हे विचारले.

तो म्हणाला—"महाराज, आपल्या आज्ञे-प्रमाणे दवंडी पिटत मी राजधानीबाहेर महारवाड्याकडे गेलो तेव्हां झोपडीतून एक मनुष्य बाहेर आला व आपल्या आज्ञेने मी दवंडी पिटत आहे हे कळल्यावर त्याने मला अशी दवंडी पिटायला सांगितले."

राजा त्या महाराच्या घराच्या खाणा-खुणा सर्व विचारून घेऊन रात्री वेष पालटून त्या झोपडीजवळ गेला व बाहेरून दाराची कडी वाजवली. आतून त्या महाराने विचारले—"कोण आहे?"

"मी महाराज धर्मपाल! 'खरा शिष्य नाही' अशी दवंडी पिटायला तुम्हीच नव्हते का सांगितले?" राजाने विचारले.

"होय, मीच सांगितले होते." आतून तो महार म्हणाला.

राजाने त्या महाराला नमस्कार केला व म्हणाला—"महात्मन्! मी आपले शिष्यत्व ग्रहण करण्यासाठी आलो आहे. आपण गुरु उपदेश करावा."











झाला तुमच्या हाती विकत आहे. मला वाटेल तेव्हां येऊन दहा सुवर्णमुद्रा परत करून मी याला बरोबर घेऊन जाईन. तुम्हांला ही अट कबूल असेल तरच याला विकत घ्यावे."

त्या वेश्येने ती अट कबूल केली आणि धर्मपालाला घेऊन आपल्या घरी परत गेली.

त्या दिवसापासून धर्मपाल वेश्येच्या घरा बाहेरच्या ओट्यावर बसून राही व ती जे काही सांगे ते 'गुरूची आज्ञा' मानून करी. त्याला जे खायला मिळे ते खाऊन रात्रंदिवस, पावसाळा असो, हिवाळा असो की उन्हाळा, त्याच ओट्यावर पडून राही. आपल्या आज्ञाधारी नोकराचे वेश्या कौतुक करी. ती व तिची मुलगी दोघींची धर्मपालावर फार मर्जी बसली. परंतु धर्मपालाच्या हृदयाला वेश्या किंवा तिची मुलगी दोघी पैकी एकीचाहि विचार शिवला नाही. गुरूची आज्ञा म्हणून तो सर्व कष्ट सहन करी.

एकदा पहाटे मुसळधार पाऊस पडत होता. नित्याप्रमाणे उठून त्याने तोंड धुवून चूळ भरून थुंकली. ती नेमकी त्या वेश्येच्या अंगावर पडली. काळोख असल्यामुळे वेश्या आलेली त्याला दिसली नाही.

ती घाई घाईने घरात गेली. मुलीला उठवले व म्हणाली—"पाहिलेस, हा नोकर कसा माजला आहे तो. माझ्या अंगावर तो आज थुंकला."

मुलीने किलकिले डोळे करून आईला पाहिले व चकित होऊन म्हणाली—"आई! तूच का! किती ग बदल झाला आहे."

वेश्येने आरशांत आपले तोंड पाहिले. तिचे वार्धक्य जाऊन तिच्या अंगात तारुण्य मुसमुसून आलेले तिला दिसले.

मायलेकींनी चकित होऊन विचार केला व त्या नोकराच्या उष्ट्या पाण्यामुळेच हा बदल झाला असल्याची दोघींची खात्री पटली. मुलीने त्याच्याशीच आपण लग्न करणार असा आपल्या मनाशी निर्धार करून आईला ते सांगितले. आईला पण ती गोष्ट पसंत पडली.

उजाडण्याच्या सुमारास पाऊस थांबला. वेश्या बाहेर आली व धर्मपालाला म्हणाली—"या घरात या. तेल लावून आंघोळ घालते."

"गुरूची आज्ञा!" असा विचार करून तो घरात गेला. त्याला तेल लावून आंघोळ घालण्यात आली, व अंगात घालायला उंची वस्त्रे देण्यात आली.

रात्री लग्नाची तयारी होती. त्याची मालकीण त्याला सांगे ते तो 'गुरूची आज्ञा' मानून करी.

पुरोहिताने सांगितल्याप्रमाणे वेश्येने धर्मपालाला मुलीच्या गळ्यात मंगळसूत्र बांधायला सांगितले. धर्मपाल ती गुरूची आज्ञा मानून मंगळसूत्र बांधणार इतक्यात महार तेथे आला व म्हणाला—"थांब!"

नंतर तो वेश्येकडे वळून म्हणाला—"हा घे तुझ्या दहा सुवर्णमुद्रा आणि मी माझ्या शिष्याला बरोबर घेऊन जातो." असे



सांगून त्याने वेश्येच्या हातात दहा सुवर्णमुद्रा ठेवल्या.

धर्मपाल बोहोल्यावरून खाली उतरला आणि त्याने आपल्या गुरूच्या पायावर डोके ठेवून त्याला साष्टांग नमस्कार केला

काही अंतर दोघे बरोबर चालत होते. महाराने धर्मपालाला श्रद्धा व भक्तिपूर्वक नमस्कार केला व म्हणाला—"महात्मन्! मला वाटत होते की मला योग्य शिष्य मिळणार नाही. परंतु तू एक योग्य शिष्य आहेस हे सिद्ध झाले. आता तू मोकळा आहेस. तू आपल्या वाटेने जा व मी

       

आपल्या वाटेने जातो." असे सांगून महार निघून गेला.

धर्मपाळ सरळ रानात निघून गेला. कंदमुळे व फळें खाऊन तपश्चर्या करीत त्याने उरलेले आयुष्य सार्थक केले.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! मला एका गोष्टीची शंका वाटते. त्या महाराने धर्मपाळाला इतके कष्ट दिले, पण त्याला उपदेश असा काही न देता तो निघून गेला. या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–"धर्म-पालाला नवीन उपदेश करण्यासारखे काही नव्हतेच. कारण त्याने वेद वेदांगाचा अभ्यास केला होता व विद्वत् सभेत व तत्व चर्चेत भाग घेतला होता. फक्त मोठमोठे सिद्धांत व तत्वे अमलात कशी आणावी एवढेच त्याला हवे होते. त्याच्या मनाच्या असमाधानाचे मुख्य कारण तेच होते. त्या महार गुरुने धर्मपाळाच्या मनात जो थोडा राजसी गुण व अभिमान उरला होता तो प्रथम दूर केला. त्यानंतर धर्मपाळाला दासवृत्ति कशी निभावून घ्यायची ह्याचे शिक्षण मिळाले. म्हणून निराळा उपदेश करण्यासारखे काही उरलेच नव्हते. म्हणून त्याने गुरु उपदेशाचा आग्रह पण दाखविला नाही व काही बोलल्याशिवाय रानात तपश्चर्येला निघून गेला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





त्याला एक दिव्य सिद्धी प्राप्त होणार हे पाहून त्याच्या मनाचा जळफळाट वाढला. म्हणून त्याने, विजयला सिद्धी मिळविण्याची विद्या शिकविण्याची व्यवस्था जेथे करण्यात आली होती त्या वाड्याच्या भिंतीला एक भोक पाडून गुप्त पणे विद्या शिकून घेतली.

योगी निघून गेल्यावर एकदा विजय व गुणनिधि दोघे फिरत फिरत रानात निघून गेले. वाटेत गुणनिधीने विजयला विचारले— "मित्रा! गुरूने कोणती विद्या तुला शिकवून दिली रे?"

"परकायसिद्धी." विजय म्हणाला.

"असं होय! ती विचित्र विद्या मला नाही का शिकविणार?" गुणनिधीने विचारले. विजयने काहीच उत्तर दिले नाही. थोड्या वेळाने दोघे रानात जास्त आत गेल्यावर त्यांना तेथे एक मेलेला पोपट दिसला. तेव्हां गुणनिधीने तो पोपट दाखवून विजयला विचारले—"या पोपटाच्या शरिरात तुला शिरता येईल का रे?"

"स्वतःच्या डोळ्यानीच पाहिजे तर पहा!" विजय म्हणाला आणि एका झाडाला टेकून बसला. थोड्या वेळाने पोपट उडू लागला व विजयचा निष्प्राण देह खाली झाडाजवळच राहून गेला. गुणनिधीच्या मनावर काय परिणाम होतो हे पोपट रूपे विजय पहात असता, गुणनिधी विजयच्या देहात शिरला व त्याने स्वतःच्या निष्प्राण देहाचे तलवारीने दोन तुकडे करून टाकले. पोपट रूपात विजय हे सर्व पहात होता.

गुणनिधीचा दुष्ट पणा विजयने प्रत्यक्ष आपल्या डोळ्याने पाहिला. जास्त वेळ न थांबता तो सरळ आपल्या राजवाड्याच्या महालात पोचला व अंतःपुरात जाऊन त्याने सर्व वृत्त आपल्या पत्नीला सांगितले व म्हणाला—"मला तू कोठे तरी लपवून ठेव



व माझा देह धारण करून येणाऱ्या दुष्ट गुणनिधीपासून स्वतःचे रक्षण कर."

जयाने त्याप्रमाणे पोपटाला एका जागी लपवून ठेवले.

थोड्या वेळाने गुणनिधी आला. विजयच घरी परत आला असेच सर्वांना वाटले. त्याने आपले वडील राजाचे मंत्री यांना सर्व वृत्त सांगितले व म्हणाला—"माझ्या मृत देहाचे दोन तुकडे रानात एका जागी आहेत. तो देह आणून अन्त्यविधी उरकून टाकावा. नंतर मी व तुम्ही दोघे मिळून राज्यसुख भोगू."

मंत्री सुशील व राजभक्त होता. त्याला राज्याचा मोह नव्हता. म्हणून त्याने मुलाला काहीच उत्तर दिले नाही व मौन धारण केले.

गुणनिधी अंतःपुरात निघाला. परंतु दासींनी त्याला वाटेत अडविले व म्हणाल्या— "राणी सरकारांनी एक व्रत आजच सुरू केले आहे व त्यांनी कोणाला भेटायला येऊ देऊ नये असे सांगितले आहे."

गुणनिधी चपापला. त्याला संशय आला की कदाचित आपले कारस्थःन राणीला कळले तर नाही. परंतु तो काही बोलला नाही. आपले स्वतःचे कारस्थान पुढे देखील



यशस्वी व्हावे या साठी त्याने गावात मोकळे सुटलेले पोपट मागवून त्यांची मुंडी पिळवटून त्यांना ठार केले.

अर्थातच जयाला ही गोष्ट कळली व पोपटाच्या रूपे तिच्या पतीने सांगितलेल्या गोष्टी बद्दल तिच्या मनात थोडी देखील शंका उरली नाही. तिने आपल्या पतीच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था केली आणि युव-राजाच्या देहात प्रवेश करून बसलेल्या गुणनिधीकडे निरोप पाठविला की व्रत संपले आहे व आता येण्यास हरकत नाही. निरोप ऐकून गुणनिधी धावतच आला.

जया वरकरणी आनंद दाखवून गुण-निधीला स्मित करून म्हणाली—" आजच माझे व्रत संपले. ब्रह्मभोज करण्याची व्यवस्था करावी. सहस्र ब्राह्मणांस निमंत्रणे पाठवावीत."

"एवढेच ना?" असे ऐटीत म्हणून त्याने एक सहस्र ब्राह्मणांना जेवणाची निमंत्रणे पाठविली.

ब्राह्मण जेवायला बसले असता एक मेलेला कावळा येऊन मधोमध पडला. जयाच्या दासींनी पूर्वी ठरल्याप्रमाणे ही व्यवस्था केली होती.

सर्व ब्राह्मण पानावरून उठू लागल्या-बरोबर जयाने पुढे होऊन सर्वांना पानावर बसून राहण्यास विनंती केली व गुणनिधीला बाजूला बोलावून म्हणाली—" तुम्ही 'परकाय-सिद्धी' शिकून घेतली आहे ना? त्याचा प्रयोग आताच करायला हवा."

गुणनिधीने आपले शरीर एका खोलीत सोडले व कावळ्याच्या शरिरात प्रवेश करून दूर उडून गेला. नंतर ब्रह्मभोज निर्विघ्न पार पडला.

विजयला ती संधी मिळाली. तो स्वतःच्या देहात प्रवेश करून जयाकडे आला व म्हणाला—" सुटलो त्या दुष्टाच्या हातून."

ब्रह्मभोज संपल्यावर गुणनिधि जयाजवळ कावळ्याच्या रूपाने आला. तिने त्याला धरून पिंजऱ्यात ठेवले. विजय स्वतःच्या शरिरात प्रवेश करून राहू लागल्याचे गुणनिधीला कळले. त्याला कृतकर्माची फळे चाखावी लागली.

जया कावळ्याला पोपटासारखी का पाळीत आहे, हे मात्र कधी कोणाला कळले नाही.





# खरी गोष्ट

चित्रपुरी नामक राज्याचा राजा चतुरवर्मा आपल्या नावाला साजेल असाच चतुर व हुशार होता. तो एक प्रजावत्सल राजा होता. प्रजेचे कष्ट सुख ओळखून घेण्यासाठी तो वेष पालटून राज्यभर हिंडे व फिरे.

एकदा राजा आजारी पडला आणि स्वतः हिंडून प्रजेचे कष्ट सुख ओळखून घेणे त्याला शक्य झाले नाही. म्हणून आपल्या मंत्र्याला व सेनापतीला जवळ बोलावून तो म्हणाला—" तुम्ही दोघे वेष पालटून राज्यात कोठे काय होत आहे हे पाहून या."

राजाज्ञेप्रमाणे दोघे निघाले. हिंडत हिंडत ते सिंगवरम् या गावी आले. गावा-बाहेर एका डोंगरी ओढ्याचे पाणी पिऊन व घोड्यांना पाजून त्यांना झाडाला बांधून ठेवले, आणि पायीच गावात निघाले.

रात्रीची वेळ होती. परंतु एका घराच्या ओट्यावर दोन लहान मुले कोणाची तरी वाट पहात बसल्यासारखी दिसली. सर्व गाव गाढ झोपी गेले असता ती दोन मुले जागीच होती. ते पाहून मंत्र्याला व सेना-पतीला आश्चर्य वाटले. मंत्र्याने पुढे होऊन त्यांना विचारले—" बाळांनो! रात्रीच्या या वेळी तुम्ही येथे काय करीत आहां?"

"सूर्याची वाट पहात आहो." दोघा-पैकी एक जण म्हणाला.

ते उत्तर मंत्र्याला विचित्र वाटले.

"घरात कोणी मोठे नाही का?" सेनापतीने विचारले.

"जळत असलेल्या लाकडावर विष टाकून काळोखाशी युद्ध करण्यासाठी सूर्य गेला आहे ना." दुसरा मुलगा उत्तरला.

जया वरकरणी आनंद दाखवून गुणनिधीला स्मित करून म्हणाली—"आजच माझे व्रत संपले. ब्रह्मभोज करण्याची व्यवस्था करावी. सहस्र ब्राह्मणांस निमंत्रणे पाठवावीत."

"एवढेच ना!" असे ऐटीत म्हणून त्याने एक सहस्र ब्राह्मणांना जेवणाची निमंत्रणे पाठविली.

ब्राह्मण जेवायला बसले असता एक मेलेला कावळा येऊन मधोमध पडला. जयाच्या दासींनी पूर्वी ठरल्याप्रमाणे ही व्यवस्था केली होती.

सर्व ब्राह्मण पानावरून उठू लागल्या-बरोबर जयाने पुढे होऊन सर्वांना पानावर बसून राहण्यास विनंती केली व गुणनिधीला बाजूला बोलावून म्हणाली—"तुम्ही 'परकाय-सिद्धी' शिकून घेतली आहे ना! त्याचा प्रयोग आताच करायला हवा."

गुणनिधीने आपले शरीर एका खोलीत सोडले व कावळ्याच्या शरिरात प्रवेश करून दूर उडून गेला. नंतर ब्रह्मभोज निर्विघ्न पार पडला.

विजयला ती संधी मिळाली. तो स्वतःच्या देहात प्रवेश करून जयाकडे आला व म्हणाला—"सुटलो त्या दुष्टाच्या हातून."

ब्रह्मभोज संपल्यावर गुणनिधि जयाजवळ कावळ्याच्या रूपाने आला. तिने त्याला धरून पिंजऱ्यात ठेवले. विजय स्वतःच्या शरिरात प्रवेश करून राहू लागल्याचे गुणनिधीला कळले. त्याला कृतकर्माची फळे चाखावी लागली.

जया कावळ्याला पोपटासारखी कां पाळीत आहे, हे मात्र कधी कोणाला कळले नाही.



"हे पहा, देहाच्या सापाला मुरगळून टाकले आहे, म्हणून पादत्राणे घासली जात नाहीत."

"दुसऱ्याचे वर्णन महाराज!"

"त्याने खजिन्याची काठी तोडली. वाट बिघडली." राजा म्हणाला.

"ज्योतिषी काय करीत आहेत?" सूर्यभानने विचारले.

"आकाशाकडे डोळे लावून बसले आहेत. या फुटक्या भाग्याच्या माणसाला काही मार्ग दाखविला पाहिजे. चांगले बक्षिस मिळेल." राजा म्हणाला.

"जशी आपली आज्ञा, महाराज!" असे म्हणत त्याने राजाच्या एक मुसकुटात दिली. राजाला सिंहासनावरून खाली ओढले, आणि उपडा निजवून त्याची पाठ आपल्या गुढघ्यांनी खूब रगडून काढली.

दरबारात खळबळ उडून गेली. राजाच्या नोकरांनी धावत जाऊन सूर्यभानला दूर ओढून नेले व त्याच्या मुसक्या बांधल्या.

राजा हसत उभा राहिला व पुन्हा सिंहासनावर बसून म्हणाला—"माझा पाठीचा कणा मोडल्यासारखे झाले होते व त्यामुळे मला सरळ उभे राहाणे पण शक्य नव्हते. माझे दांत दुखत होते. म्हणून जेवण पण जात नव्हते. दरबारी वैद्यांना औषध-पाणी करता आले नाही. सूर्यभान हा एक चांगला वैद्य आहे हे मी ओळखले. म्हणून मी त्याला बोलवून घेतले. त्याने तुमच्या देखतच मला दोन्ही रोगांतून मुक्त केले."

त्यानंतर राजाने सूर्यभानला मोठे बक्षिस देऊन निरोप दिला.





# चाल रीत

एका मुसलमान नवाबाने एका हिंदू राजाचा पराभव करून त्याचे राज्य बळकावले. राज्यातली सर्व प्रजा हिंदूच होती. म्हणून त्याने त्यांच्या चालीरिती व रूढी चालू ठेवून त्यांच्या संस्कृतीचे रक्षण करण्यासाठी विशेष व्यवस्था पण केली. नवाबाला वाटले की आपण प्रजेला त्यांच्या धर्माचे पालन करण्यास आवश्यक ती सर्व व्यवस्था करून दिली म्हणजे आपल्याला प्रजेचे प्रेम मिळेल. हिंदू नवाबाला हिंदूच्या चालीरितींची अर्धवट माहिती होती. संस्कृत पंडितांकडून संस्कृत श्लोकांचा तो अर्थ समजून घेई. व पुराण प्रवचन करवून पौराणिक कथा तो ऐकत असे.

नवाबाचा खास अंगरक्षक कासिमखान याने देखील संस्कृतचे दोन तीन शब्द शिकून घेतले होते. नवाब हिंदूंच्या चालीरीती प्रमाणे वागलेली त्याला आवडत नसे. नवाबाची गुडगुडी व हुक्का तयार करून देण्याचे काम तोच करीत असे. एकदा ते काम एका ब्राह्मण भटजींकडून कां करवून घेऊ नये असा त्याने विचार केला. म्हणून तो नवाबसाहेब खुषीत असतां म्हणाला—"सरकार! हिंदूच्या चालीरीती प्रमाणे हुक्क्याच्या चिलिमीवर विस्तव किंवा निखारा ब्राह्मण भटजींनी ठेवायचा असतो."

"भलतंच" नवाबाने उत्तर दिले.

"ते एक मंत्र म्हणतात, सरकारस्वारीला माहीतच आहे—'अग्नि मीळे पुरोहितं' म्हणजे पुराहितानेच अग्नि द्यायचा असतो." कासिमखान म्हणाला.

"ओ हो, असं होय! तरमग मी भटजींना बोलावून सांगतो." असे सांगून नवाबाने भटजींना बोलाविले आणि विचारले—"अग्नि मीळे पुरोहितं असे तुमच्या शास्त्रात लिहिले आहे, खरे ना? मग माझी चिलिम पेटवून द्यायचे काम तुमचे."

"ठीक!" म्हणून, भटजींनी कासिमच्या हातचा हुक्का घेतला व त्यावर निखारा ठेवून म्हणाले—"पुढले काम तूच पहा." असे सांगून भटजी हुक्का कासिमच्या हातात देऊ लागले.

"हे काय करता, गुरूजी?" नवाबाने विचारले.

"पुनरेवा वरूनवे!" याचा अर्थ प्रथम मनुष्याने हे काम करावयाचे आहे." असे सांगून पुराहित निघून गेला.

शेवटी कासिमलाच हुक्का भरून देण्याचे काम करावे लागले.

* * *

एकदा नवाब रामायणाची कथा ऐकत बसला. भरताने रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवून त्याची पूजा केली त्याचे वर्णन चालू होते. प्रजेचे रामावर किती प्रेम होते, हे देखील प्रकट झाले. ती कथा ऐकून नवाबाने विचार केला की स्वतःच्या पादत्राणाची



श्री. भा. वा. नारकर











मिरवणूक काढून त्या सिंहासनावर ठेवाव्या म्हणजे प्रजेचे प्रेम व दरबाऱ्यांची स्वामिभक्ति दोन्हीचा लाभ होईल. याशिवाय इतिहासात आपले नाव अजरामर होईल.

अशा विचार करून नबाबाने राज्यात सर्वत्र दवंडी पिटविली की त्याच्या पादुकांची मिरवणूक राज्यभर काढण्यात येईल. म्हणून सर्व प्रजेने मिरवणुकीला हजर राहून पूजा आरती वगैरेची तयारी ठेवावी.

ती दवंडी ऐकून प्रजा चकित झाली. काही चतुर मंडळींनी एक युक्ति काढली. दुसऱ्या दिवशी सकाळी नबाबाच्या घरासमोर हजारो लोक एकत्र झालेले दिसले. गडबड ऐकून नबाबाने आपल्या शिपायांना पाठवून चवकशी करविली की गडबड कसली.

शिपायांनी परत येऊन निवेदन केले– "आपल्या पादुकांच्या मिरवणुकीची गोष्ट ऐकून लोक चकित झाले आहेत. नबाब साहेबांची तब्येत बरी नाही का की ते राज्य सोडून वनवासास जाणार, राम गेला होता तसे." असे लोक विचारीत होते.

तेव्हां नबाबाच्या डोक्यात प्रकाश पडला की रामासारखे वनवासास निघाल्यास पादुकांची पूजा होऊ शकेल. त्यांनी काय विचार केला होता आणि हे काय घडले?

निराश होऊन नबाबाने शिपायांच्या हाती निरोप पाठवला की नबाब साहेबांची तब्येत आता उत्तम आहे. वनवासास जाण्याचा पण त्यांचा विचार नाही. म्हणून त्यांच्या पादुकांची मिरवणूक रद्द करण्यात आली आहे."

तो निरोप ऐकून प्रजेला जिवातजीव आल्यासारखे वाटले आणि सर्व लोक आनंदाने आपापल्या घरी निघून गेले.





# साडेसाती

उज्जयनी नगरी विष्णुवर्धन नांवाचा राजा राज्य करीत असता देवशर्मा नांवाचा ज्योतिषशास्त्रात प्रवीन एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याला अनायासे जे मिळे तेवढ्यावर निभावून नेण्याचा तो प्रयत्न करी. तो गणपतीच्या देवळात बसून गणेश स्तोत्राची पारायणे मात्र तो नित्य करी.

त्याची बायको त्याला म्हणे, काही काम करा. पैशाशिवाय संसाराचा गाडा कसा चालणार! देवशर्मा बायकोला म्हणे–"ही शनिदशा आहे. ही साडेसाती संपली की चांगले दिवस उजाडतील."

दररोज सकाळी राजधानीतले ब्राह्मण जमत राजाला आशीर्वाद देत आणि राजा जी दक्षिणा देई ती घेऊन घरी जात. एकदा देवशर्माची बायको त्याला म्हणाली–"तुम्ही कां नाही दक्षिणा घेऊन येत?"

बायकोच्या आग्रहावरून देवशर्मा एकदा सकाळी राजवाड्यात गेला. परंतु तो इतर ब्राह्मणांबरोबर उभा न रहता दूर एका जागी उभा राहिला. त्याने इतरांबरोबर स्वस्तिवचन म्हटले नाही व राजाला आशीर्वाद दिला नाही. राजाने फक्त स्वस्ति वाक्य म्हणणाऱ्या ब्राह्मणांनाच दक्षिणा दिली. देवशर्माला काही मिळाले नाही. राजा अंतःपुरात निघून गेल्यावर इतर ब्राह्मणांबरोबर देवशर्मा बाहेर निघून गेला.

इतके असून ही बायकोच्या शब्दाला मान देऊन तो रोज राजवाड्यात जात असे आणि हात हलवीत घरी परत येत असे. राजा त्याला रोज पाही व












हा येतो काय, स्वस्तिवचन म्हटल्या शिवाय किंवा दक्षिणाघेतल्या शिवाय जातो काय? राजाला तो सर्व विक्षिप्तपणाच वाटला.

एकदा राजाने मनाशीं ठरविले की हा असे कां करतो हे विचारून घ्यावे. त्याने आपल्या नोकरांना सांगून ठेवले की, रोज एक ब्राह्मण इतर ब्राह्मणांबरोबर राजवाड्यात येतो, एका बाजूला उभा राहून दक्षिणा वगैरे घेतल्या शिवाय निघून जातो. सर्व ब्राह्मण निघून गेल्यावर त्याला माझ्याकडे बोलावून घेऊन या.

नोकरांनी राजाज्ञेप्रमाणे दुसऱ्या दिवशी देवशर्मा जेव्हां जाऊ लागला तेव्हां महाराजांनी बोलाविले आहे असे सांगून त्याला राजाच्या खास महालात बोलावून घेऊन गेले.

देवशर्मा म्हणाला—“मी गरीब ब्राह्मण आहे. दानधर्म घेण्यासाठी मी येत नाही. माझ्या भाग्याने पाठ फिरविली आहे. कोण काय करणार?” राजाने सर्व काही ऐकून घेऊन एका चांदीच्या पात्रात पांचशे सुवर्णमुद्रा भरून त्याला दिल्या.

घरी गेल्यावर त्याने ते पात्र बायकोला दिले. तिला फार आनंद झाला. म्हणाली—“पाहिलेत जागच्या जागी काही मिळाले असते का? आजपर्यंत माझ्या सांगण्याप्रमाणे हात पाय हलविले असतेत तर सर्व गरीबी दूर झाली असती.”

“ही सर्व त्या गणेशाची कृपा आहे.” देवशर्मा म्हणाला.

त्याच दिवशी रात्री दरोडेखोरांनी घरात शिरून देवशर्माला मिळालेले सर्व धन चोरून नेले. देवशर्माच्या बायकोला त्याचे फार दुःख वाटले. देवशर्मा म्हणाला—“ही साडेसाती सुटेपर्यंत काही उपाय नाही.”

कालच ज्याला आपण एवढी मोठी रक्कम दिली तो आज पुन्हा मळकी शाल पांघरून कशाला आला आहे बुवा? राजाला आश्चर्य वाटले. सर्व ब्राह्मण निघून गेल्यावर त्याने देवशर्माला बोलावून विचारले—“काय हो गुरुजी! मी काल तुम्हांला पांचशे सुवर्णमुद्रा दिल्या, तुमचे दारिद्र्य जावे म्हणून. पण आज पुन्हा या वेषात कसे काय येणे झाले?”

“महाराज! माझी गरीबी दूर करणे कोणाला शक्य नाही. त्याला कारण ही शनिदशा आहे. ही असे पर्यंत सर्व प्रयत्न फुकट. मी सोन्याला हात लावला तर ते माती होऊन जाईल. बायकोच्या आग्रहामुळे मी दररोज येथे येत आहे आणि म्हणूनच कधी मी आपल्या समोर हात पुढे केला नाही. हेच पहा ना, काल आपण एवढे सोने दिले. ते चोरांनी चोरून नेले.” देवशर्मा म्हणाला.

‘शनिदशा’ आणि ‘साडेसाती’ यांच्यावर राजाचा विश्वास नव्हता. त्याने विचार केला की त्याने मनात आणले तर देवशर्माला श्रीमंत व सुखवस्तू करून देणे शक्य आहे. शनिदशा आडवी येणे शक्य नाही. असा





विचार करून राजाने एका मोठ्या ताटात एक हजार चांदीची नाणी घातली व देवशर्माला देत म्हणाला—"आता तुम्हांला आयुष्यभर काळजी करण्याचे कारण नाही."

परंतु देवशर्माने सहा महिने त्या रौप्यमुद्रांना हात लावायचा नाही असे ठरविले. कारण शनिदशा आणखी सहा महिने उरली होती. असा विचार करून तो ते ताट गणपतीच्या देवळात घेऊन गेला आणि देवाला नमस्कार करून आपल्या धनाचे रक्षण करण्याची जबाबदारी त्यानें त्या गणनायकावर टाकली. त्याने ताटासकट त्या एक सहस्र रौप्यमुद्रा देवळानजीक झाडाच्या पोकळीत ठेवून दिल्या.

त्या झाडाच्या पोकळीत लहान मोठे अनेक साप रहात. त्यापूर्वी अनेकांना साप चावलापण होता व कोणी त्या झाडाच्या पोकळीत हात घातला नाही. म्हणून तेथे ती मिळकत लपवून ठेवली तर सुरक्षित राहील असे त्याला वाटले.

त्यानंतर देवशर्मा कधी राजाकडे गेला नाही. तरी देवशर्माच्या घरची गरीबी तशीच आहे हे राजाला त्याच्या नोकरां-कडून कळले. राजाज्ञेने देवशर्माला कळल्या-शिवाय काही नोकर देवशर्माच्या घराची राखण करीत होते. पहिल्याप्रमाणें चोरांनी चोरी करून ते धन नेऊ नये, एवढाच एक हेतू होता.

काही काळ लोटल्यावर राजाला देव-शर्माची आठवण झाली. राजाने नोकरांना बोलावून विचारले—"तो ब्राह्मण आता सुखी आहे ना?" तेव्हां नोकरांनी देवशर्मा अजून गरीबीतच आयुष्य कंठीत असल्याचे सांगितले.

म्हणून राजाने देवशर्माला बोलावून आणायला नोकर पाठविले. नित्याप्रमाणे तो ती मळकी शाल पांघरून येऊन हात जोडून उभा राहाला.

"मी तुम्हांला जे धन दिले होते त्याचा तुम्ही उपयोग केला नाहीसे दिसते!" राजाने विचारले.

"तसे नव्हे महाराज! ही शनिदशा संपेपर्यंत मी ते सर्व धन साप राहतात त्या पोकळीत नेऊन ठेवले आहे. ही दशा संपली म्हणजे मी त्याचा उपयोग करीन." देवशर्मा म्हणाला.

राजाने आपल्या नोकरांना देवशर्मा बरोबर पाठवून त्या झाडाच्या पोकळीतून ते ताट व चांदीचे रुपये शोधून आणायला सांगितले. नोकरांनी सर्व पोकळी शोधून पाहिली. पण ते ताट किंवा रौप्यमुद्रकाहीच सापडले नाही.

देवशर्मा राजाला म्हणाला—"महाराज त्यांतली एक वस्तू देखील नाहीशी होणे शक्य नाही. माझे आराध्यदेव गणपती. त्याने त्या सर्व मुद्रा कोठे तरी जपून ठेवल्या असतील. शनिदशा संपताच मला ते सर्व धन मिळेल. आपण काळजी करू नये."

"ही शनिदशा आहे तरी आणखी किती दिवस!" राजाने त्याला विचारले.



"आणखी फक्त सहा महिने, प्रभो!" देवशर्मा म्हणाला.

"सहा महिने होण्यापूर्वी मी तुला श्रीमंत करून दाखवितो पहा. पाहतो तुझा शनी कसा मध्ये येतो ते." राजा म्हणाला. एका पात्रात सुवर्णमुद्रा भरून त्याला दिल्या व बजावले—"हे पात्र घरी नेऊन तू आज पासूनच खर्च करायला सुरवात कर. तुला चोरांची भीती बाळगण्याचे कारण नाही, मी रात्रंदिवस पाहारा देण्यासाठी पाहारेकरी नेमतो. तू या सोन्याचा उपयोग केला नाहीस तर मात्र तुला दंड करावा लागेल. लक्षात ठेव!"

देवशर्मा पात्र घेऊन घरी जात असता गणपतीच्या देवळा जवळ थांबला. जगरक्षक अशा त्या गणनायकावर सर्व भार टाकून विहिरीच्या कठड्यावर त्याने ते सुवर्णमुद्रांनी भरलेले पात्र ठेवले व विहिरीचे पाणी काढून आंघोळ करू लागला. तो डोक्यावर पोहरा भरून पाणी ओतीत होता, नेमका त्याच वेळी एक कावळा त्या भांड्यावर येऊन बसला व झटदिशी उडून गेला. भांडे विहिरीत पडले. देवशर्माच्या लक्षात ती गोष्ट मुळीच आली नाही.

आंघोळ झाल्यावर तो भांडे शोधू लागला. पण ते नव्हते त्याला वाटले की



स्वत: शनीच ते उचलून घेऊन गेला असावा. "गणनायका! आता तूच वाचव रे, या संकटातून!" अशी देवाची प्रार्थना मनातल्या मनात करून तो घरी निघून गेला.

घरी आल्यावर पाहारेकऱ्यांना म्हणाला— "घरात चोरी करायला काही असेल तर ना! तुम्ही जा परत राजाकडे."

पाहारेकऱ्यांनी ती गोष्ट राजाला कळविली. राजाने देवशर्माला बोलावून विचारले—"मी दिलेले एवढे सोने नाहीसे कसे रे झाले?"

"महाराज! ते कोठे जाणार? माझे चांगले दिवस अद्याप आले नाहीत. शनीच उचलून घेऊन गेला आहे, असे मला वाटते." देवशर्मा म्हणाला.

राजाला आतामात्र राग आला. म्हणाला— "तूच आहेस शनी! तुझ्या म्हणण्याप्रमाणे सहा महिन्यांनी शनिदशा संपल्यावर मी दिलेल्या सुवर्णमुद्रा व रौप्यमुद्रा मिळाल्या नाहीत तर मी तुला फाशी देईन."

"चोरांनी चोरून नेलेले धन मिळेल असे नाही मला वाटत. पण गणनायकाला नजर ठेवण्यासाठी सांगून मी जे जे ठेवले ते सर्व नक्कीच परत मिळेल." असे सांगून व राजाचा निरोप घेऊन देवशर्मा आपल्या घरी निघून गेला.

त्यानंतर काही दिवसांनी एक फार मोठे वादळ आले. त्याच्या झोक्याने ते जुने झाड कोलमडून बाजूच्या विहिरीवर पडले. त्याच्या मुळात अडकून राहिलेले राजाने दिलेले ताट व रौप्यमुद्रा बाहेर पडल्या. विहिरीचा गाळ उपसून काढला तेव्हां सर्व सुवर्णमुद्रापण सांपडल्या.

देवशर्माचा अंधविश्वास खोटा होता, हे काही सिद्ध होऊ शकले नाही.





# आईची माया

एका गावी एक गरीब बाई रहात असे. तिला गोविंद नांवाचा एक मुलगा होता. मुलगा आईचा फार लाडका होता. ती दिवसभर मेहनत मजुरी करून दोघांच्या पोटा पाण्यास पुरेसे पैसे मिळवी. गोविंद घरात फक्त जेवणापुरता येई. हातावर पाणी पडले की पसार.

त्याच्या बरोबरची मुले कामधंदा करीत व आपल्या आई बापांची थोडी फार मदत करीत. त्याला देखील काम करावे से वाटू लागले. परंतु त्याने काम केलेले त्याच्या आईला आवडत नसे. आपल्याच गावी मुलाने काम केलेले आईला पसंत नव्हते. म्हणून त्याने परगावी जाऊन कामधंदा करावा असे ठरविले आणि आईला कळविल्या शिवाय घरा बाहेर पडला.

गोविंद एका श्रीमंताच्या घरी काम करू लागला. एक वर्षभर काम केल्यानंतर आईला भेटून यावे असे त्याला वाटले. त्याने आपल्या धन्याला ती गोष्ट सांगितली व चार दिवस घरी जाऊन येतो असे म्हणाला. धन्याने त्याला एक चांदी वीट बक्षिस म्हणून दिली. गोविंद नोकरीला लागला तेव्हांपासून इतर नोकरांना पगार इनाम बक्षिस वगैरे दिले होते. तसें गोविंदला काही दिले नव्हते. त्याने एक वर्षभर काम केले होते. म्हणून त्याला ही चांदीची वीट मिळाली होती.

वाटेत त्याला त्या चांदीचे वजन वाढू लागल्या सारखे भासले. म्हणून त्याला झपझप चालणे कठीण वाटू लागले.

काही अंतर चालून गेल्यावर समोरून एक घोडेस्वार येत असलेला दिसला. आपल्याकडे पण असा घोडा असता तर किती बरे झाले असते असे गोविंदला वाटले. आईकडे लवकर पोचता आले असते. त्याने घोडेस्वाराला विचारले—"काय हो! असल्या घोड्याची किंमत किती असेल?"

"तुझ्याजवळ घोडा विकत घ्यायला काय आहे रे?" घोडेस्वाराने विचारले.

गोविंदने ती चांदीची वीट त्याला दाखवली. घोडेस्वाराला वाटले की कोणी भोळसट मुलगा दिसतो आहे. त्याला सहजी फसविता येईल. म्हणून तो चांदीचा तुकडा घेऊन तो घोडा द्यायला तयार झाला. गोविंदने चांदीचा तुकडा घोडेस्वाराला दिला आणि त्याच्याच मदतीने घोड्यावर चढून बसला. तो बसल्याबरोबर घोडा जोराने पळू लागला. त्याला कसे वळवायचे किंवा कसे थांबवायचे हे गोविंदला कळेना. घोडा पळत होता व आपण आता पडणार या भीतीने गोविंद ओरडत होता. एका जागी एका गुराख्याने गोविंदला घाबरलेला पाहून आपल्या काठीने घोड्याला थांबवले. घोडा थांबला पण थांबल्याबरोबर मागच्या पायावर उभा राहून त्याने गोविंदला जमीनीवर फेकून दिले.



त्या गुराख्याने गोविंदला हात धरून सावरून उभे केले व विचारले—"अरे, तू एवढासा मुलगा, घोड्यावर कशाला बसायला गेलास? पण हा घोडा तुला मिळाला कसा?"

गोविंदने सर्व खरे खरे ते सांगितले.

"तू चूक केलीस. हा घोडा पाहून तुझ्या आईला काय आनंद वाटणार! या ऐवजी तू एखादी गाय घेऊन गेला असतास तर तिला जास्त बरे वाटले असते. तिने स्वत: दूध काढून तुला प्यायला दिले असते. अजून विशेष बिघडले नाही. हा

सौ. शारदाबाई साटम



घोडा देऊन तू पाहिजे तर एक चांगली गाय घेऊन जा." गुराखी म्हणाला.

गोविंदने विचार केला, गुराखी म्हणतो ते बरोबर आहे. गाय व्यायली की आणखी एक गाय घरात येईल त्यानंतर दोन्ही गाईंची वासरे. गोठ्यात पुष्कळ गाई होतील. गोविंद घोडा देऊन गाय घ्यायला तयार झाला. गुराख्याने एक अटलेली गाय गोविंदला देऊन घोडा ठेवून घेतला. गोविंद गाईला घेऊन घरी निघाला. वाटेत त्याला भूक लागली. त्याने विचार केला संध्याकाळपर्यंत थांबले तर गाईचे दूध काढून पिता येईल.

संध्याकाळच्या सुमारास गोविंदला एक धनगर भेटला तो बकऱ्या चरायला घेऊन आला होता. गोविंदने धनगराकडून एक तांब्या मागून घेतला व गाईचे दूध काढायला बसला. दूध तर मिळालेच नाही, गाईने लाथ मात्र जोराने मारली.

ते पाहून धनगर हंसू लागला व म्हणाला—"अरे ही अटलेली म्हातारी गाय आहे. ही का दूध देणार? कुठे मिळाली तुला?"

गोविंदने सर्व वृत्त थोडक्यात सांगितले. धनगर सहानुभूति दाखवीत म्हणाला—"तुला फसवले रे फसवले कोणी तरी. मी तुला खूप दूध देणारी एक बकरी देतो. ही गाय दे सोडून एका वर्षाच्या आत बकऱ्यांचा एक मोठा कळप तयार होईल." असे सांगून धनगराने एका बकरीचे दूध काढून गोविंदला प्यायला दिले. गोविंदने आनंदने ती बकरी घेऊन गाय धनगराला दिली आणि घरी निघाला.

थोड्या वेळाने बकरी "बें बें" करीत मागे पाहून परत जायला ओढू लागली. तिला ओढून नेण्याइतकी शक्तीदेखील गोविंदच्या अंगात उरली नव्हती.

त्याच वेळी समोरून एक जण एक कोंबडा घेऊन येताना गोविंदला दिसला. त्याने गोविंदला विचारले—"काय रे पोरा! त्या बकरीचा असा कां जीव घेतो आहेस? कोणाची बकरी ही? कुठे घेऊन चाललास?"

गोविंदने त्याला देखील सर्व कथा वर्णन करून सांगितली. तो मनुष्य म्हणाला—"तुझे गांव येथून पुष्कळ दूर आहे. या बकरीला तू असा फरपटत किती वेळ नेत बसणार? तू ही कोंबडी घे आणि बकरीला जा सोडून इकडे. ही कोंबडी रोज दहा अंडी घालते. अंड्यातून पिले येतील व ती मोठी झाली की तुझ्या घरी कोंबडीच कोंबडी होतील."

गोविंदला तो सल्ला पसंत पडला. ती कोंबडी नव्हतीच कोंबडा होता. गोविंदला ते देखील माहीत नव्हते. त्याने बकरी देऊन कोंबडा घेतला आणि पुढे निघाला.

थोडे अंतर पुढे गेल्यावर एका गांवी त्याला एक मनुष्य आपली सुरी पाजळवीत असलेला दिसला. तो एका सुरीला धार करून दुसरीवर धार चढवीत होता. गोविंद ती गंमत पहात काही वेळ उभा राहाला व














नंतर त्याने त्याला विचारले—"तू कशाला रे हे सर्व करतो आहेस?"

"सुऱ्यांना धार लावणे हा माझा धंदा आहे. तासभर काम केले की एक रुपया मिळतो." धार लावणारा म्हणाला.

"मला देखील असा दगड मिळेल तर किती बरं होईल." गोविंद म्हणाला.

"माझ्याजवळ आणखी एक दगड आहे. पाहिजे तर मी विकत द्यायला तयार आहे." धार लावणारा म्हणाला.

"विकत घ्यायला माझ्याजवळ पैसे नाहीत. आहे ती ही एक कोंबडी आहे." गोविंद म्हणाला.

"तीच दे!" असे सांगून त्या धार लावणाऱ्याने सहाणेच्या दगडाचा एक तुकडा काढून गोविंदला दिला व तो कोंबडा ठेवून घेतला.

गोविंद तो दगड घेऊन आपल्या गावी गेला. आपल्या आईला त्याने चांदीची वीट घेऊन घऱ्याच्या वरून कसा निघाला आणि वाटेत घोडा, गाय, बकरी, कोंबडी वगैरे बदलवीत शेवटी सहाणेचा दगड घेऊन कसा आला, ते सर्व वर्णन करून सांगितले.

ते सर्व ऐकून घेऊन त्याची आई कपाळावर हात मारून म्हणाली—"कर्म! वेड्या इतकी चांदी घालवून शेवटी तुझ्या नशिबी हा दगडच आला ना? तू सुखरूप घरी परत आलास एवढेच मला पुरे आहे." आई म्हणाली.

त्यानंतर आईने त्याला घरीच राहून काम करायला सांगितले. हळूहळू त्याची मिळकत वाढत गेली व दोघे मायलेक सुखी झाले.





# यथा राजा तथा मंत्री

एका गांवी एक मूर्ख राजा राज्य करीत असे. त्याचा मंत्री पण त्याच्या सारखाच महामूर्ख होता. एक ब्राह्मण रोज राजाच्या दरबारी येत असे आणि तिथी, वार, नक्षत्र वगैरे सांगून निघून जात असे. एकदां राजाला संशय आला, हा ब्राह्मण रोज तिथी, वार नक्षत्र वगैरे सांगून जातो, पण आपण कधी ते प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले नाही. राजाने तसे मंत्र्याला विचारले.

"त्या ब्राह्मणाला आपण कधी तरी विचारू या," मंत्री म्हणाला.

दुसऱ्या दिवशी दरबारात आल्याबरोबर त्या ब्राह्मणाला राजाने विचारले—"काय हो, गुरुजी! तुम्ही दररोज येऊन आम्हांला तिथी, वार, नक्षत्र सांगून जातां. पण काय का? आम्ही कधी त्यांना प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले नाहीं? एकदां दाखवा पाहूं!" ब्राह्मण घाबरूनच गेला. पण नंतर स्वतःला सावरून आणि तोंडावर दुःखाचा आव आणून म्हणाला—"महाराज! मी घरचा गरीब! तिथी, वार, नक्षत्रांना आणून दाखविणे या गरिबाला शक्य होणार नाही, महाराज!" "त्यांची किंमत तशीच मोठी द्यावी लागते!" मंत्री आपले पांडित्य प्रदर्शित करीत म्हणाला.

"हरकत नाहीं, काय वाटेल ती किंमत दिली तरी चालेल, खजिन्यातून द्या, मंत्री!" राजाज्ञा झाली.

मंत्र्याने खजिन्यातून दोन हजार मुद्रा मागवून ब्राह्मणाला दिल्या व म्हणाला—"तिथी, वार वगैरे आणून दाखविण्याची जबाबदारी आतां तुमच्यावर बरं का?"



ब्राह्मण मोहरा घेऊन तिथी, वार वगैरे आणायला निघाला. त्याला तरी ते कोठे मिळतात हे कोठे ठाऊक होते? तो बाजारपेठेत गेला व एका दुकानदाराला विचारले—"काय हो, तुमच्याकडे तिथी, वार काय दराने मिळतात?" दुकानदार ब्राह्मणाचा तो प्रश्न ऐकून हसले. ब्राह्मण कित्येक गाव व बाजारपेठा फिरून आला. एका गांवचा वाणी म्हणाला—"आहेत, पण वर माळावर आहेत. काढून ठेवतो उद्या या." ते ऐकून ब्राह्मणाला हायसे वाटले.

रात्री वाण्याने दोन उंदीर पकडले आणि एका पेटीत बंद करून पेटीला कुलूप लावले. ब्राह्मणाने त्याला दोन हजार मोहरा दिल्या. पेटी त्याच्या हातात देत वाणी म्हणाला—"सरळ राजाकडे घेऊन जा आणि राजासमोरच पेटी उघडा. ही घ्या किल्ली."

ब्राह्मण पेटी घेऊन घरी निघाला. वाटेत विचार करू लागला. वाण्याने पेटी उघडू नका असे कां बरे सांगितले. मी स्वतः प्रथम पाहिले नाही तर राजाने विचारले तर मी काय उत्तर देणार?

त्यावेळी तो एका डोंगरी वाटेने जात होता. त्याने दूर वर कोणी दिसत नाही, याची खात्री करून घेतली. तिथी वार पाहून घ्यायला हीच संधी बरोबर आहे असे मनाशी ठरवून त्याने पेटी एका मोठ्या शिळेवर ठेवली आणि किल्ली काढून पेटी उघडली. एका क्षणार्धात उंदरांनी टुणकन् उडी मारली व पापणी लवायच्या आत अदृश्य झाले. ब्राह्मणाचे उतारवय होते. म्हणून त्यांची आकृती देखील ब्राह्मणाला कळली नाही.

ब्राह्मणाच्या पोटात धस्स झाले. इतके पैसे देऊन विकत आणलेले तिथीवार हातचे निसटून गेल्याची गोष्ट राजाला सांगितली तर राजा काय म्हणेल? तरी राजाकडे जाऊन ब्राह्मणाने जे त्याला कळले व सांगता आले तसे प्रामाणिक पणे सर्व सांगितले. आणि म्हणाला—"महाराज! सर्व चूक माझी. वाण्याने तिथीवार बरोबर दिले आहेत की नाही, हे पाहण्यासाठी मी पेटी उघडली."

राजा म्हणाला—"खुळ्या ब्राह्मणा! एवढ्याशा गोष्टीसाठी इतके घाबरून जाण्याचे कारणच काय? डोंगर खणून काढू आपण. पाहू तर या कोठे जातात ते."

डोंगर खणून काढायचे मनाशी ठरवून ज्या जागी तिथीवार निसटून गेले होते तेथे त्या ब्राह्मणाबरोबर राजा स्वतः आला. मजूर लावून त्याने डोंगर खणायला सुरवात केली.

एक महिना झाला दोन महिने झाले. पुरे एक वर्षभर डोंगर खणण्याचे काम चालू होते. आणखी किती वर्षे लागतात हे कळायला मार्ग नव्हता. इतक्यात मंत्र्याचा निरोप घेऊन एक मनुष्य आला आणि म्हणाला—"महाराज! मंत्री महाशय मोठ्या संकटात सापडले आहेत. आपण आज्ञा द्याल तसे करण्यासाठी वाट पहात आहेत."



"पण करू तर देशील की काय झाले ते." राजा त्याला म्हणाला.

"महाराज निघून गेले त्याच दिवशी महाराणीच्या मोठ्या दासीला एक विंचू चावला. विष चढू लागलेले पाहून मंत्र्याने तिचा पाय कापून टाकवला आणि विंचवाचा शोध सुरू केला. तो वाड्यात कोठे असेल तर इतरांना चावेल या भीतीने मंत्र्यांनी राजवाड्याला आग लावविली. आग विझत नाही हे पाहून मंत्र्यांनी पूर्वेकडच्या मोठ्या तलावाचे पाणी सरळ महालाकडे यावे म्हणून तलावाचा बांध फोडवला. त्यामुळे आग विझली. पण पूर्वेकडची सर्व शेते पाण्याच्या अभावी वाळून गेली आहेत. त्यांचे रक्षण कसे करावे हे मंत्र्यांना सुचत नाही. त्यासाठी आपली आज्ञा व्हावी म्हणून ते वाट पहात आहेत. त्यांना कोणची आज्ञा विचारावी हे कळेना. आपण जशी आज्ञा कराल तसे करायला ते तयार आहेत."

राजा थोडा वेळ विचार करीत राहाला. नंतर म्हणाला—"अरे एवढ्याशा गोष्टी साठी इतके घाबरण्याचे कारणच काय! पश्चिमे कडची शेते कापून त्यांचा पूर्वे कडच्या शेतावर मांडव घाला, म्हणावे. मग पाहतो शेते कशी वाळून जातात ती. जाऊन सांग मंत्र्याला, माझी आज्ञा आहे."

मंत्र्याने राजाज्ञेप्रमाणें केले. दोघे अकलेचे कांदे. परिणाम व्हायचा तोच झाले. राज्यभर पीक कोठेच निघाले नाही. राजवाडा जळून गेला होता. राणीची दासी लंगडी झाली होती. डोंगरी वाट बंद झाली. ब्राह्मणाचा उदरनिर्वाह मात्र निर्विघ्न-पणे दुसऱ्या राज्यात तिथी, वार नक्षत्र सांगून चालू होता.





# कृष्णावतार

कृष्णाचा सल्ला महर्षींना फार आवडला.

त्यांनी आनंदाने बरोबर आणलेले बदरी फळ कृष्णाला समर्पित केले व म्हणाले—"आम्ही एका अत्यावश्यक कामा-साठी आपल्याकडे आलो आहो. भूदेवीचा मुलगा नरकासुर हा राक्षसांचा नायक आहे. तो क्रूर व दुष्ट आहे. समुद्र आटविणे त्याला शक्य आहे. तो पृथ्वी हालवू शकतो. त्याच्या तापाने त्रिलोक कापत आहे. एकदा तो बदरी वनात शिरला व आमचे यज्ञयागादी ध्वंस करून आम्हांला म्हणाला की या पुढे यज्ञ न करता माझी आराधना करा. आम्ही त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले तेव्हां त्याने आमची यज्ञकुंडे नष्ट केली व यज्ञ सामुग्री पायाखाली तुडविली. नंतर तो आमच्या सर्व स्त्रियांना बंदी करून घेऊन निघून गेला. या संकटातून आमचे रक्षण करण्यास तूच एक समर्थ आहेस म्हणून आम्ही तुझ्याकडे आपले गाऱ्हाणे घेऊन आलो आहो."

मुनींचे गाऱ्हाणे ऐकून कृष्णाला आश्चर्य वाटले. काही वेळ तो विचारमग्न होऊन बसला. तेव्हां मुनींना आश्चर्य वाटले व ते परस्परांची तोंडे पाहू लागले.

तेव्हां सात्यकी आदिक यादवांनी कृष्णाला ही जबाबदारी स्वतःवर घ्यावी



अशी विनंती केली. तेव्हां कृष्ण ऋषींना म्हणाला—"तुम्ही तसे काही घाबरण्याचे कारण नाही. त्याच्या दुष्ट पणाचे वर्णन ऐकून क्षणभर त्याची एवढी हिंमत कशी झाली, या गोष्टी बद्दल मी विचार करीत होतो, एवढेच. तुम्ही अगदी निश्चित रहा. आपापल्यां स्थानी जाऊन आपले यज्ञ कार्य आरंभ करा."

कृष्णाने दिलेले ते आश्वासन ऐकून मुनींना फार आनंद झाला. त्यांनी कृष्णाचे अभिनंदन करून त्याचे आभार मानले व निरोप घेऊन बद्रिकाश्रमाकडे निघाले.

मुनी निघून गेल्यावर देवेंद्र सर्व दिक्पालकांना बरोबर घेऊन द्वारकेला आला. कृष्णाने सामोरा होऊन त्याचे स्वागत केले. इंद्र सर्व यादवांना प्रेमाने भेटला. त्यानंतर सुधर्म सभेत सर्व एकत्र यथास्थानी बसले.

इंद्र कृष्णाचा हात हातात घेऊन म्हणाला—"मी कां आलो हे आता सांगतो."

"नरकासुर नांवाच्या दैत्य नायकाने ब्रह्मदेवाकडून वरप्राप्ती करून घेऊन स्वर्गावर स्वारी केली आणि सर्वांचा पराभव केला. आम्ही सर्व घरे दारे सोडून या मर्त्यलोकात पळून आलो आहो. आमच्या घरात शिरून त्याने ती लुटली. मोठमोठ्यांना असाध्य अशी अदितीची कुंडलें पण त्याने हिरावून नेली. मुनींचे आश्रम ध्वंस केले. दुष्टांचा संहार करण्याचे व्रत आपण घेतले आहे. कित्येक राक्षसांचा वध आपण केलात. म्हणून आपल्या आश्रयाला आम्ही धावून आलो आहो. त्या दुष्टाचा नाश करून देव व मुनी यांचे रक्षण करण्याचा भार आपण स्वतः वर घ्यावा. तरच या जगाचा उद्धार होईल. या गरूडाने आपले वाहन होण्याचे कबूल केले आहे. म्हणून आम्ही मुद्दाम त्याला बरोबर घेऊन आलो आहो."



इंद्राचे सर्व म्हणणे ऐकून घेऊन कृष्ण म्हणाला—"देवेन्द्रा! मी मुनींच्या तोंडी त्या दुष्ट राक्षसाच्या अत्याचारांचे वर्णन ऐकले आहे. तू आल्याने आता माझ्या निश्चयाला जास्त बळकटी आली आहे. चला, निघू या प्राग्जयोतिषपूराला." असें सांगून कृष्ण! उठून उभा राहला. त्याने आपले सुदर्शन चक्र आदि शस्त्रास्त्रे घेतली आणि सत्यभामेकडे बरोबर युद्धास चलण्यास निरोप पाठविला. दोघे गरुड वाहनावर बसून प्राग्ज्योतिषपुरी जाण्यासाठी सज्ज झाले. वडीलधाऱ्या यादवांनी त्यांना आशीर्वाद दिला. भाट व चारण यांनी कृष्ण सत्यभामेचा स्तोत्र पाठ केला. शंखनाद झाला. सर्व आकाश मार्गी निघाले.

कृष्णाला आकाशातूनच प्राग्ज्योतिष्पुर दिसले. त्यात कोणा मानवाला प्रवेश अशक्य होता. त्याचे रक्षण करण्यासाठी जी सैन्य व्यवस्था होती ती कृष्णाने आकाशातून पाहून घेतली. कृष्णाने इंद्राला तेथेच थांबायला सांगितले व स्वतः पुढे होऊन राक्षसांचा संहार सुरू केला.

मुरासुर कृष्णाशी युद्धाला पुढे आला. दोघांचे घोर युद्ध झाले. शेवटी कृष्णाने



एक अस्त्रप्रयोग करून त्याचे डोके उडविले. त्यानंतर निसुंद नावाचा राक्षस युद्धाला पुढे आला. त्याने सत्यभामेवर बाण सोडला. त्यामुळे तिच्या एका हाताला खोक पडली व रक्तप्रवाह सुरू झाला. ते पाहून कृष्णाला त्वेष चढला व त्याने शरवृष्टी करून त्याचे दोन्ही हात व डोके उडविले. त्यानंतर हयग्रीव, अघोरपाल, विरूपाक्ष, पंचजन वगैरे चौऱ्याऐंशी हजार राक्षसांना कृष्णाने ठार केले.

नगराच्या रक्षणार्थ जे द्वारपाल उभे होते त्या सर्वांचा संहार करून कृष्ण दरवाज्या-



जवळ येऊ लागला तेव्हां राक्षसांच्या एका सैन्याने त्याच्यावर हल्ला केला. कृष्णाने त्या सर्वांचा क्षणार्धांत नाश केला. इतक्यात स्वतः नरकासुर युद्धासाठी पुढे आला. युद्धासाठी एकट्या कृष्णाला सत्यभामेबरोबर आलेला पाहून तो म्हणाला—"मला नरकासुर म्हणतात. मी इंद्रादिक देवांचा पराभव करून त्रिलोकाला "त्राहि त्राहि" करून सोडले आहे. माझ्या समोर मोठमोठ्या शूर बहाद्दरांची डाळ शिजली नाही. मग तुझी काय बिशात? हा मोठा पक्षी तुला कोठे मिळाला आणि ही सुंदर स्त्री कोठून पळवून आणलीस? तुला ठार करून तिला आपली पट्टराणी करून घेतो. पाठ दाखवून पळून जाऊ नकोस. समोर उभा राहून युद्ध कर."

नरकासुराचे बोलणे ऐकून कृष्ण स्मित करून म्हणाला—"माझ्या विषयी तू ऐकले आहेस की नाही, हे नाही मला ठाऊक. माझे नाव वासुदेव आहे. हिचे नाव सत्यभामा आहे. ही माझी बायको. हा पक्षी दुसरा तिसरा कोणी सामान्य पक्षी नसून पक्षी जातीचा राजा स्वतः गरुड आहे. तो माझे वाहन होऊन आला आहे. मी तुझा वध करून जगताचे कल्याण करणार आहे."

नरकासुर हसून म्हणाला—"अस्सं! तूच का तो वासुदेव! बरेच दिवसापासून तुझ्याशी युद्धाची संधी मिळेल म्हणून मी वाट पहात होतो. तू आपली सर्व शक्ती पणाला लाव. पण आज माझ्या हातून तुला निसटून जाणे शक्य नाही, एवढे लक्षात ठेव." अशी वल्गना करून त्याने कृष्णाशी युद्धाला सुरवात केली. त्या दोघांचे परस्परांशी जे युद्ध झाले ते रामरावणांच्या युद्धाची आठवण करून देणारे होते.





कृष्ण जखमी स्थितीत बेशुद्ध होऊन पडला.

कृष्णाला बेशुद्ध होऊन पडलेला पाहून सत्यभामा थोडी देखील घाबरली नाही. कृष्णाच्या कपाळाला बाण लागला होता तो काढून तिने जखमेवर घट्ट हात धरून ठेवला म्हणून रक्त प्रवाह थांबला. नंतर तिने त्याच्या कपाळाला पट्टी बांधली. गरुडाने पंख फडफडवून वारा घातला. त्यामुळे कृष्णाला थोडे बरे वाटले. शुद्धीवर आल्यावर कृष्ण सत्यभामेकडे पाहून म्हणाला—"मला थोडे दमल्यासारखे वाटत आहे. तू युद्ध चालू ठेव." सत्यभामेने लगेच कृष्णाचे धनुष्य घेतले व भाता काढून आपल्या खांद्याला अडकवला.

तिने नरकासुरावर शरवृष्टी सुरू केली तेव्हां नरकासुराला राग आला. म्हणाला—"माझ्यासमोर युद्ध करण्याची तयारी नाही म्हणून भागुबाई सारखा कृष्ण पळून गेला आहे आणि बायकोला पुढे केले आहे." असे म्हणून त्याने सत्यभामेवर बाणांचा पाऊस पाडायला सुरवात केली. बाण सत्यभामेच्या सर्व अंगात एका मागून एक शिरत होते. परंतु त्या सर्वांची फिकीर न करता सत्यभामेने नरकासुराचा झेंडा तोडला. त्याच्या रथाचे घोडे व सारथी एका मागून एक ठार केले. त्याने हातात बाण घेतला की सत्यभामा नेमका तोच बाण धनुष्यावर ठेवण्यापूर्वी तोडीत होती. अशा तऱ्हेने तिने नरकासुराला निराश व असहाय करून सोडले.

सत्यभामेचा तो शौर्य व पराक्रम पाहून कृष्णाने तिला प्रेमालिंगन देऊन तिचे अभिनंदन केले. तिच्या कपाळावरचा घाम पुसून तो तिला म्हणाला—"सत्यभामे! पुरे कर आता, तू दमली आहेस." असे












सांगून आपल्या गळ्यातला कंठहार त्याने तिच्या गळ्यात घातला.

तो कंठहार आपल्याला मिळावा म्हणून रुक्मिणी व सत्यभामा दोघीत चढाओढ चालू होती. परंतु सत्यभामेला तो आज सहजी मिळाला.

कृष्णाने सत्यभामेच्या हातातून धनुष्य बाण घेऊन पुन्हा युद्ध सुरू केले. मध्यंतरी जो थोडा अवधी मिळाला त्या वेळात नरकासुर दुसऱ्या रथात चढला व कृष्ण, सत्यभामा व त्यांचा रथ यांवर बाण सोडू लागला. परंतु कृष्णाने त्याचा नवा रथ, घोडे व सारथी सर्वांना एकामागून एक नष्ट केले. तेव्हां नरकासुराने गदा घेऊन युद्ध करू लागला. त्याने कृष्णावर गदा फेकली. पण कृष्णाने मध्येच ती तोडून टाकली. नरकासुराने कृष्णावर दुसरी अस्त्रे एकामागून एक टाकली व झाडे उपटून फेकू लागला.

शेवटी कृष्णाने सुदर्शन चक्राचा प्रयोग केला. ते लागताच नरकासुराचे दोन उभे तुकडे होऊन जमिनीवर आदळले. त्याच्या मृत्यूमुळे पृथ्वीवर चालू असलेला त्याचा अत्याचार थांबला. भूदेवीने प्रगट होऊन आपल्या मुलाला मांडीवर घेतले व शोक करू लागली. नंतर नरकासुराच्या कानांतली रत्नकुंडले काढून घेऊन ती कृष्णाजवळ आली व हात जोडून म्हणाली—"तूच मला हा पुत्र दिलास व तूच याला काट्यासारखा उचलून फेकून दिलास. ही इंद्राकडून हरण करून आणलेली रत्नकुंडले आहेत. तू ही घे. नरकासुराच्या मुलाला अभयदान दे."

कृष्णाने ते कबूल केले. भूदेवी अंतर्धान पावली. कृष्णाने नरकासुराची अंत्यविधी उरकून त्याचा मुलगा भगदत्त याला नरकासुराच्या सिंहासनावर बसविले.

नरकासुराच्या राजधानीत अलोट धन होते. दिक्पालकांना हरण करून त्याने ते सर्व मिळविले होते. नरकासुराच्या अधिकाऱ्यांनी ते सर्व आणून कृष्णासमोर ओतले.

मणिशैल नजीक सोळा हजार एकशे देवकन्यांना नरकासुराने बंदी करून ठेवले होते. श्रीकृष्ण सत्यभामेबरोबर तेथे गेला. कृष्णाला पाहून त्या म्हणाल्या—"नरकासुराने आम्हा देवकन्यांना कैद केले होते. आमचे दुःख ओळखून नारदाने आमचे सांत्वन करून आम्हांला धीर धरायला सांगितले होते. त्याने असे देखील सांगितले होते की स्वतः विष्णु अवतार घेऊन नरकासुराच्या हातून तुमचे रक्षण करील व तुमचे वरण करील. आम्ही तीच आशा मनात बाळगून आजवर जिवंत होतो."

कृष्णाने स्मित करून त्या सर्वांकडे पाहिले आणि त्या सर्वांना घेऊन जाण्यासाठी पालख्यांची व्यवस्था केली. नंतर कृष्णाने सर्व मणिशैल फिरून पाहिला. त्याचे एक शिखर वृक्ष व पक्षी या सकट उपटून गरुडाच्या पाठीवर ठेवले आणि सत्यभामेसह गरुडावर बसून इंद्रपुरीला निघाला. तेथे त्याच्या स्वागतासाठी शची व इंद्र हजर होते. कृष्णाने बरोबर आणलेली रत्नकुंडले इंद्राला परत दिली. कृष्णाने सत्यभामेच्या मदतीने नरकासुराचा वध केला होता. म्हणून शचीने सत्यभामेची वाखाणणी केली व म्हणाली—"मी तुला आवडेल अशी कोणती वस्तू माझी आठवण म्हणून देऊं?"

"मला कोणत्या गोष्टीची उणीव आहे? मला फक्त तुझे प्रेम हवे आहे." सत्यभामा म्हणाली.





# अरण्यपुराण

[ २३ ]

आता मौवलीला माकडांची भीती वाटत नाहीशी झाली. मौवली त्या पडक्या नगराकडे गेला असता माकडाचा कळप रानात कोठे तरी गेला होता. ते पडके नगर पूर्ण पणे निर्जन वाटत होते.

काबा पडक्या महालाच्या अंतःपुराकडे सरपटत गेला व त्याच्या मधोमध असलेल्या जिन्याच्या पायऱ्यावरून सरकत खाली जाऊ लागला. पायऱ्या पण मोडक्याच होत्या.

"आम्ही सर्व एक आहो निराळे नाही." मौवली सापांच्या भाषेत बोलला त्याला रांगतच जावे लागले. जिन्याच्या शेवटी नागमोडी वाट होती. पुढे गेल्यावर दगडाच्या भिंती तून एक मोठे मूळ बाहेर आल्यासारखे दिसले. एका चिंचोळ्या भोकातून शिरून दोघे एक खोलीत शिरले. ती खोली पाहून त्यांना आश्चर्य ती खोली म्हणजे एक मोठे दालन होते. छपरांतून शिरून झाडाची मुळे खाली लोंबत होती.

"ही गुहा रोज यायला जायला थोडी कठीण वाटते. येथे आपल्याला काय काय पहायचे आहे?" मौवलीने विचारले.

"मी आहे ना आत?" आंतून एक आवाज ऐकू आला. एका पांढरी वस्तू हलत असलेली मौवलीला दिसली. मौवलीने आयुष्यभरात तसा साप कधी पाहिला नव्हता. तो जवळ जवळ आठफूट लांब असेल. काळोखांत राहल्याकारणाने जुन्या दातासारखा थोडा तांबूस पिवळट दिसत होता. त्याच्या उघड्या फणावर दहाचा

शेवटचें मलपृष्ठ



आंकडा मळकट पिवळ्या रंगाचा दिसत होता. त्याचे डोळे लकाकत होते. तो दिसायला सुंदर व आकर्षक पण होता.

"शिकार करायची आहे." मौवली म्हणाला. तो कट्यार नेहमी आपल्या कमरेला खोचून ठेवीत असे. शिष्टतापूर्ण वागणे व बोलणे तो पार विसरून गेला होता.

पांढरा फण असलेला साप मौवलीला उत्तर न देता म्हणाला—"कसं काय वाटले हे गावं? शंभर हत्ती, वीस हजार घोडे व असंख्य पशूंनी भरलेले हे महानगर कसे काय वाटलं? वीस राजे मांडलिक आहेत या महाराजांचे. त्यांच्या लढायांची रणवाद्ये व शिंगे ऐकून एक युग लोटले."

"वर अरण्य काय ते दिसते आहे. तू हे सर्व काय म्हणतो स आहे? मी फक्त गजराजाला व त्याच्या मुलांना ओळखतो. एका गांवच्या सर्व बोक्यांना वाघाने ठार केले. पण राजा कोण, अन् ही काय भानगड आहे?" मौवलीने विचारले.

"जंगलाच्या मध्य भागी राजाने पाहरे-करी नेमून ज्या बुरजांच्या रक्षणाची व्यवस्था केली होती ते राजधानीचे दिंडी दरवाजे. माझ्या वडिलांचे वडील अंड्यातून बाहेर येण्यापूर्वी बांधलेली राजधानी आहे ती. माझ्या मुलांची मुले माझ्या सारखी पांढरी व फिक्की पडे पर्यंत ते नगर राहणार. याग सूर्याचा मुलगा विजय, त्याचा मुलगा चंद्रबीज, त्याचा मुलगा सलोंधी याने बाप्पा रावळ याच्या काळात हे नगर वसवले. तुम्ही कोणाचे पशू, स्पष्ट सांगा!" पांढऱ्या फणाने विचारले.

मौवली काबाकडे वळून म्हणाला—"तो काय विचारतो आहे, हे मला मुळीच कळले नाही."

"मला वाटते, तो फार म्हातारा आहे." काबा मौवलीला म्हणाला आणि पांढऱ्या फणवाल्याकडे वळून म्हणाला—"नागवंशाचे पितामह! या प्रदेशात आमच्या आठवणीत जंगलच जंगल आहे."

"तर मग माझ्या समोर बसलेला मनुष्य कोण? याला राजाचे नाव माहीत नाही. हा कोणाला भीत पण नाही. सापांची भाषा बोलतो. एक कट्यार बाळगतो. कोण आहे हा कोणी विचित्र प्राणी दिसतो आहे. याचे चरित्र मला ऐकावयाचे आहे." पांढरा फण वाला नाग म्हणाला.

त्या प्रश्नाचे उत्तर देत मौवली म्हणाला—"मला मौवली म्हणतात. मी रानातच राहातो. लांडगे माझे नातेवाईक आहेत. हा काबा माझा भाऊ आहे. नाग पितामह! पण तुम्ही कोण?"

"मी राजाच्या खजिन्याचा रक्षक नाग आहे. ज्या वेळी माझे अंग काळे होते त्या काळात करुण राजाने हे छप्पर बनविले. चोरी करणाऱ्याला मृत्यदंड देण्यासाठी माझी नेमणूक करून राजाने ही व्यवस्था केली होती. त्यानंतर दगडी दरवाजा पण खजिन्याचा तयार करण्यात आला. तेव्हां ब्राह्मणांनी मंत्र पाठ केला होता." पांढरा फणवाला म्हणाला.



मौवली विचार करू लागला. म्हणजे मात धोका आहे. मनुष्यांच्या वस्तीत राहतांना एका ब्राह्मणाच्या कामाची मला चांगली कल्पना आहे.

पांढरा फणवाला बोलत होता—"मी आल्यानंतर पांच वेळा ही मोठी शिळा उचलून आत ठेवा पोंचविण्यात आला. इतका मोठा ठेवा आणली कोठे नाही. सर्वात शेवटी ही शिळा उचलली त्याला फार फार काळ लोटला. कदाचित मी राजधानीला ओळखू शकणार नाही."

      

"आता ते नगर राहिलेच नाही. वर डोके करून पहा. दगडात शिरलेली मुळे. ही झाडांची मुळें आहेत. माणसे व झाडे एकत्र वाढत नसतात." काबाने अंगाचा भडका उडून जाईल असे उत्तर दिले.

पांढरा फणवाला म्हणाला–"दोन तीन वेळा मनुष्यांनी येथे आंत शिरण्याचा यत्न करून पाहिला. काळोखांत सरकत त्यांच्या जवळ पोचे पर्यंत ते काही बोलले नाहीत. त्यानंतर थोडा वेळ त्यांची बडबड चालू होती. तुम्ही सर्व खोटे बोलता आहा. एक मनुष्य व एक सर्प जातीचा प्राणी दोघे मला सांगता आहा की माझे नगर आता नाही आणि मी त्याच्या रक्षणाचे कार्य करण्याची गरज नाही! मी त्यावर विश्वास करीन असे वाटले होय तुम्हांला? ब्राम्हण मंत्रपाठ करून मला दूध पाजीपर्यंत मी राजाच्या खजिन्याचे रक्षण करणार. नगर ओसाड झाले! ही झाडांची मुळे आहेत म्हणता? वांकून या रत्नांना जरा हात लावून तर पहा. यांच्याहून जास्त मूल्यवान रत्ने जगात कोठे नाहीत. सापाची जीभ असलेल्या माणसा! तू आल्या वाटेने सुखरूप परत गेलास तर लहानलहान राजे तुझे गुलाम व्हायला तयार होतील."

"तुम्ही चुकत आहां नाग पितामह! घेऊन जायला येथे आहे काय? मला तरी दिसत नाही." मौवली म्हणाला.

"सूर्य व चंद्र दोघांना साक्षी ठेवून तीन कोटी देवांसमक्ष मी सांगतो, या मुलाला त्याचा काळ बोलावीत आहे. पहा, तुझ्या पापण्या लवण्यापूर्वी मी तुला एक वस्तू दाखवितो." पांढरा फणवाला म्हणाला.



## ७७. अंगर्स दुर्ग

हा किला अंगर्स (फ्रांस) नजीक नवव्या लुई राजाने बांधला. याला सेण्ट लुई म्हणतात. (१३ वी शताब्दी) या किल्याला १७ बुरूज आहेत. हा गगन चुंबी दुर्ग नष्ट करण्यासाठी तिसऱ्या हेनरीने हुकूम सोडला होता. परंतु अंगर्सच्या गव्हर्नराने थोडी सावधगिरी दाखविल्याने या दुर्गाचे रक्षण होऊं शकले.



सर्व महाराष्ट्राचा अपमान झाल्यासारखे त्यांना वाटले. म्हणून परस्परांचे वैर विसरून पुन्हा एक जुटीने इंग्रजांना तोंड देण्याचे त्यांनी ठरविले.

प्रथम दौलतराव शिंदे व नागपूरचे दुसरे रघुजी भोसले यांनी परस्परांशी हात मिळवणी केली. त्यांनी यशवंतराव होळकर यांच्याशी हात मिळवणी करण्याचा यत्न पण केला, परंतु त्यात यश झाले नाही. होळकरांनी दोघांच्या मैत्रीचा परिणाम पाहून सख्य करता येईल असा विचार केला होता. परंतु त्यांनी सख्य करण्याचे कबूल केले तोपर्यंत हातची संधी निघून गेली होती.

१८०६ च्या ऑगस्ट महिन्यात इंग्रज व मराठे यांचे युद्ध सुरू झाले. मराठ्यांकडे २,५०००० सैनिक व फ्रेंच पद्धतीने शिक्षण मिळविलेले ४०,००० शिपाई होते. इंग्रजांनी पण युद्धाची उत्तम तयारी ठेवली होती. निरनिराळ्या जागी युद्ध सुरू झाले. मुख्य युद्धक्षेत्रे दक्षिणेकडे व उत्तरेकडे होती. गुजरात, बुंदेलखंड व ओरिसा प्रांतात लहान लहान युद्धे झाली. सर्व ठिकाणी इंग्रजांचाच जय मिळाला. शिंदे व भोसले यांचा अनेक वेळा पराभव झाला व त्यांनी निरनिराळे तह करून घेतले. १७ डिसेंबर १८०६ या रोजी देवगाव येथे जो तह झाला त्या तहा-प्रमाणे नागपूरचे भोसले कटक प्रांत, बालासोर व वर्धा नदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रांत हातचा घालवून बसले आणि त्यांनी इंग्रजांचे मांडलिकत्व स्वीकारले.

३० डिसेंबर रोजी शिंदे सरकारने इंग्रजांशी सुरजी अर्जुन गाव येथे तह केला. या तहान्वये त्यांनी गंगा यमुना नद्यांचा मध्य-प्रदेश इंग्रजांना दिला. त्याच बरोबर जयपुर, जोधपुर व गोहदच्या उत्तरे कडील राज्य, पश्चिमेकडील अहमदनगर, भडोच व अजिठा पर्वतापर्यंतच्या प्रदेशावरचा अधिकार ते घालवून बसले.





# भुतांबरोबर व्यापार

एका गांवी एका गरीब शेतकऱ्याला दोन मुले होती. मोठ्याचे नाव होते शिवू व धाकट्याचे रामू. शिवूचे लग्न एका श्रीमंताच्या मुलीशी झाले. म्हणून त्याचे कौटुंबिक जीवन सुखाचे झाले. रामूचे लग्न गरिबाच्या मुलीशी झाले. म्हणून त्याला गरिबीत दिवस काढावे लागत.

बायकोच्या सांगण्यावरून रामू चणे, चुरमुरे पकोडी वगैरे वस्तू घरात तयार करून एका टोपलीत घालून विकू लागला. रामूची बायकी घरी बसून नवऱ्याच्या कामाला हातभर लावी. गावभर फिरल्यावर संध्याकाळी त्याला कुटुंबाच्या पोटापाण्या पुरते पैसे मिळत. एकदा रामूला रिकाम्या हाताने घरी परत फिरावे लागले. कारण त्या दिवशी काही तरी सण होता. गावात प्रत्येकाच्या घरी पक्वान्नांचे जेवण होते. चुरमुरे फुटाणे कोण विकत घेणार? म्हणून संध्याकाळपर्यंत गावभर हिंडून अगदी हताश होऊन तो परत घरी निघाला.

तो गावच्या स्मशानाजवळ आला तोपर्यंत चांगला काळोख पडला होता. त्याला दूरून पुसट काही आकृती हालत असलेल्या दिसत होत्या. ती भुते असणार यात त्याला शंका उरली नाही. परंतु तो भितरा नव्हता. साहसी हिंमतवान होता. समजूतदारपण तो तितकाच होता. संकट समयी पळपुट्या-सारखा पळून जाणारा नव्हता. प्रसंगावधान राखून काय करावे हे त्याला चांगले कळत होते. म्हणून तो एका झाडाखाली बसून भुतांचे लक्ष त्याच्याकडे जावे म्हणून मोठमोठ्याने ओरडू लागला—"गरम चुरमुरे, घ्या फुटाणे मसालेदार, पकोडी मिठाई ही किती मजेदार!"

उपाशी भुतांनी ते ऐकले आणि धावली. रामू भोवती घोळका करून उभी राहली व म्हणाली—"आम्हांला, आम्हाला दे!"



"तुमच्या करता तर घेऊन आलो आहे. खा: पोटभर!" रामू म्हणाला.

भुतांनी रामूच्या टोपलीवर हात मारला व सारी टोपली रिकामी केली आणि म्हणू लागली–"खरोखरच फुटाणे आहेत मसालेदार आणि मिठाई आहे मजेदार. रोज कां नाही आणीत तू?"

रामू म्हणाला–"तुम्ही म्हणालात तर रोज आणीन."

त्या दिवशी रिकामी टोपली घेऊन घरी गेला आणि बायकोला म्हणाला–"आज पासून भुते माझी गिऱ्हाईक झाली आहेत. त्यांच्याबरोबर मी व्यापार करणार आहे. त्यांच्याशी मैत्री झाली की मग आपल्याला जे पाहिजे ते मिळेल. कसली उणीव भासणार नाही."

रामूची बायको गप्प बसली. नकार किंवा होकार काहीच दिला नाहीं. कारण नवऱ्याच्या कर्तबगारीवर तिचा पूर्ण विश्वास होता. तो जे काही करतो विचार, करून करतो, अविचाराने काही करीत नाहीं हे तिला चांगले माहीत होते. म्हणून तिने दुसऱ्या दिवली टोपली भरून चणे चुरमुरे पकोडी, वगैरे मिठाई तयार करून दिली. रामू संध्याकाळपर्यंत घरा बाहेर पडला नाही. काळोख पडल्यावर टोपली डोक्यावर घेऊन निघाला. तो सरळ स्मशानात गेला. भुते घोळका करून त्याच्या चारी बाजूला जमा झाली आणि एका क्षणार्धात त्याची टोपली रिकामी झाली.

तेव्हां रामू भुतांना म्हणाला–"हे पहा! मी आहे व्यापारी. पैसे घेऊन माल विकतो. मी रोज छान निरनिराळे पदार्थ आणीत जाईन. पण तुम्ही पैसे दिले नाहीत तर मात्र मी काही आणणार नाही."

"अरे, तुला काय पैसेच हवेत ना? घे पाहिजे तितके. थांब येथे." थोडा वेळ असे सांगून भुते गेली आणि टोपलीभर



आणि म्हणाली–"हे घे. आता रोज आले पाहिजे बरं रुपये आणून दिले का? आम्ही तुझी वाट पहात बसू."

रामूने परत येण्याचे वचन दिले व टोपलीभर रुपये घेऊन घरी गेला. बायकोला तर हर्ष रोग झाल्यासारखे झाले. ओरडून म्हणाली–"अगोबाई! इतके रुपये!"

"मी तुला नव्हते का सांगितले की भुतें माझी गिऱ्हाईक आहेत. आता, हात पाय हलवल्याशिवाय आयुष्यभर आनंदाने खाऊ पिऊ." रामू बायकोला म्हणाला.

रामूने शेत विकत घेतले, गाई गुरे विकत घेतली व एक सुंदर घर स्वत:ला राहण्यासाठी बांधले. ते सर्व पाहून मोठ्या भावाला आश्चर्य वाटले. तो रामूच्या घरी आला व म्हणाला–"रामू! तुला एकदम एवढे धन कोठे रे मिळाले?"

रामूने शिवूला खरे खरे ते सांगितले.

"अस्सं! म्हणजे भुतांशी व्यापार करण्यांत फायदा आहे तर! मी सुद्धा तसाच व्यापार करून पैसे मिळवून आणतो." शिवू म्हणाला.

रात्री शिवूपण रामूसारखीच एक टोपली भर मिठाई, चणे चुरमुरे घेऊन स्मशानात गेला.



रामूला भीती वाटू लागली, आपल्यासारखे साहस, धीटपणा भाऊ दाखवू शकला नाही तर. त्याने भुतांना भीती दाखविण्याचा विचार करून ठेवला. भाऊ स्मशानात गेल्यानंतर रामू तेल व काडयाची पेटी घेऊन स्मशानात गेला. स्मशानाच्या कडेला काटेरी झाडे झुडपे होती. त्यांच्यावर तेल शिंपडून ठेवले.

शिवू स्मशानात पोचला होता. तो जवळ आल्याबरोबर भुते गराडा घालून त्याच्या चारी बाजूला जमा झाली आणि दरडावून विचारू लागली–"रोज यायचे वचन देऊन तू नाहीसाच झालास की रे! पुन्हा अशी





फसवा फसवी करशील का?" रागाने ती बोलत होती.

इतक्यात रामू पुढे धावत आला व म्हणाला–"यांना सोडा. वचन देणारा मी होतो, हे नव्हते."

भुतांनी शिवूला सोडले व रामूला गराडा घालून उभी राहली. म्हणाली–"मग बोल, तूं कां नाही आलास?"

"तुम्हांला एवढेच एक कळते. पण मी रोज आलो हे नाही कळले. मला वाटेत दुसरी भुते अडवून धरीत होती. माझी सर्व टोपली रिकामी करीत तेव्हां मला सोडीत. त्यांच्या तावडीतून सुटका मिळेल तर ना मी येणार? काय करूं, सांगा!" शिवू म्हणाला.

"अस्सं, होय! दाखव, ती भुते कोठे आहेत नी. आज त्यांचा समाचार घेतो आम्ही," सर्व भुते म्हणाली.

"चला तर!" असे रामू म्हणाला आणि त्यांना कांटेरी झुडपांजवळ घेऊन जाऊन म्हणाला–"या झुडपात दडून बसली आहेत."

भुतांनी मागे पुढे पाहिले नाही आणि सर्व झुडपात शिरली. क्षणार्धात रामूने काडी पेटवून झुडपांना आग लावली. भुते घाबरून बाहेर आली आणि पळून गेली. त्यानंतर स्मशानात देखील कोणाला कधी भुते दिसली नाहीत.

रामू आपल्या मोठ्या भावाला घरी घेऊन गेला आणि म्हणाला–"दादा! अरे काळजी कसली? आपल्याकडे जे काही आहे ते वाटून घेऊ आणि सुखाने पुढचे आयुष्य घालवू."

त्यानंतर दोघा भावांनी मिळून शेती-भाती केली. व्यापार धदा केला. पुष्कळ पैसा मिळवला व सुखी झाले.





# पडकें देऊळ

[५]

[पुजाऱ्याच्या जाळ्यातून स्वतःचा बचाव करीत शिखीमुख ज्या जागी पोचला त्या जागी विक्रमकेसरी आला. ते दोघे, चोर कोठे आहेत याचा शोध काढीत डोंगराळ प्रदेशात पोचले. तेथे त्रिशूळ यातात असलेले एक मोठे लाकडी बाहुले दिसले. लाल कुत्रे त्याच्या पायाखालून निघून जाताच त्रिशूळ जमिनीत रुतला. पुढे]

लाकडी बाहुल्याचे हात हलतांना जो बारीक आवाज झाला तो ऐकून कान टवकारून कुत्रा पुढे निसटून निघून गेला आणि दुसऱ्या क्षणी त्रिशूल वेगाने जमिनीत शिरला. शिखीमुख व विक्रमकेसरी ते दृश्य चकित होऊन पहात होते. त्या बाहुल्याचे हात पुन्हा वर जागच्या जागी झाले.

"हे लाकडी बाहुले नसून राक्षसी बाहुले आहे. आज लाल कुत्र्याने आपला दोघांचा जीव वांचविला. आपण दोघे पुढे गेलो असतो व 'राम' म्हटले असते." विक्रमकेसरी म्हणाला.

शिखीमुख त्या लाकडी बाहुल्याकडे दुरूनच पण ध्यानपूर्वक पहात म्हणाला–"पडक्या देवळाच्या त्या पुजऱ्याने आपल्या बाहुले येथे करून सारख्यांसाठी हे ठेवलेले दिसते आहे. आपल्या पूर्वी कोणी तरी इकडून गेलेला दिसतो आहे आणि



याच्या हातच्या त्रिशूलाखाली सापडून जखमी झालेला किंवा मेलेला दिसतो आहे. पहा ना, त्रिशूळाला लागलेले रक्त ताजे आहे आणि सूर्याच्या किरणात कसे छान चमकत आहे."

विक्रमकेसरीने दुरून भाल्याचे टोक त्या राक्षसी बाहुल्याच्या पायाला मारून पाहिले. बाहुले थोडे हलले. ते पाहून शिखीमुखाकडे वळून तो म्हणाला—"शिखी! मला वाटते, आपण थोडा प्रयत्न केला तर याला सहजी खाली पाडता येईल. याला असेल ठेवून दिले तर आपले साथी याच्या खालून जाण्याचा प्रयत्न करतील आणि त्रिशूळा खाली सापडून ठार होतील."

शिखीमुखने होकारार्थी मान हलविली आणि विक्रमकेसरीला एक मोठी शिळा दाखवीत म्हणाला—"आपण दोघांनी थोडा प्रयत्न केला तर ह्या हलेल व गडगडत याच्यावर येऊन आदळला तर या बाहुयाचे तुकडे होऊन जातील."

तसे मनाशी ठरवून दोघांनी तो दगड जोराने हलविला आणि तो गडगडत जाऊन त्या बाहुल्यावर आदळला. त्याचा धक्का बाहुल्याच्या एका पायाला लागला आणि दुसऱ्या क्षणाला बाहुला 'कर्र' असा आवाज करीत जमिनीवर पडला. त्याच्या हातातला त्रिशूळ दूर जाऊन पडला.

"काम कसे छान फत्ते झाले. पण तो लाकडी बाहुला पडला त्यावेळी जो आवाज झाला तो त्या पुजाऱ्याला किंवा त्याच्या अनुयायांना नक्कीच ऐकू गेला असेल." शिखीमुख म्हणाला.

"त्यात शंका करण्याची गरजच नाही. मला तर असे देखील वाटते की त्यांनी आपल्याला दगडाआडून पाहिले देखील असेल. कदाचित ते हे पहात उभे होते की त्या बाहुल्याच्या हातचा त्रिशूळ केव्हा आपल्या छातीत लागतो व केव्हा आपण त्याच्या पायावर लोटांगण घालतो." विक्रमकेसरी म्हणाला.

"आता मला आणखी एक शंका वाटू लागली आहे. आपण आपल्याच नादात त्या दुष्ट लोकांच्या जाळ्यात गुरफटून गेलो तर नाही? शबर वस्तीतून आपल्या मदतीला आलेल्या लोकांना पाठवून आपण मोठी चूक केली. ह्या दुष्टांना आपण दोघांनी तोंड देणे कठीण नाही का? येथेच कोठे तरी ते लपून बसले असणार." शिखीमुख म्हणाला.

ते दोघे बोलतच होते, तेवढ्यात कुत्रा, (जो डोंगरातल्या गुहेत शिरला होता) भुंकत आपल्या मालकाजवळ येऊन उभा राहिला. कुत्र्याच्या भुंकण्यावरून शिखीमुखला वाटले की पुजाऱ्याचे अनुयायी येथेच कोठे तरी दबा धरून बसलेले असणार व कदाचित आपल्यावर हल्ला करण्याच्या तयारीत असणार.

शिखीमुख कुत्र्याला जवळ ओढून कुरवाळीत आपल्या मित्राला म्हणाला—"केसरी! कायपण हे कुत्रे आहे? अरे, माणसापेक्षा मायाळ, विश्वासू आणि शूर. अरे हो, पण येथे उभे राहण्यात किंवा पुढे जाण्यात धोका दिसतो आहे. पुजाऱ्याचे



अनुयायी दुरून लपून बाण सोडून आपल्याला ठार करतील. मोठमोठ्या खडकां आडून आपण पाहिजे तर पुढे जायला हरकत नाही. हा कुत्रा आपल्याला वाट दाखवायला आहेच."

परंतु कुत्रा पुढे जाण्या ऐवजी मागच्या पायांवर उभा राहून मोठमोठ्याने भुंकू लागला. त्याच्या त्या वागण्याचा अर्थ ओळखून शिखीमुख खडकाआड रांगत पुढे जाण्याऐवजी उठून उभा राहिला. त्याची दृष्टी त्याच्याकडे पळत येणाऱ्या एका शबर तरुणावर पडली. त्याच्या हातात धनुष्यबाण होता. परंतु इतक्या दुरून धावत पळत येत



होता की उभा राहल्यावर थोडा वेळ त्याच्या तोंडा वाटे एक शब्द देखील आला नाही. शिखीमुखने त्याला दम घ्यायला थोडा वेळ देऊन विचारले–"कोठला राहणारा तू? असा पळत येण्याचे कारण काय?"

तो म्हणाला–"मी गाय गावचा राहणारा. आमच्या गावचे सर्व धान्य नाग जातीचे लोक येऊन लुटून नेत आहेत. मी मदतीसाठी तुमच्याकडे धावत आलो आहे. तू जिवाजीचा मुलगा शिखीमुखच ना? तुझ्या कुत्र्याला पाहून तू व तुझे अनुयायी जवळ पास कोठे असाल असे मला वाटले. म्हणून तुझ्या कुत्र्याच्या पाठीमागून मी पळत आलो."

तो शबर म्हणाला ते नाग जातीचे लोक म्हणजे पुजाऱ्याचे अनुयायी नोकरच असावेत असे शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांना वाटले. शिखीमुखने डोंगराच्या पायथ्याला असलेल्या गाय गावाकडे पाहून त्या शबर तरुणाला विचारले–"धान्य लुटायला आलेल्या लोकांबरोबर एक उंच मनुष्य कोणी आहे का?"

"असा कोणी दिसला नाही. नागजातीचा कोणी लट्ठूसिंह नांवाचा एक मनुष्य त्यांचा नायक आहे. त्याला लांब लांब मिशा आहेत. दिसायला तो रानटी रेड्यासारखा काळा व आडदांड आहे." तो तरुण म्हणाला.

"अस्सं! तू आमच्या गावी जा आणि मी सांगितले आहे म्हणून सांग, मदतीला या म्हणावे. आम्ही दोघे पुढे जातो. आम्ही त्या लोकांना गावाबाहेर पाऊल टाकू देणार नाही. तुझ्या गावची वाट मला माहीत आहे." शिखीमुख म्हणाला.

गायगावचा तो तरुण शिखीमुखच्या गावी निघून गेला आणि शिखीमुख व विक्रमकेसरी दोघे गायगावाकडे निघाले. पंधरा मिनिटात ते त्या गावी येऊन पोचले. तेथे झाडाखाली शबरजातीचे तरुण उभे होते व त्यांना धाकदपटशा दाखवीत आणि दरडावीत नागजातीचे दहाबारा सशस्त्र लोक पाहरा देत असलेले दिसले. त्यांना पाहताच ते पुजाऱ्याचे अनुयायीच असले पाहिजेत हे दोघांनी ओळखले.

शिखीमुखला एक युक्ती सुचली. तो त्या पाहारेकऱ्यांजवळ जाऊन म्हणाला–"तुमचा मालक तो पुजारी आहेना? तो कोठे आहे एक काम आहे. त्याला भेटण्यासाठी मी आलो आहे."

ते ऐकून पाहरा देणाऱ्या पैकी एक जण शिखीमुखला न्याहाळून पहात मोठ्याने हसला व म्हणाला–"पुजाऱ्याला भेटायला आला आहे, म्हणे! काम आहे म्हणे! तू कोण रे! बदमाश! शबर जातीचा पोर! आमचे मालक क्षणात प्रगट होतील व क्षणात अदृश्यपण होतील."

दुसरा एक जण शिखीमुखला व त्याच्या कुत्र्याला ओळखून म्हणाला–"अरे हा तर आपल्या हातातून निसटून रात्री पळून गेलेला शबरजातीचा तो तरुण आहे. याने आपल्या पैकी दोघांना जखमी केले होते. या कुत्र्याला पकडायला म्हणून गेलेल्या चौघांना हा कुत्रा चावला पण होता, त्याचा हा साथी, हो याला सुद्धा कोठेतरी पाहाल्या-



सारखे आठवते." असे म्हणत तो आपला भाला उचलून शिखीमुख व विक्रमकेसरीच्या अंगावर धावला.

शिखीमुख व विक्रमकेसरीने पण आपापले भाले उचलले. शिखीमुख पाऊल पुढे न टाकता म्हणाला–"तुमच्या मालकाला भेटायचे आहे. पाहारेकऱ्यांशी आमचे काय वांकडे. पण त्यांच्या पैकी कोणी आमच्यावर हल्ला केला तर त्यांचे मरण निश्चित पणेजवळ आलेच समजा. नंतर तुम्ही ज्या शबर लोकांवर पाहरा देण्यासाठी उभे आहा ते पळून जातील. ते पुजाऱ्याला कळले तर तो तुम्हाला उभा चिरून खाईल."



शिखीमुखच्या तोंडचे ते वाक्य ऐकताच तो नाग तरुण मागे फिरला व म्हणाला– आमचा नायक लट्ठूसिह याने आम्हाला जे काम सांगितले आहे ते आपण करावयाचे आहे. या मूर्खांच्या तोंडी लागण्यात काय अर्थ आहे?" असे म्हणत तो शिखीमुखला म्हणाला–"पुजारी कोठे आहे, हे नाही आम्हांला माहीत. पण त्यांचा उजवा हात लट्ठूसिह गांवात धान्याची पोती भरीत आहे. तुला मरण हवे असेल तर त्याला जाऊन पुजारी कोठे आहे हे विचार."

शिखीमुख व विक्रमकेसरी दोघे गावाकडे वळले. जातांना ते विचार करु लागले, आता पुढे काय करावे, अर्धा तास लागेल शंबर लोकांना मदतीला यायला. तो पर्यंत त्या लट्ठूसिहाला गप्पात गुंतवून ठेवता आले तर बाबा गावकऱ्यांबरोबर येतील व सर्वांना कैद करु शकतील. नंतर त्या पुजाऱ्याचा पण समाचार घेता येईल विक्रम! तुला काय वाटते?" शिखीमुखने विचारले.

"ठीक! आपण तसेच करु या. चल!" विक्रमकेसरी म्हणाला. ते दोघे गावात पोचले तेव्हां काही नाग लोक धान्याची गाठोडी बांधीत होते. एका बाजूला एक आडदांड मनुष्य आपल्या लांब लांब मिशा पिळवटत एका हाताने होता, त्याच्या दुसऱ्या हातात भाला होता.

शिखीमुख त्याच्याजवळ जाता जाता मध्येच थांबला व जोराने हाक मारीत म्हणाला–"लट्ठूसिह! तू हा काय प्रकार अन्याय चालवला आहेस? बिचाऱ्या गावकऱ्यांनी मेहनत करुन पिकवलेले धान्य तू फुकटात असे लुटून नेणार होय? मनुष्य आहेस की राक्षस? हा का न्याय झाला?"

लट्ठूसिह तेव्हा पाठमोरा उभा होता. मागे वळून शिखीमुखकडे आश्चर्याने पहात म्हणाला–"कोण रे तू! ओ हो! जिवाजीचा पोर वाटते? पुष्कळ ऐकले आहे तुझ्या

    

विषयी. एकदा पाहिले पण आहे तुला. तू आम्हां नाग जातीच्या लोकांना न्याय धर्म शिकवायला आला आहेस, होय ना? पण तुला कसे शिकवायचे हे अजून कळले नाही आम्हांला." असे सांगून तो आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला—"पाहता काय? याला व त्याच्या मित्राला पकडून प्रथम झाडाला बांधून ठेवा."

लट्ठूसिंहाचा हुकूम होताच चार नाग शिखीमुखला व विक्रमकेसरीला धरण्यासाठी पुढे येऊ लागले. पण प्रसंग ओळखून शिखीमुखने आपल्या मित्राला सावध केले व दोघे एकेक पाऊल मागे सरकू लागले. मागे सरकून शत्रू बेसावध असतांना वार करावयाचा, असा हेतू होता दोघांचा. नाहीतर इतर लोक चटकन पुढे येऊन त्यांना चारी घेरून उभे राहतील.

शिखीमुखला मागे सरकताना पाहून लट्ठूसिंह मोठ्याने हंसला व म्हणाला—शबरजातीचा सरदार शिवाजीचा मुलगा असा भित्री भागूबाई असेल असे नव्हते मला वाटले."

ते ऐकून व्यंग करीत शिखीमुख दोन पावले पुढे टाकून म्हणाला—"लट्ठूसिंह! तू वया उंची व शक्ती तिन्हीत माझ्याहून मोठा आहेस. मग मला पकडण्यासाठी आपल्या अनुयायांना कां पाठविलेस. तूंच स्वत: कां नाही पुढे येत? भित्री भागूबाईमी की तू?"

तो अपमान लट्ठूसिंहाला असह्य झाला. "अस्सं!" असे म्हणत डाव्या हाताने मिशा पिळवटत व उजव्या हाताने भाला पेलत म्हणाला—"तर मग तू स्वत:च आपल्या मृत्यूला बोलावणे पाठवीत आहेस. हा पहा, तुझ्या मृत्यु मी आलो! खबरदार!" असे म्हणत भाल्याचा नेम शिखीमुखवर धरून त्याने जोराने उडी मारली व शिखीमुख होता तिकडे निघाला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# जादूच्या आजार

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझी निष्ठा व्रजदत्तच्या निष्ठेसारखी आहे, काकणभर जास्तच आहे. परंतु तू त्याच्या सारखे हातात आलेले यश मात्र घालवून बसू नकोस. तुला रात्रीच्या वेळी कंटाळा येऊ नये म्हणून त्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मगधचा राजा देवदत्त याला व्रजदत्त नावाचा मुलगा होता त्याला लहानपणा पासूनच वैद्यकशास्त्राची आवड होती. त्याने लहान वयातच वैद्यकशास्त्रावर सर्व ग्रन्थ वाचून काढले. नंतर त्याने औषधी वनस्पती व निरनिराळ्या प्रकारच्या मुळ्या यांचा



अभ्यास केला. काही काळ रानटी लोकांच्या संगतीत राहून त्याने काही वन्य औषधांची पण माहिती करून घेतली. तरुण वयातच त्याला लोग धन्वतरी म्हणून ओळखू लागले.

वयात आल्यावर त्याच्या आई वडिलांनी त्याचे लग्न करून देण्याचे ठरविले. तो रूपाने मदनाचा जणुकाही पुतळाच होता. म्हणून पुष्कळ राजकन्या सांगून अल्या, एकीहून एक सुंदर. राजा व राणी दोघांना पुष्कळ मुली पसंत पडल्या, परंतु व्रजदत्तला त्यांच्यापैकी एक देखील पसत पडली नाही.

प्रकृतीविषयी किंवा मानसिक स्वास्थ्याविषयी परीक्षा करून घेत असे. म्हणून त्याला प्रत्येक मुलीत हा ना तो आजार दिसून येई व तो नकार देई.

विदर्भ देशाचा राजा विक्रमसेन याला तेजोवती नावाची एक मलगी होती. तिचे आईवडील आपल्या मुलीसाठी चांगले स्थळ पहातच होते. त्यांनी व्रजदत्तच्या सौंदर्याविषयी ऐकले होते. परंतु मुलीला दाखवायला नेणे त्यांना पसंत नव्हते. त्यांत त्यांना स्वत:चा अपमान वाटला. एवढेमात्र त्यांना वाटे की व्रजदत्त मुलीला पाहील तर नक्कीच तिला पसंत करील.

म्हणून तेजोवतीच्या आई वडिलांनी व्रजदत्तला विदर्भ देशात बोलावण्याचा निश्चय करून एक युक्ती केली. देशभर तेजोवतीची वाचा गेल्याची व ती मुकी झाल्याची बातमी एकाएकी पसरली. विक्रमसेनाने जाहीर केले की त्याच्या मुलीची वाचा परत आणून देणाऱ्या वैद्याला त्याच्या वजनाचे सोने देण्यात येईल. कित्येक वैद्यांनी येऊन तेजोवतीच्या आजाराचे निदान केले. पण काही फायदा झाला नाही. खरोखरची वाचा बंद झाली [illegible]ती तर कदाचित औषधपाणी करणे शक्य होते. परंतु मुकेपणाचे सोंग करणाराचे औषधपाणी कसे कोण करणार?

पुढे विक्रमसेनाने मगधच्या दरबारी दूत पाठवून विनंती केली की मुलीच्या मुकेपणाचे निदान करून व्रजदत्तने औषधपाणी करता येण्यासारखे असेल तर करावे. व्रजदत्त त्याला कबूल झाला व तो त्या दूताबरोबर विदर्भ देशांत आला. विक्रमसेनाने व्रजदत्तची बडदास्त जावयापेक्षा जास्त चांगली ठेवली. दुसऱ्या दिवशी तेजोवतीला पाहून तिच्या आजाराचे कारण व औषधपाण्याविषयी चवकशी करण्याचे ठरले. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी त्याने तेजोवतीला पाहिले. तिचे रूप लावण्य पाहून त्याला वाटले की तिच्या सौंदर्याची बरोबरी करू शकणारी मुलगी जगात कोठे मिळणे अशक्य. त्याच बरोबर त्याने हे देखील ओळखले की तेजोवती मुकी नाही. पण तो त्याविषयी काही बोलला नाही. तो राजाला म्हणाला—"आपली मुलगी मुकी आहे खरी, परंतु तिच्याशीच विवाह करण्याचा माझा विचार आहे."

राजा सर्व ऐकत होता, पण काही बोलला नाही. वज्रदत्त पुढे म्हणाला—"हा आजार तसा मोठा व जुना दिसत नाही. आपल्या राज्यातल्या मोठमोठ्या वैद्यांनी





प्रयत्न करून हात टेकले हे ऐकून मला फार आश्चर्य वाटत आहे. मी फक्त एकच गोळी देऊन हा आजार बरा करून दाखवितो." असे सांगून वज्रदत्तने आपल्या औषधाच्या पिशवीतून एक गोळी काढून तेजोवतीला दिली.

त्याच दिवशी रात्री वज्रदत्त विदर्भ राजाचा निरोप घेतल्याशिवाय गुप्तपणे मगध देशी निघून गेला.

राजाने येऊन पाहिले तर वज्रदत्त नव्हता व तेजोवती खरोखच मुकी झाली होती. विक्रमसेन घाबरला. त्याने पुष्कळ शोध केला पण वज्रदत्त कोठे कोणाला दिसला नाही. तो परत मगधदेशी गेला असावा असेच राजाला व प्रत्येकाला वाटले.

शेवटी नाइलाजाने विक्रमसेन आपल्या मुक्या राजकन्येला घेऊन मगधदेशी गेला. वज्रदत्तजवळ अनेक प्रकारे माफी मागितली आणि मुलीने मुकेपणाचे सोंग कां केले होते हे देखील सांगून टाकले.

वज्रदत्ताने तेजोवतीला आणखी एक गोळी दिली. ती खाल्ल्या बरोबर ती पुन्हा बोलू लागली. वज्रदत्तच्या आई वडिलांनी देखील मुलीला पसंत केले व तिच्या आईवडिलांना मुलाच्या पोरकट पणामुळे जो त्रास झाला त्याबद्दल दुःख व्यक्त करून ते म्हणाले–"मुलीने मुकेपणाचे सोंग केले त्यात काही गैर नाही. आपल्या होणाऱ्या पतीची तिने परीक्षा घेतली. मुलाने पण थट्टे थट्टे तच हे सर्व केले. दोघांनी परस्पर परीक्षा घेऊन परस्परांना पसंत केले."

विक्रमसेन राजा म्हणाला–"मी तेजो-वतीचा विवाह समारंभ पुराकरूनच जावे म्हणत आहे."

वज्रदत्त म्हणाला–"मी आपल्या मुलीचा आजार बरा करण्याचे कबूल केले होते. त्या साठीच मी आपल्या कडे आलो होतो. आता आपली मुलगी चांगली बोलू लागली आहे. आतां इतर गोष्टींचा आग्रह आपण धरूं नये."

विक्रमसेनाने देवदत्त व त्याची राणी दोघांसमोर हात जोडून विनंती केली की माझ्या मुलीने आपल्या मुलाशींच लग्न करण्याचे मनाशी ठरविले आहे. आपण आपल्या मुलाचे मन वळवून तिच्याशी विवाह करून घेण्यास सांगावे."

आईवडिलांनी अनेक प्रकारे मुलाला समजावून सांगितले, पण तो तेजोवतीशी लग्नास तयार झाला नाही. शेवटी निराश होऊन विक्रमसेन मुलीला घेऊन विदर्भदेशी परतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, वज्रदत्ताने तेजोवतीला पाहल्या-बरोबर तिच्याशी लग्न करण्याचे मनाशी ठरविले होते. मग त्याने असा नकार कां द्यावा? तिने मुकेपणाचे सोंग केले होतें म्हणून? तेजोवतीने ते सर्व त्याच्याशी लग्न व्हावे याच हेतूने नव्हते का केले? हे कळले असूनही त्याचे मन कां बदलले नाही? तिने फसविले म्हणून तो तिच्यावर रागावला होता तर त्याने तिला पुन्हा वाचा कां दिली? या सर्व शंकांचे समाधान तुला





माहीत असून तू केलं नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला—"व्रजदत्त सर्व रोग बरा करणारा एक अपर धन्वंतरी होता. परंतु त्याच्या वैद्यक विद्येवर तेजावतीचा विश्वास नव्हता. म्हणून तिने मुके पणाचे सोंग केले आणि त्याच्या वैद्यक विद्येचा तिने अपमान केला. म्हणून आपल्या वैद्यक विद्येचा पराक्रम पटवून देण्यासाठी त्याने तिला मुके केले. रोग्याने रोगाचे निदान करून औषध द्यायला विनंती केली की त्याचे औषधपाणी करणे प्रत्येक वैद्याचे कर्तव्य असते. म्हणून तेजोवतीचा मुकेपणा त्याने दूर केला आणि आपल्या शक्तीची साक्ष पटवून दिली. आता तेजोवतीशी लग्न करण्याविषयीं तो कदाचित कबूल झाला असता. परंतु केव्हां? तो प्रथम आला त्या वेळी तेजोवतीने त्याला मुकेपणा धरण्या ऐवजी खरे ते सांगून टाकायला हवे होते कीं, त्याने यावे म्हणूनच तिने मुकेपणा धरला होता. तेव्हां कदाचित तिला क्षमा करून तो लग्नाला कबूल झाला असता. ते सर्व नाटक करण्याऐवजी ती त्याच्याबरोबर मगधदेशी जायला तेव्हांच तयार झाली असती तर येथवर परिस्थिती आली नसती. आपला मुकेपणा घालवण्यासाठी ती मगध देशी गेली होती. वैद्य म्हणून त्याने तिला वाचा परत मिळवून दिली. प्रत्येक वेळी तिने व तिच्या बापाने थोडा वरचढपणाच दाखविला. म्हणून व्रजदत्तने तेजोवतीशी लग्न केले नाही तर त्यांत मला तरी काही गैर वाटले नांही."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)









# सुलतानाचा निवाडा

अरबस्तानातील एका नगरी एका सुलतानाचे राज्य होते. त्या गांवी हसन नावाचा एक गरीब तरुण मुलगा रहात असे. तो दिसायला सुंदर होता व गायनशास्त्रात पण निपुण होता. त्याचे जमीला नामक एक मुलीवर प्रेम होते.

जमीलाचे सौंदर्य पाहून एका उमरावाने तिच्याशी लग्न करण्याचा विचार केला आणि एका मध्यस्थाला लग्नासंबंधी बोलणी करण्यासाठी त्या मुलीच्या आई वडिलांकडे पाठविले. परंतु जमीलाने, हसन शिवाय इतर कोणाशी ती लग्नाला तयार नाही, असा परत निरोप पाठविला. तेव्हां उमरावाने रात्रीच्या वेळी आपल्या नोकरांना पाठवून जमीलाला तिच्या इच्छे विरुद्ध आपल्या महालात उचलून आणविले. हसनला ती गोष्ट कळली व तो उमरावा विरुद्ध फिर्याद करण्यासाठी सुलतानाकडे गेला. पाहरेकऱ्यांनी सुलतानांची ती विश्रांतीची वेळ आहे असे सांगून दुसऱ्या दिवशी येण्यास सांगून हसनला परत पाठविले.

"उजाडेपर्यंत थांबावे लागले तर एका असहाय मुलीवर कहर होईल!" हसनने निवेदन केले.

"त्याला आतां आम्ही तरी काय करणार? आतां जाऊन सुलतानांची झोप मोडली तर आमचा शिरच्छेद होईल त्याची काय वाट?" पाहारेकरी म्हणाले.

तेव्हां हसन आपल्या गोड आवाजात एक गाणे म्हणू लागला. त्या गाण्यात त्याच्यावर आलेल्या संकटाचा सारांश होता.

सुलतान अर्धवट झोंपेत होता. अमृता-सारख्या गोड आवाजात हसनने म्हटलेले गाणे त्याला ऐकू आले. त्याने आपल्या

खास नोकराला पाठवून गाणे म्हणणाऱ्याला बोलावून आणायला सांगितले.

नोकर हसनला बोलावून घेऊन आला.

हसनने सुलतानाला लवून मुजरा केला. सुलतान त्याला म्हणाला—"काय रे, तुला अल्लाने किती गोड आवाज दिला आहे? उजाडेपर्यंत तू माझी करमणूक करशील का? मागशील ते तुला देईन."

"मालक! मी गाणे म्हणून आपणाकडून इनाम बक्षिस मिळविण्यासाठी आलो नसून एका दुसऱ्याच जरूरी कामाने आलो आहे. माझ्या प्रेमिकेला आपला एक उमराव तिच्या इच्छेविरुध्द उचलून घेऊन गेला आहे. आपण तिचे रक्षण केले नाही तर तो दुष्ट तिच्याशी निकाह् लावून घेईल. त्याने तिच्याशी लग्न केले तर मी जीवच देईन."

सुलतान थोडा वेळ विचार करून म्हणाला—"मला उद्या सकाळपर्यंत तू गाणे म्हणून दाखव. मी उद्यां न्याय निवाडा करीन."

हसन रात्रभर गाणे म्हणत राहला. त्याच्या प्रत्येक गाण्यात करुणरस होता.

उजाडल्यावर सुलतानाने त्या उमरावाला धरून घेऊन यायला हुकूम सोडला.

उमरावाने आल्याबरोबर सुलतानाला मुजरा करून अपराधाचे कारण विचारले.



"आम्ही असे ऐकतो की तू जमीला नाम कएका तरूण मुलीला आपल्या महालात तिच्या इच्छे विरुद्ध उचलून घेऊन आला आहेस. हे खरे असेल तर तुला कडक शिक्षा करावी लागेल." सुलतान म्हणाला.

"मालक! थोड्याच वेळापूर्वी काजी समक्ष आमचे दोघांचे लग्न झाले. लग्नानंतर लग्नाची मेजवानी चालू होती. तेवढ्यात आपल्या आज्ञेने आपले शिपाई मला धरून येथे घेऊन आले." उमराव म्हणाला.

सुलतानाचा चेहरा रागाने लाल झाला म्हणाला—"तू जमीलाला तिच्या विरुद्ध उचलून नेऊन तू तिच्याशी लग्न करून मोकळा झाला आहेस. तुला मी या अपराधा बद्दल फाशीची शिक्षा देतो." असे सांगून सुलतानाने शिपायांना आज्ञा केली "या दुष्टाला फाशीची शिक्षा द्या."

शिपाई त्या उमरावाला धरून घेऊन गेले. ते सर्व ऐकून हसन सुलतानाला म्हणाला—"मालक! मी विनंती केली तेव्हांच हे लग्न होऊ दिले नसते तर येथवर पाळी आली नसती. उजाडेपर्यंत आपणच. नाही का थांबायला सांगितले?"

सुलतान स्मित करून म्हणाला—"हसन! तू एक चांगला मनुष्य आहेस व तो उमराव दुष्ट आहे. उजाडण्यापूर्वी तो जमीलाशी लग्न करून घेणार हे मला माहीत होते. परंतु काही बिघडले नाही. उमरावाच्या मृत्यूनंतर जमीला उमरावाच्या स्थावर जंगम इस्टेटीची मालकीण होईल. तुझ्याशी लग्न करून घेण्यास मी तिला परवानगी देईन. दरबारी गायक म्हणून मी तुझी नेमणूक करतो."

त्याने न्याय मागितला त्यापेक्षा जास्तच न्याय सुलतानाने करून त्याला उपकृत केले आहे हे कळायला हसनला वेळ लागला नाही. उमरावाला फाशीची शिक्षा झाली ती फक्त त्याने केलेल्या फिर्यादीमुळे नसून त्याने पूर्वी केलेल्या गुन्ह्यांमुळे होती.





# भुतांच्या सौपावळी

एका गावी एक विधवा बाई रहात असे. तिला एक मुलगा होता. त्याचे नाव गोपाळ होते. तो तसा हुशार होता, पण उनाड स्वभावाचा होता. त्याला कामधंदा येत नसे. काही दिवसांनी त्याची आई वारली. त्याचा मामा त्याला आपल्या गावी बोलावून घेऊन गेला. मामाने एका मागून एका जमिनदाराच्या घरी त्याला कामाला लावून दिले. पण तो एका जागी टिकला नाही. मामाला कंटाळा आला व त्याने भाच्याला घराबाहेर काढले.

गोपाळ आपल्या मामाच्या घरून निघाला तो चारपाच दिवस पायी प्रवास करीत एका रानात आला. तेथे त्याला एक जुना पडका किल्ला दिसला. किल्ल्यासमोर एक जुनी विहीर होती. एक म्हातारी विहिरी-तून पाणी काढून बाहेर ओतीत होती. दम घेण्यासाठी ती मध्ये थोडा वेळ थांबे.

ती असे कां करते हे गोपाळला कळेना. त्याने तिला विचारले–"आजी! तुम्ही एवढे पाणी काढीत आहा व ते सर्व जमिनीवर ओतीत आहा हे कशाला? तुम्हांला दम लागल्यासारखा पण दिसतो आहे. मला द्या पोहरा, मी काढतो पाणी."

"अरे बाळ! मी आणखी पांच पोहरे ओढून काढले की भुते येतील." पोहरा गोपाळच्या हाती देत म्हातारी म्हणाली आणि झोपडीत निघून गेली.

गोपाळला ते सर्व काही कळेना. त्याने पन्नासवर पोहरे पाणी काढून म्हातारी ओतीत होती तसे ओतले. विहिरीतून दोन भुते आली आणि किल्ल्यात निघून गेली. थोड्या वेळाने ती परत आली व पुन्हा विहिरीत निघून गेली. गोपाळ झोपडीत आराम करीत बसलेल्या म्हातारीकडे गेला व त्याने तिला विचारले–"आजी! तुम्ही विहिरीतून हे पाणी कस्य काढला? विहिरीतून भुतें काय येतात? आणि किल्ल्यात जाऊन पुन्हा विहिरीत परत काय जातात? आहे तरी कोण या किल्ल्यात?

म्हातारी दम घेऊन म्हणाली–"बाळ! एका काळी मी या किल्ल्याची मालकीण होते. मी एक जादूगारीण आहे. कोठून तरी शिंग असलेला एक राक्षस आला आणि त्याने माझा किल्ला बळकावला. त्याने माझा मंत्रदंड हिसकावून घेतला आणि आपल्या कानात लपवून ठेवला. तो मंत्रदंड गेला तेव्हां पासून मी निर्बळ झाले. तो मंत्रदंड परत मिळविण्याच्या प्रयत्नात माझी दोन सोन्यासारखी मुले त्या राक्षसाच्या हाती मरण पावली. त्या विहिरीत दोन भुते आहेत. विहिरीतून शंभर बालड्या पाणी उपसले की ती बाहेर येतात आणि राक्षसाला सैंपाक करून घालतात. आयुष्यभर मला ही बेगार करावी लागत आहे."



"आजी! तुम्ही काळजी करू नका. मी तुमचा मंत्रदंड परत मिळवून देतो." गोपाळ म्हणाला.

गोपाळ दिवसभर त्या म्हातारीच्या झोपडीत राहला. म्हातारीने त्याला पोटभर जेवायला वाढले. दुसऱ्या दिवशी त्याने विहिरीतून शंभर बालड्या पाणी उपसून काढल्या. भुते विहिरीतून येऊन किल्ल्यात गेली. गोपाळ देखील त्यांच्या पाठोपाठ किल्ल्यात गेला.

सैंपाकघरात राक्षसाने शिकार करून आणलेल्या जनावरांचा ढीग ठेवलेला होता. भुतांनी भराभर जनावरांच्या मांसाचे लहान लहान तुकडे करून चूल पेटवली आणि मांस शिजायला ठेवले. गोपाळने पाठी मागून दोन्ही भुतांच्या शेंड्या धरून त्यांना मांसाच्या मोठ्या कढईत टाकले. भुते पण त्या मांसाबरोबर शिजू लागली.

गोपाळने सैंपाक झाल्यावर पर्वताकार राक्षसाला जागा करून त्याला ते मांस खायला वाढले. मांसाबरोबर भुतांचे व्यंजन पडले असल्यामुळे राक्षसाला त्या दिवसाचे मांस फार आवडले.

"आजचे मांस कोणी शिजवले बुवा! काय पण रुचकर झाले आहे? आज कोणी सैंपाक केला?" राक्षसाने विचारले.

गोपाळ हिंमत करून समोर येऊन म्हणाला–"राक्षसराज! मी सैंपाक केला. भुते आली नाहीत आज."

"तू? कोण तू?" राक्षसाने विचारले.

"मी भुतांचा सैंपाकी आहे." गोपाळ म्हणाला

"अरे गुलामा! छान सैंपाक करता येतो की रे तुला! आज पासून तूच येऊन सैंपाक करीत जा." राक्षस म्हणाला.

राक्षस काही वेळ ढेकरा देत बसून होता. नंतर जमिनीवर पडला आणि [illegible] लागला. संधी पाहून गोपाळने त्याच्या कानातला मंत्रदंड काढून घेतला आणि म्हातारीला नेऊन दिला.

मंत्रदंड हातात येताच हजार हत्तीचे बळ अंगात आल्यासारखे म्हातारीला वाटले. ती घाई घाईने किल्ल्यात गेली. राक्षसावर मंत्र टाकून जादूची कांडी फिरवली आणि तीनदां राक्षसाच्या डोक्यावर ती आपटली. राक्षस भस्म होऊन गेला.

झोपडीत परत आल्यावर म्हातारी गोपाळला म्हणाली–"बाळ! माझी मुले आता या जगात नाहीत. तूच माझा नातू. या किल्ल्यात अलोट धन आहे. तू ते घेऊन जा आणि सुखी हो."

म्हातारीने दाखविलेला ठेवा उचलून घेऊन गोपाळ मामाच्या घरी गेला. आपला भाचा इतके धन घेऊन आलेला पाहून मामा खूष झाला व त्याने त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले.







# बोलणारा पोपट

एका गावी भोलाराम नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याने एक पोपट पाळला होता

एकदा संध्या काळी भोलाराम शेतावरून परत येत असता त्याला वाटेत एक बकरा दिसला. तो बकरा भोलारामचा शेजारी काळूराम याचा होता. तो नाहीसा झाला होता. म्हणून काळूराम त्याला शोधत होता. पण बकरा सापडला नाही. बिचारा हताश होऊन घरी बसला होता.

भोलाराम सर्वांची नजर चुकवून बकरा घरी घेऊन आला आणि त्याने तो बकरा कापला. त्याचे थोडे मांस त्याने रात्रीच शिजवून खाल्ले व थोडे दुसऱ्या दिवसासाठी ठेवून दिले उरलेले मांस त्याने शेजारच्या गावी त्याचे नातेवाईक रहात होते त्यांच्या घरी पाठवून देण्यासाठी बाजूला काढून ठेवले. बकऱ्याचे कातडे गुंडाळून झोपडीच्या छपरात त्याने लपवून ठेवले. पोपट पिंजऱ्यात बसून ते सर्व पहात होता.

दुसऱ्या दिवशी काळूराम भोलारामाच्या घरी आला व म्हणाला–"काय सांगू अण्णा! अरे तीन दिवस झाले, कोठे बकरा गेला राम जाणे!"

लगेच पोपटाने बकऱ्याची गोष्ट जशी त्याने पाहाली होती सांगून टाकली. काळूरामाला ती गोष्ट खरी वाटली, पण काही बोलल्याशिवाय तो आपल्या घरी निघून गेला. जातांना झोपडीच्या छपरात लपवून ठेवलेले कातडे त्याला दिसले.

भोलारामाला वाटले की काळूराम जाऊन पाटलाकडे फिर्याद करणार. म्हणून तो स्वस्थ बसला नाही. पोपटावर एक डबा उपडा ठेवून त्या डब्याला भोके करून त्यातून आंत पाणी सोडू लागला. दुसऱ्या दिवशी भोलारामाकडे पाटलाचा









निरोप आला—"पोपट बरोबर घेऊन चावडीवर हजर हो!" भोलाराम त्याप्रमाणे पोपटाला घेऊन चावडीवर गेला.

पाटलाने पोपटाला विचारले—"काय रे! काल काय काय झाले सांग पाहू." पोपटाने जे पाहिले होते ते सांगितले. भोलाराम काळोख पडल्यावर बकरा घेऊन आला. त्याला कापून त्याचे थोडे मांस खाल्ले व बाकी उचलून ठेवून दिले. कातडे छपरात लपवून ठेवले आहे वगैरे.

पाटलाने भोलारामाला विचारले—"मग बोल आता! तुझा पोपट सुद्धा तुझ्या विरुद्ध साक्ष देतो आहे. तू काळूरामाचा बकरा कापून खाल्लास."

भोलाराम म्हणाला—"पाटील! हा पोपट नमकहराम आहे! नेहमी खोटे बोलतो. पाहिजेतर मी ही गोष्ट आपल्याला पटवून देतो." असे सांगून त्याने पोपटाला विचारले काल रात्री हवामान कसे होते?"

"काल रात्री घनदाट काळोख होता. बराच वेळ पाऊस पडत होता!" पोपट म्हणाला.

"ऐकलेत पाटील! रात्री पौर्णिमा होती आणि हा म्हणतो काळोख होता. आकाश निरभ्र होते आणि हा म्हणतो पाऊस पडत होता." भोलाराम म्हणाला.

पोपट खोटे बोलत असल्याची पाटलाची खात्री पटली व त्याने भोलाराम निर्दोष असल्याचे जाहीर केले.

घरी पोचल्या बरोबर भोलारामाने आपल्या पोपटाला सोडून दिले. तो रानात इतर पोपटांबरोबर राहू लागला व त्यांना म्हणाला—"मनुष्य! इतका क्षुद्र असेल असे नव्हते मला वाटले त्यांना आवडेल ते बोलले पाहिजे आम्ही. खरे त्यांना आवडत नाही. आम्हाला बोलण्याचा अधिकार नाही. ते शिकवतील तेच बोलले पाहिजे. दुसरे काही बोललो तर त्यांना राग येतो!"







मनूच्या मुलाचे नाव नभाग असे होते. त्याला कित्येक मुले होती. प्रत्येकाने वैदिककर्मे शिकून घेतली. यज्ञादिक करून पुष्कळ गोधन मिळविले. विवाह करून गृहस्थाश्रमात प्रवेश केला.

नभगाच्या सर्वात धाकट्या मुलाचे नाव नाभाग असे होते. त्याच्या इतर भावांनी सर्व गोधन वाटून घेतले आणि गृहस्थाश्रमात प्रवेश केला त्यावेळी नाभाग ब्रह्मचारी होता. त्याने आपल्या भावांकडे आपला वांटा मागितला.

ते म्हणाले—"तू बाबांना जाऊन विचार. ते जसे सांगतील तसे आम्ही करू."

नाभाग आपल्या वडिलांकडे गेला आणि विचारले—"बाबा! माझ्या सर्व वडील बंधूंनी सर्व गोधन वाटून घेतले आहे. मी मागायला गेलो तेव्हां तुमच्याकडे जाऊन विचार असे म्हणाले. आता तुम्हीच काय तो न्याय निवाडा करा."

नाभग आपल्या सर्वात धाकट्या मुलाला म्हणाला—"त्या सर्वांनी यज्ञादि करून गोधन मिळविले आहे. गृहस्थश्रामात प्रवेश पण त्यांनी केला आहे व गोधन दान करण्याचा अधिकार मिळविला आहे. तू आजपर्यंत यज्ञकर्म केले नाहीस. गोधन मिळविले नाहीस. ब्रह्मचारी आहेस. त्यांच्या बरोबरीने वांटा तुला कसा काय मिळणार?"

"तर मग मी काय करू?" नाभागने वडिलांना विचारले.

"अंगीरस सत्रयज्ञ करणार आहेत. ते थोर ज्ञानी आहेत, परंतु सहाव्या दिवशी कर्तव्य असलेले कर्म वैश्वदेव आदि सूक्त त्यांना माहीत नाही. तू त्या सत्रयज्ञाच्या वेळी हजर रहा आणि वैश्व-देवाची दोन सूक्ते म्हणून त्यांना त्या दिवसाचे कर्म कसे करावयाचे ते सांग. सत्रयज्ञ संपूर्ण होताच यज्ञाचा शेष भाग दान

म्हणून तू घे. अशा तऱ्हेने तुला गोधन मिळेल." बापाने मुलाला उपदेश केला.

नाभाग बापाने सांगितल्याप्रमाणे अंगीरसांच्या सत्र यज्ञात भाग घेण्यासाठी गेला. सहाव्या दिवशी कर्तव्य असलेले कर्म माहीत नसल्यामुळे काय करावयाचे हे त्यांना सुचेना. तेव्हा नाभागने पुढे होऊन त्यांना मदत देण्याचे कबूल केले व यज्ञाचा शेषभाग मिळाला पाहिजे असे त्यांच्याकडून वचन घेतले. यज्ञ संपला. अंगीरसांनी वचन दिल्या प्रमाणे यज्ञाचा शेषांश नाभागला दिला. तो घेण्यासाठी नाभागने हात पुढे केला तेवढ्यात एक कृष्ण आकृति प्रगट झाली आणि—यज्ञाचा शेषांश घेऊ लागली.

"हा मला मिळालेला शेषांश आहे. तूं कोण याला हात लावणारा?" नाभाग त्याला विचारू लागला.

"यज्ञाचा शेषांश नियमानुसार रुद्राला मिळावयाचा असतो. मी रुद्राच्या वतीने आलो आहे. माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास नसेल तर तू आपला वडिलांना जाऊन पाहिजे तर विचार." तो कृष्ण आकृतीवाला पुरुष म्हणाला.

नाभाग आपल्या वडिलांकडे गेला व सर्व वृत्त सांगून त्याने विचारले—"रुद्राचा प्रतिनिधि म्हणतो की यज्ञाचा शेषांश रुद्राला मिळावयाचा असतो. तर हे सत्य आहे का?"

"होय, ते सत्य आहे. नियमानुसार यज्ञाचा शेषांश रुद्राला मिळावयाचा असतो." बाप म्हणाला.

नाभाग परत आला व म्हणाला—"हे महापुरुषा! तू म्हणालास ते सत्य आहे. म्हणून तू हे गोधन घेऊन जा."

"तू आणि तुझे वडील दोघे ही सत्यवादी आहात. तू ब्रह्मज्ञानी आहेस. तू यशस्वी होशील. हे गोधन तुझे आहे." असे सांगून तो महापुरुष अदृश्य झाला.







# भीमू भीमसेन झाला

एका गावी एक शेतकऱ्याचा मुलगा होता. त्याचे नाव भीमू होते. बाप जिवंत असेपर्यंत तो दोन वेळचा पुख्खा झोडीत असे व हातावर पाणी पडले की उनाडक्या करायला निघून जाई. तसा तो हुशार होता, परंतु त्याने कामधंदा शिकून घेतला नाही.

बाप मेल्यावर भीमूला स्वतःच्या पायावर उभे रहावे लागले. मरते वेळी बापाने फक्त पाच मोहरा ठेवल्या होत्या. त्या घेऊन तो गावात एका सुताराकडे गेला. सुताराला त्याने मोहरा देऊन काम शिकवायला सांगितले. सकाळपासून संध्याकाळपर्यंत तो त्याच्याकडे काम शिकत राहला. दुसऱ्या दिवशी दगडावर कोरीव काम करणाऱ्याकडे जाऊन त्याच्याकडे सकाळपासून संध्याकाळपर्यंत काम शिकत राहला. त्याने आपल्या त्या गुरूला पण दोन मोहरा दिल्या. तिसऱ्या दिवशी तो आपल्या गावी परतला तेव्हा त्याच्या जवळ फक्त एकच एक मोहोर उरली होती. गावात तो कधी सुताराचे व कधी दगड कोरण्याचे काम करून आपला उदर निर्वाह करू लागला.

त्याच सुमारास राजाचा वाढदिवस आला. भीमूने विचार केला की राजाला काहीतरी उत्तम नजराणा दिला पाहिजे. त्याने चंदनाच्या लाकडाची एक सुंदर पेटी तयार केली व तिच्यावर चांगली नकशी काढली. नंतर संगमरमरी दगडाची एक सुंदर मूर्त तयार केली. ती मूर्त एका बाजूने पाहिली की विष्णूसारखी दिसे व दुसऱ्या बाजूने पाहिली की शंकरासारखी दिसे. ती मूर्त चंदनाच्या पेटीत ठेवून भीमू राजाच्या वाढदिवसाच्या समारंभाच्या वेळी हजर झाला व त्याने ती पेटी नजराणा म्हणून राजाला दिली.

सौ. शांताबाई बापट



तो नजराणा पाहून राजाला परमानंद झाला. राजा भीमूच्या कौशल्यावर इतका खूष झाला की त्याने भीमूला पाच हजार मोहरा बक्षिस म्हणून दिल्या. भीमू ते बक्षिस घेऊन आपल्या गावी परत आला.

भीमूला इतके मोठे इनाम मिळालेले पाहून शेजारच्या गांवच्या एका कारीगराला त्याचा हेवा वाटू लागला. आपण त्याहून मोठे इनाम मिळविले पाहिजे असे त्याने ठरविले. त्याने एक मूर्त तयार केली. ती मूर्त स्वतः राजाची होती. राजा आपल्या शत्रूला ठार करीत असल्याचे ते दृश्य होते. त्याने एका सुताराकडून ती मूर्त ठेवता येईल इतकी मोठी पेटी करवून घेतली आणि पेटीत मूर्त ठेवून ती राजाला नेऊन दिली.

परंतु ती मूर्त पाहून राजाला भयंकर राग आला. कारण ठार होणाऱ्या राजाचे रूप राजासारखे होते व मारणारा दुसराच कोणी होता. तो राजासारखा नव्हता.

राजाने ती मूर्त जागच्या जागी फोडून तोडून टाकली व कारीगराला पन्नास फटक्यांची शिक्षा दिली. अर्थातच कारीगराचा राग राजापेक्षा भीमूवरच वाढला. त्याने एके दिवशी रात्री भीमूच्या घराला आग लावली. घराबरोबर घरात होती नव्हती ती सर्व चीजवस्तू जळून गेली.

भीमू पुन्हा गरिबाचा गरीब झाला. त्याने सुताराचा धंदा करण्याचे ठरविले. तो खांद्यावर एक कुऱ्हाड घेऊन रानात गेला. वाटेत त्याला ठेच लागली व पायाच्या एका बोटाचे नख निघाले. त्याचा पाय दुखू लागला. भीमूने रागाच्या भरात ज्या दगडाची ठेच लागली होती तो दगड जमिनीतून बाहेर खणून काढला. परंतु त्या दगडाखाली त्याला शिलालेख लिहिलेला दगड दिसला.

डोंगरांतल्या खडकाळ जागी हा शिलालेख कोणी व कां बरे पुरून ठेवला असावा? त्याने त्या शिलालेखावर ठेवलेले इतर दगड खणून काढले. शिलालेखाची शिळा उचलल्यावर त्याच्याखाली त्याला एक खड्डा दिसला. खड्ड्यात दागिने व मोहरा ठेवलेल्या दिसल्या. भीमूला वाटले की कदाचित चोरांनी चोरीचा माल येथे लपवून ठेवला असावा. तो कोणाला काही सांगितल्याशिवाय सर्व दागिने व मोहरा घेऊन घरी गेला.

भीमू पुन्हा श्रीमंत झालेला पाहून गांवच्या पाटलाच्या पोटात दुखू लागले. त्याने भीमूला बोलावून विचारले—"काय रे तुला हे सर्व दागिने कोठे मिळाले रे?"

"मला डोंगरातल्या एका खडकाळ जागी मिळाले." त्याने खरेखरे सांगितले.

पाटील म्हणाला—"तू मूर्ख आहेस मूर्ख! केवढा मोठा गुन्हा केला आहेस तू? अरे ते पैसे व दागिने राजाचे आहेत त्यातल्या एका पैला देखील हात लावलास तर तुला कैद करण्याचा मला अधिकार आहे, लक्षात ठेव. झाले ते झाले, आता निमूटपणे तू जे काही त्या खड्ड्यातून उचलून घेऊन आला आहेस सर्व येथे आणून मला दे. मी राजाच्या खजिन्यात पाठवून देईन."

भीमूने दागिने व मोहरा वगैरे सर्व सामान आणून पाटलाकडे जमा केले





पाटलाने बराचसा माल स्वतःकडे ठेवून घेतला व थोडासा खजिन्यात जमा केला.

भीमूला ते सर्व पाहून त्या गावाचा वीट आला. त्याने गांव सोडून परदेशी जाऊन राहण्याचे मनाशी ठरविले. तो उत्तम कारीगर होताच. जगाच्या पाठीवर कोठे ही पोटा पाण्याला कमी पडणार नाही एवढी त्याची खात्री होती. म्हणून तो एके दिवशी गांव सोडून निघाला.

वाटेत रानात त्याला अनेक गावे लागली. कधी कोठे खायला मिळाले तर खाई, कधी विश्राती घ्यावीशी वाटली की विश्रांती घेई. असा अनेक दिवस प्रवास केल्यावर तो एके दिवशीं संध्याकाळी एका गावी आला. त्याला एका घरात कोणीतरी रडत असल्याचा आवाज ऐकू आला.

भीमूने घरात डोकावून पाहिले. एक सोळा वर्षांची मुलगी रडत होती. "कां ग मुली रडतेस? या घरांत तुझे असे कोणी नाही वाटते? एकटीच आहेस का?" भीमूने तिला विचारले.

"मला लहानपणीच चोरांनी उचलून या जंगलांत आणून टाकले. या घराच्या मालकाने मला लहानपणापासून प्रेमाने वाढविले. आज सकाळी ते जग सोडून निघून गेले. आता मी एकटी आहे. रडू नाही तर आता मी काय करू?" तिला आपल्या आई-वडिलांचे नावपण माहीत नव्हते.

"तुला कोणी नसेल तर चल माझ्या-बरोबर. आपण दोघे लग्न करून सुखाने संसार करू." भीमू म्हणाला.

मुलीला जिवात जीव आल्यासारखे वाटले. तिने उठून सैपाक केला. भीमू मुलीकडेच पहात होता. त्याला तिच्या डाव्या पावलावर एक वण दिसला. त्याला लहानपणी ऐकलेली एक गोष्ट आठवली. ती त्या देशाच्या राजकन्येची गोष्ट होती. ती एकाएकी नाहीशी झाली होती. राजाने पुष्कळ शोध केला पण सर्व फुकट. मुलीच्या डाव्या पावलावर चाकू लागल्याचा एक वण होता. भीमूने विचार केला की तीच ही मुलगी असावी. कारण त्या मुलीचे वयपण हिच्या इतकेच असते. आतां हिच्याशी लग्न करणे बरोबर नाही. या मुलीला राजाकडे पोचती करणे हे त्याचे प्रथम कर्तव्य होय.

असा विचार करून भीमू मुलीला बरोबर घेऊन राजधानीकडे निघाला. लहानपणा-पासून त्या मुलीने ज्या वस्तु तिच्या म्हणून लपवून ठेवल्या होत्या त्या तिने बरोबर घेतल्या. त्या पाहिल्यावर राजा व राणी दोघांना मुलीला ओळखणे जास्तच सोपे झाले. बारा वर्षांपूर्वी हरवलेली मुलगी अचानक अशा तऱ्हेने घरी आलेली पाहून राजाला व राणीला अपरंपार आनंद झाला. भीमू मुलीला सुरक्षित राजवाड्यात घेऊन आला त्याबद्दल त्याला काय इनाम द्यावे या विचारात राजा असता राजकन्येने त्याच्याशी लग्न करण्याची इच्छा प्रकट केली. म्हणाली— "हे पहा बाबा! हा मनुष्य किती निस्वार्थ आहे. मी अनाथ अवस्थेत असताना त्याने माझ्याशी लग्न करण्याची इच्छा प्रगट केली. मी त्याला होकार पण दिला होता. परंतु माझ्या पायावरचा वण पाहून मी राजकन्या असल्याचा संशय त्याला आला, व तो निस्वार्थ बुद्धीने मला येथे घेऊन आला. त्याने ती गोष्ट मला न कळविता माझ्याशी लग्न करून घेतले असते आणि इकडे घेऊन आला असता तर त्याचा हात कोण धरू शकला असता?"

राजाला मुलीचे म्हणणे रास्त वाटले व मुलीची इच्छा भीमूशी लग्न करण्याची आहे हे पण त्याने ओळखले. एका सुमुहूर्तावर भीमू व राजकन्या दोघांचे थाटामाटाने लग्न झाले. तेव्हांपासून सर्व भीमूला भीमसेन म्हणून ओळखू लागले.





# विष्णूची माया

ध्रुव घोर तपश्चर्या करीत असता इंद्राने त्याची तपश्चर्या भंग करण्याच्या हेतूने विरध नावाच्या एका गंधर्वाला पाठविले. ध्रुव ध्यान मग्न असता विरध एक राक्षस रूप घेऊन आला. एका मुनीने ते पाहिले व मुनीने विरधला शाप दिला "तू खरोखरचा राक्षसच हो."

अशा तऱ्हेने विरध गंधर्वाचा राक्षस झाला. तो शबरी नामक नदीकाठी रहात असे. त्याला जो कोणी समोर मनुष्य दिसे त्याला धरून तो खाऊ लागला. अशा तऱ्हेने तो राक्षसासारखा राहू लागला. तो राक्षस झाला असला तरी त्याला दिव्य दृष्टी प्राप्त होती. त्रिलोकात घडलेली प्रत्येक गोष्ट त्याला कळे.

शबरी व गोदावरी नदीच्या संगमा-नजीक एक आश्रम होता. त्या आश्रमात अनेक ऋषी व मुनी रहात. आश्रमातील काही मुनिबालक समिधा गोळा करून आणायला एकदा जंगलात गेले. तेथे विरध आला. त्याला पाहून सर्व मुनिबालक घाबरून पळून गेले. परंतु भरत नावाचा एक मुलगा साहस करून तेथेच उभा राहिला. त्याचे धैर्य पहून विरधला आश्चर्य वाटले.

जे मुनिबालक रानात गेले होते त्यांनी आश्रमात आल्यावर भरत राक्षसाच्या हाती सापडल्याची गोष्ट त्याच्या वडिलांना सांगितली. भरताचे वडील धावत रानात आले. तोपर्यंत विरधने भरताला धरले होते. भरताच्या बापाने विरधला हात जोडून विनंती केली—"हाच एकुलता एक मुलगा आहे आम्हांला. याला सोडून दे व पाहिजे तर मला खा."

"तू सोंगट्या खेळायला माझ्याबरोबर बस. त्यात मी हारलो तर मी तुझ्या मुलाला व तुला दोघांना सोडून देईन" राक्षस म्हणाला. भरताचा बाप खेळात हारला' तेव्हा विरध त्याला म्हणाला—"मी तुला आणखी एक संधी देतो. मी उद्या सकाळी येईन. तू आपल्या मुलाला अशा जागी लपव की मला तो सापडणार नाही. नंतर मी त्याला कधी त्रास देणार नाही"'

भरताला बाप आश्रमात घेऊन गेला. त्याच्या रक्षणार्थ त्याने आपली सर्व तपश्चर्या पणाला लावली. त्याने यज्ञ करून ब्रह्मदेवाला प्रसन्न केले. ब्रह्मदेव प्रगट झाला.

भरताच्या बापाने हात जोडून विनंती केली—"देवाधिदेवा! माझ्या मुलाला आजचा दिवस विरध राक्षसाला तो दिसणार नाही असा कोठे तरी लपव."

ब्रह्मदेव त्याला ब्रह्मलोकात घेऊन गेला आणि त्याला आपल्या आसनाच्या कमळाची एक पाकळी करून ठेवले.

दुसऱ्या दिवशी विरध भरताच्या बापाला म्हणाला—"मूर्ख आहेस तू! ब्रह्मदेवाने तुझ्या मुलाला कमळाची पाकळी करून ठेवले तर ते मला कळणार नाही असे वाटले होय तुला. या खेपेस पण तू हारलास. आणखी एक संधी मी तुला देतो. या खेपेस तू आपल्या मुलाला जास्त काळजी-पूर्वक कोठे तो लपवून ठेव. उद्या सकाळी



मी पुन्हा येईन." असे सांगून विरध निघून गेला.

या खेपेस भरताच्या बापाने शंकराची आराधना केली. शंकर प्रगट झाला. ब्रह्मदेवाजवळ भरताच्या बापाने जशी विनंती केली होती तशीच शंकराजवळ त्याने केली.

शंकर भरताला कैलास लोकी घेऊन गेला. शंकराने भरताला एक कुमुदाचे फूल करून ते फूल पार्वतीच्या कानाला खोचून ठेवले.

दुसऱ्या दिवशी विरधने येऊन भरताच्या बापाला सांगितले–"तू आहेस खुळा. त्या भोळ्या सांबाने तुझ्या मुलाला कुमुदाचे फूल करून त्याला पार्वतीच्या कानाला खोचून ठेवलेले मला कळणार नाही असे वाटले होय तुला? बरे ते सोड. मी आता शेवटची एक संधी देतो." असे सांगून विरध राक्षस निघून गेला.

या खेपेस भरताच्या बापाने विष्णूला प्रसन्न करून ब्रह्मदेव व शंकराजवळ त्याने जशी विनंती केली होती तशीच विष्णूजवळ केली. विष्णु भरताला बरोबर घेऊन गेला.

दुसऱ्या दिवशी विरध आला. त्याने आपल्या तीक्ष्ण नजरेने त्रिलोक हुडकून पाहिला परंतु भरत कोठे ही त्याला दिसला नाही. त्याने ओरडून विचारले–"मुनि बालका! तू कोठे आहेस रे?"

"मी येथेच आहे." किरट्या आवाजांत भरताने उत्तर दिले.

"मी तुला खाणार नाही. तू आता प्रगट हो." विरध त्याला म्हणाला.

लगेच भरत विरधाची छाती फोडून बाहेर आला. राक्षस जागच्या जागी ठार झाला. विरध शापमुक्त झाला. भरताच्या बापाला नमस्कार करून तो गंधर्व लोकी परत निघून गेला.





# खोटी साक्ष

एक ब्राह्मण आपल्या गावाहून दुसऱ्या गावी पाऊल वाटेने जात होता. समोरून एक तेली तेलाची एक हांडी भरून समोरून आला. हांडीत तेल असावे असे ब्राह्मणाने अनुमान केले. त्याने तेल्याला विचारले– "काय रे? कसे दिलेस तेल?"

"नऊ रुपये!" तेली म्हणाला.

"पांच रुपयाला देतोस का?" ब्राह्मणाने विचारले.

"हांडी भरून तेल तुला पांच रुपयात कोण देईल भटा! तुझे तोंड पाहूनच मला कळले की तुला हांडी भरून तेलाची गरज नाही. जा जा!" तेली तोंडाला आले ते बोलून गेला.

ब्राह्मणाला राग आला. तो तेल्याला म्हणाला–"काय रे? भाव विचारून तो कमीजास्त करून घेऊन माल विकत घ्यायचा माझा अधिकार आहे. तुला द्यायचे असेल तर दे, नाहीतर जा आपल्या वाटेने. तोंडाला येईल ती बडबड करून नाही चालायचे. कोणाजवळ काय बोलायचे हे तरी कळते का तुला?" असे म्हणत ब्राह्मण रागाने तेल्याजवळ जाऊ लागला.

ब्राह्मण येऊन हांडीला हात घालणार असे तेल्याला वाटले. म्हणून तो थोडा मागे सरकला व त्याने आपली मान थोडी मागे केली. परंतु त्यामुळे हांडी खाली पडली व सर्व तेल जमिनीवर पसरले आणि हांडीला पोचे पडले.

ब्राह्मणाला आनंद झाला की तेल्याला उर्मटपणाची शिक्षा देवाने छान दिली. तेली तेथेच बसून रडू लागला.

त्याच वेळी लक्ष्मणसिंह नावाचा एक क्षत्रिय तरुण तेथे आला. तेली रडत होता व तेल जमिनीवर पसरलेले पाहून त्याने तेल्याला विचारले–"कायरे झाले? असा रडतोस का?"



तेल्याने घडलेले वृत्त थोडक्यात सांगितले.

लक्ष्मणसिंह म्हणाला—"होय! किती नुकसान झाले रे तुझे? माझ्या सांगण्याप्रमाणे पाटलाकडे फिर्याद कर. तुला तेलाची व हांडीची किमत मिळेल. मी तुझ्या बाजूनें साक्ष द्यायला तयार आहे. ही साक्ष देण्यासाठी तू फक्त पाच रुपये दे."

"फिर्याद कशी करायची, हे सांगशील की नाही?" तेल्याने विचारले.

लक्ष्यणसिंहाने त्याला फिर्याद कशी करायची हे नीट समजावून सांगितले. तेल्याला वाटले की फिर्याद केली म्हणजे तेलाची व हांडीची किमत मिळेल. म्हणून त्याने पाटलाकडे फिर्याद केली. पाटलाने ब्राह्मणाला बोलावून आणायला शिपाई पाठवला. ब्राह्मणाने, हांडीतले तेल कसे सांडले, तेल्यालाच विचारायला सांगितले.

तेली म्हणाला—"पाटील! मी तेलाची हांडी डोक्यावर घेऊन जात होतो. या भटाने समोरून येऊन मला तेलाचा भाव विचारला. मी नऊ रुपये मागितले. ब्राह्मणाने एका रुपयाला देतोस का विचारले. मी नकार दिला. तेव्हां रागाने याने माझ्या डोक्यावरची हांडी खाली जमिनीवर पाडली आणि मला बेदम मारले. इतक्यात लक्ष्मणसिंह नांवाचा हा तरुण तेथे आला. त्याने मला वांचविले. नाहीतर आज, या गरिबाचा जीवच घेतला असता - या भटाने. आता आपणच काय तो न्याय करावा."

"भटजी! बोला, तुमचे काय म्हणणे आहे ते?" पाटलाने विचारले.

"पाटील, ही गोष्ट घडली त्यावेळी तेथे आम्हा दोघाशिवाय तिसरा कोणी नव्हता." ब्राह्मण म्हणाला.

त्यानंतर पाटलाने बोलावल्यावर लक्ष्मण-सिंहाने साक्ष दिली व तेल्याने सांगितले, अगदी हुबेहूब तसेच सांगून त्याने तेल्याचे जे नुकसान झाले त्याची नुकसान भरपाई करून द्यावी अशी विनंती केली.

आरोपीने पंचवीस रुपये नुकसान भरपाई म्हणून तेल्याला द्यावी असा निवाडा पाटलाने सांगितला.

कचेरीतून बाहेर आल्याबरोबर लक्ष्मण-सिंह तेल्याला म्हणाला—"पाहिलेस, तुला किती फायदा झाला तो. आता काढ माझे पाच रुपये."

खोटे बोलण्याची शिकवण तेल्याला मिळाली होती. त्याने लक्ष्मणसिंहाला विचारले—"आता कसले रे पांच रुपये? तुला मी पहिल्यानेच नाही का दिले? पुन्हा काय रे मागतोस?"

लक्ष्मणसिंहाला राग आला. त्याने धावत जाऊन ब्राह्मणाचे पाय धरले आणि म्हणाला—"गुरुजी! हा पाटील वस्ताद आहे पक्का. तुम्हाला तो इतका मोठा दंड करील असे नव्हते मला वाटले. मी तेल्याच्या वतीने खोटी साक्ष दिली होती. पांच रुपयाच्या मोहाने मी ते केले. परंतु तुम्ही माझ्या म्हणण्याप्रमाणे पुन्हा फिर्याद केलीत तर तुम्हाला झालेला दंड रद्द होईल." असे सांगून त्याने फिर्याद कशी करावयाची हे ब्राह्मणाला नीट समजावून सांगितले.



ब्राह्मण थोडा वेळ विचार करून म्हणाला- "तुझा सल्ला चांगला आहे, या बद्दल मी तुला प्रथमच दहा रुपये देतो. हे घे." असे सांगून त्याने लक्ष्मणसिंहाला दहा रुपये दिले.

दोघे पुन्हा कचेरीत गेले. ब्राह्मणाने फिर्याद केली की तेल्याने कचेरीच्या बाहेर गेल्यावर मला खूप बडविले. त्यावेळी लक्ष्मणसिंह समोर उभा होता.

पाटलाने तेल्याला बोलाविले आणि विचारले—"मी तुझे झालेले नुकसान भरून देण्यास ब्राह्मणाला सांगितले व त्याने तुला पंचवीस रुपये दिले. मग तू त्याला मारायला का गेलास?"








"मी नाही म्याला मारले. मी त्याला पाहिले सुद्धा नाही." तेली म्हणाला.

लक्ष्मणसिंहाने पुढे होऊन साक्ष दिली– "तेली ब्राह्मणाला मारू लागला तेव्हा मी मध्ये पडून ब्राह्मणाला वांचविले."

"बोल, मग तुझे काय म्हणणे आहे?" पाटलाने तेल्याला विचारले.

"पाटील! हा लुच्चा लबाड आहे. याच्या साक्षीवर विश्वास करू नका. आपण मला नुकसान भरपाई म्हणून जे पंचवीस रुपये देवविले त्याबद्दल राग येऊन या दोघांनी मिळून ही खोटी फिर्याद माझ्या विरुद्ध केली आहे." तेली म्हणाला.

"ब्राह्मणाने याच्याकडून खोटी साक्ष देवविली आहे हे मी कबूल करायला तयार आहे. परंतु हा साक्षीदार पहिल्याने तुझ्या तर्फे साक्ष द्यायला आला होता त्याचे काय?" पाटलाने विचारले.

काय उत्तर द्यावे हे तेल्याला सुचेना.

तेव्हा ब्राह्मण पाटलाला म्हणाला– "पाटील तुम्हाला तरी साक्षीदार हवा असतो खरे खोटे काय याची फिकीर कोठे असते? या लबाडाने खोटी साक्ष देऊन माझ्याकडून तेल्याला पंचवीस रुपये देवविले व आता याने माझ्या वतीने खोटी साक्ष देऊन मला नुकसान भरपाई करवून देतो असे सांगून माझ्याकडून दहा रुपये उपटले. या साक्षीदाराच्या जबानीवर आपण माझी नुकसान भरपाई करून द्यायला हवी."

पाटलाची मान खाली झाली. लक्ष्मण-सिंहाची झडती घेण्यात आली तेव्हा त्याच्या जवळ ब्राह्मणाने दिलेले दहा रुपये त्याच्या-जवळ मिळाले. तेल्याने कबूल केले की त्याने खोटी फिर्याद केली होती. पाटलाने ब्राह्मणाला त्याचे रुपये परत देवविले व लक्ष्मणसिंहाला खोटी साक्ष दिल्याबद्दल तुरुंगात टाकले.





# कर्ज वसूली

एका गावी श्यामूशेट नांवाचा एक श्रीमंत वाणी रहात असे. कोणी उधार कर्ज मागितले की तो देई. कधी त्याने नकार दिला नाही किंवा त्याचे कर्ज वसूल झाले नाही असे देखील कधी झाले नाही.

दुसऱ्या गांवी धनीराम नांवाचा दुसरा एक शेट रहात असे. श्यामूशेट कोणाकडून काही लेखी लिहून घेतल्याशिवाय सर्व कर्ज वसुली करून घेतो, हे ऐकून त्याला आश्चर्य वाटले. तर मग पाहूच याची कशी वसुली होते ती असे त्याने मनातल्या मनात ठरविले.

धनीराम एकदा श्यामूशेटकडे आला व म्हणाला–"मी अमूक गावचा राहणारा आहे. मला धनरामशेट म्हणतात. मला एक हजार रुपयाची आता गरज आहे. तुम्ही दिलेत तर घेऊन जाईन म्हणतो."

श्यामूशेटला धनीरामची माहिती होती. कागदाचा उलटफेर करून त्याने लोकांना गोत्यात घातल्याचे पण श्यामूने ऐकले होते. परंतु श्यामूने, पाहू तर या की हा कसा फसवितो ते, असा विचार करून धनीरामला एक हजार रुपये कर्जाऊ दिले.

एक वर्ष लोटले. धनीरामाने पैसे परत केले नाहीत. तेव्हां श्यामूशेटने त्याला एक पत्र लिहिले की कर्ज दिलेली रक्कम परत करावी.

ते पत्र मिळाल्यावर धनीरामने उत्तर लिहिले–"तुझ्याकडून कर्ज घेतले आहे, हे खरे. पण मला आताच फेडणे शक्य नाही. मी बाभळीचे बी खरेदी करण्यासाठी जातो आहे. परत आल्यावर देईन."

आणखी एक वर्ष लोटले. धनीरामाने कर्जाची रक्कम परत केली नाही. श्यामूशेटने पुन्हा एक पत्र लिहून पाठवले. या खेपेस पण धनीरामने उत्तर पाठविले की बाभळीचे बी खरेदी करायला अजून गेलो नाही. परत आल्यावर रक्कम पाठवितो.



श्यामूशेटला हे कळेना की बाभळीचे बी खरेदी करण्याशी व कर्जाऊ दिलेली रक्कम परत करण्याचा काय संबंध आहे. म्हणून तो एकदा स्वतःच धनीरामाच्या घरी गेला व विचारले–"तू लिहिलेस की बाभळीचे बी खरेदी करून आल्यावर पैसे परत करतो. पण या दोन्हींचा परस्पर संबंध मला नाही कळला."

"बाभळीची झाडे डोंगरावर आहेत. त्याच्या खाली बाभळीचे बी पडते. मला ते जमा करून आणावयाचे आहे. डोंगराच्या पायथ्यापासून वर बाभळीची झाडे आहेत तेथवर गाडी रस्ता होणार आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूला बाभळीची झाडे लावणार आहेत. त्या वाटेने कापसाच्या गाड्या जाऊ येऊ लागल्या की कापूस बाभळीच्या काटयात थोड फार अडकून राहीलच. मी तो कापूस गोळा करून विकणार आहे. जे पैसे मिळतील ते तुला देऊन कर्जफेड करणार आहे. बाभळीच्या बियांशी कर्जफेडीचा संबंध कसा आहे, हे तुला कळले असेल?" शांतपणे धनीरामाने विचारले.

"अस्सं! आता माझ्या लक्षात आले." असे सांगून श्यामू धनीरामाचा निरोप घेऊन घरी निघून गेला.

त्यानंतर आणखी कित्येक दिवस लोटले. एकदां श्यामूशेटने धनीरामाला सकुटुंब सत्यनारायणाच्या पुजेला बोलाविले.

धनीरामाने विचार केला निमंत्रण मिळाल्यावर गेले हे पाहिजेच. गेलो नाही तर श्यामूशेट विचार करील की मी त्याला भिऊन पुजेला गेलो नाही. गेलो तर चारचौघांसमोर कर्ज घेतल्याची गोष्ट सांगून आपला अपमान करील. तो स्वतः न जाता बायकोला पाठवून द्यावे म्हणावे तर ती एकटी जाणार नाही. म्हणून त्याने एकट्या म्हाताऱ्या आईला श्यामूशेटकडे सत्यनारायणाच्या पुजेला पाठविले.

श्यामूशेट धनीरामाच्या आईला म्हणाला–"आजी! तुझ्या मुलाने माझ्याकडून एक हजार रुपये कर्जाऊ घेतले होते. त्याने मला कळविले की कर्ज चुकेपर्यंत म्हातारीला गहाण ठेवून घे. म्हणून त्याने तुला पाठविले आहे. सर्वांना, तुला तुझ्या मुळाने माझ्याकडे गहाण ठेवल्याची गोष्ट कळल्याशिवाय राहणार नाही. तुझ्या मुलाच्या कीर्तीला कलंक लागेल. मला नाही ते पसंत. म्हणून तू आतल्या कोठडीत जाऊन बस कशी. तुझा मुलगा येऊन कर्ज दिलेले पैसे परत करून तुला सोडवून घेऊन जाईल."

म्हातारी मुलाला शिव्या देत श्यामूशेटच्या कोठडीत जाऊन बसली.

नंतर अशी अफवा धनीरामच्या गावी पसरली की धनीरामची आई श्यामूच्या घरी जाऊन राहू लागली आहे. ती रोज श्यामूला शिवीगाळ करू लागली तेव्हा श्यामूने तिला खूप बडवून काढले. त्यात म्हातारीचा जीव गेला. म्हणून श्यामूशेटने मध्यरात्रीच्या वेळी कोणाला कळविल्याशिवाय तिला पुरून टाकले आहे.

ती अफवा धनीरामच्या कानावर आली. त्याची आई धनीरामच्या घरी जाऊन एक आठवडा होऊन गेला होता. धनीराम









कोणाला काही सांगितल्याशिवाय सरळ श्यामूशेटकडे आला व जणुकाही काही माहीतच नाही असा आव आणून म्हणाला– "श्यामूशेट मी आपल्या आईला घेऊन जायला आलो आहे. एक आठवडा झाला ती तुझ्या घरी आहे. आणखी किती दिवस राहणार?"

श्यामू दुःखाने श्वास सोडून म्हणाला– "बेचारी म्हातारी होती. आपले शरीर शाश्वत आहे का? या जगात पाहुण्यासारखे आपण सर्व आलो आहोत."

धनीराम रागाने म्हणाला–"मी तुझे कर्ज फेडले नाही म्हणून तू माझ्या आईचा जीव घेतलास? कोठे आहे माझी आई?"

श्यामूशेट म्हणाला–"माफ करा! तुमच्या कडचे कर्ज वसूल करणे जितके कठीण आहे तितकेच तुमच्या आईचे दर्शन घडणे पण कठीण आहे."

तोपर्यंत गावकरी लोक जमा झाले होते. धनीराम सर्वांसमक्ष म्हणाला–"ऐकलेत तुम्ही सर्वांनी, श्यामू म्हणाला ते. मी आपल्या गावी जाऊन येतो आणि घेतो याचा समाचार." असे सांगून तो आपल्या गावी गेला. एक हजार रुपये बरोबर घेऊन आला आणि म्हणाला–"हे घे आपले रुपये आणि दाखव माझी आई आहे ती. नाहीतर आईचा खून केल्याचा कोठे आरोप लावून तुला फाशीवर चढविले नाही तर मी नांवाचा धनीराम नाही."

श्यामूने एक हजार रुपये घरात नेऊन ठेवले आणि म्हातारीला बाहेर बोलावून घेऊन येऊन म्हणाला–"ही पहा तुझी आई! घेऊन जा बिचारीला!"

धनीरामाची वाचाच बंद झाली. मान खाली करून तो आपल्या आईला घेऊन आपल्या गावी निघून गेला.





# कृष्णावतार

इंद्र व कृष्ण दोघे प्रथम परस्परांचा सल्ला घेऊन शची व सत्यभामा यांच्यासह अदितीकडे निघाले. दोघांनी अदितीला नमस्कार केला. इंद्राने कर्णकुंडले परत केली व म्हणाला–"कृष्णाने सत्यभामेच्या मदतीने नरकासुराचा वध करून त्रिलोकाचा उद्धार केला आहे."

अदितीने कृष्णाला आशीर्वाद दिला व म्हणाला–"बाळ, कृष्णा! तू आपल्या अनुपमेय बाहुबळाने माझे सर्व कष्ट दूर केले आहेस. तुझा जन्म धन्य आहे. इंद्राप्रमाणे तू त्रिलोकात अजिंक्य राहशील. नारी जगतात सत्यभामेची बरोबर करणारी दुसरी स्त्री नाहीच. ही गोष्ट सर्वविदित आहे. तू मानव रूप घेऊन या भूलोकात आहेस तोंवर ती नित्य तुझ्याबरोबर राहील व तिचे यौवनपण असेच नित्य कायम राहील.

त्यानंतर कृष्ण अदिति व इंद्र यांचा निरोप घेऊन सत्यभामेबरोबर आपल्या गरुड वाहनावर बसून नंदन वनाची शोभा पहात विहार करू लागला. तेथे अनेक कल्पवृक्ष होते. देवकन्या झोके घेत होता. कित्येक सिद्ध पुरुष कल्पवृक्षाच्या सावलीत बसून विश्राम करीत होते. कल्पवृक्षांच्या मध्यभागी कृष्णाला पारिजातक वृक्ष दिसला. देवांचा तो फार आवडा वृक्ष होता. शचीने स्वतः तो लावला होता. त्याची प्रसिद्धी त्रिलोकात पसरली होती. तो वृक्ष पाहून हत्यभामेला अपार आनंद झाला व तिने तो वृक्ष हवा म्हणून कृष्णाजवळ हट्ट धरला.



कृष्णाने सत्याभामेची इच्छा पुरी करण्यासाठी पारिजातक वृक्ष मुळासकट उपटला व गरुडावर बसून द्वारकेला निघाला. तेव्हां नंदनवनाच्या रक्षणार्थ नेमलेल्या पाहरेकऱ्यांनी कृष्णाला अडविले आणि त्यांनी त्याच्याशी युद्ध आरंभिले. कृष्णाने शरवृष्टी करून सर्वांना बेशुद्ध केले. इंद्रालापण ही गोष्ट कळली.

कृष्ण हा त्रिलोक रक्षक स्वत: विष्णूचा अवतार आहे हे इंद्राला माहीत होते. कृष्णाने पारिजातक वृक्ष नेला असता तरी इंद्राने दुर्लक्ष केले असते परंतु शचीचा विलाप व देवांचा आक्रोश ऐकून इंद्र देहभान विसरला आणि त्याने कृष्णाला थांबविले. एवढेच नव्हे तर त्याने कृष्णावर वज्रायुधाचा प्रयोग केला. कृष्णाने वज्रयुधाला मध्येच अडविले. इंद्राचा पराभव झाला. कृष्ण सत्यभामा भूलोकात असेपर्यंत पारिजातक भूलोकात राहील हे त्याला मान्य करावे लागले. त्यानंतर इंद्र कृष्णाचा व कृष्ण इंद्राचा निरोप घेऊन आपापल्या राजधानीला परतले.

गरुड पारिजातक वृक्षासह सरळ राजवाड्यासमोर उतरला. कृष्णाने पांचजन्य वाजवून आपल्या आगमनाची सूचना सर्वांना दिली. सर्व कृष्णाच्या दर्शनासाठी आपापली कामे सोडून धावले. कृष्णाने थोर वडील धाऱ्यांना नमस्कार केला व लहानांना भेटून आशीर्वाद दिला.

प्रद्युम्नाने पारिजातक वृक्ष अंत:पुरात नेऊन ठेवला. त्या दिव्य वृक्षाजवळ जो कोणी गेला त्याला आपल्या पूर्व जन्माची कथा आठवली. त्या वृक्षाचा तो महिमा पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. नंतर तो योग्यस्थानी लावण्यात आला.

नरकासुराच्या कैदेतून मुक्त झालेल्या स्त्रियांना द्वारकापुरी सुखरूप पोचविण्यात आले होते. त्या सर्वांबरोबर श्रीकृष्णाचा विवाह झाला. त्यानंतर कृष्णाने गरुडाचा सर्व प्रकारे सत्कार करून त्याला निरोप दिला. जातांना गरुडानें कृष्णाला वाटेल त्या वेळी पाचारण करण्यास विनंती केली.

एकदा कृष्णाने राज्य सभा बोलावली. त्या सभेत नरकासुराच्या खजिन्यात जी रत्ने त्याला मिळाली होती ती मागवून त्याने उग्रसेन त्याची बायको इतर वडील मंडळीस व दरबाऱ्यांना ती वाटली.

सत्यभामा पारिजातकाच्या फुलाचे हार तुरे व गजरे करून स्वत: अंगावर व डोक्यांत घाली व आपल्या सवतींकडे पाठवी. नंदनवनात पारिजातक ज्या जागी होता ती जागा रिकामी पाहून इंद्राला वाईट वाटे. शचीला त्याचे फारच दु:ख वाटे. तिचा उदास चेहरा पाहून इंद्राला जास्तच वाईट वाटे.

एकदां दुर्योधनाने हस्तिनापुर येथे एक मोठा यज्ञ केला. त्याने यज्ञाला येण्यासाठी सर्व राजांकडे निमंत्रणें पाठविली. यज्ञाला आलेल्या सर्व राजांनी कृष्णाच्या वैभवाच्या गोष्टी ऐकल्या. ते वैभव स्वत:च्या डोळ्यांनी पाहून यावेसे सर्वांना वाटले. म्हणून सर्वांनी आपापले दूत द्वारकेला पाठविले. कृष्णाने दूतां करवी द्वारकेस येण्यास सर्व राजांना निमंत्रणें पाठविली. धृतराष्ट्र



आपल्या शंभर राजपुत्रांसह, पंच पांडवासह व अठरा अक्षौहिणींचे सैन्य घेऊन द्वारकेला आला. रैवतक पर्वताच्या पायथ्याशी ससैन्य उतरला.

बलराम, सात्यकी, प्रद्युम्न व या सर्वांसह कृष्ण स्वागतासाठी सामोरा गेला. त्याने सर्वांचे प्रेमाने स्वागत करून त्यांना वस्त्रादि देऊन त्यांचा सत्कार केला आणि म्हणाला—"मी व माझे बंधु आपल्या पैकीच एक आहो. हे घर व गांव आपलेंच आहे. संकोच सोडून जे हवे असेल ते मागून घ्यावे. सर्व व्यवस्था करण्यात येईल."



सर्व राजे द्वारकापुरीला कृष्णाच्या घरी कांही दिवस आतिथ्य सत्कार करून घेऊन आपाल्या गावी परत गेले.

एकदां अर्जुन थोरला भाऊ धर्मराज याची परवानगी घेऊन द्वारकेला येऊन राहू लागला. त्याच वेळी कृष्णाने यज्ञ आरंभिला. यज्ञ समयी एक गावाहून एका गरीब ब्राह्मण आला. कृष्ण यज्ञाची दीक्षा घेऊन ज्या जागी बसला होता तेथे तो आला व म्हणाला–“प्रभो! एक विनंती आहे. माझी बायको बाळंत झाली की कोणीतरी शिशूला उचलून घेऊन जातो. आतां अशी तीन मुलें

चवथी खेप आहे. बाळंत होण्याची वेळ जवळ येऊ लागली आहे. आपणांला सोडून माझ्या शिशूचे रक्षण करण्यास कोणी समर्थ मला तरी दिसत नाही.”

त्या ब्राह्मणाची ती दीन वाणी ऐकून कृष्ण म्हणाला–“जो कोणी माझ्याकडे येऊन रक्षण करा म्हणून विनंती करतो त्याचे रक्षण करणे माझे कर्तव्य आहे. परंतु मी तर यावेळी यज्ञ दीक्षा घेऊन बसलो आहे. येथून उठून कोठे जाणे कसे शक्य होणार? काय करावे, हेच मला सुचत नाहीं.”

अर्जुन जवळ उभा राहून कृष्ण जे म्हणाला ते ऐकत होता. म्हणाला–“कृष्णा! तुला काळजी करण्याचे कारण नाही. मला आज्ञा कर. मी या ब्राह्मणाबरोबर जाऊन त्याच्या मुलाचे रक्षण करतो.”

कृष्ण स्मित करून म्हणाला–“हे काम तुला जमेल का?”

अर्जुनाला कृष्णाचे ते वाक्य झोंबले. त्याला त्यात त्याचा अपमान वाटला. तो मान खाली करून बसला. ते पाहून कृष्ण म्हणाला–“ठीक, जा. पण एकटा जाऊ नकोस. बलराम, प्रद्युम्न, सात्यकी व इतर यादववीरांना बरोबर घेऊन जा. आपल्या ...बलाचा गर्व करू नये.”



अर्जुन कृष्णाच्या आज्ञेप्रमाणे यादव-वीरांना बरोबर घेऊन त्या ब्राह्मणाच्या गावी निघाला.

इतक्यात दुरून कोल्हेकुई ऐकू आली. सूर्य मावळल्यासारखा काळोख पडू लागला. एक मोठा आवाज झाला आणि एक तारा जमिनीवर येऊन आदळला. त्याच वेळी ब्राह्मणाच्या बायकोच्या पोटात दुखू लागले. ब्राह्मणाने ती गोष्ट अर्जुनाला कळविली सर्व आपापली शस्त्रास्त्रे घेऊन पाहारा देऊ लागले.

मध्यरात्रीची वेळ होती. ब्राह्मणाची बायको बाळंत झाली. मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. इतक्यात बायकांचे ओरडणे सर्वांना ऐकू आले–“अरेरे! गेला रे निघून गेला!” मुलाचे रडणे आकाशात ऐकू येऊ लागले.

अर्जुन व इतर वीरांनी शरवृष्टी करून सर्व आकाश अच्छादून टाकले. पण त्यांना काही दिसले नाही. कोणाला बाण लागला नाही व कोणी आकाशातून खाली पडला नाही. सर्व चकित होऊन आकाशाकडे पहात राहिले.

वृद्ध स्त्री पुरुषांनी अर्जुन व इतर वीरांची निंदा केली. ब्राह्मण अर्जुनासमोर येऊन रागानें म्हणाला–“कृष्णासमोर आपल्या शौर्याच्या बढाया मारल्यास आणि मुलाला वांचविण्याची जबाबदारी स्वतःवर घेतलीस. कृष्णाशिवाय इतर कोणास मुलाचे रक्षण करणे शक्य नाही हे मी पूर्वीच सांगितले होते. यापुढे आपल्या शौर्याच्या व पराक्रमाच्या बढाया मारणे सोडून दे, वांचवायला आला होतास, वांचवू शकला नाहीस. अशा तऱ्हेने धर्महानी करून तू पापाचा वांटेकरी झाला आहेस. तुला या पापाचा चतुर्थांश मिळेल. तुझे तें गांडीव व त्याचा तो प्रताप कळला. आता खुशाल आल्या वाटेने जा.”



ब्राह्मण उलट पावली कृष्णाकडे परतला. त्याच्या पाठोपाठ अर्जुनादिक पण आले. अर्जुनाला समोर मानखाली करून उभा असलेला पाहून कृष्ण म्हणाला—"यात दुःखी होण्याचे कारणच काय? या सर्व प्रकाराचें कारण तुला कळणार नाहीं, मी पुन्हा केव्हांतरी सांगेन." असे सांगून कृष्णाने आपला सारथी दारुक याला बोलावून रथ तयार करायला सांगितले.

दारुकाने कृष्णाच्या रथाला शैव्य, सुग्रीव मेघपुष्प व पलाहका नामक चार घोडे जुंपले आणि, गरुडध्वज रथावर बांधला. अर्जुनाला रथ चालवायला सांगून स्वतः कृष्ण रथात बसला. रथ उत्तर दिशेला निघाला. जंगल, पर्वत व नद्या ओलांडून कृष्णाचा रथ समुद्र किनाऱ्यावर आला. समुद्र मनुष्यरूप घेऊन कृष्णासमोर हात जोडून उभा राहाला व म्हणाला—"प्रभो! काय आज्ञा आहे?"

"काही नाही माझ्या रथाला वाट दे." कृष्ण म्हणाला.

ते ऐकून समुद्र म्हणाला—"प्रभो! मी आपल्या रथाला वाट करून दिली तर इतर लोक माझी निंदा नाही का करणार? आपणच नाहीं का माझी सृष्टी करून कधी पार न करण्यासारखे हे अफाट रूप मला दिले?"

"माझ्याबरोबर इतरांची तुलना कशाला? मी जे काय करू शकतो ते इतरांना शक्य आहे का? माझ्यासाठी व एका गरीब दुःखी ब्राह्मणासाठी तुला वाट द्यावीच लागेल. मी पुढे निघून गेल्यावर पाहिजे तर वाट बंद कर." कृष्ण म्हणाला.

समुद्राने निरुत्तर होऊन वाट दिली. कृष्णाचा रथ उत्तरेकडील कुरु भूमीत शिरला व ती पार करून गंधमादन पर्वताकडे निघाला.

त्यावेळी सहा पर्वत-जयंत, वैजयंत, नील, श्वेत, इंद्रकूट व कैलास निरनिराळ्या प्रकारच्या धातूंचे अलंकार धारण करून समोर येऊन कृष्णाला म्हणाले–"प्रभो काय आज्ञा आहे?"

"माझ्या रथाला जायला वाट द्या." कृष्ण म्हणाला.

तेव्हां सर्व वृक्ष वांकून उभे राहाले व रथ पुढे निघून गेला.

मेघांमधून जाणाऱ्या सूर्यासारखा त्या पर्वतांतून कृष्णाचा रथ पुढे जात होता. नंतर सर्वत्र काळोख पडला. घोडे घाबरून जागच्या जागी उभे राहाले. दगडासारख्या घनांधःकारावर शरवृष्टी करून काळोखाचा पडदा कृष्णाने फाडला व अर्जुनाला आज्ञा केली–"रथ पुढे जाऊं दे."

पुष्कळ पुढे गेल्यावर कोटी सूर्यांच्या प्रकाशा सारखा प्रकाश एका जागी दिसला. कृष्णाने स्मित करून अर्जुनाकडे, व त्या ब्राह्मणाकडे पाहिल व रथातून उतरून त्या प्रकाशात शिरला.

"हा प्रकाश काय आहे बुवा? एकटा कृष्ण कसा काय जाणार आत? काय होणार आता?" या विचारात अर्जुन किंकर्तव्य विमूढ स्थितीत उभा असता कृष्ण त्या प्रकाशातून परत येत असलेला दिसला. त्याच्या पाठोपाठ तीन ब्राह्मण कुमार येत असलेले दिसले. कृष्णाच्या हातात नुकतेच जन्मलेले एक मूल होते.

कृष्ण त्या ब्राह्मणाला त्याची मुले देऊन म्हणाला–"आतां यांच्या अंगाला कोणी हात लावणार नाही," ब्राह्मण व अर्जुन दोघे चकित होऊन कृष्णाकडे पहात होते.

रथ ज्या वाटेने गेला होता त्याच वाटेने परत आला. कृष्णाने ब्राह्मणाला जेवायला वाढले. खूप दक्षिणा दिली व गोधन देऊन निरोप दिला.





# अरण्यपुराण

[ २४ ]

मौवलीने एकदां चहूकडे दृष्टी फिरविली आणि जमिनीवर लकाकणारी वस्तु मुठीत घेऊन पाहिले.

"ओहो मनुष्य जातीत उपयोगी पडणारी वस्तु दिसते आहे ही. ही वस्तु पिवळट आहे. ती गव्हाच्या रंगाची होती. एवढाच काय तो फरक दोन्हीत आहे." असे म्हणत त्याने सोन्याची नाणी जमिनीवर फेकून दिली. त्या काळोखाच्या खोलीत काही फुटाखाली सोन्याची व चांदीची नाणी होती. त्यात अर्धवट बुडलेल्या अंबाऱ्या होत्या. अंबाऱ्या पण सोन्याच्या होत्या आणि त्या अंबारीचे खांब व पाय रत्नखचित होते. नंतर राजांना व महाराजांना बसण्यासाठी केलेल्या सोन्या चांदीने मढवलेल्या पालख्या होत्या.

त्या पांढऱ्या फणवाल्याचे म्हणणेबरोबर होते. या सर्व धनाची किंमत लावणे अशक्य. कित्येक शतके युद्ध करून शत्रूची राज्ये लुटून जमा केलेला तो खजिना होता. व्यापार व प्रजेवर कर लावून जमा केलेले ते सर्व धन होते.

परंतु मौवलीला त्या सर्व धनाची किंमत कशी काय कळणार? तलवारींवर त्याची नजर गेली. परंतु त्याच्या कट्यारीसारखी एकीला ही मूठ नव्हती म्हणून त्याने तलवारी हातात घेऊन फेंकून दिल्या. नंतर त्याची नजर एका अंकुशावर गेली. त्याच्या मुठीच्या टोकाला लाल मणी नावाच्या रत्नाची एक सुंदर गोळी बसवलेली होती. त्याच्या खाली आठ इंच लांब नीलमणी मढवलेले होते. बाकी मूठ हस्तीदंती होती. पोलादी व आणकुचीदार होता. त्याच्यावर अंकुश हत्तीची चित्रे कोरलेली होती. तो अंकुश मौवलीला फार आवडला.

शेवटचें मलपृष्ठ



मौवलीला इतका मग्न झालेला पाहून श्वेत फणवाला नाग म्हणाला–"मी हे सर्व पहायला तुला सवड दिली त्या बद्दल तू आपला जीव ओवाळून टाकायला तयार झालास तर त्यांत नवल काय? मी तुझ्यावर हे उपकार केले आहेत!"

"हे सर्व काय कामाचे, मला नाही माहीत. पण ही एक वस्तू उजेडात पाहून मी सांगेन उपयोगी होईल की नाही ते." असे म्हणत मौवलीने अंकुश उचलला व म्हणाला–"हे सर्व तुझंच आहे नव्हे का? मला फक्त ही एक वस्तु देतोस का? तुला खायला मी वाटेल तितके बेडूक आणून देईन."

श्वेत फणवाला नाग व्यंग्योक्तीने म्हणाला–"अवश्य देईन, येथून तुझे पाऊल बाहेर पडेपर्यंत."

"बरे तर, मी येतों येथे काळोख आहे मला थंडी पण लागत आहे. हा अंकुश रानात घेऊन जाईन." मौवली म्हणाला.

"तुझ्या पायाजवळ काय पडले आहे, एकदा पहा!" नाग म्हणाला.

मौवलीने उचलून पाहिले. मनुष्याच्या डोक्याची कवठी होती. "ही तर मनुष्याच्या डोक्याची कवठी दिसते आहे. तिकडे आणखी दोन आहेत."

"ते काही वर्षापूर्वी हे धन उचलून न्यायला आले होते. काळोखांतच मी त्यांचा समाचार घेतला व ते येथून पुन्हा कधी हलले नाहीत. आता उरली काय ती त्यांची ही कवठी आहे." नाग म्हणाला.

"हे धन व हा साठा मला काय करायचा आहे तो? मला फक्त हा अंकुश हवा आहे. हा तू दिलास तर मला शिकारीला उपयोगी पडेल. नसला तरी शिकार थांबणार नाही. मी विषारी प्राण्यांशी भांडत नाही. तुझ्या बांधवांपासून मी अभय मंत्र शिकून घेतला आहे."

"येथे अभय मंत्र फक्त माझाच चालतो." पांढरा नाग म्हणाला.

काबाच्या डोळ्यातून जणु काही ठिणग्या बाहेर येऊ लागल्या. त्याने पुढे होऊन श्वेत नागाला विचारले–"मनुष्याला घेऊन यायला कोणी सांगितले होते?"

"होय, मीच सांगितले होते. मनुष्याला पाहून एक युग लोटले. म्हणून वाटले की एकदा पुन्हा पहावे पण हा तर नाग-जातीच्या भाषेत बोलतो," श्वेत नाग म्हणाला.

"पण तेव्हां ठार करण्याची भाषा नव्हती. तरमग तुझ्या मते मी एकटा अरण्यात जाऊन सांगू की मी मौवलीला मृत्यु मुखात लोटून आलो?" काबाने विचारले.

श्वेत नाग तोऱ्यात म्हणाला–"मी कोणाला ठार करणार आहे हे पाहिल्याने सांगण्याची संवय मला नाही. तू येथे रहा किंवा जा. भिंतीत भुयार आहेच. माकडांचा जीव घेणारा तू, जास्त बडबड करू नकोस. मी तुझी मानगुटी फक्त शिवलो तरी पुरे. भस्म होऊन जाशील. येथे जो आला तो जिवंत परतला नाही. मी या नगराच्या खजिन्याचा रक्षक नाग आहे."



"अरे काळोखातल्या किड्या! मी पुन्हा तुला सांगतो, ऐक. तुझा राजा नाही व त्याची राजधानी पण नाही. चारी बाजूला फक्त अरण्य आहे, अरण्य!" काबा म्हणाला.

"हा खजिना आहे ना! एक काम करू या. तू या तरुणाला पळायला सांग आणि मग पहा गंमत. काबा आणि ए पोरा, तुम्ही पळा. खेळ खेळू या." श्वेत नाग म्हणाला.

काबाच्या डोक्यावर हात ठेवून मौवलीने त्याच्या कानात सांगितले–"या श्वेत नागाला आजपर्यंत मनुष्य जातीची गर्दीच काय ती माहीत आहेसे दिसते. माझ्या विषयी त्याला









पुरी कल्पना नसणार. त्याला शिकार हवी आहे, देऊ आनंदाने."

मौवलीने आपल्या हातातला अंकुश चटदिशी नेम धरून श्वेत नागाच्या मानेवर टाकला. त्याच्या वजना खाली श्वेत नागाची हालचाल मंद पडली. त्याचे सर्वांग पिळवटूं लागले. काबाने त्याच्यावर उडी मारली आणि ओरडला–"मौवली ठार कर याला!"

मौवलीचा हात कट्यारीवर गेला. पण म्हणाला–"याला नाही मारणार. मला भूक लागेल तेव्हांच ठार करीन." असे म्हणत मौवलीने श्वेत नागाची मान धरून त्याचे तोंड कट्यारीने चिरले व म्हणाला– "काबा, पहा तर! याच्या जबड्यात विषाच्या पिशव्या आहेत पण त्या काळ्या पडल्या आहेत. विष गोठून गेले आहे."

मौवलीने श्वेत नागाच्या मानेवरचा अंकुश उचलला व त्याची मान सोडून म्हणाला– "राजाच्या खजिन्याचे रक्षण करायला नवा रक्षक नेमला पाहिजे. हा तर, उपाशी निर्जीव रक्षक आहे. श्वेत नागा! तू मूर्ख-पणा केलास. पाहिजे तर तूच पळ आता, आपण खेळ खेळू या."

"हा माझा अपमान असह्य वाटतो मला. मला ठार कर." श्वेत नाग म्हणाला.

"तुला मी नाही ठार करणार. हा अंकुश मी घेऊन जातो. मी तुला जिंकले ना, याची आठवण म्हणून." मौवली म्हणाला.

"तो ठेवून तुला मरण न येवो. माझ्या राजधानीत प्रत्येकाला याच्या पायीच मरण आले. कारण तुझ्या हातात हा अंकुश फार दिवस टिकणार नाही. रानटी मनुष्या! दिवस हातातून हिसकावून घेणाऱ्याच्या हातातपण तो राहणार नाही. हा कित्येकांचे बळी घेईल. माझ्या अंगात आता शक्ती उरली नाही. आता मला जे काम करावयाचे आहे, ते हा अंकुश करील. तो मृत्यु आहे. मृत्यु! मृत्यु!" श्वेत नाग म्हणाला.





# ७८. मुस्तांग पर्वतातल्या गुहा

मुस्तांग नामक प्रदेश नेपाळच्या उत्तरेला आहे. फक्त ७५० चौरस मैल पसरलेल्या या प्रदेशाचा एक राजा आहे. या प्रदेशात या गुहेसारख्या अनेक गुहा आहेत. या गुहा कोणी व केव्हा कोरून काढल्या कोणाला माहीत नाही. या गुहात प्रवेश करण्यास विशेष साधनांची गरज असते.



परसोजीचा एक नातेवाईक अप्पासाहेब ह्याच्या मनात राज प्रतिनिधी होण्याची महत्वाकांक्षा होती. इंग्रजांनी नागपुरची संधी करून त्याची ती इच्छा पूर्ण केली आणि त्याला आपला दोस्त करून घेतले.

अशा तऱ्हेने इंग्रजांच्या पूर्ण आहारी जाणे मराठ्यांना आवडले नाही. त्यांच्या मनात पेशव्यांसारखेच विचार घोळू लागले. शिंद्यांनी ज्या दिवशीं इंग्रजांशी केलेल्या संधीपत्रावर सही केली त्याच दिवशी पेशव्यांनी ब्रिटीश रेसीडेन्सीला आग लावून तिचा ध्वंस केला. नंतर २७००० सैन्यानिशी खडकी जवळ इंग्रजांच्या २८०० सैन्याशी युद्ध करून त्यात हारले. नागपूर येथे अप्पासाहेबांनी इंग्रजांशी युद्ध केले व २७ नोव्हेंबर १८१७ रोजी त्यांचा सिताबर्डी येथे पराभव झाली. यशवंतरावांचा मुलगा द्वितीय मल्हारराव होळकर याने इंग्रजांशी युद्ध केले व एका महिन्याच्या आत महीदपूर येथ त्याला हार मानावी लागली. अप्पासाहेब पंजाबकडे व तेथून जोधपूर येथे पळाला आणि १८४० मध्ये मरण पावला. नर्मदेच्या उत्तरे कडील सर्व प्रदेश इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली आला. ७ जानेवारी १८१८ या रोजी होळकरांनी मंदोसर नजीक इंग्रजांशी संधी करून घेतली.

मराठा पदपादशाहीचे चिन्ह म्हणून जी पेशवाई होती ती रद्द झाली. त्यापूर्वी दुसरा बाजीराव इंग्रजांशी दोन वेळ युद्ध करून हारला. इंग्रजांनी त्याला दरवर्षी ६ लक्ष रुपये पेन्शन देऊन कानपूर नजीक पिठूर गांवी पाठविले. त्र्यंबकजी चुनारच्या किल्ल्यात आमरण शिक्षा भोगू लागला. सातारा येथील छोट्या राज्याचा अधिपती म्हणून छत्रपती शिवाजी महाराजांचा एक वंशज प्रतापसिंह याची नेमणूक झाली.

अशा तऱ्हेने भारतांत ब्रिटीशांची अपार सत्ता वाढली.







# कोलाहल पंडित

दक्षिणेकडील एका राज्याच्या गादीवर एक राजा राज्य करीत असे. तो गुणग्राहक होता. त्याच्या दरबारात अनेक कवि, विद्वान, गायक वगैरेंना आदराचे स्थान प्राप्त होते.

राजाची मर्जी कोलाहल पंडित नावाच्या एका विद्वानावर थोडी जास्त होती. कोणी त्याच्या मर्जीविरुद्ध काही करावयास धजत नसे. कारण तो जे करी स्वतः राजादेखील त्याचे अनुमोदनच करी. राजाचे पाठबळ असल्यावर आणखी काय पाहिजे. कोलाहल पंडिताचा धाकदपटशा वाढत गेला. कोलाहल पंडिताला पैशाची गरज पडली की राजधानीतल्या वाटेल त्या नागरिकाकडे तो आपल्या शिष्याला चिट्ठी लिहून देऊन पाठवी. चिट्ठी मिळाल्याबरोबर, ज्याच्या नांवी चिट्ठी असे तो पैसे देऊन मोकळा होई. एकदा कोलाहल पंडिताने एका ब्राह्मणाच्या नावी एक चिट्ठी लिहून आपल्या शिष्याला त्याच्या घरी पाठविले.

तो शिष्य आला तेव्हां त्या ब्राह्मणाचा एक शिष्य बाहेर ओटीवर बसून वेदाध्ययन करीत होता. कोलाहल पंडिताच्या शिष्याने आपल्या गुरूने दिलेली चिट्ठी त्या ब्राह्मणाच्या शिष्याला दिली. ती चिट्ठी वाचल्यावर त्या शिष्याला भयंकर राग आला व त्याने चिट्ठी फाडून कागदाचे तुकडे कोलाहलच्या शिष्याच्या तोंडावर टाकले. अणि म्हणाला–"आपल्या गुरुवर्यांना जाऊन सांग, असला मूर्खपणा आमच्या जवळ नाही चालणार आणि तुलापण सांगतो, असली कामे तू स्वतः करू लागलास तर........" असे म्हणत तो कोलाहल पंडिताच्या शिष्याला मारायला धावला.

श्री. दा. म. बोडस



कोलाहलच्या शिष्याने तेथून पाय काढून स्वतःचा बचाव केला आणि गुरूकडे जाऊन त्याचा जसा सत्कार झाला त्याचे तिखटमीठ लावून वर्णन केले.

अधिकारमदाने मातलेले कोलाहल पंडिताचे डोके जास्तच भडकले. त्याने त्या ब्राह्मणाविरुद्ध राजाकडे फिर्याद केली. राजाने तत्क्षण त्या ब्राह्मणाला बोलावून आणावयास शिपाई पाठविले.

त्या ब्राह्मणाला फार आश्चर्य वाटले. तो घरी नसतांना घडलेली गोष्ट त्याला माहीत नव्हती. म्हणून शिष्याने जे घडले ते सर्व जसेच्या तसे सांगून गुरूजवळ क्षमा मागितली आणि राजाच्या शिपायांना म्हणाला—"हे पहा, या फिर्यादीशी आमच्या गुरुवर्यांचा काही संबंध नाही. या सर्वाला जबाबदार त्यांचा शिष्य मी आहे. मला घेऊन चला राजा कडे."

तो राज दरबारी गेल्यावर राजाने त्याला विचारले—"तुझ्या विरुद्ध कोलाहल पंडिताने फिर्याद केली आहे, त्याविषयी तुझे काय म्हणणे आहे?"

ब्राह्मणाचा शिष्य म्हणाला—"महाराज! मी सर्व समजून उमजून केले आहे. पाहिजे तर आपण त्यांच्या व माझ्या बुद्धिमतेची परीक्षा घेऊन पहावी."

राजा ने विचार केला, पाहू तर या गंमत, कोलाहल पंडिताला वाटले, बरे झाले. विचारू तर दे त्याला. काय विचारावयाचे आहे ते. तो हारला म्हणजे खोड मोडेल अशी शिक्षा करता येईल.

राजाने पंडितांची सभा बोलाविली. राजा जरा आतल्या खोलीत गेला. तेथे राजा व राणी यांचा आपसात काही तरी वाद झाला. "मुलगा हुशार दिसतो आहे, बरं का!" राणी म्हणाली. "मुळीच नाही." राजा म्हणाला. ते बाहेर बसून ब्राह्मणाचा शिष्य ऐकत होता.

पंडितांची सभा जमली. पांडित्याची परीक्षा करण्याचा त्या देशात एक प्रघात होता. एकाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर दुसऱ्याने पूर्वापार संदर्भानुसार द्यायचे. दुसरा उत्तर देऊ शकला नाही तर प्रश्न करणाऱ्याने त्याचे बरोबर उत्तर काय ते सांगावयाचे. तोपर्यंत जयापजयाचा निर्णय होत नसे.

ब्राह्मणाच्या शिष्याने कोलाहल पंडिताला विचारले—"तुम्ही माझे खंडन करणार की मी तुमचे करू, बोला."

एवढासा पोर माझे खंडन करणार? थट्टा आहे का, असा विचार करून कोलाहल पंडित म्हणाला—"मीच तुझे खंडन करतो!"

"ठीक आहे. तरमग मी म्हणतो त्याचे खंडन तुम्ही करा. पहिली गोष्ट म्हणजे, तुमची आई वन्ध्या स्त्री नव्हती. दुसरी गोष्ट म्हणजे आपले महाराज, एक धर्मात्मा पुरुष होत. आता शेवटची व तिसरी गोष्ट म्हणजे आपल्या राणी सरकार पतिव्रतांना आदर्श आहेत."

त्या तिन्ही गोष्टींचे खंडन करण्याची. कोलाहल पंडितच काय पंडित सभेत कोणाची छाती होती? त्या गोष्टी विचारून परीक्षा घेणाऱ्या मुलाचाच सर्व पंडितांना



राग आला. चिडक्या स्वरात कोलाहल पंडित ब्राह्मणाच्या शिष्याला म्हणाला– "तूच आपल्या गोष्टीचे खंडन करून दाखव आणि हा जय तुलाच लख लाभो!"

ब्राह्मणाचा शिष्य म्हणाला–"ठीक! मीच, मी म्हटल्याचे खंडन करू म्हणता? बरे तर ऐका! पहली गोष्ट, तुमची आई वन्ध्या स्त्री नव्हती, असे मी म्हणालो होतो. ती एका तऱ्हेने वन्ध्याच होती म्हणाना. तुमच्या सारख्या पापी माणसाचा तिच्या पोटी जन्म होण्यापेक्षा ती वन्ध्या राहिली असती तरच तिला बरे वाटले असते. दुसरी गोष्ट, महाराज धर्मात्मा आहेत, मी म्हणालो. पण खरोखर पाहिले तर नाहीत. ते धर्मात्मा असते तर तुमच्या सारख्या दुरात्म्याला स्वेच्छाचार करू दिला असता का त्यांनी? तिसरी गोष्ट, आपल्या राणी सरकार पतिव्रतांना आदर्श आहेत, मी म्हणालो. पण पतिव्रतांच्या लक्षणांपैकी एक गोष्टीची उणीव दिसून आली त्यांच्यात. आजच्या या परीक्षेत मी हारणार असे महाराज म्हणाले. पण राणी सरकार म्हणाल्या मी जिंकणार. त्या म्हणाल्या तेच शेवटी खरे ठरले. मी जिंकलो व तुम्ही हारलात."

थोडा वेळ सभेत कोणाच्या तोंडावाटे शब्द उमटत नव्हता. मुलाचे म्हणणे कोणी खोडू शकला नाही. महाराज न्यायी होते. म्हणून ते सिंहासनावरून उतरून खाली येऊन ब्राह्मणाच्या शिष्याची पाठ थोपटून म्हणाले–"मुला! आज, तू माझे डोळे उघडलेस. माझ्या राज्यात माझा एक दरबारी पंडित माझे पाठबळ मिळाल्याने इतके अत्याचार करीत असेल याची कल्पना मला स्वप्नात देखील नव्हती.

राजाने ब्राह्मणाच्या शिष्याचा यथोचित सत्कार केला आणि कोलाहल पंडिताला आपल्या दरबारातून काढून टाकले.







# पडकें देऊळ

[ ६ ]

[ त्या राक्षसी बाहुल्याच्या हातून निसटून शिखीमुख व विक्रमकेसरी डोंगरातील गुहांकडे निघाले तेव्हां गाय गावचे धान्य नागजातीचे म्हणून लोक लुटून नेत असल्याचे त्या गावच्या एका शबराने येऊन सांगितले. दोघे त्या गांवी आले. लट्ठूसिंह शिखीमुखला पाहून भाला उगारून त्याच्या अंगावर धावला.—पुढे. ]

डोंगराळ प्रदेशात शिखीमुख व विक्रमकेसरी यांना भेटलेला शबर जातीचा गांवकरी जोराने धावत शबरांच्या वस्तीत येऊन पोचला. त्यावेळी गांवकरी जळून गेलेल्या आपल्या झोपड्या पुन्हा शाकारून उभ्या करीत होते. प्रत्येकाच्या तोंडावर त्यावेळी राग व आवेश आणि त्याच बरोबर दुःख पण स्पष्ट दिसत होते. पण हिंमत मात्र खचलेली मुळीच दिसत नव्हती.

गाय गांवचा गांवकरी नवीन बांधून तयार झालेल्या एका झोपडी समोर उभा राहून मोठ्याने शबर मातेचा जयघोष करून म्हणाला–"मी गाय गांवचा शबर आहे. गावचा नायक जिवाजी यांचे घर कोठे आहे? नाग जातीच्या लोकांनी आमच्या गांवावर स्वारी केली आहे व धान्य लुटून नेत आहेत. तुमच्या गावाची मदत मिळेल म्हणून मी आलो आहे.



तुमच्या नायकाचा मुलगा व त्याचा एक मित्र पुढे गेले आहेत."

त्याचा आवाज ऐकून एक मध्यम वयाचा मनुष्य पुढे आला. तो त्या वेळी आपले झोंपडे शाकारीत होता. त्याच्या हातात दोऱ्या व काठ्या होत्या. त्या त्याने खाली टाकल्या व म्हणाला–"मरणाच्या वेळी असे हळू व गोड शब्दात बोलतात होय रे? चल लवकर. रात्रीं आमच्या झोपड्यांना त्याच दुष्टांनी आग लावली. त्यांचाच शोध काढण्यासाठी आमच्या नायकाचा मुलगा शिखीमुख सारे रान रात्रभर पालथें घालीत फिरत आहे. आमचा नायक जिवाजी याला लवकर या सर्व गोष्टीची माहिती दिली पाहिजे की दुष्ट लट्ठूसिह तुमच्या गावात शिरून लुटालूट करीत आहे.

ते दोघे जिवाजीच्या घरी पोचले तेव्हां जिवाजी आपल्या घरासमोरच्या आंब्याच्या झाडाखाली बसून गावकरांशी काही तरी बोलण्यात गर्क होता. गायगांवच्या त्या शबराने विजाजीला नमस्कार केला आणि येण्याचे कारण सांगितले आणि शिखीमुख व एक तरुण गायगावला हिंमत करून गेले आहेत.

ते ऐकून जिवाजी उभा राहाला व म्हणाला–"शिखी व विक्रमकेसरी त्या गावी एकटे गेले आहेत. हे त्यांनी दुःसाहसच केले आहे. मी लट्ठूसिहला चांगला ओळखतो. तो पहिल्या नंबरचा दुष्ट व पाजी आहे. त्याने पडक्या देवळाच्या पुजाऱ्याशी दोस्ती केली आहे. आपण सर्वांनी मिळून त्या दोघांचा नाश केला पाहिजे. आपल्या वस्तीतल्या दहावीस तरुणांना लवकर बोलावून घेऊन या."

जिवाजीने विचार करण्यात जास्त वेळ घालवला नाही. अशा अनेक प्रसंगी तो शांतचित्तच रहात असे. तरी मुलाने दाख-विलेल्या दुःसाहसाबद्दल त्याला काळजी वाटत होती.

एक मध्यम वयाचा मनुष्य आपल्या झोपडीत गेला व एक ढोलके आणून जोराने वाजवू लागला. दोन तीन मिनिटात त्या वस्तीतले सर्व तरुण आपापले भाले व बरच्या घेऊन हजर झाले. त्यांच्यापैकी पंचवीस जणाना निवडून जिवाजीने एका बाजूला उभे केले. आणि म्हणाला–"हे पहा, ह्या गायगावच्या माणसाबरोबर जा. वाटेत लट्ठूसिहच्या अनुयायांपैकी लोक भेटले तर त्यांच्या बरोबर मारामारी करण्यात वेळ घालवू नका. सरळ गायगावी जा. तुम्ही पुढे व्हा, मी पाठीमागून येतोच आहे."

गायगावचा मनुष्य पुढे वाट दाखवायला जाऊ लागला व त्याच्या पाठी मागून शबर तरुण धावत निघाले. ते गेल्यानंतर थोड्या वेळाने जिवाजी घरात गेला. एका शबर नायकाला साजेल अशा पोशाख करून व जंगली पक्ष्यांची पिसे खोचलले शिरस्त्राण धारण करून बाहेर आला.

तोपर्यंत जिवाजीच्या घरासमोर वस्तीचे सर्व लोक जमा झाले होते. जिवाजी त्यांना म्हणाला–"मी परत येईपर्यंत तुम्ही सर्वांनी सावधगिरी बाळगा. लट्ठूसिहला



धान्य हवे आहे, पण पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला माझ्या जवळच्या ताडपत्रांचा ग्रंथ हवा आहे. मी घरी नाही असे पाहून तो कदाचित गावावर व माझ्या घरावर हल्ला करील. सावध रहा!"

"आणखी एक गोष्ट सांगून ठेवतो, त्याला अद्भुत शक्तीवाला व अग्निवृष्टी करणारा एक तिसरा डोळा आहे. तो डोळा उघडून तो सर्वांना भस्म करून टाकील." गर्दीतला एक मनुष्य म्हणाला.

ते बोलणारा कोण हे बघण्यासाठी जिवाजीने एकदां सर्वांकडे करड्या नजरेने पाहिले. पण कोण हे ओळखू शकला नाही.



तेव्हां करड्या, आवाजात म्हणाला–"आपल्या वस्तीतले एकदोघे तरी त्या पुजाऱ्याच्या अंगात अद्‌भुत शक्ती आहे असे मानणारे दिसत आहेत. खरोखरी ही आश्चर्याची गोष्ट आहे. पण लक्षात ठेवा त्याचे पैसे खाऊन असल्या खोट्या अफवा पसरविणाऱ्या लोकांच्या बोलण्यावर मुळीच विश्वास करू नका."

त्यानंतर, जिवाजी वस्तीच्या काही लोकांना बरोबर घेऊन गायगावकडे निघाला. जंगलात काही अंतर चालून गेल्यावर ते डोंगराळ प्रदेशात पोचले. तेथे वाटेत त्यांना ते तुटून पडलेले राक्षसी बाहुले दिसले. ते पाहून जिवाजीला व त्याच्या अनुयायांना आश्चर्य वाटले. काहीना त्याची भीती पण वाटली.

त्या शबरांपैकी एकाने जमिनीवर पडलेला त्रिशूल उचलून सरळ उभा केला. त्याला लागलेले रक्त पाहिले व जिवाजी जवळ जाऊन म्हणाला–"हा त्रिशूळ कांस्याचा आहे. आपल्या या प्रदेशात या धातूची वस्तू आढळणे शक्य नाही. याला लागलेले रक्त मनुष्याचे नसून जनावराचे दिसते आहे."

जिवाजीने त्रिशूल हातात घेऊन पाहिला व म्हणाला–"तू म्हणतो आहेस ते बरोबर आहे. मी ऐन उमेदीत आपले धनी विक्रम-केसरी यांच्या बरोबर हिमालय पर्वताच्या दऱ्या खोऱ्यात गेलो होतो तेव्हां तेथले लोक या धातूच्या वस्तूच वापरत असतांना मी पाहिलेले आठवते मला." काही वेळ गप्प राहून तो पुन्हा म्हणाला–"बरे तर चला, जास्त वेळ घालवणे बरोबर होणार नाही." असे म्हणत तो पुढे निघाला.

ज्याने त्रिशूल जिवाजीच्या हातात उचलून दिला होता त्या शबराने विचारले–"धनी! हा त्रिशूल पडक्या देवळाच्या पुजाऱ्याचा असेल असे वाटते का तुम्हांला? तो पुजारी पण हिमालयाच्या दऱ्या खोऱ्यातूनच आला आहे, नाही का?"

"त्याच्या बोलण्यावर कसा काय विश्वास करावयाचा? पुजाऱ्याचे काय तो सहस्रावधी वर्षे झाली, हे काम करीत आला आहे, अशा गप्पा सांगतो. म्हणे, त्याला तिसरा डोळा आहे व त्याला वाटेल तेव्हा तो अदृश्य होऊ शकतो. यात काही तरी लबाडी व लुच्चे गिरी आहे. त्याला पकडल्यावरच आपल्याला खरेखोटे काय ते कळेल. प्रथम आपण गायगावला पोचले पाहिजे. पुढे गेलेले लोक आतापर्यंत पोचले असणार." जिवाजी म्हणाला.

जिवाजीला वाटले ते बरोबर होते. आपल्या नायकाचा बहाद्दूर मुलगा संकटात सापडल्याचे त्यांना कळले होते. म्हणून ते पळतच गायगावपर्यंत गेले. त्या शबर जातीच्या वाटाड्याने त्यांना सरळ गावात लट्टूसिंह जेथे धान्य लुटीत होता सरळ तेथे नेले.

त्याच वेळी लट्टूसिंह मिशावर ताव देत शिखीमुखच्या अंगावर धावून येत होता. शिखीमुख आता भाला फेकणार त्याच वेळी लट्टूसिंहाची दृष्टी नुकत्याच आलेल्या शबर जातीच्या लोकांवर पडली. त्यांच्या सर्वांच्या हातात शस्त्रे होती व ते सुद्धा हल्ला करायला तयार होते.



लट्टूसिंह त्यांना पाहून म्हणाला–"हा विश्वासघात आहे. तू मला द्वन्द्व युद्धाला आह्वान केले होतेस. आता हे सर्व माझ्यावर हल्ला करायला तयार होऊन आलेले दिसत आहेत." असे म्हणत त्याने शबर लोकांकडे बोट दाखविले.

शिखीमुख व त्याच्या जवळून थोड्याच अंतरावर उभा असलेला विक्रम केसरी दोघांनी चकित होऊन मागे वळून पाहिले. गाय गावच्या तरुणाबरोबर शबर वस्तीचे सुमारे पंचवीसवीर भाले घेऊन येत असलेले दिसले. शिखीमुखने त्यांना हाताने खूण करून जागच्या जागी थांबायला



सांगितले व म्हणाला—"मी व लट्टूसिंह आपापली शक्ती आजमावून पहात आहो."

शबरलोक शिखीमुखच्या सांगण्याला मान देऊन जागच्या जागी उभे राहाले. शिखीमुख सिंहासारखा हुंकार करीत म्हणाला—"लट्टूसिंह! आहेस ना तयार?" आणि एक पाऊल पुढे टाकले. पण लट्टूसिंह एक पाऊल मागे सरकून म्हणाला—"तू स्वतःच्या रक्षणासाठी गांवकऱ्यांना घेऊन आला आहेस आणि मला द्वंद्व युद्धाला आह्वान करीत आहेस. आज तू एकटा आलास तर नक्कीच माझ्या हातून मरशील. पण नंतर हे सर्व शबर माझ्यावर हल्ला करून माझे लचके तोडून मला खातील."

"कोण कोणाला ठार करतो हे थोड्या वेळात ठरेल. या सर्व गप्पा सोड. पाहिजे तर तू आपल्या सर्व अनुयायांना मदतीला बोलाव." शिखीमुख म्हणाला.

लगेच लट्टूसिंहने टाळ्या वाजवून ओरडून आपल्या अनुयायांना बोलाविले. गांवभर पसरलेले त्याचे अनुयायी धावत आले. त्यांना त्याने जे सांगायचे ते सांगितले व ते धान्यांच्या कणग्याआड जाऊन उभे राहाले. शिखीमुखच्या लोकांनी हल्ला केलाच तर स्वरक्षणार्थ धावून यायला त्याने समजावून सांगितले होते.

त्यानंतर शिखीमुख व लट्टूसिंह यांचे द्वन्द्व युद्ध सुरू झाले. लट्टूसिंहचे वार चालू होते. पण शिखीमुख स्वतःचा बचाव करीत लट्टूसिंहला मागे रेटीत चालला होता. धान्य ठेवण्यासाठी जमिनीत खड्डे खणून ठेवलेले होते. त्यांच्या जवळ लट्टूसिंहला रेटीत शिखीमुख घेऊन आला. त्यात त्याचा हेतू एवढाच होता की स्वतः दमून जाण्या पेक्षा लट्टूसिंह चांगला दमून गेला की नव्या दमाने त्याच्यावर वार करून त्याला ठार करावयाचा.



लट्टूसिंहला आपला डाव फसल्यासारखे वाटले. त्या तरुण शबराला पांच मिनटात लोळविण्याचा त्याचा बेत फसला. कारण त्याला वाटले होते तसा त्याचा शत्रू पोरकट दिसत नव्हता. शिखीमुख तर सिंहा सारखा स्वतःचा बचाव करीत लट्टूसिंहाला रेटीत पुढे येत होता.

परंतु आपण अजून दमलो नाही हे दाखविण्यासाठी लट्टूसिंह शिखीमुखला म्हणाला—"भित्र्या! पळपुट्या माझ्याशी द्वंद्व युद्धाला आला आहेस नाही का?"

"लट्टूसिंह! अरे, कशाला या फुकटाच्या गप्पा? एका जागी थोडा वेळ रहा की उभा."

असे म्हणत त्याने भाला दोन्ही हातांनी जोराने उचलून लट्टूसिंहच्या भाल्यावर फेकला. लट्टूसिंहचा भाला तुटून दूर जाऊन पडला. लट्टूसिंह भाला घेण्यासाठी मागे वळणार एवढ्यात शिखीमुखने त्याच्या बाहूवर भाल्याचे टोक ठेवले व म्हणाला—"बोल! मानतोस, हारलास म्हणून? तुला मी जीवदान द्यायला तयार आहे."

"एका शबराजवळ मी जीवदान मागणार होय?" असे म्हणत त्याने आपल्या उजव्या हातावर टेकलेले शिखीमुखच्या भाल्याचे टोक डाव्या हाताने फेफून देऊन कमरेचा खंजीर काढला व शिखीमुखच्या अंगावर



झडप मारल्यासारखी उडी मारली. पण शिखीमुख एक पाऊल मागे सरकला. म्हणून खंजीराचा वार चुकला. त्याने लट्ठूसिंहच्या उजव्या हातांत आपला भाला भोसकला आणि लट्ठूसिंहच्या डाव्या पायाला इतक्या जोराने लाथ मारली की लट्ठूसिंह 'ओय ओय!' करून जोराने ओरडला. त्याच्या हातातला खंजीर जमिनीवर पडला. शिखीमुखची लाथ त्याच्या गुडघ्याला लागली होती. त्याची कळ असह्य होऊन तो जमिनीवर गडबडा लोळत धान्य साठवण्यासाठी जमिनीत करून ठेवलेल्या एका खड्ड्यात जाऊन पडला.

ते पाहून त्याचे अनुयायी घाबरून गेले. दोघे तिघे पळून जाऊ लागले. पण त्यांच्या पैकी एक जण आपला भाला वर करून म्हणाला–"लट्ठूसिंहानंतर नागजातीचा नायक मी आहे. शिखीमुख व त्याच्या अनुयांयांचा मी एका क्षणात संहार करतो. या, असे पळता काय?" असे म्हणत तो आपल्या अनुयायांसह शिखीमुखवर धावून आला.

शिखीमुखने प्रसंग ओळखला आणि आपल्या अनुयायांना सावध केले. विक्रमकेसरी त्या सर्वांना घेऊन नागजातीच्या लोकांशी युद्धाला तयार झाला. आता मारामारी होणार व भयंकर दृश्य पहायला मिळणार असा प्रसंग होता. पण तितक्यात त्यांना जिवाजीची आरोळी ऐकू आली– "अरे, फुकटचे रक्त कां सांडता? लट्ठूसिंहाच्या अनुयायांनी निमूटपणे हातांतली शस्त्रे जमिनीवर टाकावी."

लट्ठूसिंहाच्या अनुयायांनी मागे वळून पाहिले. मागून दहावीस शबर व समोरून वीस पंचवीस शबर. आतां काय करायचे, हा प्रश्न त्यांच्या समोर होता. शस्त्रे टाकायची की शूरासारखे युद्ध करून मृत्यूला मिठी मारावयाची.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# [illegible]

विक्रमार्कानें हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले व स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझी निष्ठा प्रशंसनीय आहे. परंतु ती सोमशेखर सारखी ऐन वेळी, यश हाती येण्याची संधी आली असता, निरूपयोगी ठरते की काय एवढीच एक शंका मला वाटते. तुला कंटाळा वाटू नये म्हणून मी सोमशेखरची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सोमशेखर नांवाचा एक ब्राह्मण गंगानदीच्या काठी एक आश्रम बांधून त्यात रहात असे. त्याने एक नियम ठेवला होता. तो रोज भिक्षेला जाई. जी भिक्षा मिळे ती स्वतः खाण्यापूर्वी अतिथीअभ्यागत जो कोणी असेल त्याला प्रथम पोटभर जेवायला



वाढी. काही उरले तर ते स्वत: खाई. काही उरले नाही तर गंगेचे पाणी पिऊन त्यावर तेवढा दिवस घालवी. आणखी काही करत असो किंवा नसो, एवढा नियम मात्र तो चुकल्याशिवाय पाळीत असे.

एकदा दुष्काळ पडला. त्याला मिळणारी भिक्षा कमी होऊ लागली व अतिथी-अभ्यागतांची संख्या वाढू लागली. परंतु त्याने आपला नियम कधी मोडला नाही.

अशा दुष्काळाच्या काळात तो एकदा भिक्षेला निघाला असता एक उपाशी मनुष्य समोर भोवळ येऊन पडलेला त्याला दिसला. सोमशेखरने त्याच्या तोंडावर पाणी शिपडून तो शुद्धीवर आल्यावर त्याला आपल्या आश्रमात नेले व प्यायला पाणी देऊन विचारले–"कोण तुम्ही, असे एकदम बेशुद्ध होऊन कसे काय पडलात?"

"पोटात अन्न जाऊन किती दिवस झाले हे त्या एकट्या परमेश्वराला माहीत, उन्हाची वेळ, भुकेने जीव कासावीस. भोंवळ येऊन पडलो, एवढ्यावर भागले." तो मनुष्य म्हणाला.

"तुम्ही माझ्या आश्रमात विश्रांती घ्या, मी भिक्षेला जातो आहे, आल्यावर तुम्हांला जेवायला वाढतो." असे सांगून सोमशेखर निघून गेला. परंतु, काय पण आश्चर्य दुपार? होऊन गेली तरी त्याला एक शीत देखील भिक्षेत मिळाले नाही. घरी एक अतिथीला जेवायला थांब म्हणून सांगून तो निघाला होता. रिकाम्या हाताने घरी जाऊन त्याला जेवायला वाढले नाही तर जो अपमान होईल त्यापेक्षा जीव देणे बरे, असे त्याला वाटले. म्हणून त्याने गंगेत उडी टाकली.

परंतु त्याला मरण आले नाही. त्याला समोर एक देवी दिसली. ती म्हणाली–"मी गंगानदी आहे. तू असा जीव द्यायला कां निघालास?"

सोमशेखर हात जोडून म्हणाला–"माते! मी आजवर भिक्षा मागून अतिथी अभ्यागतांना जेवायला वाढून नंतर उरलेले खाण्याचा नियम आजवर पाळीत आलो. माझ्या घरी एक अतिथी माझी वाट पहात आहे. परंतु आज आझ्या दुर्दैवाने एक शीत देखील मिळाले नाही. नियम मोडण्यापेक्षा मरण बरे असे मला वाटले."

"बाळ! चिंता करण्याचे कारण नाही. मी हे पात्र देते. ते घेऊन जा. आपल्या पाहुण्याला पोटभर जेवण वाढ. हे अक्षय-पात्र आहे. किती पाहुणे आले तरी त्यांना पुरेसे अन्न या पात्रात तुला मिळेल. परंतु तुला स्वत:च्या पोटाला हे उपयोगी पडणार नाही. आजवर तू भिक्षा मागून आपला उदर निर्वाह चालविलास तसाच पुढे तुला चालवावा लागेल. मात्र तुला खायला असो किंवा नसो, हे पात्र असल्यावर तुझा नियम मोडणार नाही." असे सांगून गंगेने ते अक्षय-पात्र त्याला दिले आणि अंतर्धान पावली.

सोमशेखरला अत्यानंद झाला. अक्षयपात्र घेऊन तो घरी आला. आपल्या पाहुण्या-समोर ते पात्र त्याने उघडे केले. त्याच्या पाहुण्याला पोटभर षडरस भोजन मिळाले. कित्येक दिवसाचा उपाशी तो पाहुणा सोमशेखरचे आभार मानन निघून गेला.





गंगेने दिलेले पात्र सोमशेखरने आपल्या समोर पण उपडे करून पाहिले, परंतु त्यांतून काही आले नाही. म्हणून त्याच्याजवळ अक्षयपात्र असून ही त्याला त्यादिवशी उपास काढावा लागला.

परंतु त्याने ती गोष्ट मनाला लावून घेतली नाही. तो स्वतःच्या पोटाला लागेल तेवढीच भिक्षा मागून आणू लागला. त्याच्याकडे किती पाहुणे आले तरी त्याला काळजी करण्याचे कारण उरले नाही. त्याची कीर्ती देशोदेशी पसरली.

सोमशेखरच्या अन्नदानाचे वृत्त ऐकून त्याला भेटायला देशाचा राजा आला. अक्षयपात्राचा महिमा राजाने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिला. सोमशेखरशिवाय इतर कोणाच्या हाती ते पात्र असेल तर निरुपयोगी ठरते व सोमशेखरला स्वतःच्यासाठी त्याचा काही उपयोग नाही हे देखील राजाला कळले.

राजा म्हणाला-"तू इतक्या लोकांना अन्नदान करतोस पण तुला स्वतःच्या पोटासाठी भिक्षा मागावी लागते, हे काही बरोबर दिसत नाही. उद्यांपासून राजवाड्यातून तुझ्यासाठी पंचपक्वान्नाची व्यवस्था मी करून देतो." त्याप्रमाणे राजाने जेवण पाठविण्याची व्यवस्था सुद्धा केली.

आता सोमशेखरला भिक्षेला जाण्याची गरज उरली नाही. पाहुण्यांना पोटभर जेवायला वाढायला अक्षयपात्र होतेच. त्याच्यासाठी नियमितपणे पंचपक्वानांचे जेवण राजवाड्यातून येत होते.

काही काळ लोटल्यावर सोमशेखरच्या स्वभावात व वागणुकीत फरक पडला. पाहुण्यांना प्रेमाने जेवण वाढण्याच्या कामात त्याला उत्साह वाटेनासा झाला. अतिथी अभ्यागत म्हणून येणारे खरोखरीचे गरीब उपाशी नसून फुकटाचे खायला मिळते म्हणून येणारेच जास्त आहेत असे त्याला वाटू लागले. त्याचे जेवण झाल्यावर कोणी पाहुणा आला की त्याला राग येऊ लागला. पूर्वी अतिथी अभ्यागत त्याला देवतुल्य वाटत, ते आता भिकारी वाटू लागले. तो त्यांच्यावर राग काढून बोलायला कमी करीत नसे. "माझे हे घर आहे. ज्याला ज्याला यायचे असेल त्याने एकदम यावे. ही काय खाणावळ किंवा धर्मशाळा आहे?" असे तो म्हणे.

म्हणून अतिथी अभ्यागत कमी होऊ लागले. या उलट सोमशेखरचा पाहुण्यांवरचा रागमात्र वाढत गेला. शेवटी कोणी येईनासे झाले. लोक त्याची निंदानालस्ती करू लागले.

ही गोष्ट राजाच्या कानावर गेली. त्या ब्राह्मणाजवळ गंगेने दिलेले अक्षयपात्र होते. कष्ट केल्याशिवाय त्याला दोन्ही वेळ जेवायला मिळू लागले. असे असून अतिथी अभ्यागत आल्यावर त्यांच्याशी प्रेमाने वागण्याऐवजी तो असे विचित्र वागू लागला, हे पाहून राजाला आश्चर्य वाटले. याचे कारण काय हे कळावे म्हणून राजा स्वतः त्याच्याकडे गेला.

राजा येत असल्याची गोष्ट त्याला अगोदरच कळली होती. अक्षयपात्राविषयी



राजा नक्की विचारणार, हे सोमशेखरला माहीत होते. परंतु त्या पात्राचा उपयोग करून पुष्कळ दिवस झाले होते. त्याने पात्र उघडून पाहिले तर त्यावर घाण व पुटे साचलेली होती. ते स्वच्छ घासून पुसून आणण्यासाठी तो गंगेवर गेला. त्याने ते गंगेत बुडविले मात्र, कोणीतरी ते ओढल्यासारखे त्याला भासले आणि ते पात्र पाण्यात बुडाले. किती हुडकून पाहिले पण ते त्याला सापडले नाही.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला-"राजा! मला एका गोष्टीचे आश्चर्य वाटते की ज्या सोमशेखरला स्वतःच्या पोटा पुरेसे



देखील अन्न मिळत नसे आणि तरी सुद्धा तो अन्नदान केल्याशिवाय जेवत नसे, तो स्वतःच्या पोटाची काळजी नसताना आणि येतील तितक्या अतिथी अभ्यागतांना पोटभर वाढण्यास अक्षयपात्र असतांना त्यांच्याकडे असे दुर्लक्ष किंवा उपेक्षाभाव कां दाखवू लागला? त्याचे व्रत चालू ठेवायला अनुकूल परिस्थिती होती, नव्हे का? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"उपासमार ज्याची होते त्यालाच उपाशी माणसाबद्दल कळकळ वाटते. म्हणूनच त्याला ज्यावेळी भिक्षा मागावी लागे त्यावेळी अतिथी अभ्यागतांना जेवायला वाढण्याची बुद्धी पण झाली. अतिथी अभ्यागत त्याच्या सारखेच गरीब व बरोबरीचे त्याला वाटत होते. अक्षयपात्र मिळाल्यानंतर सुद्धा त्याला उपासमार म्हणजे काय हे कळत होते. परंतु राजाने सोमशेखरच्या पोटा पाण्याची व्यवस्था करून दिल्यावर त्याच्या मनात भुकेची किंमत कमी झाली. म्हणून उपाशी लोकांविषयीचा आदर त्याच्या मनात कमी होत गेला. अतिथी अभ्यागत आपल्याहून हलक्या प्रतीचे लोक आहेत. त्यांची सेवा आपण करावी हे त्याला आवडेना. त्यात त्याला कमी पणा वाटू लागला. म्हणून तो आपल्या अतिथी अभ्यागतांचा अपमान करू लागला. अर्थात त्यांनी येणेच सोडून दिले. अशा तऱ्हेने अक्षयपात्र व राजाने पोटा पाण्याची करून दिलेली व्यवस्था ही अनुकूल परिस्थिती असून ही त्याच्या अहिताची ठरली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ पुन्हा प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# इंद्रजाल

सुंदरगड नामक अरण्यात रमणक नावाचा एक कोल्हा रहात असे. कोल्हा हा मुळातच फार हुशार. त्यात रमणक हा वयाने मोठा होता आणि वयाबरोबर जगाचा अनुभव पण त्याला पुष्कळ होता. म्हणून अरण्यातल्या जनावरांना रमणक हा फार मोठा आधार वाटे.

एकदा एकाएकी सिंह गर्जना झाली आणि सारे जंगल भयकंपित झाले. यापुढे अरण्यात निश्चिंतपणे राहाणे अशक्य हे जनावरांनी ओळखले. त्यांना भीती वाटत होती तसे झाले देखील. दुसऱ्या दिवशी सकाळी दोन हरणे व एक जंगली रेडा मेलेला आढळला. त्या दिवशी दुपारी एक ससा व त्याची बायको दोघ मरून पडलेली दिसली. तो आठवडाभर हत्याकांड चालू होते.

त्या अरण्यात विक्रम नावाचा एक सिंह नवीनच येऊन राहू लागला होता व त्याने स्वतःला मृगराज असे जाहीर पण केले होते. त्याने चालू केलेल्या हत्याकांडाचा शेवट व्हावा, या हेतूने सर्व जनावरे रमणकचा सल्ला घेण्यासाठी त्याच्याकडे आली आणि म्हणाली—"कोल्होबा! या मृगराजाच्या अत्याचारांचा शेवट झाला पाहिजे. काय वाटेल ते करून आमचे रक्षण करा."

"घाई करू नका. विचार करून सांगतो." कोल्हा म्हणाला.

"अहो, विचार करायला वेळ कोठे आहे? पाहता पाहता आपण सर्व मरणार आहो." जनावरे म्हणाली.

कोल्ह्याने थोडे स्मित करून म्हणाला—"हे पहा रे, मला एक युक्ती सुचली आहे. कोणी तरी जाऊन मृगराजाला भेटले पाहिजे. तुमच्या पैकी कोण तयार आहे, बोला." परंतु एकाने देखील तोंड उघडले नाही.



"बरे तर सोडा. मीच जाऊन येतो. हो, पण आपले हे मृगराज राहतात कोठे?" कोल्ह्याने विचारले.

जंगली मांजर आपले शेपुट ताठ करून म्हणाले–"घुवडे वसतात त्या वडाच्या झाडाजवळ केळधाच्या बागेजवळ एक गुहा आहे पहा, तिच्यात राहतात ते."

कोल्ह्याने सर्वांना निरोप दिला आणि काळोख पडण्याच्या सुमारास पोटभर खाऊन पिऊन आपल्या बिळातून बाहेर पडला. तो वडाच्या झाडापर्यंत पळत गेला. नंतर एकेक पाऊल टाकीत पुढे गेला.

गुहेतून सिंहाच्या घोरण्याचा आवाज बाहेर ऐकू येत होता. गुहेच्या समोर कित्येक जनावरांच्या देहाचे सांगाडे पडले होते. जवळ जवळ सगळेच कोल्ह्याच्या मित्र मंडळी पैकीच होते. काय करावे हे काही ठरविल्याशिवाय कोल्हा आपल्या बिळाकडे परतला.

रात्रभर काय करावे या विचारात त्याचा डोळा म्हणून लागला नाही. पहाटेचा गार-वार सुरु झाल्यावर त्याला एक युक्ति सुचली. टुण् दिशी उडी मारून तो उठून बसला.

पुन्हा संध्याकाळी सर्व जनावरे कोल्ह्याला भेटायला आली. कोल्हा खूष असलेला त्यांना दिसला. म्हणाला–"मित्रहो! उद्या पासून तुम्हांला कसलीच फिकीर करण्याचे कारण नाही. आपल्या महाराजांवर मी एक इंद्रजाल करून त्यांना वैकुंठलोकी वास करण्यास पाठवणार आहे. उद्या सकाळी तुम्ही सर्वजण इकडे या." असे सांगून कोल्ह्याने सर्व जनावरांना निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व जनावरे आल्यावर कोल्हा गेंड्याला म्हणाला–"हे पहा मित्रा! तुझ्यावरच आज कामाची मुख्य जबाबदारी आहे." गेंड्याने होकारार्थी मान हलविली.



सर्व जनावरे आली तेव्हां सिंहाची झोप मोडली.

"विक्रमसिंह महाराज! बंदगी! आम्ही सर्व जनावरे आपल्या दर्शनासाठी आलो आहो." गेंडा म्हणाला.

"इतके दिवस काय केलेत? पूर्वीच यायला हवे होते." सिंह म्हणाला.

कोल्हा पुढे येऊन बंदगी करून म्हणाला–"काय करणार महाराज, आपणाहून शतपटीने पराक्रमी अशा एक द्विपाद प्राण्याने आम्हांला अडविले. आज त्याचा डोळा चुकवून हिंमत करून आम्ही आलो आहो. तो द्विपाद प्राणी इंद्रजाल करून आपला जीव घेणार आहे म्हणाला. त्या द्विपाद प्राण्याने इंद्रजाल करून सर्व केळी कापून तुकडे करून टाकली आहेत. आणि आता तेच इंद्रजाल करून आपले सुद्धा दोन तुकडे करून टाकणार आहे, म्हणे. आपल्याला ही गोष्ट आधीच कळावी म्हणून आम्ही सर्व आलो आहो."

सिंह जोराने खदखदां हंसून म्हणाला–"इंद्रजाल करून केळी कापून टाकणे काही थट्टा वाटली होय? केळचांचे दोन घोस पहा आहेत की नाहीत ते. एक केळे तरी कापलेले आहे का, पाहून घे. पाहिजेतर."



"तो द्विपाद प्राणी महा पराक्रमी आहे. तरी पण पाहू या." असे सांगून माकड झाडावर चढले व दोन तीन केळी तोडून आणून सिंहापुढे ठेवली. सिंहाने एक केळे सोलून पहिले. केळे आतून कापलेले व दोन तुकडे झालेले दिसले. एका मागून एक अशी पुष्कळ केळी सोलून पाहिली. बाहेरून पहावे तर सबंध केळे, पण सोलून पाहावे तर कापलेले. कोल्हा म्हणाला ते खरे ठरले. सिंहाच्या सर्वांगाला घाम सुटला. तरी स्वतःला सावरून म्हणाला–"कोठे आहे तो द्विपाद प्राणी? त्याला ठार केल्याशिवाय मला चैन पडणार नाही."

"महाराज! आपण भिण्याचे काय कारण? तो द्विपाद प्राणी आपल्या वाटेला जाण्याची हिंमत तरी करील का?" कोल्हा म्हणाला.

"तो माझे दोन तुकडे करी पर्यंत मी स्वस्थ बसावे, हाच ना तुझा सल्ला?" सिंहाने रागाने विचारले.

कोल्ह्याने चटकन खाकेतून एक डबी काढली. त्या डबीत तांबड्या रंगाचे एक अंजन होते. ते दाखवून सिंहाला म्हणाला–"विक्रम मृगराज! हे दिव्य दृष्टी देणारे अंजन आहे. हे डोळ्यांत घालूनच तो द्विपाद प्राणी कोठे काय होते हे पाहतो. त्याची नजर चुकवून मी त्याच्याकडून हे चोरून आणले आहे. तुम्ही ते डोळ्यांत घालून तो लबाड कोठे आहे हे पाहून घ्या, म्हणजे त्याला पकडून ठार करणे सोपे जाईल." असे सांगून कोल्ह्याने ती डबी सिंहाला दिली.

ते अंजन डोळ्यात घातल्याबरोबर सिंहाला काही दिसेनासे झाले. तो आंधळा झाला. एका क्षणार्धात गेंड्याने आपले शिंग सिंहाच्या छातीत भोसकून त्याला ठार केले. इतर जनावरांनी पण हातभार लावला.

नंतर सर्व जनावरांनी कोल्ह्याला विचारले–"कोल्होबा! आता हे सर्व उरकले. पण केळ्याची साल काढल्या शिवाय त्याचे दोन तुकडे आतल्या आत कसे काय हो झाले?"

"अरे त्यात काय रे? केळ्यात एक सुई भोसकून ती आंतल्या आत फिरवली की झाले. सुई बाहेर काढून घेतली की सालीवर एक काळी खूण व बारीक भोक दिसते तेवढेच. मात्र आतल्या गराचे दोन तुकडे झालेले असतात. लहान मुलांना देखील हे इंद्रजाल करता सहज येईल आहे." कोल्हा म्हणाला.





# ठीक निवाडा

गौतमी नदीच्या काठी धनगुप्त नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. आपले नाव किती निरर्थक आहे असे त्याला फार वाटे. कारण त्याने आपले नाव सार्थक व्हावे म्हणून पैसे मिळविण्याची पुष्कळ खटपट केली तरी त्याला यश आले नाही. शेवटी त्याला जिवाचा कंटाळा आला व त्याने नदीत उडी मारली.

त्याच वेळी एक गोसावी नदीवर आंघोळ करीत होता त्याने त्याला पाहिले आणि त्याला नदी बाहेर काढून विचारले–"असा जीव द्यायला निघालास, झाले तरी काय?"

धनगुप्तने खरे ते सांगितले. त्या गोसाव्याने त्याला एक ताईत दिला आणि म्हणाला–"हा ताईत तू गळ्यात बांधलास म्हणजे तुझे भाग्य पालटेल. तू लवकरच नावासारखाच श्रीमंत होशील." असे सांगून गोसावी निघून गेला.

त्या गोसाव्याने दिलेल्या ताइताचा प्रभाव म्हणा, किंवा धनगुप्ताच्या मनात नवीन उत्साह व आत्मविश्वास वाढला होता म्हणून म्हणा, त्याने हात घातला त्या कामात त्याला त्या दिवसापासून यश येऊ लागले. त्याने मुठीत माती घेतली तरी ती सोने होऊ लागली, म्हणाना. हळूहळू त्याची गणना गावातल्या श्रीमंत लोकात होऊ लागली. त्याने एका सुंदर मुलीशी लग्न केले व त्याला यथावेळी एक मुलगा झाला. त्याचा व्यापार वाढला. त्याने मोठे शेत विकत घेतले. वाढलेला कामाचा व्याप संभाळण्यासाठी त्याने एका दिवाणाला पण नेमले.

पुढे काही दिवसांनी त्याची बायको एकाएकी वारली. नंतर तो स्वतः आजारी पडला. मुलगा लहान, त्याचा सांभाळ कोण करणार ही चिंता त्याला वाटू लागली.



त्याने गावातल्या चार प्रमुख व्यक्तींना बोलावून त्यांच्या समोर मृत्युपत्र लिहिले. त्यात त्याने या गोष्टी नमूद करून ठेवल्या–

"माझ्या मृत्यूनंतर माझ्या सर्व इस्टेटीचा रक्षक म्हणून माझा दिवाण राहील. तोच माझ्या मुलाचा सांभाळ करील. मुलगा वयात आल्यावर दिवाण माझ्या इस्टेटीपैकी त्याला हवी असेल तेवढी माझ्या मुलाला देऊन बाकी स्वत: साठी ठेवून घेईल."

त्या मृत्युपत्रावर सर्वांनी साक्षी म्हणून सह्या केल्या. दिवाणाला फार आनंद झाला. मृत्युसमयी धन्याला बुद्धिभ्रम झाला म्हणूनच तर त्याने असे मृत्युपत्र लिहिले, असे त्याला वाटले.

मृत्युपत्रावर सही केल्यावर थोड्या वेळाने धनगुप्ताने डोळे मिटले.

धनगुप्ताचा मुलगा वयात येईपर्यंत दिवाणाने त्याला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू दिली नाही.

वयात आल्याबरोबर मुलाने बापाने ठेवलेली इस्टेट द्यायला दिवाणाजवळ विनंती केली.

दिवाणाने मुलाला एक ताईत काढून दिला व म्हणाला–"हा ताईत होता म्हणूनच तुमच्या वडिलांना एवढे मोठे ऐश्वर्य लाभले. वडिलांच्या इस्टेटीतला हा ताईत मी आपल्याला देतो व बाकी इस्टेट मी स्वत: साठी ठेवून घेतो."

धनगुप्ताच्या मुलाला आश्चर्य वाटले. म्हणाला–"म्हणजे, तुम्ही माझ्या वडिलांची सर्व इस्टेट घेणार होय? हा अन्याय आहे?"

"तुमच्या वडिलांनी मृत्युपत्रात तसेच लिहून ठेवले आहे, त्याला आता मी काय करू? मला हवे असेल ते तुम्हाला देऊन बाकी ठेवून घ्यावे असेच मृत्युपत्रात लिहिले आहे, पाहिजेतर मृत्युपत्र वाचून पहा." दिवाण म्हणाला.

धनगुप्ताचा मुलगा मृत्युपत्राचा कागद घेऊन न्यायाधिशाकडे गेला आणि म्हणाला– "हे मृत्युपत्र दाखवून आमचा दिवाण आमची सर्व इस्टेट त्याची आहे असे सांगतो आहे. तरी काय तो न्याय करावा."

न्यायाधिशाने मृत्युपत्र लक्षपूर्वक वाचून पाहिले व दिवाणाला बोलवून म्हणाला– "काय हो, मुलगा आता वयात आला आहे. आपल्या वडिलांची इस्टेट त्याला मिळवून द्यावी असे म्हणत आहे. माझ्या-पर्यंत तक्रार येण्याचे कारणच काय होते? तुम्ही स्वत :च देऊन मोकळे झाला असतात तर भागले नसते का?"

"आपले म्हणणे बरोबर आहे. आमच्या मालकाला इतके मोठे ऐश्वर्य देणारा हा ताईत घे असे मी त्याला म्हटले. उरलेली इस्टेट मी ठेवून घेतो आहे, एवढेच. मला हवे असेल ते मी त्याला द्यावे असे मृत्युपत्रात मालकांनी स्पष्ट लिहून ठेवले आहे." दिवाण म्हणाला.

"त्या ताईताशिवाय बाकी इस्टेट तुला हवी आहे, होय ना?" न्यायाधिशाने विचारले.

"अगदी बरोबर, तेच तर मी म्हटले नाही का?" दिवाण म्हणाला.

"तसे असेल तर तू तो ताईत ठेवून घे आणि सर्व इस्टेट मुलाला देऊन टाक कशी. कारण तुला हवे असेल ते मुलाला दे असेच तर मृत्युपत्रात लिहून ठेवले आहे. तुला हवे असेल ते तू स्वत: जवळ ठेवून घ्यावे असे मृत्युपत्रात कुठे लिहिलेले नाही." न्यायाधीश म्हणाला.

दिवाणाचे तोंड पांढरे फट्ट झाले. त्याने पुन: पुन्हा मृत्युपत्र वाचून पाहिले व न्यायाधीश म्हणाला ते बरोबर असल्याची त्याची खात्री पटली. त्याला धनगुप्ताची सर्व इस्टेट हवी होती. मृत्युपात्रा प्रमाणे तीच धनगुप्ताच्या मुलाला देणे भाग होते. त्यानंतर त्या गावात तोंड दाखविणे देखील त्याला अशक्य झाले.







# कळते नि कळत नाही

मंगळपुरीच्या गादीवर मायावर्मा नांवाचा राजा राज्य करीत असता त्याचा मंत्री अचानक वारला. राजाने नवीन मंत्री नेमला नाही व स्वतःच राजा व स्वतःच मंत्री होऊन राज्यकारभार पाहू लागला. प्रजेच्या सुख दुःखाची काळजी वाहणे राजाचे कर्तव्य आहे हे ओळखून राजा वेष पालटून दोघा अंगरक्षकांबरोबर मधून मधून राज्यात फिरत असे. हे सर्व तो करी, परंतु त्याला समजूतच मुळात नव्हती.

एकदा राजा असाच वेष पालटून हिंडत असता त्याला एका घरात नवराबायकोचे भांडण चालू असलेले ऐकू आले.

"छीः! छीः! हे काय केलेस? तुला हे कळत नाही हे पहिल्यानेच सांगितले असतेस तर मी नसते का केले?" नवरा

"तुम्हांला 'कळते' 'कळते' म्हणता पण माझ्या तान्ह्या मुलाला जेवढे कळते तेवढे देखील तुम्हांला कळत नाही." बायको म्हणाली.

"तोंड बंदकर! तुला काही कळेल तर ना तुझ्या मुलाला कळणार? संधी मिळाली तर या राज्याचा मालक होऊन दाखवीन, एवढे मला कळते,समजलीस काय?" नवरा म्हणाला.

ती गोष्ट कानावर पडताच राजा सरळ घरी आला. दुसऱ्या दिवशी त्याने एक आज्ञा काढली. राज्यात 'कोणी मला कळते' असे म्हणता कामा नये. कोणी "मला कळते!" म्हणेल त्याला सक्त मजुरीची शिक्षा मिळेल असे देखील त्या हुकुमाबरोबर जाहीर करण्यात आले होते.

हा हुकूम निघाल्यामुळे प्रजेवर मोठे संकट आले, प्रत्येकाने 'कळत नाही' 'कळत नाही' याचा जप करून त्याचीच संवय करून घेतली.

त्याच सुमारास त्या राज्यात कोणी दोघे परदेशी आले. कोणाला काही विचारले की 'कळत नाही' 'आम्हाला कळत नाही' असेच उत्तर प्रत्येक जण देतो हे त्यांनी पाहिले. म्हणून त्यांनी एकाला जवळ बोलावून विचारले–"काय हो, काही विचारले तर प्रत्येक 'कळत नाही' 'कळत नाही' असे का उत्तर देतो?

"माहीत नाही हो आम्हांला माहीत नाही, तुम्ही विचारलेत ते आम्हाला कळत नाही हो?" त्याने उत्तर दिले.

"काय पण देश हा? कोणाला काही विचारले तर 'माहीत नाही, आम्हाला कळत नाही' हे एकच एक उत्तर मिळते." असे दोघे परदेशी परस्परांशी बोलत होते.

ते राजा ऐकत होता. तो वेष पालटून त्यावेळी जवळून जात होता. म्हणून राजाने दुसऱ्या दिवशी दुसरा हुकूम काढला.

"कोणी तोंडावाटे 'कळत नाही' 'मला माहीत नाही.' हे शब्द काढता कामा नये. कोणी तसे म्हणताना आढळला की त्याला सक्ती मजुरीची शिक्षा केली जाईल."



दुसरा हुकूम निघाला त्या दिवसापासून 'कळते' किंवा 'कळत नाही' हे शब्दच राज्यात कोठे ऐकू येईनातसे झाले. प्रजेने बोलायचेच बंद केले.

ते परदेशी त्या राज्यात असतानाच हे सर्व झाले. म्हणून त्यांचे काम बिघडलें. शेवटी ते राजाच्या दर्शनासाठी गेले. त्यांनी आपली तक्रार एका पत्रात लिहून कळविली. पत्रातला मजकूर असा होता–

"महाराज! आम्ही परदेशातून आलेले प्रवासी आहो. आपण काढलेल्या निषेधाच्या हुकुमामुळे आम्हांला तोंड उघडणे देखील अशक्य झाले आहे. आम्ही परदेशी असल्या

कारणाने आम्हांला जास्तच कष्ट सहन करावे लागत आहेत. अशा तऱ्हेचा निषेधाचा हुकूम आपण काढळात त्याला कारण पण तसेच काही असणार. ते कारण आपण सांगू शकलात तर आतां जे संकट आमच्यासमोर उभे आहे त्यातून काही वाट काढता येईल."

राजाने त्या दोघांना बोलावून नवरा-बायकोचे भांडण कसे झाले ते त्यांना थोडक्यात सांगितले.

"त्या नवराबायकोचे भांडण कोणत्या संदर्भात झाले हे समजून घेणे आवश्यक आहे." परदेशी म्हणाले.

राजा वेष पालटून त्या दोघांना बरोबर घेऊन ज्या घरी नवरा बायकोचे भांडण झाले होते तेथे गेला आणि नवऱ्याला बाहेर बोलावून म्हणाला—"तू मागे बायकोशी भांडताना साऱ्या राज्याचा मालक कसा होशील हे तुला माहीत आहे असे म्हणाला होतास, ते आठवते का?"

"माझे घरच मला संभाळता येत नाही, मी राज्य काय संभाळणार? बायकोने सैपाक मनासारखा केला नाही तेव्हां तिला रागवतांना मी ते म्हटले होते. एकाद वेळ कधी म्हटले तर ते कबूल, पण कोणी नेहमीच 'मला कळत नाही' म्हटले तर कसे काय चालेल?" नवरा म्हणाला.

"पाहिलेत महाराज! सामान्य प्रजेने जे म्हटले तेच मुख्य मानून काही केले तर त्याचा परिणाम काय होतो तो कळला का आता? तुम्हांला सल्ला देणारे मंत्री नाहीत का?" त्या दोघांनी विचारले.

"जुने मंत्री वारले. नवे मंत्री नेमले नाहीत अद्याप. तुम्ही दोघे माझे मंत्री होऊन मला सल्ला द्याल का? तुम्ही दोघे हुशार व समजूतदार दिसत आहां, म्हणून विचारतो." राजा म्हणाला.

दोघांनी मंत्रीपद स्वीकारले. त्यानंतर राज्यकारभार सुरळीत चालू लागला.





# गाठोडे

कुशीतपुर नांवाच्या गावी नेत्रानंद नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्यात कोठे चोरी, लूटमार, खून किंवा इतर तऱ्हेचे गुन्हे होत नसत. त्याने हुशार व आपापल्या कामात दक्ष असे अधिकारी नेमले होते. विशेष नैपुण्य दाखविणाऱ्या नोकराला राजा बक्षिस वगैरे देऊन प्रोत्साहन देत असे. त्यामुळे गुन्हेगारीला वावच मिळत नसे.

एकदा एक मनुष्य परदेशातून आला. त्याच्या अंगावरचे कपडे मळके व फाटके होते, दाढी वाढलेली होती आणि डोक्यात व अंगावर धूळच धूळ होती. त्याच्या जवळ एक जुन्या कपड्यांचे गाठोडे होते. तो रस्त्यावर भीक मागत येत होता. संध्याकाळी तो एका धर्मशाळेच्या पडवीत ओटीवरच आपले गाठोडे उशाशी ठेवून झोपला.

मध्यरात्रीच्या सुमारास कोणीतरी येऊन त्याच्या डोक्या खालचे गाठोडे अलगद काढून घेतले व त्याच्या जागी दुसरे मळक्या कपड्यांचे गाठोडे ठेवून दिले.

सकाळी झोंप मोडल्यावर त्याचे गाठोडे नाहीसे झाल्याचे त्याला कळले. तो घाबरून गेला आणि सरळ राजवाड्यात जाऊन त्याने राजाकडे आपले गाऱ्हाणे नेले. म्हणाला—"महाराज! या राज्यात चोऱ्या, लूटमार वगैरे होत नाहीत, हे ऐकून जे होते नव्हते ते सर्व घेऊन याच देशात येऊन रहावे या विचाराने मी आलो होतो. रात्री धर्मशाळेत मी झोपलो असता कोणीतरी येऊन माझे गाठोडे उचलून नेले. माझे सर्वस्व त्यातच होते. आपण चवकशी करून माझे गाठोडे मला परत देववावे."

राजाने विचारल्यावर त्या भिकाऱ्याने आपले नाव गाव सांगितले. म्हणाला—"माझे नाव सोमनाथ. मी तोंडमंडलम



गांवचा राहणारा आहे. तेथे माझे सराफीचे दुकान होते. एका आठवडयापूर्वी कोणीतरी दुकानात शिरून माझे सर्वस्व लुटले आणि माझ्या घराला आग लावली. त्यातच माझी मुले व त्यांची आई जळून गेली. मी कसा बसा आपला जीव वांचवून व जे सहजी हाती आले ते घेऊन बाहेर पडलो. फक्त चार हिरे व चार सोन्याच्या विटा माझ्या हाती आल्या. जुन्या कपडयात गुंडाळून त्यांचे एक गाठोडे करून हा भिकाऱ्याचा वेष करून या देशात आलो. पुढील आयुष्य येथेच घालवावे हा माझा विचार होता.

सर्व ऐकून राजा म्हणाला–"या देशात चोऱ्या होतच नाही ही थोडी अतिशयोक्तीच ठरेल. लहान मोठ्या चोऱ्या होतातच. परंतु चोऱ्या लपत नाहीत. म्हणून तुझे गाठोडे कोठे जात नाही, घाबरू नकोस. तुला ते लवकरच मिळेल."

राजाने सोमनाथला आंघोळीला पाणी व अंगात घालायला चांगले कपडे द्यायला सांगितले व त्याच्या राहण्याची व जेवणाची व्यवस्था करून दिली.

राजाज्ञेप्रमाणे सोमनाथच्या स्नाना-दिकाची उत्तम व्यवस्था झाली. जेवणखाण झाल्यावर तो राजाच्या दिवाणखान्यातच झोपला.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर राजाने सोमनाथला बोलावून एक जुन्या कापडात बांधलेले एक गाठोडे दाखविले व "हेच का तुझे गाठोडे" असे त्याला विचारले.

सोमनाथने आपले गाठोडे ओळखले व त्याला पुनर्जन्म मिळाल्यासारखा आनंद झाला. त्याने सांगितल्याप्रमाणे त्या गाठोडयात चार हिरे व सोन्याच्या चार विटा पण होत्या.

"गेलेले धन इतक्या लवकर परत मिळाले हे पाहून डोळयावर विश्वासच बसत नाही. पण चोर सापडला का?" सोमनाथने राजाला विचारले.

"तुझे धन तुला मिळाले ना? चोराला पकडले की नाही याची तुला कशाला फिकीर? ती सर्व फिकीर आम्ही करू. तुझ्या जवळ इतके सोने व हिरे असता आमच्या देशात तू भिकारी म्हणून राहण्याचे कारण नाही. काय करण्याचा विचार आहे तुझा?" राजाने विचारले.

"या गाठोड्यात आहे .तेवढेच आता माझ्याकडे उरले आहे. ते विकून जे पैसे मिळतील त्यावर पुढले आयुष्य हरीचे नाम स्मरण करीत घालवावे असे म्हणतो." सोमनाथ म्हणाला.

"तसे असेल तर एक हिरा मी स्वत:च विकत घ्यावा म्हणतो. काय किंमत आहे, सांग." राजाने विचारले.

"तुम्हीच घेणार असाल तर किंमत कशाला विचारता? एक हिरा माझी एक भेट म्हणून ठेवून घ्या." सोमनाथ म्हणाला.

"फारच छान! पण दुसऱ्याची किंमत काय ती सांग." राजा म्हणाला.

"महाराज! तुम्ही विकतच घ्यायचा असे मनाशी ठरविले असेल तर घ्या.













आपल्याला वाटेल ती किंमत द्या." सोमनाथ म्हणाला.

"त्याची खरी किंमत किती आहे, सांग ना. त्यानंतर मला जे द्यायचे ते मी देईनच." राजा म्हणाला.

"त्याची किंमत शंभर मोहरा आहे, महाराज!" सोमनाथ म्हणाला.

"इतकी कमी? तू सराफी व जव्हेरी आहेस म्हणतोस आणि या हिऱ्याची इतकी कमी किंमत कशी काय सांगतोस?" राजाने विचारले.

"महाराज! आतां मी आपणांपुढे काय बोल? डोळ्यासमोर बायको व मुले जळून गेलों. त्यामुळे मला काही सुचत नाही. तुम्हाला योग्य वाटेल ती किंमत द्या. मी आनंदाने स्वीकारीन." सोमनाथ म्हणाला.

"बरे तर मी जव्हेऱ्याकडून याची काय किंमत होईल ती विचारून घेतो आणि ते सांगतील ती किंमत देतो. माझ्याजवळ दोन हिरे आहेत. त्यांची किंमत पण मी अजून दिली नाही. ते पाहून तूच, त्यांची किंमत तुझ्या मते किती होईल सांग?" असे सांगून दोन हिरे मागवून सोमनाथला दाखवले.

सोमनाथ ते पाहून म्हणाला—"एकेकाची किंमत दोन हजार रुपये होईल."

"एवढीच? हे विकणारा मला म्हणाला की एकेकाची किंमत दहा हजार होईल." असे सांगून राजा ते दोन्ही हिरे सोमनाथा-जवळच ठेवून देऊन निघून गेला.

त्या दिवशी रात्री सुद्धा सोमनाथ दिवाणखान्यात झोपला. तीन प्रहर रात्र उलटल्यावर त्याने गाठोडे उचलले आणि दिवाणखान्याच्या मागच्या बाजूला जाऊन आवाराची भिंत ओलांडून पळून जाऊ लागला. परंतु राजाच्या नोकरांनी त्याला धरले आणि तुरुंगात टाकले.

[illegible]दुसऱ्या दिवशी सोमनाथाला राजासमोर हजर करण्यात आले. त्यावेळी राजाने काही गोष्टी उघडपणे सांगितल्या. म्हणाला—"माझ्या अधिकाऱ्यांच्या डोळ्यात धूळ टाकून माझ्या राज्यात कोणी पाऊल टाकणे शक्य नाही. सोमनाथाने राज्याच्या सर-हद्दीत पाऊल टाकल्यापासून त्याच्यावर अधिकाऱ्यांची सतत नजर होती. निरुपयोगी फाटक्या कपड्यांचे गाठोडे सोमनाथने इतके काळजीपूर्वक बाळगले होते, त्यावरून त्यात काही किमती वस्तू असणार असा संशय धर्मशाळेच्या अधिकाऱ्याला आला व त्यानेच रात्री ते गाठोडे काढून घेऊन त्याच्या जागी दुसरे गाठोडे ठेवले. त्या वेळी, या राज्यात चोरी होत नाही हे समजून सोमनाथ बेफिकीरपणे झोपला होता.

"सोमनाथाच्या डोक्याखालचे गाठोडे धर्मशाळेच्या अधिकाऱ्याने माझ्याकडे पाठ-विले. चोरीस गेलेल्या गाठोड्या विषयी धर्मशाळेत काही चवकशी केल्याशिवाय सोमनाथाने सरळ माझ्याकडे येऊन फिर्याद केली. त्यावरून त्यात काही विशेष असले पाहिजे हे दिसले. कारण त्या गाठोड्यात किमती वस्तू आहेत हे चोरांना किंवा इतर कोणाला कळणे इष्ट नाही असे सोमनाथाला वाटत होते. त्यावरून त्या गाठोड्यात



चोरीचा माल असावा असे अनुमान लावणे सोपे झाले.

"सोमनाथने आपला पूर्वेतिहास निवेदन केला. त्यांतली एक ही गोष्ट खरी असणे शक्य नाही हे स्पष्ट झाले. कारण बायका-मुले जळून गेली, घर जळून गेले, सर्वस्व भस्म झाले असतां फक्त हाती लागलेल्या वस्तू घेऊन लगेच स्वतःचे घरगांव सोडून परदेशी कोणी कसा जाईल? त्याच्या गावा-हून आपले गांव कमीत कमी सात आठ मैलावर तरी आहे.

"जळून गेलेल्या घरांतून स्वतःचा जीव वाचवून बाहेर येणाऱ्याच्या अंगावर










जळल्याचा किंवा पोळल्याचा डाग किंवा वण तरी दिसायला हवा होता. परंतु त्याने स्नान वगैरे केल्यावर देखील त्याच्या अंगावर डाग किंवा वण कोठे दिसला नाही.

"तो जेवायला बसला तेव्हां त्याच्या जेवणाच्या पद्धतीवरून तो श्रीमंत घराण्यात वाढलेला असावा असे मुळीच दिसले नाही. उलट अगदी गरीब स्थितीत वाढलेला असावा असेच दिसले.

"नंतर हिऱ्याची किंमत किती असते हे देखील त्याला माहीत नव्हते. मी त्याला जे हिरे म्हणून साध्या काचेचे हिरे दाखविले त्याची किंमत सुद्धा त्याने दोनदोन हजार मोहरा सांगितली. हिऱ्याचा व्यापार करणाऱ्याला काचेचा हिरा व खरा हिरा यांतिला फरक कळू नये यावरून तो हिऱ्याचा व्यापारी नव्हता हे स्पष्ट झाले.

"या सर्व गोष्टी कळल्यावर सोमनाथ रात्री गाठोडे व मी दिलेले हिरे घेऊन खात्रीने पळून जाईल हें मी ओळखले होते. म्हणून त्याला पकडण्यासाठी उचित व्यवस्था पण करून ठेवली होती. त्याप्रमाणे पाहारेकऱ्यांनी त्याला पकडले."

सोमनाथाविषयी राजाने इतक्या गोष्टी सांगितल्यावर सोमनाथाला आपला गुन्हा कबूल करण्याशिवाय दुसरा मार्गच उरला नाही. तो एक सामान्य मजूर होता. दोन दोन तीन तीन दिवस कोणाकडे तरी नोकरी करीत तो हिंडे. एकदा एका व्यापाऱ्याकडे नोकरी करीत असतां त्याच्याकडून चार हिरे व सोन्याच्या चार विटा त्याने चोरून घेतल्या व त्यादिवशी रात्री धर्मशाळेत येऊन झोपला हे त्याने कबूल केले.

राजाने सोमनाथाला योग्य ती शिक्षा केली व त्याने चोरून आणलेला माल व्यापाऱ्याकडे परत करविला.





# शुद्ध बीजा पोटी

आनंदपुर नावाच्या गावी कांतिवर्मा नावाचा एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला मूलबाळ नव्हते म्हणून तो नेहमी दु:खी असे.

त्या गावी एकदां एक योगी आला. कोणत्याहि गावी तीन दिवसा पेक्षा जास्त कधी तो रहात नसे. जो प्रसाद देई तो घेण्यासाठी लोकांची गर्दी होई. त्या प्रसादात काही तरी महिमा आहे असा लोकांचा विश्वास बसला होता.

कांतिवर्मा त्या योग्याला भेटला व मूलबाळ नसल्याबद्दल आपले दु:ख व्यक्त केले. त्या वेळी योगी दूध पीत होता. दुधाच्या पेल्यांतले थोडे दूध एका द्रोणात ओतून कांतिवर्माला देत म्हणाला–"या द्रोणातले दूध तुझी बायको एकदम एका घोटांत पिईल तर तुझी इच्छा पूर्ण होईल."

कांतिवर्मा दूध घेऊन घरी गेला व बायकोला म्हणाला–"एका घोटांत पिऊन टाक." त्याच्या बायकोने देवाची पूजा करून त्या दुधाचा नैवद्य दाखविला व तीर्थ म्हणून दूध हातावर आपोष्णी सारखे घेऊन दोनदां प्याली व डोळ्याला हात लावून देवाला नमस्कार केला.

देवकृपेने तिला नऊ महिन्यांनी दोन मुली झाल्या. दोघी मुली नक्षत्रा सारख्या सुंदर होत्या. मुली रांगू लागण्याची वेळ झाली तेव्हां त्यांचा एकेक पाय लुळा आहे हे कळले. एक पाय लुळा असल्या कारणाने त्यांना उभे राहून चालता येईना.

कांतिवर्माने अनेक वैद्यांकडून औषधपाणी करविले. परंतु मुलींचा पांगळेपणा कमी झाला नाही. पांगळेपणा कायमचा राहतो की काय ही भीती वाटू लागली. त्यांना कळू लागले होते. आपला पांगळेपणा दिसला

सौ. सरस्वतीबाई सोमण



तर लोक हसतील असे पण त्यांना वाटे. म्हणून त्या घराच्या बाहेर पडत नसत.

परंतु कांतिवर्माने मुलींचे लाड पुरविण्यात काही कमतरता दाखविली नाही.

बरोबर बारा वर्षांनंतर तो योगी पुन्हा त्या गावी आला. कांतिवर्मा त्याच्या दर्शनाला गेला व नमस्कार करून म्हणाला– "योगिराज! आपल्या अनुग्रहाने मला दोन मुली झाल्या. परंतु त्या पांगळ्या आहेत. त्यांचे भविष्य पाहून मनाला वाईट वाटते. आता आपणच त्यांच्यावर कृपा करून त्यांचा पांगळेपणा जाईल असे काही तरी करावे."

योगी काही वेळ डोळे मिटून विचार केल्यावर म्हणाला–"मी सांगितल्याप्रमाणे तुझ्या बायकोने केले नाही. म्हणून हा प्रसंग आला. माझ्याजवळ या केळ्या-शिवाय दुसरे काही नाही." असे म्हणत त्याने केळ्याचा एक लहान तुकडा तोडून तोंडात टाकला व बाकी केळे कांतिवर्माला देत म्हणाला–"हे तू तुला वाटेल तिला देऊन टाक." असें सांगून कांतिवर्माला काही उत्तर द्यायला सवड देऊ न देता योग्याने त्याला निरोप देऊन पाठवून दिले.

कांतिवर्मा ते केळे घेऊन ते कोणत्या मुलीला द्यावे या विषयी विचार करीत घरी निघाला. दोघा मुलींचा एक पाय लंगडा आहे हे माहीत असून योग्याने एकाच मुलीला प्रसाद का दिला? हा प्रसाद खाऊन एकीचा पाय बरा झाला व दुसरीचा तसाच राहाला तर तिला किती वाईट वाटेल? दोघींवर आपले प्रेमसारखे असता आपण एकीलाच प्रसाद देऊन तिचा पाय ठीक करून दिला व दुसरीला पांगळीच सोडून दिले तर आपल्याला आयुष्यभर दुःख सहन करावे लागेल.

असा विचार करीत डोके खाली करून चालत घरी येत असता कांतिवर्माला कोणी रडत असल्याचे ऐकू आले. त्याने डोके वर करून पाहिले. त्याला एका विहिरीवर एक तरुण मुलगी रडत असलेली दिसली. एक तरुण मुलगा तिची समजूत घालीत असलेला दिसला. कांतिवर्मा जवळ येऊन उभा राहलेला पाहून तो तरुण मुलगा म्हणाला–"अहो काका! तुम्ही तरी हिला समजावून सांगा हो! ही विहिरीत जीव द्यायला आली आहे."

"पण असे झालं तरी काय?" कांतिवर्माने विचारले. तो तरुण मुलगा म्हणाला– "हिला लहानपणीच अर्धांग वायु झाला आणि तिचे डावे अंग लुळे झाले. म्हणून तिच्याशी कोणी लग्नाला कसा तयार होणार? पण मी तिच्याशी लग्न करून मी तिला आपल्या घरी घेऊन गेलो.

"मी घरचा श्रीमंत नाही. कामधंदा केल्याशिवाय पोट कसे भरणार. बायकोला चांगले हिंडता फिरता यावे म्हणून मी पुष्कळ औषधोपचार करीत आलो. कामाच्या निमित्ते मला घराबाहेर जावेच लागते.

"आपल्यासाठी नवऱ्याला इतके कष्ट सहन करावे लागतात हे बायकोला पहा-वेना. नवऱ्याने सकाळपासून संध्याकाळ-पर्यंत एवढे कष्ट करावेत व तिने नुसते पडून राहून दोन वेळ खावे हे तिला



आवडेना. म्हणून जीव दिला की नवऱ्याचे कष्ट वांचतील व तो दुसरे लग्न करून घेऊन निदान पुढले आयुष्य सुखाने घालवू शकेल असे तिला वाटले.

"ती हातापायाने चांगली आहे हे माहीत असून देखील मी तिच्याशी लग्न केले. म्हणून स्वतः मेहनत करून तिला सुखी करण्यात मला आनंद वाटतो. तिने असा जीव दिला तर मी देखील जीव देईन. ही गोष्ट तुम्ही तरी तिला नीट समजावून सांगाल का?" तो तरुण म्हणाला.

योग्याने दिलेला प्रसाद त्या मुलीला दिला तर दोघे नवराबायको सुखी होतील असे मनातल्या मनात कांतिवर्माला फार वाटले. त्याने ते केळे तिला दिले व म्हणाला– "मुली! पहिल्याने हे एवढे केळे खा पाहू. नंतर तुला जे सांगायचे ते मी सांगतो."

तिने ते केळे खाल्ले. एकदम तिला सर्वांगांत विजेचा संचार झाल्यासारखे एकदा वाटले. ती एकदम उभी राहाली व कांतिवर्माला हात जोडून नमस्कार केला. तिच्या नवऱ्याला परमानंद झाला.

"तुमच्यावरचे संकट टळले. जा आता घरी सुखाने रहा बाळांनो!" कांतिवर्मा त्यांना आशीर्वाद देऊन म्हणाला आणि आपल्या घरी निघाला. आपल्या एकाच मुलीला बरे करून दुसऱ्या मुलीला लुळी पांगळी राहू दिल्याचे दुःख सहन करण्या-पेक्षां दुसऱ्याच एका पांगळ्या मुलीला सुखी करून एका नवरा बायकोला सुखी केल्याचे सुख शतपटीने मोठे नाहीं का? असा विचार करून त्याने स्वतःचे समाधान करून घेतले.

पण तो घरी येऊन पाहतो तर त्याच्या अकरा वर्षे वयाच्या जुळ्या मुली धावत पुढे आल्या. ते पाहून त्याला जे आश्चर्य वाटले व आनंद झाला तो काय वर्णावा?

शुद्ध बीजा पोटी फळे रसाळ गोमटी.





# कृपणा दुप्पट खर्च

एका गावी सोनदेव नावाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. जवळपास त्याच्या इतका श्रीमंत दुसरा कोणी नव्हता. पण तो स्वभावाने चिक्कू मारवाडी होता.

चिक्कू सोनदेवाला डोळ्याचे दुखणे सुरू झाले. डोके दुखायचे, डोळ्यातून सारखे पाणी व्हायचे आणि सर्वांबरोबर दृष्टी मंद झाल्याचा संशय देखील होता.

शेजारच्या गावी एक उत्तम वैद्य रहात असे. तो जे औषध देई त्याचा गुण पडला नाही असे कधी झालेच नाही. त्याला इतकी प्रसिद्धी होती की दुसरा डाक्टर किंवा वैद्य त्या पंचक्रोशीत पाऊल टाकण्याची हिंमतच करीत नसे.

तो वैद्य रोग्याची प्रकृती पाहून बरोबर औषध देई. श्रीमंताकडून खूप पैसे घेई व गोरगरिबाला फुकट औषध देई. सामान्य स्थितीतला रोगी जे देई ते आनंदाने घेई.

त्या वैद्याचे फक्त नाव कोणी घेतले की, चिक्कू सोनदेवाच्या कपाळाला आठ्या पडत. कारण, एकदा त्याने याच्याकडून औषध घेतले होते व त्याबद्दल शंभर रुपये त्या वैद्याने घेतले होते.

आता डोळ्याच्या आजाराचा इलाज करावयाचा म्हणजे त्याच वैद्याकडे जाणे भाग होते. कारण दहावीस मैलात दुसरा कोणी योग्य वैद्य नव्हता. बरे, या वैद्या-कडून इलाज करवायचा तर पैसे मोजावे लागणार.

म्हणून सोनदेवाने गरीबीचे सोंग पांघरून त्या वैद्याकडूनच इलाज करविण्याचे ठर-विले. एक फाटके धोतर नेसून व फाटकाच रुमाल डोक्याला गुंडाळून दोन आणे एका पानावर ठेवून वैद्याकडे गेला आणि त्याच्या त्या अवताराला शोभेलशा गावंढळ भाषेत बोलत त्याने आपल्या डोळ्याच्या दुखण्याचे



वर्णन वैद्यासमोर केले,–"गरिबावर दया करा व हे डोळे बरे होतील असे चांगले औषध द्या."

"तुझा आजार बरा होईल. घाबरू नकोस. मी सांगतो ते कर. चार मुळे घेऊन ये व त्याच्या चकत्या करून त्यांना मीठ लाव. त्यांना पाणी सुटेल. त्या पाण्यात हिंग घालून ते पाणी पिऊन टाक. नंतर त्या चकत्या वाळत टाकून रात्री त्या खा. असे पुरे चाळीस दिवस कर. तुझा आजार चांगला बरा होईल," वैद्य म्हणाला.

सोनदेव घरी परत आला, वैद्याने सांगितल्याप्रमाणे त्याने पुरे चाळीस दिवस ते औषध केले. परंतु त्याला तो इलाज नकोसा वाटू लागला. मुळ्यांचा वास, त्यांत हिंगाचा उग्र वास. चाळीस दिवस ते पाणी पिऊन व मुळ्यांच्या चकत्या खाऊन तो वैतागून गेला. आजार बरा झाला खरा, पण तोंडाला चव म्हणून राहाली नाही. म्हणून डोळे बरे होताच सोनदेव सकाळ संध्याकाळ लाडू, जिलब्या व शेव चकल्या आणि बोंडे व भजी खाऊ लागला. त्यामुळे सोनदेवाला ढेकरा येत, पोट दुखे, खूप तहान लागे आणि भूक लागेनाशी झाली. म्हणून पुन्हा वैद्याकडे जावे लागले.

सोनदेव पुन्हा तसाच गरिबीचे सोंग पांघरून पानावर दोन आणे ठेवून वैद्याकडे गेला आणि डोळ्याचा आजार बरा झाल्याचे सांगून म्हणाला–"आता हा एक नवा आजार झाला आहे. गरिबाला वांचवा. देव तुम्हांला सुखी करील."

वैद्याने सोनदेवाची नाडी पाहून विचारले–"अजीर्ण होईपर्यंत कोणी खायला सांगितले तुला? तू काय खाऊन हा नवा रोग स्वत:वर ओढून घेतला आहेस. त्या बेताचेच औषध द्यावे लागणार."

"काही नाही हो, लाडू व जिलब्या खाल्ल्या होत्या." सोनदेव म्हणाला.

"इतके अजीर्ण व्हायला खूप लाडू खाल्ले असणार! तुला रे कोठून इतके लाडू व जिलब्या खायला मिळाल्या?" वैद्याने विचारले.

विषय बदलण्याच्या हेतूने सोनदेव म्हणाला–"वैद्यबुवा! पोट फार दुखते आहे हो! लवकर औषध द्या. जाऊं द्या गरिबाला. घरी जाऊन पडून रहावे म्हणतो."

"तुला इतके लाडू व जिलब्या खायला घालणारा कोणी श्रीमंत असला पाहिजे. तो कोण हे कळल्या शिवाय मी औषध देणार नाही. तुला खायला घालून आजारी पाडणारा औषधाचा खर्च देऊ शकणार नाहीं का?" वैद्य रागाने म्हणाला.

"सोनदेवच होते. त्यांच्या पदरी मी काम करीत होतो. पुष्कळ दिवसांनी भेटायला म्हणून गेलो होतो. समोर लाडू आणि जिलब्या आणून ठेवल्या. स्वत:ला आवरू शकलो नाही आणि खाल्ले समोर ठेवले होते ते सारे." सोनदेव म्हणाला.

"मग झाले तर. पन्नास रुपये औषधाला मागितले आहेत म्हणून जाऊन सांग. तू येईपर्यंत औषध तयार करून ठेवतो." वैद्य म्हणाला.

"ते बरोबर नाही. त्यांनी खायला लाडू घातले आणि मी आधाशासारखे खाऊन



आजारी पडलो. त्यांनी केलेल्या उपकाराची फेड करण्या ऐवजी औषध पाण्यासाठी पैसे द्यायला सांगू का त्यांना? छे, छे! ते नाही, माझ्याकडून होणार." सोनदेव म्हणाला.

"तुझ्याकडून होणार नसेल तर मी जाऊन मागून घेईन. मला आत्तां सोन-देवाकडे जायचे पण आहे." असे सांगून वैद्याने कसली तरी पुडी सोनदेवाच्या तोंडात घातली व पाणी प्यायला सांगून "रोग बरा होईल, आता गेलास तरी चालेल." असे म्हणाला.

सोनदेवाचे तोंड एकदम भाजल्यासारखे झाले. डोळे बाहेर येतात की काय असे

वाटले. कानशिला उड्या मारू लागल्या. कानाला ऐकू येईनासे झाले. घाई घाईने आडवाटेने घरी निघाला. पण त्याला चालवेना. एका झाडाखाली अंमळ विश्रांती घेण्यासाठी पडून राहाला. पोळलेल्या जिभेला हळूहळू फुंकर घालू लागला.

तिकडे वैद्य हमरस्त्याने सोनदेवाच्या घरीं गेला. सोनदेव कोठेतरी बाहेर गेला असल्याचे घरच्या लोकांनी सांगितले. लवकरच परत येईल असा विचार करून वैद्य त्याची वाट पहात ओटीवर बसून राहाला.

काही वेळाने सोनदेव कसाबसा घरी येऊन पोचला. स्वत: त्याच्या आधी पोचावे म्हणून निघाला होता, परंतु वैद्यालाच आधी पोचलेला पाहून ओशाळल्यासारखे तोंड करून म्हणाला–"ओहो! तुम्ही इकडे कसे काय आलात?" आणि मोठ्या कष्टाने खुर्चीत अंग टाकले.

वैद्य म्हणाला–"या खेपेस मी तुम्हांला पाहिले तेव्हांच मला संशय आला होता. कारण तुम्हांला या खेपेस जो आजार झाला होता तो मेहनत मजुरी करणाऱ्या गरिबांस होत नसतो. बैठकीत बसून दोन वेळ पुक्खा झोडणारालाच होतो. तुम्ही डोळ्याच्या आजारासाठी म्हणून आलात तेव्हां मी तुम्हांला खरोखरीच गरीब समजून गरिबांना साजेलसे औषध दिले होते. त्या औषधात चव न ढव. पण तुमच्यासारख्यांना एकाहून एक रुचकर औषधे–पेये, लेह्ये, चाटणे वगैरे नाहीत का? या अजीर्णाला-सुद्धा चांगली औषधे आहेत. पैशाकडे पाहू नका. देवादिकांना मिळणार नाहीत अशी औषधे आहेत. गोड रोगाला गोड रुचकर औषधेच लागतात."

वैद्याने सोनदेवाला चांगले औषध देऊन त्याच्याकडून जरूर तेवढे पैसे वसूल केले.







# गाईचा पाडा

एका गावी दयानिधी नांवाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याच्याकडे शेती-बेताचीच होती व एकच एक गाय होती.

ऐन उन्हाळ्यात दुपारच्या वेळी एक जण दयानिधीच्या घरासमोर उभा राहून म्हणाला–"पाणी प्यायला हवे आहे. द्याल का?"

दयानिधीने घरात जाऊन पेलाभर ताक आणून त्याला प्यायला दिले आणि ऊन उतरे पर्यंत विश्रांती घेऊन पुढे जा असे त्या वाटसरूला म्हणाला.

नंतर दोघे इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत काही वेळ बसले. बोलत असता दयानिधीची घरची स्थिती अगदी बेताची आहे हे त्या वाटसरूला कळले.

दयानिधी त्याला म्हणाला–"आमची गाय एका महिन्याने विईल. चांगली किंमत मिळाली तर विकून टाकावी म्हणतो.

त्या वाटसरूने गाय पाहिली व म्हणाला–"तुमची गाय चांगल्या जातीची दिसते आहे. अशी विकून नका टाकू. अशी सुलक्षणी गाय दारात असल्यावर तुम्हाला काय कमी? माझ्या मते विकू नका."

दयानिधीला त्या वाटसरूचा सल्ला पटला व त्याने गाय विकून टाकण्याचा विचार सोडला. एका महिन्याने गाय व्यायली. गाईला एक पाडा झाला. काही दिवसांनी ती गाय आजारी पडून मेली. तरी गाईला विकले नाही या बद्दल दयानिधी पश्चाताप करीत बसला नाही. वासराची काळजीपूर्वक जोपासना करू लागला.

एकदा दयानिधी घरात नसता पाडा दावे तोडून आनंदात नाचत बागडत संध्याकाळच्या सुमारास गावालगतच्या रानात शिरला. त्याला परत घरी कसे जायचे हे कळेना. आदल्या दिवशी रात्री राजवाड्यात

सौ. कमलाबाई सोनार

चोरी झाली. चोर चोरीचा माल घेऊन दिवसभर कोठे तरी लपून बसला होता. पाडा हरवला त्या दिवशी त्या रानात तो चोर आला. माल खांद्यावर घेऊन ओझे उचलून पळून जाणें त्याला अशक्य झाले.

त्याच वेळी त्याला दयानिधीचा पाडा समोर दिसला. त्याने चोरी करून आण-लेल्या मालाचे ओझे पाड्याच्या पाठीवर बांधले. नंतर दावे धरून पाड्याला ओढू लागला. पाडा मोठ मोठ्याने हंबरू लागला.

तिकडे दयानिधी परत आला तेव्हां पाडा दावे तोडून पळून गेल्याचे त्याला कळले. म्हणून त्याच्या शोधार्थ तो आपल्या दोघा-तिघां शेजाऱ्यांना घेऊन व कंदील घेऊन निघाला. पाडा हंबरू लागला त्याच सुमारास दयानिधी व त्याचे मित्र रानाच्या कडेला येऊन पोचले. दयानिधीने पाड्याचा आवाज ओळखला व मोठ्याने ओरडला– “तिकडे आहेस का? आलो.”

चोराने तो आवाज ऐकला व दुरून तीन चार दिवे पाहिले. म्हणून तो पाड्याच्या पाठीवरचा माल सोडून उचलून नेण्याचा विचार सोडून पळून गेला.

दयानिधी व त्याचे साथी पाडा उभा होता तेथे आले. त्याच्या पाठीवर कोणीतरी काही तरी बांधले आहे हे पाहिले व त्यांना आश्चर्य पण वाटले. पण त्यांनी काय आहे ते तेथे पाहिले नाही. पाड्याला घरी घेऊन आल्यावर त्यांनी पाठीवरचे ओझे सोडून पाहिले तर त्यांत राजाच्या घरात शोभतील अशा वस्तू होत्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी दयानिधीने त्या सर्व वस्तू नेऊन राजाकडे पोचत्या केल्या व त्या त्याला कशा मिळाल्या हे सांगितले. राजाने खूष होऊन त्याला व त्याच्या साथी शेजाऱ्यांना इनाम दिले आणि वासराच्या चाऱ्यासाठी चार एकर जमीन दयानिधीच्या नावे लिहून दिली.








कृष्णाने आरंभिलेला यज्ञ संपला. सहस्त्रावधी ब्राह्मणांना दानधर्म करण्यात आला. कृष्णाने अर्जुन, सात्यकी वगैरे पन्नास जणांना आपल्या पंक्तीला जेवायला बसविले आणि त्यांना मोठी मेजवानी दिली. नंतर सर्व सभागृहात जमा झाले. गप्पागोष्टी चालू असता अर्जुन म्हणाला– “कृष्णा! आम्हांला ब्राह्मणाची मुले कशी गेली? कोणी त्यांना उचलून नेले आणि कोठे लपवून ठेवले, हे नाही कळले.”

“या सर्व सृष्टीला मूळ कारण असा जो परमेश्वर त्याला मला भेटावयाचे होते. ब्राह्मणाचे काम आहे तेव्हां मी दुर्लक्ष करणार नाही असे वाटून त्याने माया करून ब्राह्मणाच्या मुलांना अदृश्य केले. त्याची इच्छा पुरी व्हावी म्हणून मला समुद्राचे दोन भाग पाडून आणि डोंगर ओलांडून पलीकडे जावे लागले.” कृष्ण म्हणाला.

नंतर अर्जुन हस्तिनापुरीला परतला. धर्मराजाला त्याने द्वारकापुरीला घडलेले सर्व वृत्त सांगितले. ते ऐकून धर्मराजाला फार आनंद झाला.

एकदां रुक्मिणी कृष्णाला एकांतात बसून बोलत असता म्हणाली–“मला प्रद्युम्न वगैरे रूपवान व पराक्रमी मुले झाली. परंतु संतान प्राप्तीची इच्छा अजून पूर्ण झाली नाही. आणखी एक मुलागा व्हावा असे वाटते.”

कृष्ण म्हणाला–“ठीक! शंकराला प्रसन्न करून तुला आणखी एक मुलगा व्हावा

## २२. कृष्णाची कैलास यात्रा



अशी प्रार्थना करतो. तपश्चर्या केल्याने इच्छिलेले अवश्य मिळते. मी हिमालय पर्वत चढून शंकराच्या दर्शनाला जातो. वाटेत बदरी वनात जाऊन तेथील ऋषी मुनींना पण सहजी भेटता येईल. तरमग मी कैलासयात्रेला निघतो."

दुसऱ्या दिवशी सकाळी कृष्णाने राज्यसभा बोलाविली आणि बलराम, सात्यकी, उग्रसेन, कृतवर्मा, उद्धव व इतर प्रमुख यादवांना बोलावणे पाठविले. थोड्या वेळाने सर्व सभेला हजर झाले. कृष्ण सर्वांना संबोधन करून म्हणाला–

"मी माझ्या सर्व शत्रूंचा संहार केला. परंतु अजून एक शत्रू उरला आहे. तो सामान्य शत्रू नव्हे. महा पराक्रमी व शूर आहे. त्याचे नाव पौंड्र असे आहे. त्याला माझा फार हेवा वाटतो. त्याचे थोडे भय वाटते. त्याला ठार केल्या शिवाय मी सर्व शत्रूंना जिंकले असे म्हणता येणार नाही. मला आतां कैलास यात्रेला जावे लागत आहे. मी गेल्या बरोबर पौंड्र आपल्या राज्यावर चालून येईल. सर्व पृथ्वीवरच्या यादवांचा संहार करावा असे त्याच्या मनात आहे. म्हणून मी येईपर्यंत तुम्ही सर्वांनी डोळयात तेल घालून आपल्या राज्याचे रक्षण केले पाहिजे. नगराच्या सर्व द्वारांचे उत्तम प्रकारे रक्षण करा. परवानगी शिवाय कोणाला आत येऊ देऊ नका किंवा बाहेर जाऊ देऊ नका. आपले चतुरंग सैन्य सतत सुसज्ज ठेवा. शस्त्रास्त्रे तयार ठेवा. सर्व बाजूला लक्ष ठेवून नगराचे रक्षण करा."

नंतर सात्यकीला जवळ बोलावून कृष्ण म्हणाला–"या नगराच्या रक्षणाचा मुख्य भार मी तुझ्यावर टाकीत आहे. यादवांचे सर्व ऐश्वर्य व वैभव मी तुझ्यावर सोडून जात आहे.



"कृष्णा, तुझी आज्ञा व बलरामासारखा पाठिराखा असल्यावर मी करू शकणार नाही असे काय आहे. पौंड्रच काय, स्वतः इंद्रदेखील अष्ट दिक्पालकांना बरोबर घेऊन युद्धाला आला तरी मी त्याची फिकीर करणार नाही." सात्यकी म्हणाला.

कृष्ण उद्धवाला जवळ बोलावून म्हणाला– "गुरुवर्य, सख्या मित्रवर्या! बृहस्पतितुल्य तुझी बुद्धि, मी तुला काय समजावून सांगणार? तू पराक्रमी यादव वीरांचे मार्गदर्शन कर." अशा तऱ्हेने कृष्णाने एका मागून एक बलराम, उग्रसेन वगैरे यादव वीरांना जवळ बोलावून सर्वांनी एक जुटीने राहून कोणी काय करावे हे समजावून सांगितले. नंतर गरुडाचे स्मरण करतांच गरुड हजर झाला. त्याच्यावर बसून म्हणाला–"मला कैलास लोकी शंकराच्या दर्शनाला जावयाचे आहे, घेऊन चल." गरुड आकाशात उडाला आणि ईशान्य दिशेला जाऊ लागला.

काही वेळाने बदरीवन आकाशातून दिसू लागले. कृष्णाने सांगितल्यावर गरुड बदरीवनात उतरला. तेथील ऋषी व मुनी कृष्णाला पाहून त्याला सामोरे गेले. त्या दिवशी कृष्णाने त्यांचे आतिथ्य स्वीकारले.



रात्री कृष्ण बदरीवनातच झोपला. दोन प्रहर रात्र उलटल्यावर कृष्णाला वाटले की उघड्या हवेवर फिरून यावे. म्हणून तो बराच वेळ हिंडला फिरला. एका रम्य जागी थांबून स्वस्तिकासन करून बसला. क्षणार्धात तो समाधी धरून योगमुद्रेत मग्न झाला.

त्याच वेळी सहस्त्रावधी भुते जनावरांना हाकलीत त्या बाजूला आली. घंटाकर्ण नांवाचा पिशाचाधिपती त्यांचा नायक होता. त्याच्या बरोबर त्याचा धाकटा भाऊ पण आला होता. कृष्ण समाधीस्थ बसला होता त्या जागी ती भुते आली



व कृष्णाला विचारू लागली–"कोण रे बुवा तू? दिसायला इतका सुंदर, या जंगलात या वेळी कसा काय आला आहेस?"

कृष्ण म्हणाला–"मी यादव वंशी एक क्षत्रीय आहे. दुष्टांचा संहार करणे व सज्जनांचे रक्षण करणे हे माझे काम आहे. कैलासपती श्री शंकराच्या दर्शनासाठी जात आहे. तुम्ही कोण? येथे ऋषी व मुनी राहतात. या बदरीवनात जीवहिंसा करता कामा नये. तुम्ही शिकार करण्यासाठी इकडे आला असाल तर ते मला खपायचे नाही."

घंटाकर्ण म्हणाला–"माझे नाव घंटाकर्ण. हा माझा धाकटा भाऊ. मी विष्णूचा भक्त आहे. हे सर्व माझे सैन्य आहे. मी कुबेराचा सेवक आहे. विष्णूच्या पूजेसाठीच आम्ही शिकार करतो. म्हणून या शिकारीला जीवहिंसा म्हणता येणार नाही. आणखी एक गोष्ट सांगतो. वसुदेवाचा मुलगा द्वारकाधीश आहे ना, त्यालाच मी आपले इष्ट दैवत मानतो. त्याच्या दर्शनासाठीच मी ससैन्य निघालो आहे."

नंतर तो कृष्णाजवळच आतडी पसरून खाली बसला आणि हात जोडून आपल्या इष्ट दैवताचे ध्यान करू लागला. त्याचे ते ध्यान पाहून कृष्णाला फार आनंद झाला व आश्चर्य पण वाटले. हा आपला भक्त आहे आणि करतो आहे ती सर्व कामे भूत पिशाच्चांना शोभतील अशी आहेत. ध्यान धरून बसलेल्या घंटाकर्णाच्या ज्ञान चक्षूसमोर आपले रूप यावे अशी योगमाया कृष्णाने केली. त्याने डोळे उघडून पाहिले. त्याला ध्यानमग्न असतांना ज्याचे दर्शन घडले त्यालाच प्रत्यक्ष समोर पाहून तो आनंदातिरेकाने एकदम उठून उभा राहिला आणि त्याच आनंदात नाचू लागला. नाचत असता त्याच्या तोंडून हे शब्द येत होते–



"कृष्णाचे दर्शन घडले, विष्णूचे दर्शन घडले. नंतर त्याने अनेक प्रकारे कृष्णाचे स्तोत्र गान केले. नंतर त्याने त्याच्या त्रिशूळाला अडकवून ठेवलेले प्रेत काढले व आपल्या सुऱ्याने त्याचे दोन तुकडे करून म्हणाला–"हे एक पवित्र ब्राह्मणाचे प्रेत आहे. भक्तिपूर्वक अर्पण करीत आहे, स्वीकार कर."

ते पाहून कृष्णाला घृणा वाटली. तो घंटाकर्णाला म्हणाला–"हे पहा! माझ्या सारख्यांनी प्रेताला हात लावणे देखील बरोबर नाही. असली पूजा मला मुळीच आवडत नाही. सामान्य भूत पिशाच्चांना शोभणारी कामे तुझ्या सारख्या माझ्या थोर भक्तांना शोभत नाहीत. तू सदा माझे ध्यान करीत आलास म्हणून मी तुला परम लोकाची प्राप्ती देतो." असे म्हणत कृष्णाने घंटाकर्णाच्या देहाला स्पर्श केला. कृष्णाचा स्पर्श होताच, लोखंडाला पारस-दगडाचा स्पर्श होत जसे त्याचे सोने होते तसा घंटाकर्णाचे भयंकर रूप नाहीसे होऊन त्या जागी एक देवरूप दिसले.

थोड्या वेळाने रात्र संपली. सूर्योदय झाला कृष्णाने गंगास्नान केले. बदरीवनांतील मुनींना नमस्कार करून त्यांचा निरोप घेतला आणि गरुडवाहनावर बसून कैलास पर्वताच्या दिशेने प्रयाण केले. कैलास पर्वतावर कृष्णाने गुहा पाहिल्या. शंकराने आपल्या हाताने जी जी वस्तू निर्माण करून ठेवली होती, ती प्रत्येक वस्तू पाहून त्याला आनंद झाला.

तो मानस सरोवराच्या उत्तर तीरावर उतरला. तेथील ऋषी मुनीना भेटून त्याने तेथेच बारा वर्षे तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. फाल्गुन महिन्याच्या प्रारंभी दीक्षा घेऊन, फक्त कंदमुळे खाऊन बारावर्षे तपश्चर्या केली. बारा वर्षे पूर्ण झाल्यावर इंद्र इतर देवांसह कृष्णाच्या दर्शनाला आला. कोणत्या उद्देश्याने कृष्णाने ती तपश्चर्या केली हे त्याला कळले नाही.

दुसऱ्या दिवशी वृषभवाहनावर बसून पार्वतीसह शंकर तेथे आला. त्याच्या पाठोपाठ पुष्पक विमानांत बसून कुबेर आणि आपापल्यावर वाहनांवर बसून गणेश व षण्मुख कुमारस्वामी आले त्यांच्यापुढे आपापले शस्त्रास्त्र धारण करून नंदी, भृंगी, महाकाळ व भूतगण आले ते सर्व गात व नृत्य करीत येत होते

कृष्णाला दुरून पाहूनच शंकर पार्वती वृषभ वाहनावरून खाली उतरले. कृष्ण सुद्धा शंकराला पाहून उठला व पुढे येऊन श्रद्धा पूर्वक नमस्कार करून समोर उभा राहिला. तेथे आलेल्या सर्व देवादिकांना अनायासे शिवकेशवांचे एकत्र दर्शन घडल्याचा पुण्य लाभ झाला.

कृष्णाने शंकरासमोर साष्टांग नमस्कार केला व त्याचे स्तोत्रगान केले. शंकराला परमानंद झाला. तो कृष्णाचा हात आपल्या हातात घेऊन म्हणाला–

"कृष्णा, या पूर्वीच तू तपश्चर्या करून एक वर प्राप्त केला आहेस व तुला पुत्र प्राप्ती झाली आहे. मी पूर्वी त्रेतायुगात शतशतं वर्षे एक संकल्प करून निष्ठापूर्वक तपश्चर्या केली होती. तेव्हां माझ्या सेवेला हिमालय







पर्वताने माझ्या बरोबर आलेल्या आपल्या मुलीला व तिच्या सखींना नेमले होते. मी देखील हिमालय पर्वताचा मान राखण्यासाठी त्यांची सेवा स्वीकारली. तेव्हां आम्ही दोघांनी प्रेमबद्ध व्हावे म्हणून इंद्राने कामदेवाला प्रोत्साहन दिले. मी समाधीस्थ असता, कामदेवाने माझ्यावर नेम धरला व समाधी सुटायच्या आधी माझ्या छातीवर मोहनास्त्र सोडले. माझ्या मनात त्यामुळे विकार झाला व मी त्याच वेळी डोळे उघडून पार्वतीकडे पाहिले. तिचा सर्व देह आनंदाने ओसंडून येत असलेला मला भासला. आपले चित्त असे चंचल कसे बरे झाले. मला कळेना. मी चारी बाजूला पाहिले. त्यावेळी मला कामदेव, माझ्यावर पुष्पबाण सोडण्यास सज्ज असलेला दिसला. अशा दुष्टाचा नाश कां करू नये, मनात येण्याची खोटी, माझा भाल नेत्र उघडला आणि त्यांतून अग्नि ज्वाळा येऊन कामदेवाकडे धांवू लागल्या. 'कामदेवावर राग दाखवू नये' असा आकाशातून देवादिक ओरडून सांगत असता अग्नि ज्वाळांनी कामदेवाला भस्म करून टाकले. नंतर ब्रह्मादिक देवांनी येऊन त्रिलोकाच्या हितासाठीच कामदेवाने हे धाडस केले होते, असे निवेदन केल्यावर ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून कामदेवाला तुझ्या पोटी जन्म घेण्यास परवानगी दिली. तोच प्रद्युम्न रूपे रुक्मिणीच्या पोटी तुझा प्रथम पुत्र होऊन जन्मला. तू आतां जी तपश्चर्या करीत आहेस त्याचे फळ तुला या पूर्वीच लाभले आहे.

नंतर शंकराने तेथे हजर असलेल्या सर्व ऋषी व मुनींना संबोधन करून कृष्ण हाच स्वत: नारायणाचा अवतार असल्याचे सांगितले आणि पार्वती, गणपती आदिकासह अंतर्धान पावला. कृष्ण देखील बदरीवनांत परत आला.







# अरण्यपुराण

[ २५ ]

मौवली जवळ येऊ न शकल्यामुळे श्वेतनाग मोठ्याने ओरडून म्हणाला—"ते मरण आहे, मरण!" आणि पुतळ्यांच्या चहू बाजूला वेटोळे करून बसला.

परत आपल्या अरण्यात सुखरूप परत येऊन पोचल्याबद्दल काबाला व मौवलीला पुनर्जन्म मिळाल्यासारखा आनंद झाला. उजाडल्यावर सूर्य प्रकाशात चकाकणारा अंकुशावरचा तांबडा खडा पाहून मौवली स्वत:शीच त्याचे कौतुक करू लागला. म्हणाला—"हा तर काळ्या वाघाच्या डोळ्यांहून जास्त चकाकतो आहे. पण तो लबाड नाग 'मृत्यू' 'मृत्यू' असे कां बरे ओरडत होता?"

"तू त्याला सुऱ्याने ठार केले नाहीस हाच विचार माझ्या मनात घोळत होता! चल आपण, शिकारीला जाऊ या. येतोस का?" काबाने विचारले.

"नाही, हा अंकुश काळ्या वाघाला दाखवला पाहिजे व नंतर शिकारीचे पाहू!" असे म्हणत मौवली पळत निघाला. मधून मधून वाकून तो आपल्या हातातला अंकुश पहात होता. तो येऊन पोचला त्यावेळी काळा वाघ पोटभर खाऊन व पाणी पीत असलेला दिसला. मौवलीने जे जे घडले वर्णन करून सांगितले. काळा वाघ सर्व शांतपणे ऐकत होता. पण श्वेत नागाने शेवटी जे सांगितले ते बरोबर आहे असे तो म्हणाला तेव्हां मौवलीने त्याला विचारले—"तरमग श्वेतनाग म्हणाला ते सर्व खरे आहे म्हणतोस?"

"अरे धाकल्या! मी उदयपूरच्या राजाच्या पिंजऱ्यात पडलो होतो. मनुष्य जातीचा स्वभाव मी चांगला ओळखतो. त्या तांबड्या दगडासाठी एका रात्रीत



तीन तीन जणांना ठार करणारे कित्येक सापडतील."

"मनुष्याची जात ठार करण्यात पटाईत आहे, हे मी सुद्धा पाहिलेले आहे. पण हा तांबडा दगड खायला उपयोगी पडत नाही. मग याच्यासाठी एवढे हत्याकांड कशाला?" मौवलीने आश्चर्य करीत विचारले.

"मौवली, जा, तू जाऊन झोप काढ. मनुष्यच ना तू. पण काय उपयोग?" काळा वाघ झोपण्याच्या तयारीत म्हणाला.

या वस्तूचा काय रे उपयोग, सांग ना!" मौवली काळ्या वाघाला म्हणाला.

"मनुष्य हत्तीच्या गंडस्थळावर हे मारून त्यातून रक्त काढण्यासाठी याचा उपयोग करतो. नखे, शिंगे किंवा अणकुचीदार दात नसलेला मनुष्य हेच काय याच्याहून जास्त भयंकर वस्तू तयार करतो." काळा वाघ म्हणाला.

"छी:! छी:! मनष्य जातीतल्या प्रत्येकाला रक्तपात करणेच काय ते सुचते. हे मला पूर्वी माहीत असते तर मी ही वस्तु घेऊन आलोच नसतो." असे म्हणत मौवलीने अंकुश दूर फेकून दिला. तो दूर तीस चाळीस हातावर जाऊन पडला. मौवली गवतावर पडलेल्या दवाच्या पाण्याने हात धुवीत म्हणाला—"सुटलो, त्या कुलक्षणी वस्तुच्या तावडीतून. तो लबाड नाग 'तू मरशील' म्हणाला."

"रात्रभर शिकार करून दिवसभर गप्पा मारत राहणे मला नाही जमणार. मी झोपतो आता!" काळा वाघ म्हणाला.

मौवलीने एक चांगलेसे झाड पाहिले व त्यावर चढून वेलांचा जणु एक पाळणा करून त्यात आडवा झाला त्याला त्या तांबड्या दगडाचे स्वप्न पडले. झोप मोडली तेव्हां चहूकडे घनदाट काळोख पडला होता. माकडे झाडावर बसून गलका करीत होती.

ती वस्तु एकदा पाहून येऊ या, असा विचार करून मौवली खाली उतरला. काळ्या वाघाची झोप केव्हांच मोडली होती व तो आपली भूक शांत करण्याच्या खटपटीत होता. "ती विचित्र वस्तू काय झाली रे?" मौवलीने विचारले.

"कोणीतरी मनुष्य उचलून घेऊन गेला. ह्या पहा त्याच्या पावलांच्या खुणा." काळा वाघ म्हणाला.

"तो लबाड नाग म्हणाला ते खरे असेल तर तो मनुष्य मरणार. आपण पावलांच्या अनुरोधाने चल त्याचा माग काढीत जाऊ." मौवली म्हणाला.

पहिल्याने पोटभर खाऊन घेऊ, ये." काळा वाघ म्हणाला.

त्यांना लवकरच एक शिकार सांपडली. दोघांनी पोटभर खाऊन घेतले व ओढ्याचे पाणी पिऊन पावलांच्या खुणा पहात त्या माणसाच्या शोधार्थ दोघे निघाले. ह्या पावलांच्या खुणावरून त्यांना कळले की तो मनुष्य काही अंतर हळू हळू गेला व नंतर धावत पळत जात एकदम बाजूला वळला. पावलांच्या खुणा जेथवर गेल्या होत्या तेथवर आणखी एकाच्या पावलांच्या खुणा येऊन पोचलेल्या दिसल्या. ती



पावले लहान होती व बोटे खोल जमिनीत रुतलेली होती. ती पावले शिकाऱ्याची असावीत असे मौवलीला वाटले. मौवली लहान पावलांच्या खुणांमागून व काळा वाघ मोठ्या पावलांच्या खुणांमागून जाऊ लागला. त्यांना त्यां पावलांवरून जे जे कळले ते ओरडून आपल्या साथ्याला सांगत गेले.

शेवटी दोन्ही खुणा एक झाल्या. तेथे एका गावकऱ्याचे प्रेत पडलेले होते. त्याच्या छातीला लागलेला शिकाऱ्याचा बाण दिसत होता. "एक जण मेला. पण ती वस्तू कोठे आहे?" मौवलीने विचारले.

       

"शिकारी घेऊन गेला." म्हणत काळा वाघ लहान पावलां मागोमाग जाऊ लागला. एका गुहेच्या तोंडापासून थोड्या अंतरावर त्याला शिकाऱ्याचे प्रेत दिसले. 'दुसरा पण मेला.' वहाणा घालून चालणाऱ्या चौघा जणांच्या पावलांच्या खुणा दिसत होत्या.

आतां त्यापुढे जावेसे मौवलीला वाटले नाही. पण काळा वाघ म्हणाला—"मागे फिरणे शूर शिकाऱ्याला शोभत नाही."

त्या चार जणांच्या पावलांच्या अनुरोधाने सुमारे एक तास चालल्यावर काळ्या वाघाला धुराचा वास आला. त्याच जागी झाडीत काळ्या वाघाला आणखी एक प्रेत दिसले. "याला कोणी मारले? शिकारी मेला तसाच हा मेला असावा."

आणखी अर्धा मैल चालून गेल्यावर त्यांना आणखी तीन प्रेते दिसली. कोणाच्या अंगावर जखम नव्हती. "हे कसे काय मेले असावेत?" मौवलीने विचारले.

"विषाने!" काळा वाघ म्हणाला. ह्यांच्या हाती मेलेला तो सैंपाकी होता. त्याने मरण्यापूर्वीच इतर तिघांच्या जेवणांत विष घालून ठेवले होते. अंकुश बाजूला पडला आहे, पहा.

'आपण तो अंकुश त्या पडक्या गांवातून घेऊन आलो, ही चूक झाली,' मौवली पश्चात्ताप करीत मनात म्हणाला. त्याने तो अंकुश एका जागी पुरून ठेवला. नंतर एका रात्री तो श्वेत नाग रहात होता त्या भुयारांत त्याने तो गुपचुप नेऊन टाकला आणि ओरडून म्हणाला—"हे नागपितामहा! एकाद्या चांगल्या तरुण सापाला मदतीला घेऊन राजाने मागे सोडलेले हे वैभव सुरक्षित ठेवण्यासाठी तजवीज कर आणि आंत शिरणारा जिवंत बाहेर पोचणार नाही याची काळजी वाहात रहा."

"ओहो! परत आलास वाटते. तूंच म्हणून वांचलास. पण तू वांचलास कसा? काय पण आश्चर्य!" श्वेत नाग म्हणाला.





# ७९. विंता पर्वताच्या रांगा

आस्ट्रेलियाच्या मधोमध मकर रेखा आहे. तेथेच मॅकडोनल पर्वताच्या विचित्र रांगा आहेत हा झिजून घासून गेलेला पर्वत आहे. यांची लांबी २५० मैल आहे.



कैदेत ठेवण्यात आले. वेलस्लीने आपला दूरदर्शीपणा दाखवून मराठ्यांना म्हैसूरच्या राज्याच्या पश्चिमोत्तर भागाचे दोन जिल्हे देऊ केले. परंतु मराठ्यांनी ते स्वीकारण्यास नकार दिला. कारण त्यांना ते जिल्हे घेण्यात कमीपणा वाटला. परंतु इंग्रजांनी निजामाला म्हैसूरच्या उत्तर-पूर्वेचा गुत्ती पासून गुरमकोंडा दिल्यावर त्याने आनंदाने त्याचा स्वीकार केला. म्हैसूरच्या पश्चिमे कडील प्रदेश—कानडा, वाइनाड, कोयंबतूर, दारापुर, श्रीरंगपट्टणम् इत्यादी इंग्रजांनी स्वत:कडे ठेवून घेतला.

अशा तऱ्हेने म्हैसूरच्या आजूबाजूचा बराचसा भाग वाटून घेतल्यानंतर जो प्रदेश उरला त्याच्यावर राज्य करण्यासाठी म्हैसूरच्या गादीवर एका लहान मुलाला बसविण्यात आले, तो मुलगा म्हैसूरच्या जुन्या हिंदू राज्यघराण्यातला होता. म्हैसूर-वर इंग्रजांचेच प्रभुत्व होते. म्हैसूरच्या राजाला इंग्रजांना कर द्यावा लागे व इंग्रजांच्या फौजेचा खर्च पण द्यावा लागे.

म्हैसूरची अशी वांटणी केल्यामुळे इंग्रजांना राज्य, पैसा, व्यापार यांबरोबर सैनिक दृष्ट्या पण पुष्कळ लाभ झाला. वेलस्लीने इंग्रजांचे राज्य वाढविण्यासाठी ही जी कारवाई केली त्याबद्दल खूष होऊन इंग्रजांनी त्याला 'मार्क्विस' ही पदवी बहाल केली.

टिपूच्या मृत्यूनंतर भारतात फ्रेंचांचा पाठीराखा कोणी उरला नाही. इंग्रज देखील निश्चिंत झाले, कारण टिपूचे व्यक्तित्व तसेच मोठे होते. अनीती व अत्याचार त्याने कधी केला नाही. त्याला राजकारण चांगले कळत होते. इंग्रजच भारताचे मुख्य शत्रू होत, हे त्याला चांगले समजत होते. म्हणून त्यांचे उच्चाटन करण्यासाठी व भारतीय संस्थानिकांमध्ये मैत्री स्थापन करण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केला. परंतु ते एक स्वप्न ठरले.





# कोंबडी चोर

एका गावी रघू नावाचा एक भोळा भावडा शेतकरी रहात असे. कोणी काही सांगितले तर ते त्याला खरे वाटे. पण त्याची बायको जानकी फार हुशार होती. कुटुंबाचा भार पती सांभाळू शकणार नाही हे तिला लवकरच कळले. तिने आपले सर्व दागिने विकून कोंबड्या पाळल्या. अंडी विकून जे पैसे मिळत त्यावर व शेतातून पीक निघे त्यावर कुटुंबाचा उदर निर्वाह चालू लागला.

रघूच्या घरा शेजारी हरिराम नावाचा एक चिक्कू मारवाडी रहात असे. स्वत:चे धन तिजोरीत ठेवून तो त्याची पुजा करी. त्याला कोंबडीचे मांस फार आवडे. परंतु स्वत:चे पैसे खर्च करून कोंबडी विकत घेण्याचा विचार त्याने कधी केला नाही. रघूच्या परसात कोंबड्या पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटे. म्हणून रोज रात्री भिंतीवरून उडी मारून तो रघूची एक कोंबडी चोरून नेई.

जानकीला आपल्या कोंबड्या कमी होऊ लागल्याचा संशय येऊ लागला. चोराला पकडण्यासाठी तिने रात्रभर पाहरा देण्याचे ठरविले. एक रात्र ती स्वत: जागे व एक रात्र रघू जागे. पाहारा देत असता रात्रभर तिचा डोळा न लागे. परंतु रघू पाहारा देण्यासाठी जाऊन बसे व थोड्या वेळाने आडवा होऊन घोरू लागे. हरिरामला ही गोष्ट माहीत होती. म्हणून ज्या दिवशी रघू पाहाऱ्यावर असे त्याच दिवशी तो कोंबडी चोरून नेई.

जानकी नवऱ्यावर त्यासाठी रागावली देखील. म्हणाली—"तुम्हाला झोप म्हणजे कुंभकर्णाची आहे. पाहारा दिला काय अन न दिला काय सारखाच. असेच काही दिवस चालले तर लवकरच हातात झोळी येईल."



जानकी म्हणाली ते ऐकून रघूनं, त्या दिवशी चोराला नक्कीच पकडायचे ठरवून पाहाऱ्याला एक कांबळे पांघरुन बसला. मध्यरात्रीच्या सुमारास खुराड्या जवळ दार उघडण्याचा आवाज झाला. कोणीतरी तोंडावर बुरखा घालून पुढे जात असलेला दिसला. काळोखात त्याला ओळखणे अशक्य होते. रघूने उडी मारून त्याला धरले.

हरिराम रघूपेक्षा जास्त बळकट होता. म्हणून स्वतःला सोडवून घेऊन व भिंतीवरून उडी मारून पलीकडे निघून गेला. परंतु त्या झटापटीत त्याच्या कमरेला अडकवलेले किल्लयांचे जुडगे खाली पडले.

परसांत खडबड झाली ती जानकीला ऐकू आली. ती दिवा घेऊन बाहेर आली. तिने विचारले "चोरबीर होता वाटते?"

हातातला चोर निसटून पळून गेल्याबद्दल रघूला स्वतःचाच राग आला. जानकीला पण सर्व प्रसंग कळल्यावर नवऱ्याचा राग आला. तिला दिव्याच्या उजेडात किल्लयांचे जुडगे दिसले. "चोर सापडला. चोराच्या किल्लयांचे जुडगेच सापडले आहे. जुडगे शोधायला येईलच की नाही? पकडू तेव्हा त्याला." असे सांगून ती जुडगे घेऊन घरात निघून गेली.

'आपण वाचलो' असा विचार करून हरिराम खूष होता. कारण त्याची ती चोरी पकडली गेली असती तर गावात तोंड दाखवायला जागा उरली नसती. सहज त्याचा हात कमरेला जुडग्यासाठी गेला, पण जुडगे नव्हते. जुडगे रघूच्या आवारातच पडले असणार. त्याने विचार केला बतावणी करून भोळ्या भाबड्या रघूकडून तेवढे जुडगे मिळविले पाहिजे.

दुसऱ्या दिवशी सकाळी तो रघूच्या घरी गेला आणि म्हणाला—"रघू! मोकळा आहेस का की कामात गुंतला आहेस? चल ना जरा शेतावर जाऊन येऊ." रघू त्याच्याबरोबर निघाला.





वाटेत त्याने रघूला विचारले—"काय रे रघू, तू नेहमी सांगतोस, तुझ्या कोंबड्या चोरीला जातात. मग मिळाला का चोर?"

रघू आनंदाने म्हणाला—"होय रे, हरिराम! रात्री मी त्याला पकडले होते. पण त्याचे नशीब बलवत्तर म्हणून निसटून पळून गेला. नाही तर त्याचे हात पाय मोडून त्याला पाठविले असते. पण त्याला माझ्याकडे यावेच लागणार. कारण त्या दुष्टाच्या किल्लयांचे जुडगे राहून गेले आहे. ते न्यायला येईल तेव्हा पाहून घेईन.

हरिरामने विचार केल्यासारखे केले व म्हणाला—"आजपर्यंत तुझ्या कोंबड्यांची चोरी करणारा मनुष्य नव्हताच. एक भूत होते. त्याला कोंबड्या आवडतात खायला. माझे आजोबा मला एकदा म्हणाले होते की त्या भूताची तिजोरी स्मशानात आहे. तो आपल्या किल्लयांचे जुडगे नेहमी कमरेला अडकवून ठेवतो. मग काय, तुला चोर मिळाला. तू कोणाला, म्हणजे बायकोला सुद्धा सांगितल्याशिवाय ते जुडगे घेऊन स्मशानात का नाही येत? मी तुला त्या भुताची तिजोरी दाखवितो. परंतु एवढे लक्षात ठेव. ते भूत नेहमी स्मशानातच राहते. बायकोला हे सर्व खुळ्यासारखा सांगून बसशील!"

रघूला हरिराम म्हणाला ते सर्व खरे वाटले. त्या रात्री पाहारा देण्याची पाळी बायकोची होती. ती परसात खाटेवर पडून राहाली. मध्यरात्रीच्या सुमारास रघू उठला व जानकीच्या पेटीतून किल्लयांचे जुडगे काढून घेऊन स्मशानाच्या दिशेने निघाला.

तेथे एका खड्डयाआड रघूला एक काळी आकृती दिसली. तोच हरिराम असावा

असे समजून तो हळूच म्हणाला–"अरे हरिराम! किल्लचांचे जुडगे आणले आहे, बरं का? असे म्हणत रघूने किल्लचांचे जुडगे हलवून व वाजवून दाखविले.

ती काळी आकृती म्हणजे हरिरामच होता. परंतु तो काही बोलल्या शिवाय रघूच्या हातातल्या किल्लचाचे जुडगे ओढू लागला. रघूने त्याला भूत समजून त्याच्याशी झटापट सुरू केली. शेवटी हरिरामने किल्लचांचे जुडगे रघूच्या हातातून ओढून घेतले, परंतु ओढाताण चालू असता हरिरामची अंगठी रघूच्या हातात आली. हरिरामच्या लक्षात ती गोष्ट आली नाही व तो काळोखात जुडगे घेऊन पळून गेला.

किल्लचांचे जुडगे गेले खरे, पण त्या ऐवजी अंगठी हातात आल्याबद्दल त्याला फार आनंद झाला. त्याच आनंदात तो घरी गेला.

सकाळी उजाडल्यावर रघूने बायकोला हरिरामशी झालेले बोलणे व रात्री त्याच्याबरोबर तो स्मशानात जायला कसा कबूल झाला व तेथे भुताशी झटापट होऊन शेवटी भुताची अंगठी कशी मिळाली हे वर्णन करून सांगितले. जानकीने अंगठी ओळखली. त्याच्यावर हरिरामचे नाव पण होते.

चोर सापडला. जानकीने गावच्या पाट-लाला अंगठी नेऊन दिली आणि कोंबडीची चोरी कशी होत होती व हरिरामचे रघूशी काय काय बोलणे झाले सर्व सांगितले. पाटलाने हरिरामाला बोलाविले आणि जानकीचे झालेले नुकसान भरून द्यायला सांगितले.

हरिरामला त्या गावात कोणाला तोंड दाखविणे देखील अशक्य झाले. म्हणून तो गाव सोडून निघून गेला.





# पडकें देऊळ

[ ७ ]

[ शिखीमुख व विक्रमकेसरी मायगावला गेल्याची बातमी मिळताच जिवाजी काही अनुयायांसह त्या गांवी गेला. तो पोचण्यापूर्वीच शिखीमुखने लट्टूसिंहला धान्य ठेवण्याच्या खड्ड्यात ढकलले होते. लट्टूसिंहाचे अनुयायी शिखीमुखावर हल्ला चढविणार इतक्यात जिवाजीची 'हत्यारे खाली टाका' ची आरोळी ऐकू आली.–पुढे. ]

लट्टूसिंह जखमी होऊन खड्ड्यात पडला होता. तेव्हां त्याच्या अनुयायांचा जो दुसरा नायक होता त्याला जिवाजीची आरोळी ऐकू आली व त्याला तो व त्याचे सर्व अनुयायी संकटात सापडले असल्याचे कळले. अशा प्रसंगी काय करणे बरोबर होईल याचा त्याने थोडा विचार केला. समोरा समोर शत्रूशी चार हात केल्यास मृत्यु मुखात स्वतःच उडी टाकल्या सारखे होईल, या उलट जिवाजीला शरण गेल्यास नागलोकांत आपली मान खाली होईल हे पण तो ओळखून होता.

म्हणून जिवाजीकडे वळून तो म्हणाला–"तुम्ही मला चारी बाजूंनी घेरले आहे. तुम्ही संख्येने आमच्या तिप्पट आहा. म्हणून हे न्याय्य युद्ध होणार नाही. धर्मयुद्ध तर नाहीच नाही."

ते ऐकून शिखीमुख त्याच्याकडे वळून म्हणाला–"तुम्हांला धर्म व न्याय संकटाच्या



वेळीच आठवतात. ही सर्व शिकवण तुम्हांला तुमच्या त्या गुरूकडून मिळालेली दिसते. स्वतःचे इमान विकून तुम्ही आजवर परक्याची चाकरी करीत आलात तेव्हां तुमचा हा न्याय व धर्म कोठे गेला होता? तुम्ही या गायगांवच्या गरीब शेतकऱ्यांची मेहनत करून सांठवलेली कमाई अशी लुटून नेत आहां आणि आम्हांला न्यायाच्या व धर्माच्या गोष्टी सांगतां? मुकाट्याने शस्त्रास्त्रें खाली टाका."

"आम्ही शस्त्रास्त्रें टाकल्यावर तुम्ही आम्हांला भाला थोसकून ठार करणार नाही कशावरून?" नागनायकाने विचारलें.

"ते आम्ही तुमच्यावर दया दाखवून पाहिजेतर करू. तुम्ही शस्त्रास्त्रे टाकता कीं नाही?" असे म्हणत त्याने एकदा विक्रमकेसरी जवळ उभे असलेल्या तरुणांकडे सार्थक दृष्टी ने पाहिले.

शिलीमुखच्या बोलण्यावरून आता तो व त्याचे अनुयायी हल्ला चढविणार हे स्पष्ट दिसत होते. परंतु जिवाजीने तो भ्रम कोणाच्या मनात राहू नये म्हणून आपला भाला दूर फेकला व म्हणाला— "कोणाच्या केसालाहि धक्का लागणार नाही. पाहिजे तर तुम्ही आपापली शस्त्रास्त्रे स्वतः जवळ ठेवा, मला हरकत नाही. मला त्या पडक्या देवळांच्या पुजाऱ्याची गरज आहे. तोच आमचा खरा शत्रू आहे. बरे हे सांगा तुमचा नायक लठ्ठूसिंह कोठे आहे?"

"मी इकडे पडलो आहे, खड्डयात. सर्व अंग रक्तबंबाळ झाले आहे. डोळ्यासमोर काळोखी आली आहे. खड्डयातून कण्हत नागनायक लठ्ठूसिंह ओरडून म्हणाला.

जिवाजीने चकित होऊन आवाज ऐकू आला त्या दिशेला पाहिले. घाईघाईने खड्डयाजवळ जाऊन त्याने आत डोकावून पाहिले. लठ्ठूसिंह खड्डयातून त्याच्याकडे दीनवाणीने पहात होता.







"लट्‌ठूसिह, काय रे? बरेच लागले आहे वाटते? वर ये ना उठून. त्या पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला पकडण्यासाठी तुझ्या मदतीची गरज आहे मला." जिवाजी म्हणाला.

"वर येता आले असते तर केव्हांच आलो असतो रे! भाला लागल्याने माझा उजवा हात गेला. डाव्या पायाचा गुडगा पण मोडल्यासारखा दिसतो आहे. या सर्वाला जबाबदार कोण, माहीत आहे का? तुझा मुलगा शिखीमुख. त्याचे धैर्य, शौर्य माझ्या तोडीचे आहे. त्याच्या बरोबर मी आपली मुलगी नागमल्ली हिचा विवाह करून द्यावा म्हणत आहे. बोल, मग काय म्हणतोस?" थट्टेत हसत लट्‌ठूसिह म्हणाला.

त्याचे ते विचित्र बोलणे ऐकून जिवाजीला, खड्ड्यांत पडल्यामुळे व रक्त-स्राव झाल्यामुळे त्याला मतिभ्रम झाला असावा असे वाटले. जिवाजीने आपल्या अनुयायांना एक लाकडी फळी आणायला सांगितले. त्या फळीच्या दोन्ही टोकाला त्याने दोऱ्या बांधवल्या व दोघां अनुयायांना खड्ड्यात उतरायला सांगितले. त्या दोघांनी लट्‌ठूसिहला त्या फळीवर निजविले. नंतर वरच्या लोकांनी दोन्ही बाजूंनी दोऱ्या धरून लट्‌ठूसिहला अलगद वर काढले.

लट्‌ठूसिहने चकित होऊन आपल्या अनुयायांकडे पाहून विचारले—"सर्वांच्या हातात शस्त्रे आहेत. आज कोण जिकला, कोण हारला? आपल्यापैकी किती लोक ठार झाले?"

दुसऱ्या नागनायकाने पुढे येऊन थोडक्यात सर्व वृत्त सांगितले. म्हणाला— "धनी! शबर नायक जिवाजीने रक्तपात थांबविला. आपल्यापैकी सर्व आनंदात आहेत."

ते ऐकून लट्‌ठूसिह जिवाजीकडे वळून म्हणाला—"शबर नायका! मी तुझ्या जाती विरुद्ध फार मोठा अन्याय केला. त्या दुष्ट पुजाऱ्याने माझ्यासमोर सोन्याचे चार तुकडे टाकून मला वश करून घेतले. मी केवढे पाप केले. मला क्षमा कर. आजपासून आपण सर्व एक."

"बरे, सोडा! जे झाले ते झाले. विसरा सारे. पहिल्याने मी तुझ्या हाताला व पायाला पट्टी बांधवतो. नंतर आपण सर्व मिळून त्या पुजाऱ्याच्या शिकारीला निघू या." जिवाजी म्हणाला. नंतर दूर उभा असलेल्या एका वृद्ध शबराला हाक मारून जिवाजी म्हणाला— "नागजातीचा नायक लट्‌ठूसिह याचे औषध पाणी होऊ द्या."

तो वृद्ध त्या गावातला वैद्य होता. तो नेहमी औषधी मुळ्या, साले व इतर वस्तू एका पिशवीत घालून गाव गाव हिंडून आजाऱ्यांचे औषध पाणी करी. त्याने कसला तरी पाला तोडून आणला व त्याचा रस लट्‌ठू-सिहाच्या जखमेवर पिळून नंतर कसली तरी दोन तीन पाने ठेवून पट्टी बांधली. नंतर लट्‌ठूसिहाचा गुडगा बोटाने तपासून पाहिला. दोघां नागांना लट्‌ठूसिहाचे दोन्ही हात ओढून धरून ठेवायला सांगितले. दोन दोन कामट्या गुडघ्याच्या खाली व वर



ठेवून दोरीने घट्ट आवळून बांधल्या. नंतर गुडघ्याचा सांधा ठीक बसवला. सांधा बसवीत असता लट्‌ठूसिह मोठमोठ्याने ओरडत होता—"या सर्व नरक यातनेला कारण तो लुच्चा पुजारी आहे. त्याने ज्या सोन्याच्या विटा दिल्या आहेत, फेका त्या पाण्यात. त्या दुष्टाला झाडाला टांगून भाले टोचून ठार करा." पट्टी बांधण्याचे काम संपल्यावर वैद्याने एकदा तीक्ष्ण नजरेने लट्‌ठूसिहाकडे पाहिले व म्हणाला— "लट्‌ठूसिह! मी वैद्याच्या नात्याने रोग्याची सेवा करायचे कर्तव्य पुरे केले आहे. आता बोल, माझ्या गावचे जे धान्य










लुटून तू नेले आहेस तें परत करणार आहेस की नाही?"

"माझे अनुयायी तसे जास्त धान्य घेऊन गेलेच नाहीत. बाकीचे नेणार एवढ्यात शिखीमुखाने सिंहासारखी आमच्यावर झडप मारली. माझे अनुयायी जितकी पोती घेऊन गेले आहेत त्याच्या दुप्पट पोती मी स्वतःचे धान्य आणून देतो" वैद्याला असे उत्तर देऊन लट्ठूसिंहाने आपल्या अनुयायांना बोलाविले आणि हुकूम दिला– पोत्यात भरलेले धान्य पुन्हां खड्ड्यात ओता. आपले साथी जितकी पोती धान्य येथून उचलून घेऊन गेले आहेत त्याच्या दुप्पट पोती धान्य आपल्या गावातून घेऊन या."

त्यांच्या नायकाची आज्ञा होताच नागजातीचे काही लोक आपल्या वस्तीकडे निघाले. लट्ठूसिंह त्यांना थांबवून म्हणाला– "आणखी हे पहा, पुजारी आपल्या गुहे बाहेर जंगलात फिरत असेल. जर तो कोठे भेटला तर त्याला सांगा की आपल्या नागजातीचे सर्वलोक जिवाजीच्या हाती बंदी झाले आहेत. बाकीच्यांच्या जिवाला धोका आहे. समजले!"

त्यानंतर जिवाजी लट्ठूसिंहला दोघां तिघांच्या मदतीने उचलून घेऊन जाऊन गावातल्या चौकात गेला. त्याला एका ओटचावर नेऊन ठेवले. ओटचावर एका जागी जिवाजी, शिखीमुख व विक्रमकेसरी बसले. दुसरीकडे लट्ठूसिंह आपल्या अनुयायांसह बसला होता. जिवाजीने विचारल्यावर लट्ठूसिंह म्हणाला–"पडक्या देवळाचा पुजारी फक्त एकाच आठवड्या पूर्वी आमच्या गावी आला होता. त्याने आमच्या पुढे सोन्याच्या काही विटा टाकल्या व म्हणाला–"विक्रमकेसरी-जवळ ताडपत्रांचा जो ग्रंथ आहे तो आणून द्या."



नंतर लट्ठूसिंह जिवाजीला म्हणाला– "त्याने मला थोडे सोने दिले होते त्याच्या मोहाला बळी पडून मी हे सर्व पाप केले. मला मंत्रतंत्र शिकवून या जंगलाचा राजा करून देण्याचे वचन पण त्याने मला दिले होते. त्याला या ताडपत्राच्या ग्रंथाची गरज काय? यात कोणते गुपित आहे. मला सांगशील का?"

"हा प्रश्न तू विचारु नयेस. या शिवाय त्यात कोणते गुपित आहे हे मलादेखील ठीक ठीक माहीत नाही. तू ह्या गोष्टी विषयी चवकशीच सोडून दे. तो पुजारी या प्रदेशात मोकळेपणे हिंडू लागला व नंतर ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यात हिंडू फिरू लागला तर त्यात धोका आहे. म्हणून त्याला याच जंगलात पकडून ठार केले पाहिजे. तो कोणत्या गुहेत आत्तां लपून बसला आहे?" जिवाजीने विचारले.

लट्ठूसिंहने शिखीमुखकडे वळून जिवाजीला विचारले–"तुझ्या शिखीला जवळपासच्या सर्व जंगलाची व डोंगराळ प्रदेशाची चांगली माहिती आहे. शिखी! नंदी डोंगराच्या पायथ्याशी जे ताडा झाडांचे वन आहे, तुला ते माहीतच आहे. त्याच्या दक्षिणेकडच्या टोकाला एक पांच डोक्यांचे



ताडाचे झाड आहे. त्याचे जे सर्वांत उंच डोके आहे, त्याच्यावर चढून समोर पाहिलेस तर तुला पुजाऱ्याची गुहा दिसेल. त्या गुहेच्या जवळपास आणखी काही लहान मोठ्या गुहा आहेत. म्हणून ती गुहा ओळखण्यास हीच एक बरोबर खूण आहे."

"त्या गुहेसमोर पाहारेकरी आहेत का?" शिखीमुखने विचारले.

"गुहेसमोर कोणी पाहारेकरी नाही. पण ताडांच्या झाडाच्या वनात आमचे दोन तीन नाग आहेत. मी त्यांना निरोप पाठवितो. ते तुला मदत करतील." लट्ठूसिंह म्हणाला.

       



जियजीचा निरोप घेऊन शिखीमुख, विक्रमकेसरी व चार शबर साथी त्या नंदी पर्वताकडे निघाले. त्यांच्या जवळ धनुष्य-बाण, तलवार, भाला, बरछी वगैरे शस्त्रे होती. ते नंदी पर्वतापर्यंत पोंचले तो पर्यंत सूर्य पश्चिमेकडे वळला होता. ताडांच्या झाडांच्या वनात पाहारा देणाऱ्या नाग. पाहरेकऱ्यांना त्यांच्या नायकाकडून पूर्वीच मदत देण्यासंबंधी निरोप आला होता. त्या प्रमाणे ते शिखीमुख, विक्रमकेसरी वगैरेना पांच डोकी असलेल्या ताडाच्या झाडाजवळ घेऊन गेले आणि म्हणाले– "झाडावर चढून पहा. पुजारी गुहेतच आहे. दोन तीन तास झाले तो गुहेत वेड्यासारखा फिरत आहे. गुहेत जास्त उजेड नाही. म्हणून तो काय करतो आहे हे बरोबर कळणे कठिण आहे."

शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी पुढे काय करायचे हे विचार करून असे ठरविले की विक्रमकेसरीने काही साथी दारांना बरोबर घेऊन तिकडे जावे. पुजारी त्यांना येत असलेले पाहून पळू लागला तर शिखीमुखने झाडावरून त्याला बाण मारावयाचा.

थोड्या वेळानंतर विक्रमकेसरी डोंगरावर चढून गुहेजवळ पोचला तेव्हां गुहेत सावली सारखी फिरणारी पुजाऱ्याची आकृती आता एकदम उडी मारणार असे वाटले. शिखीमुखला वाटले की पुजारी आता पळण्याच्या विचारात असावा. त्याने नेम धरून बाण मारला. बाण लागताच गुहेत राहणारी ती आकृती अस्वलासारखी एकदा मोठ्यांने ओरडली.

तो आवाज ऐकून विक्रमकेसरी व त्याचे साथी गुहेकडे धावत निघाले. "पुजारी अस्वल झाला आहे." असे म्हणत शिखीमुख झाडावरून खाली उतरला व गुहेकडे धावत निघाला. (पुढील गोष्ट पुढील अंकी)





# वीर गांगेय

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू खरोखरच कर्तृत्ववान दिसतो आहेस. परंतु वीर गंग सारख्या कर्तृत्ववानाला जसे अपयश मिळाले तसे तुला न येवो, एवढेच मला वाटते. तुला रात्रीच्या वेळी कंटाळा येऊ नये म्हणून त्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मणिपूरचे महाराज शूरसेन दरवर्षी विजयादशमीचा उत्सव मोठ्या थाटामाटाने साजरा करीत. त्यावेळी तलवारीचे हात, मल्लयुद्ध व धनुर्विद्या यां प्रतिस्पर्धा होत. या प्रतिस्पर्धांत भाग घेण्यासाठी दूरदूरच्या देशाचे राहणारे धनुर्विद्येत निपुण लोक येत.



अष्टमीच्या दिवशी प्रतिस्पर्धांचा कार्यक्रम होई. विजयादशमीच्या दिवशी बक्षिस समारंभ होई. ज्यांना बक्षिसे मिळण्याचे ठरलेले असे त्या सर्वांची राहण्याची व्यवस्था राजा करी. नृत्य, संगीत इत्यादी करमणुकीच्या कार्यक्रमांची खास व्यवस्था त्यांच्यासाठी करण्यात येई. प्रदर्शनात जिकणारे बहुतेक परदेशांतलेच लोक असत.

एक वर्षी तलवारीचे हात करण्यात प्रवीण अशा एका तरुणाने एका मागून एक पांच जणांना जिंकले. त्यांच्या तलवारी तुटून जमिनीवर आदळल्या. त्याने चारही बाजूला दृष्टी फिरवून विचारले—"आहे का आणखी कोणी आपली शक्ती आजमावून पाहण्याची तयारी असणारा?"

प्रेक्षकांपैकी एक जण, तोपर्यंत गंमत पहात बसला होता. तो आपल्या म्यानेतून तलवार उपसून समोर आला. पाच तरुणाना जिकणाऱ्या तरुणाला त्याने आव्हान केले. दोघांच्या तलवारी चमकल्या. पण पहिला वार केल्याबरोबर पांच जणांना जिकणाऱ्या त्या प्रवीणाच्या हातातली तलवार जमिनीवर आदळली.

राजाने त्या नवीन तरुणाला जवळ बोलावून त्याचे नांव विचारले.

"महाराज! मला गांगेय म्हणतात. काही लोक मला वीर गांगेय या नावाने पण हाक मारतात." तो तरुण म्हणाला.

"तू कोणत्या देशातला राहणारा?" राजाने विचारले.

"महाराज! मी आपलीच प्रजा आहे." गांगेय म्हणाला. ते उत्तर ऐकून राजाला फार आनंद झाला. इतक्या वर्षांनी का होईना, आपल्या देशातल्या तरुणाने आपली लाज राखली.

इतर विजयी वीरांबरोबर विजयादशमी पर्यंत राजाचे आतिथ्य स्वीकारून व बक्षिस मिळवून तो तरुण आपल्या गावी निघून



गेला. त्या दोन तीन दिवसाच्या अवधीत त्याला राजकन्येची भेट घेण्याचे व तिच्याशी बोलण्याचे भाग्य लाभले.

गांगेयने ज्या क्षणी आपला पराक्रम दाखविला त्या क्षणापासूनच राजकन्येने त्याला मनातल्या मनात वरले होते. तिने आपल्या एका हुशार सखीला गांगेयचा मानस जाणण्यासाठी नेमले होते. सखीने परत या शब्दात गांगेयचे वर्णन केले—"त्याच्या मनात तुझ्याशिवाय इतर कोणा मुलीचा विचार आलेला नाही."

ते कळल्यावर राजकन्येला आनंद झाला. विजयादशमीच्या दिवशी सर्व नोकर इनाम घेण्यासाठी राजवाड्यात आले त्यात एक धोबीण पण आली होती. राजकुमारीच्या हातचे इनाम घेत तिने हळूच विचारले—"राजकुमारी! चोरांच्या सरदाराचा मुलगा गांगेय, राजवाड्यात वारंवार कां हो येतो?"

राजकुमारीने चकित होऊन विचारले—"चोरांच्या सरदाराचा मुलगा! कोण?"

"तो! तो तरुण वीर गांगेय! तो शहरा बाहेर एका जुन्या किल्लयात राहतो. त्यांचे कपडे पण मीच धुते." धोबीण म्हणाली.



राजकुमारीला डोळ्यासमोर काळोखी आल्यासारखे झाले.

"कोणाजवळ हे सर्व काही बोलू नकोस. उद्यां तो स्वतःच जाईल निघून आपल्या गावी." राजकन्या म्हणाली.

दुसऱ्या दिवशी गांगेय, राजाने दिलेले बक्षिस घेऊन आपल्या घरीं निघून गेला. त्याला राजकुमारीचे दर्शन घडले नाही. तशी संधीच मिळाली नाही.

राजकुमारी मनातल्या मनात गांगेयची आठवण काढून एकांतात रडू लागली. त्याच्याशी लग्न व्हावे असे मनापासून वाटत असूनही त्यासाठी तिने काही प्रयत्न केला



नाही. पुढे राजाने तिचे लग्न करून देण्यासाठी योग्य वर शोधण्याचे ठरविले, तेव्हां पण तिने नकार दिला नाही. शेजारच्या राज्याच्या युवराजाशी तिचे लग्न झाले. युवराज सपत्नीक आपल्या राज्यात जाण्यासाठी निघाला.

राजकुमारीच्या लग्न समारंभाची गोष्ट गांगेयला कळली होती. युवराज आपल्या लव्याजम्यासह जात असता गांगेयने त्याला वाटेत अडविले व म्हणाला–"तू खरोखरच वीर असशील तर ये द्वंद्व युद्धाला. तू जिंकलास तर राजकन्या तुझी. मी जिंकलो तर माझी. मी राजकन्येला परक्याची पत्नी होऊ देणार नाही. तुला ठार करून मी राजकुमारीला घेऊन जाण्यासाठी आलो आहे." गांगेय म्हणाला.

युवराजाला राग आला. तो आपल्या सैनिकांना म्हणाला–"पाहता काय? या भामट्याला ठार करा.

युवराजाचे वीस अंगरक्षक गांगेयवर तलवारी उपसून धावले. परंतु कित्येक जखमी होऊन जमिनीवर पडले. युवराज रथातून खाली उतरला व त्याने पाठीमागून गांगेयच्या पाठीत खंजीर भोसकला.

राजकुमारी हे सर्व रथात बसून पहात होती. गांगेय जमिनीवर पडल्यानंतर ती रथातून खाली उतरून आली व त्याचे डोके आपल्या मांडीवर घेऊन रडू लागली. गांगेयने एकदांच राजकन्येकडे प्रेमाने पाहिले व म्हणाला–"तुझ्यासाठी मरण आले यापेक्षा जास्त आनंद तो कशात मिळणार?" इतके म्हटल्यावर त्याचे डोळे फिरले.

इतका वेळ युवराज ते सर्व दृश्य पहात होता. त्याने राजकुमारीला खंजीर भोसकून ठार केले. राजकुमारीने गांगेयच्या देहावर आपले शरीर टाकून प्राण त्याग केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! मला एका गोष्टीची शंका वाटते. गांगेयने दुस्साहस करून आपला जीव धोक्यात टाकला. पण राजकन्येने आपल्या जिवावर असे कां उदार व्हावे. गांगेयचे प्रेम राजकन्येवर स्वत:च्या प्राणापेक्षां जास्त होते परंतु राजकुमारीचे तितकेच प्रेम त्याच्यावर होते का नाही, हे सांगता येणार नाही. कारण वडिलांनी ज्याच्याशी लग्न करून दिले त्याच्याशी संसार करायला ती तयार झाली होती. मग तिने असे वागून स्वत:च्या जीव धोक्यात कां टाकला? याचे उत्तर माहीत असून ही तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे की तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"राजकुमारीचे प्रेम गांगेयवर कमी होते असे नाही म्हणता येणार. गांगेयने राजकुमारीवरच्या प्रेमासाठी मोठा त्याग केला असे ही म्हणतां येणार नाही. तिने गांगेयशीच लग्न करून देण्याचा हट्ट धरलां असता तर तिच्या वडिलांच्या कुळाला कलंक लागला असता. कारण गांगेय पिढिजात लुटेरा व डाकू होता. म्हणून राजकुमारीने तिच्या वडिलांनी ज्याच्याशी तिचे लग्न करून देण्याचे ठरविले त्याच्याशी ती लग्नाला तयार झाली. तिचा पति वीर नव्हता हे पण तिला माहीत नव्हते. परंतु गांगेयने त्याला अडवून आव्हान केले तेव्हां तिला तिचा पति शूर नाही हे कळले. कारण त्याने आपल्या सैनिकांना गांगेयला ठार करण्यास पाठविले व ते हारणार हे पाहून पाठीमागून वार करून त्याने गांगेयचा वध केला. अशा कापुरुष पुरुषाची पत्नी म्हणून आयुष्य कंठण्या पेक्षा एका वीर पुरुषाची प्रेयसी म्हणून मरणे तिला श्रेयस्कर वाटले."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)














# परोपकारी गोपाळ

गोपाळने काही दिवसापूर्वी गावाबाहेर थोडी जमीन विकत घेतली. त्याच्या आईने व बायकोने त्या जमीनीत भाजीचा मळा लावला तर चांगला फायदा होईल असे सुचविले. गोपाळला पण तो सल्ला पसंत पडला. परंतु भाजीच्या मळ्यावर पैसे मिळविण्याचा विचार त्याच्या मनाला शिवला नाही, गरिबांना भाजी वांटता येईल असा विचार केला.

त्याने जमिनीच्या चारीबाजूला चांगले कुंपण करून घेतले, विहीर खणली आणि वांगी, भेंडी, भोपळा, दोडकी, पडवळ वगैरे भाज्या लावल्या. काही दिवसांनी खूप भाजी मिळू लागली. घरासाठी लागे तेवढी तो घरात ठेवून घेई आणि बाकी शेजार पाजारच्या लोकांना व घरी येऊन मागणाऱ्यांना वांटून टाकी.

त्याच गावी रंगनाथ नावाचा एक मनुष्य रहात असे. तो रोज गोपाळकडे येई व कोणती तरी एक भाजी मागून घेऊन जाई. त्याला गोपाळच्या उदार स्वभावाची चांगली ओळख होती. एकदा तो एक मोठी टोपली घेऊन सरळ मळ्यात आला व टोपली दाखवून म्हणाला– "अहो गोपाळराव! काय सांगू, आज माझ्या घरी पाहुणे आले आहेत व निदान दोन एक आठवडे तरी राहणार आहेत. म्हणून थोडी जास्तच भाजी मागायला आलो आहे."

"अरे, त्यात काय मोठे से? जास्त घेऊन जा." गोपाळ म्हणाला.

रंगनाथ भाजीची टोपली घेऊन सरळ बाजारात गेला आणि सर्व भाजी दोन रुपये घेऊन विकून टाकली.

त्या दिवसापासून तो रोज टोपलीभर भाजी घेऊन बाजारात जाऊन विकून पैसे मिळवू लागला. कधी कधी रंगनाथ भाजी घेऊन गेला म्हणजे गोपाळला स्वतःच्या घरासाठी पण भाजी उरत नसे. तरी गोपाळला त्याचे काही वाटले नाही. रंगनाथ भाज्या बाजारात नेऊन विकत असेल हे त्याच्या गावीही नव्हते.

परंतु काही दिवसांनी गोपाळच्या बायकोच्या कानावर कुणकुण येऊ लागली. शेजार पाजारच्या बायका येऊन तिला– "विचारू लागल्या, भाजीचा व्यापार कसा काय चालतो? पुष्कळ फायदा होतो ना?"

"व्यापार? आम्ही नाही बुवा भाजी विकत. हे सर्व काय विचारता तुम्ही?" लक्ष्मीने चकित होऊन विचारले.

"अहो गोपाळराव नसतील विकत स्वत:, पण रंगनाथाच्या हाती रोज बाजारात टोपलं भरभरून भाजी विकतात की." एक बाई म्हणाली.

शेवटी लक्ष्मीने नवऱ्याला विचारलेच– "तुम्ही रंगनाथच्या हाती दररोज बाजारात भाजी पाठवता म्हणे, शेजारच्या सर्व बायका सांगत होत्या."

गोपाळला असल्या खोट्यानाट्या गोष्टी ऐकायची संवय नव्हती. बायकोला त्याने समजावून सांगितले की त्या बिचाऱ्याच्या घरी पाहुणे आले आहेत व दोन आठवडे झाले तरी हलायचे नाव काढीत नाहीत.



श्री. भा. ना. पोळ



गरीब बिचारा, माझ्याकडे येऊन त्यांच्या साठी भाजी मागून घेऊन जातो. गावच्या लोकांना दुसरा धंदा नाही. त्यांच्या बोलण्यावर मुळीच विश्वास करू नकोस."

एकदा रंगनाथ भाजीचे टोपले घेऊन बाजारात जात होता. पाय सरकला आणि खाली पडला. पाय मुरगळला म्हणून त्याने आपल्या दहा वर्षे वयाच्या मुलाला भाजी घेऊन बाजारात जायला सांगितले.

मुलगा त्याला कबूल झाला.

रंगनाथाने कोणती भाजी कोणत्या भावाने विकायची हे सांगितले. नंतर टोपली त्याच्या डोक्यावर ठेवून त्याला बाजारात पाठविले.

रंगनाथाचा मुलगा अर्ध्या वाटेवर गेला असेल नसेल, त्याची मान दुखू लागली. समोर एक मनुष्य उभा दिसला, त्याला हाक मारून त्याने टोपले खाली उतरायला हात लावायला सांगितले.

तो मनुष्य दुसरा तिसरा कोणी नसून स्वत: गोपाळच होता. टोपले खाली उतरवीत त्याने मुलाला विचारले–"बाळ! तू इतकी मोठी टोपली डोक्यावर घेऊन कशाला रे जातो आहेस. घरी कोणी मोठे माणूस नाही का?"

"माझ्या बाबांचा पाय मुरगळला म्हणून मीच सर्व भाज्या बाजारात नेत आहे. या विकायच्या आहेत हो!" मुलगा म्हणाला.

"ही एवढी मोठी टोपली बाजारापर्यंत नेलीस तर तुझी मान मुरगळून जाईल त्याची काय वाट? केवढ्याला विकणार आहेस तू या सर्व भाज्या? मी घेतो विकत सगळ्या." गोपाळ म्हणाला.

"माझ्या वडिलांनी दोन रुपयाला विकायला सांगितल्या आहेत." मुलगा म्हणाला.

"तरमग मी देतो दोन रुपये! चल माझ्या घरी." असे सांगून गोपाळने स्वत: ते टोपले डोक्यावर उचलून घेतले. रंगनाथाच्या मुलाला घरी गेल्यावर टोपली बरोबर दोन रुपये देऊन पाठवून दिले.

मुलाने घरी गेल्यावर बापाला दोन रुपये दिले व म्हणाला–"वाटेतच एक सद्गृहस्थ भेटले व त्यांनी सर्व भाज्या विकत घेऊन दोन "रुपये दिले." कोणी धर्मात्मा असावा!" असे म्हणत रंगनाथाने देवाचे आभार मानले.

दुसऱ्या दिवशी रंगनाथाच्या पायाला सूज आली. आपल्या मुलाला हाक मारून तो म्हणाला–"हे पहा, गांवाबाहेर गोपाळ रावांचा मळा पाहिला आहेस ना? तेथे घेऊन जा ही टोपली आणि मी पाठविले आहे म्हणून सांग. ही लहान टोपली भर भाजी बाजारात जाऊन वीक. एक रुपया घेऊन ये. मोठे टोपले उचलवणार नाही तुला."

रंगनाथाचा मुलगा लहान टोपली घेऊन मळ्यात गेला. तेव्हां गोपाळ झाडांना पाणी घालीत होता. मुलगा त्याच्या पाठी मागे उभा राहून म्हणाला–"काका! माझे वडील रंगनाथ यांनी मला भाज्या घेऊन यायला पाठविले आहे."



गोपाळने मागे वळून पाहिले व म्हणाला— "तूच होय!"

काल त्याच्याकडून भाजी विकत घेणाराच समोर उभा आहे हे जेव्हां मुलाने पाहिले तेव्हा त्याने टोपली, तेथेच टाकली व घरी पळून गेला.

"अरे, थांब जरा! ऐक मी सांगतो ते..." गोपाळ म्हणतच होता, मुलाने मागे वळून सुद्धा पाहिले नाही.

घरी पोचल्यावर धापा टाकीत तो बापाला म्हणाला—"अहो बाबा! काल माझ्याकडून भाजी घेऊन दोन रुपये दिले ते गोपाळरावांनीच. त्यांना आज मळ्यात पाहिले व मी पळून आलो."

रंगनाथाची लबाडी उघडकीला आली. गोपाळला आतां कोणते तोंड दाखवायचे?

इतक्यात गोपाळ स्वत:च तेथे आला. म्हणाला—"काय रे रंग्या! तुझा पाय मुरगळला आहे म्हणे. आता पाय कसा काय आहे? घरी आलेली पाहुणे मंडळी सर्व निघून गेली वाटते?"

रंगनाथ लंगडत पुढे आला व त्याने गोपाळचे पाय धरून क्षमा मागितली. म्हणाला—"मी मूर्ख, म्हणून तुझ्या सारख्या उपकार कर्त्याला असे फसविण्याचा प्रयत्न केला."

"काही हरकत नाही रे! गरिबी माणसाकडून काय काय करवीत नाही? यापुढे माझ्या बागेचे काम तूच पहा! मळ्यात भाजी पाला लाव व स्वत:चा व कुटुंबाचा उदर निर्वाह त्यावर भागवता आला तर पहा." गोपाळ म्हणाला.

त्या दिवसापासून रंगनाथ गोपाळच्या मळ्यात काम करू लागला. दररोज तीन रुपयाची भाजी नेऊन बाजारात विकी. एक रुपया स्वत:ची मजुरी म्हणून ठेवून घेई व दोन रुपये गोपाळच्या घरी लक्ष्मीला नेऊन देई.





# लाख मोलाची गोष्ट

उज्जयनी नगरीत वरुणश्रव नामक एक गृहस्थ रहात असे. त्याच्याकडे थोडी जमीन होती. तो दुसऱ्यांची पण कामे करून थोडे पैसे मिळवी. तो इतके काम करी व मेहनत करी पण जी मिळकत होई ती सर्व पोटा-पाण्यासाठी खर्च होऊन जाई. हातात काही शिल्लक रहात नसे. ह्याचे त्याला फार वाईट वाटे. तो आपल्या बायकोला पण वारंवार सांगे—"बहुतेक मला शेवटी उपाशीच मरावे लागणार."

"देव ठेवील तसे रहावे. असे उणे मानून घेण्यात काय अर्थ आहे?" बायको वसुमती म्हणे.

एकदा त्याच्या घरी एक पाहुणा आला. वसुमतीने त्याला जेवायला वाढले. इकडच्या तिकडच्या गप्पा चालू असता वरुणश्रव म्हणाला—"शेवटी मागे काही राखून ठेवल्या शिवायच मी 'राम' म्हणणार."

ते ऐकून पाहुणा म्हणाला—"मी हात पाहतो, दाखवता का हात तुमचा? तुमच्या भाग्यात काय काय लिहिले आहे, ते मी सांगतो." पाहुण्याने वरुणश्रवचा हात पाहिला व म्हणाला—"तुम्ही व्यर्थ काळजी करता आहां. तुमची भाग्य रेखा तर उज्वल आहे. होय, थोडी उशिरां सुरू होते आहे. पुढल्या महिन्यापासूनच काही पालट झालेला दिसेल."

"मी या गोष्टीवर विश्वास करू म्हणतां?" वरुणश्रवने विचारले.

"मी जे सांगतो ते कोणाला खूष करण्या साठी नाही सांगत. आयुष्याची दोरी असे पर्यंत तुम्ही दोन लाख रुपये बांचवणार आहात" तो पाहुणा म्हणाला.

वरुणश्रव जीवनात हताश झाला होता. म्हणून त्याच्या पाहुण्याने हात पाहून जे भविष्य सांगितले त्यावर त्याचा मुळीच

सौ. सरोजिनी










विश्वास बसला नाही. परंतु एक पहिन्या-नंतर खरोखरच त्याची प्राप्ती वाढली. पूर्वी दररोज फक्त एक रुपयाची प्राप्ती होती. ती वाढून आता दोन रुपये झाली.

वरुणश्रवला थोडी आशा वाटू लागली. आता त्याचे चित्त प्रसन्न राहू लागले. त्याच्या मिळकतीतून जी शिल्लक राही ती तो एका डबीत संभाळून ठेवू लागला. परंतु वसुमतीच्या मनांत कसली तरी काळजी वाढत चाललेली दिसली. ती रोज डबी उघडून पैसे मोजू लागली.

काही वर्षे लोटली. एक हुशार कारागीर परदेशातून आला. तो फार गरीब होता. तो उज्जयनीला चांगली मिळकत होईल या आशेने आला होता. उज्जयनीच्या राजाला भेट देण्यासाठी तो एक सुंदर मूर्त घडवून घेऊन आला होता. परंतु त्याचे मळके व फाटके कपडे पाहून पाहारेकऱ्यांनी त्याला राजवाड्यात प्रवेश दिला नाही. एवढेच नव्हे तर त्यांनी त्याला दूर धुडकावून लावले. तो कारागीर अगदी हताश होऊन वरुणश्रवच्या घरासमोर येऊन उभा राहिला. वरुणश्रवने त्याला प्रेमाने घरात बोलावले व आंघोळ करून यायला सांगितले. नंतर त्याने त्याला स्वच्छ वस्त्रे अंगात घालायला दिली. त्याला आपल्या बरोबर जेवायला बसायला सांगितले. जेवणखाण आटोपल्यावर त्या कारागिराने आपल्या पिशवीतून एक सुंदर मूर्त काढून वरुणश्रवला दाखविली.

"असली कारागिरी आमच्या महाराजांना फार आवडते. तुझ्या हाताचे हे कसब पाहून महाराज तुझी पाठ थोपटतील व तुला मोठे बक्षिस पण देतील. मी त्याची व्यवस्था करतो." वरुणश्रव म्हणाला.

"एवढे काम केलेत तर मी आजन्म आपला ऋणी होईन. एवढेच नव्हे तर जे बक्षिस मिळेल त्याचा अर्धा वांटा तुम्हांला देईन. त्यात मला आनंदच होईल." तो कारागीर म्हणाला.

दुसऱ्या दिवशी वरुणश्रव त्या कारागिराने तयार केलेली मूर्त बरोबर घेऊन राजाच्या दर्शनाला निघाला. त्या दिवशी राजाचे दर्शन होण्यास मुळीच त्रास झाला नाही. वरुणश्रवने राजाला कारागिराने करून आणलेली मूर्त दाखविली व म्हणाला—

"महाराज! ही मूर्त घडवणारा एक परदेशी कारागीर आहे. कालच आपल्या दर्शनासाठी आला होता. पण तो आहे गरीब. त्याचे मळके व फाटके कपडे पाहून पाहरेकऱ्यांनी त्याला राजवाड्यात येऊ दिले नाही. मी त्याच्या वतीने त्याची ही कला आपण पहावी अशी विनंती करीत आहे.





त्याच्या वतीने मी हे थोडे धाडस केले त्याबद्दल क्षमा करावी."

राजा ती मूर्त पाहून इतका खूष झाला की त्याने त्या कारागिराला एक लाख बक्षिस दिले व त्या मूर्तीची किमत एक लाख एकूण दोन लाख रुपये दिले.

राजाचे अधिकारी दोन लाख रुपये घेऊन वरुणश्रवच्या घरी आले. ते इनाम पाहून कारागिराच्या डोळ्यातून आनंदाश्रू आले. तो वरुणश्रवाला म्हणाला–"हे बक्षिस मला तुमच्या प्रयत्नाने मिळाले आहे. म्हणून यातला अर्धा वांटा तुमचा. हा घ्या."

वसुमती धावत पुढे येऊन म्हणाली–"एक लाख नाही, फक्त अर्धा लाखच घ्यावेत. तेच पुरेत."

वरुणश्रव व कारागीर वसुमतीला घाबरलेली पाहून चकित झाले.

"एक लाख रुपये घ्यायला कां भितेस?" वरुणश्रवने आपल्या बायकोला विचारले.

"त्या पाहुण्याने तुमचा हात पाहून काय सांगितले होते ते विसरलात वाटते. तो म्हणाला होता की आयुष्याची दोरी तुटायच्या आत तुम्याजवळ दोन लाख रुपये जमा होतील. तुमच्या जवळ कधी दोन लाख रुपये जमा होऊ नयेत याची काळजी मी बाळगली पाहिजे. प्राणापेक्षा धन अधिक मोलाचें आहे का? मला या धनाचा मोह नाही. त्याहून मोठे धन स्त्रीला तिचा पती आहे." वसुमती म्हणाली.

वसुमती जे म्हणाली ते कारागिराला एका नीतिसूक्तासारखे वाटले. त्याने राजाकडून मिळालेले धन गोर गरिबांना वांटून टाकले. त्याला स्वतःसाठी जेवढे अत्यावश्यक वाटले तेवढेच त्याने ठेवून घेतले.

वरुणश्रव व वसुमतीने पण धन जमा करून ठेवण्याचा नाद सोडला. त्यांचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# हारून जिंकला

सुवर्णपूरचा युवराज विक्रम हा फार सुंदर होता. जवळ पासच्या राज्यांच्या राजकन्या त्याला सांगून येऊ लागल्या. त्या राजांपैकी कित्येक जवळचे नातेवाईक मित्र किंवा पराक्रमी पण होते.

त्या सर्वांशी सलोखा कायम रहावा व लग्नाच्या निमित्ते वितुष्ट वाढू नये या हेतूने विक्रमने एक युक्ति केली. त्याने एक पत्र प्रत्येक राजाकडे पाठविले. त्या पत्रातला मजकूर असा होता :–

"माझ्याशी लग्न करण्याची इच्छा असलेल्या राजकुमारीने तिला वाटेल ते तीन प्रश्न मला विचारावे. त्या पैकी मी एकाद्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकलो नाही तर मी तिच्याशी लग्न करीन."

हे पत्र थोडे विचित्रच होते. तरी कित्येक राजकन्यांच्या मनात आपल्या भाग्याची परीक्षा करून पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली. अनेक राजकुमारींनी पुष्कळ विचार करून प्रश्न योजले व युवराजाकडे पाठवून त्याच्या स्वागतास त्या तयार असल्याचे कळविले.

विक्रमने प्रत्येक राज्यात पाळी पाळीने जाऊन राजकन्यांना पाहिले. पण त्याला एक देखील पसंत पडली नाही. त्यांच्या प्रश्नांचे काही तरी उत्तर देऊन व "मी हारलो नाही" असे सांगत तो दुसऱ्या राजकन्येकडे जाऊ लागला.

अशा तऱ्हेने राजकन्यांना उत्तर देत विक्रम चंद्रदेशात आला. चंद्रदेशाची राजकन्या चंद्रिका हिने पण त्याला बोलावणे पाठविले होते. चंद्रिकेला पाहताच ती त्याला पसंत पडली. तिच्याशीच लग्न करावयाचे त्याने आपल्या मनाशी ठरविले.

राजकुमारी तीन प्रश्न विचारण्यासाठी जेव्हां त्याच्या समोर येऊन बसली तेव्हां





विक्रम तिला म्हणाला–"संकोच करण्याचे कारण नाही. कठिणात कठिण प्रश्न विचारलास तरी चालेल."

राजकुमारीने पहिला प्रश्न विचारला–"मानवाला पूर्णत्व, परिपूर्णत्व व संपूर्णत्व कसे लाभेल?"

"लग्न झाल्यावर पूर्णत्व, विद्या, बुद्धि व लोकानुभव यांच्या योगे परिपूर्णत्व आणि मृत्यू आल्यावर संपूर्णत्व लाभते." विक्रम म्हणाला.

"दुसरा प्रश्न, धन व अधिकार यांच्या-योगे कोणती वस्तू होणे अशक्य?" चंद्रिकेने विचारले.

"तशा अनेक वस्तू आहेत, पण मी फक्त एक दोन वस्तूंचाच उल्लेख करतो. काढलेले दूध परत स्वस्थानी पाठविणे अशक्य. शिजवलेल्या भाताचे तांदूळ करून दाखविणे अशक्य." विक्रम म्हणाला.

"शेवटचा प्रश्न, मूर्खाशी काम पडले तर माणसाने काय करावे?" चंद्रिकेने विचारले.

विक्रमने त्याचे उत्तर दिले नाही. तो मौन पणे जागच्या जागी बसून राहिला.

चंद्रदेशच्या राजाला वाटले की त्याच्या मुलीने पैज जिंकली. म्हणून तो "आता माझ्या मुलीशी लग्न केले पाहिजेस", असे म्हणाला. विक्रमने नकार दिला नाही.

विवाह झाल्यानंतर चंद्रिकेने पतीला विचारले–"मी तिसरा प्रश्न विचारला त्याचे उत्तर तुम्ही कां नाही दिलेत? व हार कां मान्य केलीत?

"तुझ्या प्रश्नाचे उत्तर मी दिले होते. त्या प्रश्नाचे उत्तर आहे मौन राहणे. ते उत्तर तोंडाने देण्याऐवजी मी संकेत रूपे दिले. त्याचा फायदा असा झाला की तुझ्याशी माझे लग्न होऊ शकले." विक्रम म्हणाला.





# डासमार बहाद्दर

आन्ध्र प्रांतात विजयनगर नावाच्या एका गावी रामैया नावाचा एक गवळी रहात असे. रामैया हुशार होता, परंतु त्याला शिक्षण वगैरे मिळाले नव्हते. म्हणून त्याच्या कुशाग्र बुद्धीचा काही उपयोग झाला नाही. त्याचा बाप मुलाच्या लहानपणीच जगाचा निरोप घेऊन निघून गेला. आई नेहमी आजारी असे. म्हणून कुटुंबाच्या पोटापाण्याचे सर्व ओझे रामैयावरच येऊन पडले. तसा तो शरिराने हृष्टपुष्ट होता. कोणासमोर काही बोलायला तो कधी घाबरत नसे.

त्याला विसावे वर्ष लागले तोपर्यंत सर्व गवळी "डासमार बहाद्दर रामैया" या टोपण नावानेच त्याला ओळखत. कारण डास मारण्यात त्याला गंमत वाटे.

त्याच सुमारास विजयनगरम् नजीकच्या अरण्यात एक वाघ आला. तो रोज एक दोन बकऱ्या किंवा मेंढरे मारून खाई. विजयनगरम्च्या जमीनदाराने दोन तीनदा त्या वाघाच्या शिकारीचा प्रयत्न करून पाहिला. पण वाघाला ठार करणे अशक्य वाटून त्याने दवंडी पिटविली की जो कोणी वाघाला ठार करील त्याला मोठे इनाम दिले जाईल.

दवंडी ऐकून रामैयाच्या मित्रमंडळींनी त्याला थट्टेत विचारले–"अहो डासमार बहाद्दर! त्या वाघाला ठार करून 'शमशेर बहाद्दर' कां नाही होत?"

मित्रांनी थट्टा केली खरी, पण रामैयाने मनातल्या मनात त्या वाघाला ठार करण्याचे ठरविले व रात्री फक्त आईला सांगून राजवाड्याकडे गेला. फाटकावर पाहरेकरी होते. त्यांनी त्याला अडवून विचारले–"कोणरे तू, आणि रात्रीच्या वेळी येण्याचे कारण?"



"मी वाघाला ठार करण्यासाठी आलो आहे. मला महाराजांना भेटावयाचे आहे." रामैया म्हणाला. ते ऐकून पाहारेकऱ्यांना थोडे आश्चर्यच वाटले व ते त्याला महाराजांकडे बोलावून घेऊन गेले. तेव्हां रामैया हात जोडून म्हणाला–"महाराज! लोक 'डास मार बहाद्दर' म्हणून माझी मित्र मंडळी माझी थट्टा करतात. पण वाघाला ठार करून दाखविण्याची माझी इच्छा आहे."

"अरे होय! पण वाघ तर जंगलात आहे. त्याला ठार करायला जंगलात गेले पाहिजे!" राजा म्हणाला.

"होय महाराज! ते मला माहीत आहे. मी गरीब आहे. पोटभर खायला न मिळाल्याने अंगात शक्ती उरली नाही. आठवडाभर चांगले खायला प्यायला मिळाले तर त्या एका वाघालाच काय, त्याच्या सारख्या दहा वाघांना ठार करीन." रामैया म्हणाला.

राजाने त्याच्या जेवणाखाण्याची व्यवस्था करून दिली.

एक बकरा व तीन शेर दूध त्याला रोज मिळू लागले. रामैया नियमित पणे कसरत करू लागला व त्याला शक्य तेवढे खाऊ लागला.

एक महिना झाला तरी रामैया जंगलात जाण्याची गोष्ट काढीना. राजाने त्याला बोलावून विचारले तेव्हां रामैया म्हणाला–"मला एक बंदूक, दहावीस गोळ्या, खाण्या पिण्या पदार्थ व थोडे पैसे द्या. मी आजच वाघाच्या समाचाराला जंगलात जातो." त्याने जे काही मागितले ते राजाने त्याला दिले.

रामैया कोणाला काही सांगितल्या शिवाय सरळ आपल्या घरी गेला व आईला म्हणाला–"आई! परगावी जायचे आहे, जायची तयारी कर."

आईने जाण्याची तयारी केली. दोघे सामान घेऊन निघाले. रामैया राजाने दिलेली बंदूक, कटधार व कुऱ्हाड घेऊन निघाला. दोघांनी रात्रभर जंगलात एका झाडावर चढून रात्र काढायची ठरविले. त्याप्रमाणे एक मोठे वडाचे झाड पाहून रामैयाने आपल्या आईला एका फांदीवर चढवले व बंदूक वगैरे सामान वगैरे झाडा-वरच नीट बांधून ठेवले. नंतर स्वत: एका फांदीवर चढून बसला.

रात्री सोसाटयाचा वारा सुटला आणि दैवयोग असा कीं रामैया बसला होता त्या वडाच्या झाडाखाली वाघ येऊन उभा राहाला. रामैयाने वाघाला पाहिले व त्याची पांचवर धारण बसली. त्याच वेळीं ज्या मडक्यात रामैयाच्या आईने भात शिजवून आणला होता त्या मडक्याची दोरी संयोगवश तुटली व मडके वाघाच्या डोक्यातर आदळले. वाघाला त्या आकस्मिक आघाताने तिरीमिरी आल्यासारखे झाले. रामैयाला बंदूक घ्यावीसे वाटले व त्याने वाघाला मारण्यासाठी बंदूक उचलली. पण त्याच वेळी त्याची आई झोक जाऊन वाघा-वर आदळली. त्या सर्व अनपेक्षित प्रसंगामुळे वाघ घाबरून पळू लागला व जवळच्या एका कोरड्या व पडक्या विहिरीत जाऊन पडला. तेथून तो मोठमोठ्याने ओरडू लागला.

त्याच सुमारास उजाडू लागले. रामैया झाडावरून उतरून विहिरी जवळ गेला व गोळी मारून त्याने वाघाला ठार केले. नंतर तो जवळच्या गावी जाऊन एक बैलगाडी घेऊन आला. गाडीत वाघाला घालून विजयनगरमला परत आला.

राजाला वाघ ठार झाल्याचे कळले तेव्हां तो वाघ पाहण्यासाठी आला. त्याने रामैयाला व त्याच्या आईला मोठे इनाम दिले. तेव्हां पासून लोक त्याला 'शमशेर बहाद्दर' म्हणू लागले.





# प्रतिज्ञा-पालन

आनंदपूरच्या महाराजांना चार राण्या होत्या. प्रत्येकीत एक विशेष होते. एकीचे केस सुंदर होते तर दुसरीचे नाक सुंदर होते. तिसरीचे डोळे सुंदर होते तर चवथीचे गाल सुंदर होते. राजाचे चौघींवर सारखेप्रेम होते. चौघींना मुलें पण होती.

एकदा राजा आपल्या सुंदर डोळे असलेल्या राणी बरोबर राजवाडयाच्या गच्चीवर फिरत होता. एक पक्षी उडत जवळ येत होता. राजा त्याच्याकडे लक्षपूर्वक पहात होता. "त्या कावळ्याकडे इतके ध्यान देऊन पाहण्याचे कारण? काय नवल वाटले त्यात महाराजांना? तो तर कुरूप काळा पक्षी आहे." राणीने राजाला विचारले.

"तो कावळा नाही वाटत मला. गरुड पक्ष्यासारखा वाटतो आहे." राजा म्हणाला.

"तो तर कावळा आहे. शंभर टक्के! गरुड कोठून असणार?" राणीने विचारले.

"गरुडच आहे, राणी! तो जवळ आल्यावर पटेल खात्री तुझी!" राजा म्हणाला.

"तो कावळा निघाला नाही तर मी वनवास करायला तयार आहे, शपथ घेऊन सांगते. पण कावळा निघाला तर महाराजांना वनवास करावा लागेल! आहे कबूल?" राणीने विचारले.

राजा स्मित करून म्हणाला–"कबूल!"

थोडया वेळाने पक्षी जवळ आला तेव्हां राजा म्हणाला–"राणी सुनयना! पहा, तो गरुड पक्षीच निघाला ना? पटली खातरी? तुझे डोळे किती सुंदर आहेत, परंतु त्यांना थोडे कमीच दिसते. घाईत अशी प्रतिज्ञा करणे बरोबर नाही. तू हारलीस व मी जिकलो." असे सांगून राजा गच्चीवरून खाली उतरून आला.

त्या वेळी घरात पाळलेला पोपट दुरून सर्व ऐकत होता. राजा निघून गेल्यावर जवळ येऊन राणीला म्हणाला–"राणी साहेब! पैज हारलात ना?" आणि उडून गेला.

पैज हारल्यामुळे तो एक अपमान मानून तिसरी राणी मनातल्या मनात दु:खी झाली. तो पोपट इतर राण्यांना सर्व जाऊन सांगणार अशी भीती पण तिला वाटू लागली. म्हणून आपल्या दोन वर्षे वयाच्या तेजस्विनी नांवाच्या मुलीला राजवाडयात सोडून तिसरी राणी कोणाला काही सांगितल्या शिवाय फक्त एका दासीला बरोबर घेऊन जंगलात निघून गेली.

दुसऱ्या दिवशी राणी राजवाडयात कोठे न आढळल्यामुळे खळबळ उडून गेली. फक्त राजाला वस्तु स्थिति माहीत होती. राणी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे वागली याबद्दल तो मनातल्या मनात तिची वाखाणणीच करू लागला. तरी तो इतर सर्वांना उघडपणे समजावून सांगू लागला–"असे घाबरून काय जाता? ती जरूर स्वत:च परत येईल." राजाला वाटत होते की राणीला हा वनवास फार दिवस मानवणार नाही.

पण राजाने आपल्या राणीला पूर्णपणे ओळखले नव्हते. तिसरी राणी दूर खोल रानात जाऊन एका म्हातारीच्या घरात राहू लागली. त्या रानातल्या लोकांना ती एक गरीब असल्याचे आणि आयुष्यभर त्यांच्या














गावात राहण्यासाठी आली असल्याचे सांगितले.

तिसरी राणी राजवाड्यातून निघाली त्या वेळी गरोदर होती. काही दिवसांनी तिला एक मुलगा झाला. त्याचे नाव तिने तेजसिंह असे ठेवले. दासी दोघांची सेवा शुश्रूषा करी.

पांच वर्षे लोटली. म्हातारी वारली व तिचे घर तिसऱ्या राणीलाच मिळाले. तेजसिंहाला पांचवे वर्ष लागले होते, म्हणून त्याच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करण्याचे ठरवून राणीने त्याला दासीबरोबर राजधानीत पाठवून एका गुरुकुलात त्याच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करून दिली.

तेजसिंह मन लावून अभ्यास करीत असे. दसरा दिवाळी किंवा इतर सणवारी तो आपल्या आईकडे येऊन राही. आता त्याला तेरावे वर्ष लागले.

एक दिवशी तो नदीवर स्नानाला गेला. त्याला नदीच्या काठावर एक तीन रंगी रत्न दिसले. त्याने ते उचलून आणून आपल्या गुरूला दाखविले. गुरूने ते पाहिले व राज घराण्यात राहण्या योग्य आहे असा विचार करून राजाला नेऊन दिले. गुरूला अशी भीतीपण वाटत होती की यदाकदाचित कोणी ते आपल्याकडे आहे ही गोष्ट राजाला जाऊन सांगितली तर राजाच्या मनात भलभलता संशय येईल.

राजाने गुरूला विचारले–"आपल्याला हे कसे काय मिळाले?"

"माझा शिष्य तेजसिंहायाला नदीकाठी ते मिळाले.

राजा गुरूला शंभर सुवर्ण मुद्रा देऊन म्हणाला–"या तुमच्या साठी आहेत व तुमचा शिष्य पण अशा तऱ्हेचे इनाम मिळविण्यास योग्य आहे. त्याला पाठवून द्यावे."

तिसऱ्या राणीची मुलगी तेजस्विनी सोळा वर्षांची झाली होती. तिच्या लग्नाचा विचार चालू होता. तिच्यासाठी उत्तमोत्तम दागिने करण्याचे काम चालू होते. म्हणून राजाने सोनाराला बोलावून तो तीन रंगी मणी घालून एक रत्नहार तयार करायला सांगितले.

तिकडे गुरूने तेजसिंहला सांगितलें की त्याला नदीकाठी मिळालेले रत्न राजाला फार आवडले व राजाने भेटीसाठी बोलाविले आहे."

"गुरुवर्य! एवढे सोडून आपण जे सांगाल ते करायला मी तयार आहे. मी आपल्या आईच्या अनुज्ञेशिवाय राजवाड्यात जाणार नाही. आईने परवानगी दिली तर मी जाईन." तेजसिंह म्हणाला.

गुरूने, तेजसिंहाने जे उत्तर दिले, ते तसेच्या तसे राजाला जाऊन सांगितले.

गुरूकडून तेजसिंहाची आई ज्या गांवी जंगलात रहात असे ते विचारून घेऊन राजाचे शिपाई राजाज्ञेने जंगलात तिसऱ्या राणीकडे गेले. ते म्हणाले–"महाराजांनी तुमच्या मुलाला राजवाड्यात बोलाविले आहे. तर राजाला भेटण्यासाठी मुलाला राजवाड्यात जायला परवानगी द्यावी."

परंतु तिसऱ्या राणीने नकार दिला. म्हणाली–"आम्ही वनवासी आहो. माझा मुलगा राजवाड्यात पाऊल टाकणार नाही."












शिपायांनी तिसरी राणी जे म्हणाली ते सर्व राजाला जाऊन सांगितले आणि म्हणाले–"महाराज! त्या मुलाची आई सामान्य स्त्री नसून एक स्वाभिमानी स्त्री आहे, ती कोठली तरी राणीच असावी!"

राजाला लगेच संशय आला ती सुनयना राणी तर नसेल? राजा तेजस्विनीला घेऊन राणी रहात असे त्या गावी स्वतः गेला. राजाबरोबर पाळलेला तो पोपटपण निघाला.

चवदा वर्षे लोटली होती तरी राजाने राणीला लगेच ओळखले. म्हणाला–"तू तरी किती हट्टी आहेस? चवदा वर्षे अरण्यवास भोगण्याची गरजच काय होती? हा मुलगा तुझ्या हट्टामुळेच इतके कष्ट सहन करीत राहला. आम्हांला कळवायचे तरी. आम्हांला पार विसरून जायचे ठरविले आहेस की काय?" राजाने विचारले.

"रानात आल्यावर सहा महिन्यांनी तेजसिंह जन्मला. मीच स्वतः प्रतिज्ञा केली व पैजेत हारले. मग मीच नको का ती पाळायला?" राणी म्हणाली.

"तू जंगलात जाण्याची प्रतिज्ञा केली होतीस. पण जंगलात राहण्याची प्रतिज्ञा केली नव्हतीस. अशी वेड्यासारखी काय बोलातेस?" पोपटाने विचारले.

"पोपट म्हणतो ते बरोबर आहे. आणखी आता तुझ्या या मुलीचे लग्न ठरले आहे. तू प्रतिज्ञा पालन आजवर उत्तम प्रकारे निभावलेस. आता घरी चल. तूच जिंकलीच मी हारलो. मी कबूल करतो." राजा म्हणाला.

सुनयना पतीच्या या शब्दांनी विरघळून गेली व पतीबरोबर राजवाड्यात परत आली. राजाने तेजसिंहला राजवाड्यात बोलावून घेतले. तेजस्विनीचा लग्नसमारंभ थाटा माटाने पार पडला व सर्व सुखी झाले.





# विलक्षण नख

दिल्लीला मोंगल बादशाह अकबर राज्य करीत असता एक राजा युद्धात जखमी झाला. त्याच्या बोटाचे नख निघून गेले. वैद्यांनी अनेक प्रकारें मलमपट्टी लावून पाहिली. जखम भरली, पण नखमात्र उगवले नाही.

राजाला फार राग आला. त्याने दरबारातल्या सर्व हकीम व वैद्यांना कैदेत टाकले आणि राज्यातल्या हकीम वैद्यांना ताकीद केली की जो कोणी वैद्य राजाचे नख बरे करून दाखवणार नाही त्याला जन्मठेप शिक्षा देण्यात येईल. कोणी वैद्य बरोबर औषध देऊ शकला नाही आणि कित्येक वैद्य तुरुंगात गेले. उरलेले सर्व वैद्य राज्य सोडून निघून गेले. त्यामुळें वैद्यांनाच नव्हे तर सामान्य प्रजेला देखील राजाज्ञेचा त्रास भोगावा लागला. राज्यभर खळबळ उडून गेली.

अकबर बादशाहाच्या कानावर ही गोष्ट गेली. एका मांडलिक राजाने सर्व वैद्यांना तुरुंगात टाकल्याचे ऐकून बादशाहाला आश्चर्य वाटले. बादशाहाने बिरबलला बोलाविले व त्या मांडलिक राजाच्या राज्यातल्या वैद्यांना तुरुंगातून सोडवून प्रजेला सुखी करण्याचा काही तरी उपाय करायला सांगितले.

बिरबल वैद्याचा वेष धारण करून त्या राज्यात गेला आणि एका श्रीमंत गृहस्थाच्या घरी उतरला. तो त्या घरच्या धन्याला म्हणाला–"मी एक वैद्य आहे. राजाच्या दर्शनाला जाण्याची इच्छा आहे. आपण काही व्यवस्था करु शकाल का?"

"अरे वेड लागले आहे की काय तुला? आमच्या राजाने कित्येक वैद्यांना तुरुंगात टाकले आहे. आमच्या देशात स्वतःला वैद्य म्हणविणे हाच एक मोठा गुन्हा झाल्यासारखे आहे. आणि तू स्वतःच राजाच्या दर्शनाला

जायचे म्हणतो आहेस! माझे ऐकशील तर, त्या राजाला भेटण्याचा नाद सोड!" तो श्रीमंत गृहस्थ म्हणाला.

बिरबलाने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व स्वत: राजाच्या दर्शनाला निघाला.

राजाने बिरबलाला न्याहाळून पाहून विचारले–"तू वैद्य आहेस म्हणतोस?"

"होय महाराज! माझी बरोबरी करू शकणारा अकबर बादशाहाच्या राज्यात दुसरा कोणी वैद्य नाही." बिरबल म्हणाला.

"असे असेल तर माझ्या या बोटावरचे नख उगवून दाखव!" राजाने बिरबलाला आपले बोट दाखविले.

"त्यात काय मोठेसे? मी दूर देशातला राहणारा आहे. माझ्या जवळ आवश्यक असलेल्या मुळ्या व वनस्पती नाहीत. आपल्या देशात त्या मिळतात की नाही, मला माहीत नाही." बिरबल म्हणाला.

"मी हुकूम सोडला की लगेच तुला लागणारी द्रव्ये हजर होतील. तुला काय पाहिजे ते सांगशील की नाही?" राजाने बिरबलाला विचारले.

"तर मग दहा तोळे उंबराची फुले आणवून द्या. एका महिन्याच्या आत मागवून दिलीत की पुरे. तो पर्यंत मी इतर सर्व तयारी करून ठेवतो. एका महिन्याहून



जास्त वेळ लागला तर मात्र मी तयार करून ठेवलेले औषध फुकट जाईल." बिरबल म्हणाला.

"अरे एका महिन्याची काय गरज? पंधरा दिवसाच्या आंत मागवून देतो." राजा म्हणाला.

"आणि नाही आली तर?" बिरबलाने विचारले.

"तर मी तू सांगशील ते करीन." राजा म्हणाला.

उंबराच्या झाडाला फुलेच नसतात हे राजाला माहीत नव्हते. त्याने मंत्र्यांना आज्ञा केली की पंधरा दिवसांच्या आत उंबराची फुले आली पाहिजेत.

एक महिना झाला तरी बिरबलाने मागितल्याप्रमाणे उंबराची फुले मिळाली नाहीत. म्हणून महिना संपल्यावर तो राजाला जाऊन म्हणाला–"महाराज! एक महिना पुरा झाला आणि उंबराची फुले तर अद्याप आलेली नाहीत.

राजाने मंत्र्यांना फैलावर घेतले. मंत्र्यांनी सारा दोष आपल्या सैनिकांवर टाकला.

"मग आता काय?" राजाने निराश होऊन विचारले.

"अटीप्रमाणे प्रथम मी सांगतो ते केले पाहिजे. सर्व वैद्यांना कैदेतून सुटका मिळाली पाहिजे. उंबराची फुले मिळाली नाही तर मी मागेन ते देण्याचे स्वत: महाराजांनीच कबूल केले होते." बिरबलाने राजाने दिलेल्या वचनाची पण आठवण करून दिली.

राजाने सर्व वैद्यांना सोडले. अशा तऱ्हेने बिरबलाच्या चाणाक्षपणामुळे सर्व वैद्यांना सुटका मिळाली. त्यांनी बिरबलाचे आभार मानून त्याला यथाशक्ती इनाम वगैरे देऊन निरोप दिला.





# लंगडे माकड

एका गांवी एक मायलेक रहात असत. आईने मुलाचे फार लाड केले. मुलगा वयात आला. पण त्याला काम धंदा काही येत नव्हता. आता या मुलाचे पुढे कसे काय व्हायचे, ही एकच एक काळजी आईला वाटू लागली.

एकदा त्यांच्या घरासमोर एक गारुडी आला. त्याच्या जवळ एक माकड होते. माकडाकडून तो अनेक कामे करवून दाखवी. त्याने काही आणून द्यायला सांगितले की ते ती वस्तु आणून देई. कोणाला काही नेऊन द्यायला सांगितले की नेऊन देई. केरसुणी हातात देऊन केर काढायला सांगितले की केर काढी. शेवटी ते माकड हातात एक डबडे किंवा डफ घेऊन सर्वांकडे जाऊन पैसे मागी. त्याने त्या मूर्ख मुलाकडे सुद्धा पैसे मागितले. पण त्या मूर्खाने हातातली काठी त्या माकडाच्या पायावर मारली. माकडाचा पाय मोडला आणि ते 'कूं कूं' करून ओरडत आपल्या मालकाकडे गेले.

गारुडी रागावला व म्हणाला–"तू मनुष्य आहेस की जनावर? माझ्या माकडाचा पाय मोडलास. या माकडाची किंमत तीन रुपये दे."

नाइलाजाने त्या मूर्खाच्या आईला तीन रुपये काढून द्यावे लागले. गारुडी माकडाला त्यांच्या घरी सोडून निघाला.

गारुड्याकडे आणखी देखील पुष्कळ माकडे होती. ती सर्व गांवकऱ्यांनी विकत घेतली.

लंगडे माकड त्याला सांगावे ते काम करी. त्याचे पाहून त्याचा उडाणटप्पू धनी पण काम करू लागला. माकड मुसळ घेऊन धान्य कुटे, जात्यावर बसून दळण दळी, त्याला पाहून आई आपल्या उडाणटप्पू मुलाला म्हणे–"पहा जरा, माकडाची जात पण, कशी सर्व कामे करते? तुझ्या पेक्षा माकडच बरे!" ते ऐकून मुलाला चीड येई. तो माकडाला बाजूला सारून स्वत: ते काम करी.

माकडाचे पाहून मुलगा हळू हळू काम करू लागलेला पाहून आई एकदा माकडाला म्हणाली–"बाळा माकडा! तू आणि तुझा भाऊ दोघे मिळून रानातून लाकड घेऊन या. पाहूते, कोण जास्त आणतो."

ती गोष्ट माकडाला कळली. त्या बाईचा मुलगा पण माकडाच्या पाठो पाठ रानात जाण्याचा विचारकरू लागला.

जंगलात पोचल्यावर माकड वाळक्या काटक्या गोळा करू लागले. तितक्यात कोणी तरी मनुष्य तिकडे आला. त्याने माकडाला पाहिले. पण जवळ पास कोणी मनुष्य नाही हे पाहून त्याने एक खड्डा खणला व त्यात रुपयांची एक पिशवी पुरून निघून गेला. तो निघून गेल्याबरोबर माकडाने खड्ड्यातून पिशवी बाहेर काढली आणि घरी येऊन मालकिणीसमोर आणून ठेवली.

माकडाने आणून दिलेली पैशांची पिशवी पाहून त्या बाईला फार आश्चर्य वाटले.



तिने पिशवीतले फक्त दोनच रुपये कामापुरते बाहेर काढले आणि बाकी रुपये पिशवी सकट एका जागी लपवून ठेवून दिले.

संध्याकाळी उडाणटप्पू मुलगा लाकडाची एक मोळी घेऊन घरी आला. परत आल्याबरोबर त्याने आईला विचारले–"आई! माकड परत आले का?"

"ते तर केव्हांच आले. लाकडेच नव्हे तर लाकडे विकून त्यांची किंमत दोन रुपये पण ते घेऊन आले आहे." असे सांगून तिने दोन रुपये आपल्या दाखविले.

त्या उडाणटप्पू मुलाला आश्चर्याचा धक्काच बसला. माकड आणि ते देखील

       



लंगडे. तो आईला म्हणाला–"आई! आज पासून त्याला काही एक काम सांगू नकोस. सर्व कामे मी करतो. पहा तर मला सर्व कामे करता येतात कीं नाहीं." तो आईला म्हणाला.

"तू माझी सर्व कामे करून देऊ लागलास तर मी माकडाला कामे कां सांगेन? बाळ! तूच कर की!" आई म्हणाली.

त्या दिवसापासून मुलगा आई सांगे ती घरची सर्व कामे करू लागला. काही दिवसांनी एक हुशार व कर्तबगार तरुण म्हणून लोक त्याची वाखाणणी करू लागले.

माकड रानात काटक्या गोळा करून बाजारात विकते व मालकिणीला पैसे आणून देते, अशी बातमी गावभर पसरली. कोणी विचारले की रुपया कसा मिळविलास तर सांगे आमचे लंगडे माकड आहे ना, ते लाकडे विकून पैसे आणून देते. ते दररोज दोन रुपये मिळवून आणते. म्हणून तर आमचा उदर निर्वाह चालू आहे. नाहीतर उपाशीच मरावे लागले असते मला."

"आम्ही सुद्धा माकड विकत घेतले, पण काय उपयोग? त्याला चारचार वेळ खायला घालतो. पण एक पैसा देखील मिळाला असेल तर शपथ! आम्ही देखील आपल्या माकडाना काटक्या गोळा करून बाजारात विकायला घेऊन जायला शिकवितो." गाववाले म्हणाले.

त्याप्रमाणे सर्वांनी आपापल्या माकडांना जंगलांत नेऊन काटक्या गोळा करायला सांगितले. सोडल्याबरोबर सर्व माकडे झाडावर चढली व त्यांच्या मालकाच्या देखत या झाडावरून त्या झाडावर उड्या मारीत नाहीशी झाली. संध्याकाळी परत येतील म्हणून त्यांच्या मालकांनी वाट पाहिली. पण एक माकड देखील परत आले नाही.





वलभी नगर व्यापारासाठी एका काळी फार प्रसिद्ध होते. एकदां दक्षिणे कडचा एक मनुष्य त्या गावी आला. त्याच्याजवळ पाचशे रुपये होते. तो गांवभर फिरून लोकांना विचारी पांचशे रुपये भांडवलावर कोणता व्यापार करता येण्यासारखा आहे.

ते एका बाईने ऐकले. तिने त्याचा हात धरला व मोठमोठ्याने ओरडून त्याला विचारू लागली–"काय रे! माझे रुपये माझ्या कडून हिसकावून घेऊन तू व्यापार करणार आहेस होय? माझे पांचशे रुपये मुकाट्याने देऊन टाक."

तो दक्षिणेकडील मनुष्य आश्चर्य चकित झाला. म्हणाला–"तुझे रुपये? कोण तूं? मी कधीं तुला पाहिले देखील नाही."

गर्दी जमली. "असे रस्त्यावर काय भांडता? कोर्टात जा आणि खऱ्या खोट्याचा काय तो निवाडा करून घ्या!" एकाने सल्ला दिला. ती बाई त्या परदेश्याचा हात धरून त्याला ओढीत न्यायाधिशाकडे गेली व म्हणाली–"पहा हो! या लबाडाने माझ्या जवळचे पांचशे रुपये बळजबरीने घेतले. आपणच न्याय निवाडा करावा."

"कोणी साक्ष आहे का?" न्यायाधिशाने विचारले.

"कोणी नाही." ती बाई म्हणाली.

"तुला काय म्हणावयाचे आहे? हिचे म्हणणे खरे आहे की खोटे?" न्यायाधिशाने परदेशी दाक्षिणात्याला विचारले.

"न्यायमूर्ती! मी आजच या गांवी आलो. मी या बाईला पूर्वी कधी पाहिले नाही. हे पांचशे रुपये ते माझे स्वत:चे आहेत." तो मनुष्य म्हणाला.

न्यायाधिशाने एकंदर प्रसंग ओळखला. तो त्या दाक्षिणात्याला म्हणाला–"तुझे म्हणणे मला खरे नाही वाटत. तू हे पैसे









मुकाट्याने त्या बाईला देऊन टाक." नाइलाजाने त्या दाक्षिणात्याने पांचशे रुपये त्या बाईला देऊन टाकले.

ती बाई निघून गेल्यावर न्यायाधीश त्या परदेश्याला म्हणाला–"तू त्या बाईच्या पाठीमागून जाऊन आपले पैसे हिसकावून घे. तुला कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही."

तो दाक्षिणात्य त्या बाईच्या मागे धावत गेला. त्याने तिच्या हातातून रुपये हिसकावून घेण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला, पण त्याला शक्य झाले नाही. तेवढ्यात तेथे गर्दी जमली.

त्या बाईने पुन्हा न्यायाधिशाकडे येऊन तक्रार केली–"अहो! तुम्ही न्याय निवाडा करून मला जे पैसे देवविलेत ते हिसकावून घेण्याचा याने प्रयत्न केला हो!"

"हे खरे आहे का? कोणी पाहिले आहे का?" न्यायाधिशाने विचारले.

"पाहिजे तर या सर्व लोकांना विचारा. सर्वांनी पाहिले आहे." असे म्हणत त्या बाईने लोकांच्या गर्दीकडे बोट दाखविले.

"विचारायची गरज नाही. मीच पाठविले होते. पण याने हिसकावून घेतले का?" न्यायाधिशाने विचारले.

"मी अशी हिसकावून देईन का?" ती बाई म्हणाली.

"मला तरी तेच वाटले. तुझ्या जवळून रुपये हिसकावून घेण्याचे साहस याच्या अंगात नाही. त्याने तसा प्रयत्न केला तेव्हा लोक जमले. पहिल्याने तुझ्या पाठीमागून एक देखील मनुष्य आला नाही. याच्या अंगात रुपये हिसकावून घेण्यास लागणारे साहस किंवा बळ नाही, यावरून याने पूर्वी देखील पैसे हिसकावून घेतले नव्हते हे सिद्ध झाले. हे पैसे त्याचे आहेत, निमूटपणे, त्याचे त्याला परत दे." न्यायाधिशाने तिला दरडावून सांगितले. ती मान खाली घालून निघून गेली.






पौंड्र वासुदेव द्वारकेवर स्वारी करण्याची तयारी करीत होता. त्याच सुमारास नारदमुनी त्याच्याकडे आले. पौंड्रने त्यांचा सर्व प्रकारे आदर सत्कार केला आणि अर्घ्य आदि देऊन त्यांची पादपूजा केली. नंतर सुवर्णासन बसायला देऊन नमस्कार करून विचारले–"मुनिवर्य, आपण त्रिलोकात संचार करता. म्हणून आपल्याजवळ एक मागणे आहे. आपण त्रिलोकात अशी घोषणा करावी की मी कृष्णाची द्वारकापुरी व तेथील प्रजेचा सर्वनाश करणार आहे. तो गवळ्याचा पोर माझेच नाव धारण करून फुकटात कीर्ती मिळवीत आहे."

पौंड्रचे बोलणे ऐकून नारदमुनी स्मित करून म्हणाले–"मी त्रिलोकात भ्रमण करतो हे खरे आहे. परंतु मला तुझ्या एका गोष्टीबद्दल आश्चर्य वाटते. अरे तुझी व कृष्णाची बरोबरी कशी? तो पर्वत व तू खडा कृष्णाशी स्पर्धा करणे तुला शोभत नाही. कृष्ण तुझी खोड मोडल्याशिवाय राहणार नाही. ही सर्व तयारी बंद कर. तुझे नाव वासुदेव आहे, तुझ्याजवळ शंख, चक्र, गदा व पद्म पण आहेत. तरी देखील तुला त्याची बरोबरी करता येणार नाही. तुझा गर्वभंग करायला कृष्ण वाट पहात आहे.

पौंड्र मोठ्याने हसला व म्हणाला–"आपण म्हणता ते खोडून टाकण्याचा मी यत्न केला तर मला शाप घाल. आणखी कोणाच्या तोंडून हे मी ऐकले असते तर

२३. पौंड्र वासुदेव वध













फुंकले गेले व रणवाद्ये वाजू लागली. त्या आवाजाने दश दिशा थरारल्या.

यादव, पौंड्र स्वारी करील हे ओळखून होते व म्हणून घोरत पडले नव्हते. युद्धाला सज्ज होते. मध्य रात्रीची वेळ असूनही चहूकडे मशालींचा उजेड दिवसासारखा होता. पौंड्रचे सैन्य आलेले पाहून यादव

[illegible]

पुढे सरसावले. थोडयाच वेळात उग्रसेन बलराम, सात्यकी, कृतवर्मा इत्यादी आप पल्या फौजा घेऊन पौंड्रच्या सैन्याशी यु करू लागले.

मी त्याचे तोंड फोडले असते व त्याला यमसदनी पाठविले असते. आपल्या जवळ वादविवाद करायला मला वेळ पण नाही. आतां आपण जावे."

नारदाने काहीच उत्तर दिले नाही. फक्त "नारायण, नारायण!" असे म्हणत निघून गेला. तो बद्रिकाश्रमात जाऊन कृष्णाला भेटला व पौंड्र युद्धाची तयारी करीत असल्याचे कृष्णाला सांगितले.

त्याच दिवशी रात्री पौंड्र एक मोठे सैन्य घेऊन द्वारकेवर चालून आला. सहस्त्रावधी मशालींच्या उजेडात वासुदेवाचे सैन्य द्वारकेच्या सिंहद्वारावर येऊन धडकले. शिंग

दुसऱ्या बाजूला पौंड्रच्या सैन्यातल एकलव्य नावाच्या एका शूर वीरा सात्यकी, कृतवर्मा, बलराम व कृष्ण यांच्या नावाचा उल्लेख करून त्यांना युद्धा समोर येण्यास आव्हान केले. यादववी त्याच्या समोर येतांच त्याने त्यांच्याव शरवृष्टी सुरू केली. मशालधारी आपापल्य मशाली फेकून धावरून पळू लागले यु क्षेत्रात सर्वत्र काळोख पसरला. पौंड्र जयघो करीत म्हणाला—"कोटाच्या भिंतीवर चढ निशाणे उपटून खाली खंदकात फेका आणि द्वारकेत शिरा." पौंड्रचा आवाज ऐकू सैन्यात नवीन उत्साह आला.



पौंड्रच्या सैन्याचा उत्साह वाढलेला पाहून क्रोधाने सात्यकीचे सर्व अंग थरथर कापू लागले. कारण नगराच्या रक्षणाची मुख्य जबाबदारी कृष्णाने त्याच्यावरच टाकली होती. कृष्णाच्या गैर हजेरीत शत्रूचा उत्साह वाढला हे आपल्याला ऐकावे लागणार व आपली मान खाली होणार. म्हणून आपल्या सैन्यातील सर्व शूर वीरांना उत्तेजना देत तो म्हणाला—"आता पहा, शत्रूचा नाश मी कसा करतो तो. नगर रक्षणाचा भार आपल्यावर कृष्णाने टाकला आहे, हे विसरून चालणार नाही."

असे सांगून सात्यकीने आग्नेयास्त्र सोडले. त्यामुळे चारी बाजूला आग लागली. ज्वाळा पाहून भिंतीवर चढू लागलेले पौंड्रचे सैनिक खाली उड्या मारून सैरावैरा पळू लागले. सात्यकीने त्याना संबोधन करून म्हंटले—"एका क्षत्रिय कुळात जन्म घेऊन धर्मविरुद्ध मध्यरात्रीच्या वेळी चोरासारखी स्वारी करणाऱ्या तुमच्या राजाला म्हणावे, ये समोर. पाहातो तुझा पराक्रम."

सात्यकीचे आह्वान ऐकून पौंड्र दात ओठ चावत पुढे येऊन म्हणाला—"अरे सात्यकी! तू आला आहेस होय माझ्याशी युद्धाला? छान, मग गंमतच बघायला





मिळणार म्हणावयाची! पण तो कृष्ण कोठे आहे रे? गाई चरायला घेऊन गेला आहे वाटते? स्वत:ला मोठा वीर म्हणवतो आणि छाती पुढे काढून ऐटीत चालतो. माझा प्रताप अजून त्याला कळलेला दिसत नाही! बायकांचा वध करणारा व गरीब मुक्या जनावरांना ठार करणारा माझे नाव धारण करून स्वत:ला वीर म्हणवू लागला आहे. त्या दुष्टाने माझा मित्र नरकासुर याचा वध केला आहे. म्हणून त्याचा सूड उगवण्यासाठीं मी आलो आहे. तुझ्या सारख्या पोरांशी युद्धाला मी नाही तयार. हसतील लोक मला. म्हणून समोरून दूर हो. नाहीतर तुला मी परलोकी पाठवीन आणि सर्व गवळ्यांचा गर्व भंग करीन. नगर रक्षणाचा भार तुझ्यावर टाकून तो स्वत: कैलास लोकी गेला आहे. त्याला परत येऊ तर दे. त्याचा समाचार पण घेणार आहे. त्याला जाणीव यावी म्हणून मी पहिल्याने तुला ठार करतो."

बराच वेळ दोघांचे वाक्‌युद्ध चालू होते. नंतर दोघांनी परस्परांवर शरवृष्टी सुरू केली. दोघांचे रथ तुटून गेले, धनुष्य बाण पण तुटून पडले. म्हणून दोघांमध्ये गदा युद्ध सुरू झाले. मुष्टिप्रहार पण झाला. दोघे जोडीचे योद्धे होते, यात शंका नाही. मरायचे तर दोघांनी बरोबर, अशा हमरी तुमरीने ते लढत होते. परंतु कोणी कोणाला ठार करणे अशक्य झाले. नंतर दोन्ही पक्षाच्या काही लोकांनी मध्ये पडून दोघांचे युद्ध थांबविले आणि दोघांना परस्परांपासून दूर केले.

त्यानंतर बलराम व एकलव्य यांचे द्वन्द्व युद्ध सुरू झाले. त्यात बलरामाने एकलव्याला खाली पाडले. तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. नंतर त्याने शत्रु सैन्य पळवून लावले. इतक्यात एकलव्य शुद्धीवर आला व बलरामाशी युद्ध करू लागला. त्यांचे युद्ध चालू असतांच सूर्योदय झाला.

पौंड्रने युद्ध बंद करण्यास आज्ञा केली व म्हणाला—"या सर्वांचा वध करून आपल्याला काय मिळणार? आपला खरा शत्रू येथे नाही. म्हणून हे युद्ध व्यर्थ ठरेल. कृष्णाला येऊ द्या. आम्ही आपला पराक्रम त्याला दाखवू. या भित्र्यांसमक्ष आपण आपला पराक्रम दाखविण्याची गरजच काय?" असे सांगून त्याने युद्ध बंद केले आणि कृष्णाची वाट पहात तेथेच बसला.

पौंड्रचे सैन्य युद्ध थांबवून मागे सरकू लागले. पौंड्र आपले सैन्य घेऊन त्याचा मित्र काशीचा राजा याच्याकडे गेला.

द्वारकेत यादवांनी जयघोष सुरू केला. कृष्णाच्या आज्ञेप्रमाणे नगराचे रक्षण करण्यात यश मिळाले याबद्दल यादव प्रमुखांना आनंद वाटला.

त्याच वेळी आकाश मार्गे कृष्ण येत असलेला त्यांना दिसला. नगराबाहेर गरुड-वाहनावरून कृष्ण उतरला. दारुक रथ घेऊन उभा होताच. कृष्ण त्या रथात बसून द्वारकेला आला. बारा वर्षांनंतर कृष्णाला भेटून यादव प्रमुखांना परमानंद झाला. कृष्णाने त्यांना आपल्या कैलास यात्रेचे



वर्णन करून सांगितले. यादवांनी कृष्णाला पौंड्रच्या स्वारीची गोष्ट सुरवातीपासून शेवटपर्यंत सांगितली.

कृष्ण द्वारकेला परत आल्याचे वर्तमान काशीला पौंड्रला कळले. त्याने आपला एक खास दूत कृष्णाकडे आपला निरोप द्यायला पाठविला तो निरोप असा—

"गाईंच्या मध्ये तू पोळासारखा वाढलास. तुला धर्म, न्याय, नीती काय कळणार? स्त्रियांचा, जनावरांचा व स्वत:च्या नातेवाइकांचा वध करून तू थांबला नाहीस. माझ्या नावाचा उपयोग करून माझी चिन्हेंच तू वापरू लागला आहेस. माझी



बरोबरी तुला कोणत्याही प्रकारे करता येणार नाही. तुला आणखी काही दिवस या जगात जिवंत रहावयाचे असेल तर माझी आज्ञा मानून चक्र आदि आयुधे सोड. माझे नाव यापुढे धारण करू नकोस व माझ्याजवळ येऊन शरण माग."

दूताच्या तोंडी पौंड्रचा तो निरोप ऐकून कृष्ण हंसला व म्हणाला–"मी तुझ्या राजाच्या म्हणण्याप्रमाणे वागायला तयार आहे. मला त्याने निमंत्रण पाठविले आहे, तर मी येतो. चक्र आदि सोडण्याचा सल्ला त्याने मला दिला. मी ते त्याच्यावरच सोडतो. शरण मागायला त्याने सांगितले आहे, मी त्यालाच शरण द्यायला तयार आहे. मोठ्या लोकांचा मान नको का राखायला?" असे सांगून कृष्णाने दूताला निरोप दिला.

दूताने परत येऊन उत्तर सांगितल्यावर पौंड्र काशी नगराबाहेर आपल्या साथी राजांना घेऊन ससैन्य युद्धाला तयार होऊन आला आणि कृष्णाची वाट पहात बसला.

कृष्ण निघालेला पाहून सात्यकी वगैरे यादववीर देखील ससैन्य त्याच्या पाठी-मागून निघाले. कृष्ण त्या सर्वांना थांबवून म्हणाला–"तुम्ही युद्धात विजयश्री एकदा मिळविली आहे. आता माझी पाळी आहे."

कृष्ण गरुडवाहनावर बसून पौंड्र होता तेथे येऊन पोंचला. दोघे वासुदेव समोरा-समोर उभे राहाले. कृष्ण पौंड्रला शांत आवाजात म्हणाला–"पौंड्रराज! माझी सर्व चिन्हे धारण करण्याची अभिलाषा तुझ्या मनात होती तर तू तशी इच्छा प्रगट करायला हवी होती. मी नकार दिला नसता. पण तू असा मूर्खपणा कां करावा हेच मला कळत नाही. अजून उशीर झाला नाही. माझ्याजवळ क्षमा माग; मी तुझे रक्षण करायला सिद्ध आहे. शरण आलेल्याचे रक्षण करणे हे माझे ब्रीद आहे. माझ्या

सुदर्शन चक्राला नरकासुरासारखे अनेक राक्षस बळी पडले आहेत. येथे तुझे मित्र म्हणून जे कोणी आले आहेत, त्यांच्या पैकी एकाच्या अंगात तुझे रक्षण करण्याची शक्ती नाही. मी तुझ्या हितासाठी मी सांगत आहे. शहाणपणाने माझे ऐक."

"माझीच चिन्हे तू धारण केलीस. म्हणून मी तुला दंड द्यायला आलो आहे. मी येणार आहे हे कळले म्हणूनच तू कैलास लोकीं पळून गेला होतास. तू द्वारकेला नाहीस हे पाहूनच मी तुझी द्वारका बेचिराख केल्या शिवाय परतलो. तू आता वेळेवर आला आहेस. यम तुझी वाट पहात आहे." पौंड्र कृष्णाला म्हणाला.

दोघे युद्धाला तयार झाले. कृष्णाने एका मागून एक पौंड्रची सर्व शस्त्रे तोडून टाकली. शेवटी सुदर्शन चक्राचा प्रयोग करून त्याचा वध केला. आपला मित्र कृष्णाच्या हाती मेला हे पाहून काशीचा राजा कृष्णाशी युद्ध करू लागला. कृष्णाने एक अस्त्र टाकून त्याला यमसदनास पाठविले. त्याचे डोके उडाले ते काशीच्या मध्य भागी जाऊन पडले.

अशा तऱ्हेने कृष्ण विजय मिळवून द्वारकेला परत आला.

काशीच्या राजाच्या मुलाला बापाच्या मरणाचे वर्तमान कळल्यावर त्याने सुडाच्या भावनेने अग्निहोत्र जागवले. तेव्हा होम-कुंडातून कृत्य नामक एक भयंकर राक्षस भूत प्रकट झाले व म्हणाले—"मला काय आज्ञा आहे?"

काशीच्या युवराजाने कृष्ण व त्याच्या साथीदारांना ठार करण्यास आज्ञा केली. कृत्य पिशाच द्वारकेला गेले. त्याला पाहून द्वारकावासी घाबरून पळू लागले. कृष्णाने त्या भुतावर आपले सुदर्शन चक्र टाकले. कृत्य काशीला परत निघाले. पण सुदर्शन त्याचा पाठलाग करीत काशीला आले आणि सर्व काशी नगर उध्वस्त करून टाकले.





# अरण्यपुराण

[ २६ ]

मौवलीचे दिवस गमतीत व आनंदात जाऊ लागले. जंगलात त्याचे सर्वच मित्र. सर्वांचे त्याच्यावर भावासारखे प्रेम होते. त्याच बरोबर सर्व त्याला भीत पण होते. तो दुसऱ्या अरण्यात कोठे निघाला की त्याचे चौघे भाऊ (लांडगे) त्याच्या बरोबर सावली सारखे असत. कधी कधी तो एकटाच हिंडे फिरे.

एकदा लांडगा व लांडगीण गुहेत निघून गेले. गुहेच्या तोंडावर मौवलीने एक मोठी शिळा आणून ठेवली. नंतर एक गाणे म्हटले, कोणी मेल्यावर म्हणतात तसे.

अस्वल म्हातारे होऊ लागले होते. त्याचे सांधे दुखत. त्याला हिंडणे फिरणे देखील अशक्य होऊ लागले होते.

पोलादी शिरा असलेला व लोखंडी स्नायू असलेला काळा वाघ देखील पहिल्यासारखा शिकारीच्या वेळी लांब लांब उड्या मारीत नसे. एकू सर्वात म्हातारा झाला होता. त्याची हाडे दिसू लागली होती. त्याला हिंडता फिरता येत नव्हते. त्याला मौवलीच खाणे-पिणे आणून देई.

सिओनीच्या लांडग्यांचा कळप मोडून गेला होता. त्या कळपातले लांडगे पांच वर्षांचे झाले तेव्हांच एकूने नवा नायक निवडून घ्यायला सांगितले होते. नायकाची निवड झाली व फावो त्यात जिंकला.

नंतर डोंगरावर सर्वांची सभा झाली; त्या सभेशी मौवलीचा काही संबंध नव्हता. तरी मौवली तेथे हजर होता. तो फावोच्या हून उंच जागी एका खडकावर एकूच्या शेजारी बसत असे. तो काही बोलू लागला की त्याचे बोलणे संपेपर्यंत मध्ये कोणी बोलत नसे.



त्या काळात शिकार करण्यास व झोपण्यास मनाई नव्हती, दुसरे प्राणी मौवलीच्या कक्षेतल्या रानात पाऊल टाकीत नसत. सभेच्या वेळी लांडग्यांच्या पिलांना आणून बजावून सांगत–"पहा! नीट पहा बरं का!" तेव्हा मौवलीच्या सर्वांगावर रोमांच येई. तशा सभांत तो अवश्य हजर राही.

एकदा मौवलीने सूर्यास्ताच्या सुमारास एका हरणाची शिकार केली. त्याचा अर्धा भाग घेऊन एकू जाऊ लागला. तेव्हा एक विचित्र आवाज ऐकू आला. वाघोबा मेला त्या नंतर इतका भयंकर आवाज कोणाला ऐकू आला नव्हता. शिकारीला जाणारे कोल्हे ओरडत. त्यांचे ओरडणें भयंकर वाटे. त्यात द्वेष, भय, निराशा इत्यादी भाव भासत. वैनगंगेच्या पलीकडच्या तीरावर हे ओरडणे चालू होते.

तो आवाज मौवलीबरोबर व त्याच्या पाठी मागून उड्या मारीत खेळत बागडत राहणाऱ्या त्याच्या भावंडांनी (लांडग्यांनी) पण ऐकला. सर्व जागच्या जागी थबकले. एका एकी मौवलीचा हात तलवारीच्या मुठीवर गेला. त्याचे डोळे लाल बुंद झाले. त्याच्या कपाळाला आंठ्या पडल्या–"येथे शिकार करण्याची हिंमत असणारा पट्टे वाला (वाघ) तर कोणी नाही?" मौवलीने विचारले.

"हा पट्टेवाल्याचा आवाज नाही. मोठ्या प्रमाणात जनावरांचा संहार चालू आहे. त्यांच्या ओरडण्याचा हा आवाज आहे. नीट कान उघडून ऐक." मोठा भाऊ म्हणाला.

तो आवाज पुन्हा एकदा ऐकू आला. मौवलीने एक दीर्घ श्वास घेतला व जनावरांची सभा होत होती तिकडे पळत निघाला. लांडग्यांच्या कळपातले लांडगे पण तिकडेच धावत निघाले. मौवली डोंगरांवर पोंचला तेव्हां फाओ व एकू तेथेच होते. पुष्कळ लांडगे तेथे जमा झाले होते. फक्त लांडगिणी व पिल्ले आपापल्या घराकडे [illegible] (गुहेकडे) निघाला होती. त्या परिस्थितीत बाहेर राहण त्यांच्या हिताचे नव्हते.





वैनगंगेचा कलकल आवाज, संध्याकाळचा झाडांच्या पानांचा फडफड आवाज या शिवाय रात्रीच्या वेळी दुसरे काही ऐकू येत नव्हते. थोड्या वेळा पुरती सर्वत्र शांती पसरली. परंतु इतक्यात पलीकडच्या तीरावरून लांडग्यांचा आवाज ऐकू येऊ लागला.

तो आवाज त्या कळपातल्या लांडग्यांचा नव्हता. कारण त्या कळपातले लांडगे सभेसाठी डोंगरावर जमले होते. हा कोणीतरी नवा लांडगा असला पाहिजे. बाहेरून कोठून तरी आला होता.

'भूत भूत' असे ओरडत एक म्हातारा लांडगा लंगडत लंगडत डोंगर चढून वर आला. तो घाबरलेला दिसत होता. तो धापा टाकीत होता. तो सरळ चालत आला व मौवली समोर त्याच्या पायावर पडून त्याचे पाय चाटू लागला. त्याच्या तोंडातून फेस निघत होता. त्याने अंग रक्ताने माखलेले होते.

"शिकार केली पाहिजे! तुमचा नायक कोण आहे?" फाओने त्याला विचारले.

"शिकार केली पाहिजे! मी एकटाच आहे." नवा लांडगा म्हणाला. म्हणजे तो कोणत्याहि कळपातला नव्हता. 'एकू' निघणार होता. त्याच्या सर्वांगाला घाम सुटला होता.

"बरं, तुझे काय म्हणणे आहे?" फाओने विचारले.

"भुते! दक्षिणेकडची भुते! तांबडे शिकारी कुत्रे! दक्षिण ओसाड पडले आहे. उत्तरेकडून आले आहेत. वाटेत संहार चालला होता. हा चंद्र मला सर्वांत










पहिल्याने जेव्हा दिसला त्यावेळी मला एक बायको व तीन मुले होती. मैदानात पिलांना ती शिकार करायला शिकवीत होती. मध्यरात्रीच्या सुमारास त्यांच्या शिकारीचा आवाज ऐकू आला. उजाडल्यावर पाहातो तर त्या चौघांची प्रेते होती. सूड घ्यायला निघालो व स्वतःच्या डोळ्यांनी त्या भुतांना पाहिले." तो म्हाताऱ्या लांडगा म्हणाला.

"किती होती?" मौवलीने विचारले.

लांडग्यांचा कळप ओरडू लागला.

"मला नाही माहीत. मी तिघांना पाहिले. त्यांनी मला पिटाळून लावले. पहा, मी तीन पायांनी पळत आलो आहे." तो म्हातारा लांडगा म्हणाला. त्याने आपला चवथा पाय पण दाखविला. तो निरुपयोगी झाला होता. त्याच्यावर रक्त गोठले होते. त्याच्या अंगावर व गळ्याला पण जखमा लागल्या होत्या.

मौवली 'एकूकरिता जी शिकार घेऊन आला होता ती समोर फेकून एकू म्हणाला—"हे खा!" तो गरीब लांडगा हरणाचा देह खाऊ लागला. आपली भूक भागवून घेऊन म्हणाला—"तुम्ही घातलेले हे अन्न फुकट जाणार नाही. थोडे बळ अंगात आल्यावर मी पण येतो तुमच्या-बरोबर शिकारीला. माझी बायको व पोरे. मेली, मी सूड उगवल्याशिवाय राहणार नाही.

त्याला दांत ओठ आवळून बोलताना पाहून फावो म्हणाला—"जबडे असावे तर असे. तर मग त्या भुतांच्या पाठोपाठ आणखी कोणी आहेत?"

"नाहीं! फक्त लाल शिकारी कुत्रीच आहेत. मोठी मोठी आहेत. दक्षिणेकडे सरडे खाऊन भूक भागवणारी आहेत. तरी आहेत गलेलठ्ठ व बळकट." तो लांडगा म्हणाला.



# ८०. मृत नगर - सेंट पियर

वेस्ट इंडीजच्या द्वीप समुहात मार्टिनिक नावाचे एक बेट आहे. त्यावर एक ज्वालामुखी आहे. त्यात ८ मे १९०२ या रोजी सकाळी ७-३० वाजण्याच्या सुमारास एक स्फोट झाला. त्याचा आवाज कित्येक शें मैलावर ऐकू आला. तीन मिनिटांच्या आत सेंट पियर हे नगर ज्वालामुखीच्या राखेखाली गडप झाले. त्या नगराच्या तीस हजार नागरिकांपकीं फक्त एक जिवंत राहिला. नगराच्या बंदरांत २८ जहाजे होती. त्यांतले फक्त एक वांचले. काही काळापूर्वी सेंट पियर शहराची निर्मिती पुन्हा करण्यात आली. हे शहर व्यापार व संस्कृतीसाठी सतत दोन शतके प्रसिद्ध होते. परंतु आज हे शहर गाढनिद्रेत झोपी गेलेले आहे.












नजीक नेपाळी सैन्याचा पराभव केला (१८१६ फेब्रुवारी २८). त्यानंतर कांहीं दिवसांनी तहाला मान्यता दिली.

ह्या संधीमुळे नेपाळी राज्यातला दक्षिणी सरहद्दीजवळचा सुपीक प्रदेश नेपाळसत्तेत राहाला नाही. गढवाल व कमाऊचे जिल्हे ब्रिटीश कंपनीला द्यावे लागले. सिक्किम-मधून सत्ता काढून घेतली व काठमांडू येथे ब्रिटीश रेसिडेंटला ठेवणे मान्य केले.

या संधीचा इंग्रजांना फार फायदा झाला. त्यांच्या राज्याची सरहद्द पश्चिमोत्तर डोंगराळ प्रदेशाला जाऊन भिडली. सिमला, मसूरी, अल्मोडा, नैनीतालसारखी पर्वतीय नगरे त्यांना मिळाली.

१० फेब्रुवारी १८१७ या रोजी इंग्रजांनी सिक्किमच्या राजाशी एक तह करून घेतला. या तहाप्रमाणे नेपाळच्या राजा-कडून मिळालेला प्रदेश इंग्रजांनी सिक्कि-मच्या राजाला दिला. याचा फायदा हा झाला की नेपाळ व भूतान या दोन्ही राज्यांमधल्या प्रदेशावर इंग्रजांना एक दोस्त राज्य मिळाले.

अशातऱ्हेने देशातली संस्थाने एकेक करून इंग्रजांच्या छत्राखाली येऊ लागली. हिंदुस्थान मध्यवर्ती प्रदेशातले पेंढारी व पठाण स्वाऱ्या करून अराजकता पसरवीत होते. राजपुतान्यात आपसातली भांडणे वाढत गेली.

पेंढाऱ्यांनी १८१५-१६ मध्ये निजामचे उत्तरी सरकारच्या राज्यात लुटालूट सुरू केली. वॉरन हेस्टिंग्स याने पेंढाऱ्यांची सुळसुळाट बंद पाडण्यासाठी एक योजना तयार केली आणि १८१८ जानेवारीपर्यंत त्यांचा पूर्ण विमोड केला. पेंढाऱ्यांसारखेच पठाणपण लुटालूट करीत होते. परंतु त्यांच्यावर आपला अंकुश रहावा म्हणून त्यांच्या नायकाला वळवून घेऊन त्याला एक छोटे राज्य देऊ केले.





# डाव उलटला

एका गावी सोन्याबापू नावाचे गरीब गृहस्थ रहात असत. उदरनिर्वाहाचा काही मार्ग दिसला नाही तेव्हां त्यांनी रामपुरी प्रस्थान केले. त्या गांवच्या लोकांचा देवावर फार विश्वास होता. त्या गावी सोन्याबापू वेष पालटून संतभक्तासारखे राहू लागले. गांवकऱ्यांनी सोन्याबापूची भक्ति पाहिली व त्यांच्या मनात सोन्या-बापू विषयी आदर वाढत गेला.

हळूहळू गावच्या देवळाची सर्व व्यवस्था गावकऱ्यांनी सोन्याबापूंच्या हाती दिली. ते गावकऱ्यांकडून फंड गोळा करीत व देवाचा कोणता तरी उत्सव दर आठ-वड्याला काढीत. अशातऱ्हेने सोन्याबापूंचे बस्तान छान बसले. पोटापाण्याची चिंता उरली नाही.

हळूहळू सोन्याबापूंच्या मनात पैशाचा लोभ वाढू लागला. हळूहळू पैसा गोळा करू लागले. त्यांनीं शिवरात्रि उत्सवाची तयारी सुरू केली.

शिवरात्रीच्या आधी एकदा सोन्याबापूंनी गावकऱ्यांना देवळाच्या आवारात एकत्र करून विनंती केली—"भक्त हो! उद्यापरवां शिवरात्र येते आहे. या शिवरात्रीला लक्षदीपोत्सव व्हावयाला हवा. रात्रभर लक्षदीप तेवत राहाले पाहिजेत. त्याच बरोबर भजन कीर्तनाची व्यवस्था पण करावी लागणार. ब्रह्मभोज देखील शेवटी झाला पाहिजे. आपल्या गावाचे नांव तीर्थ-क्षेत्र म्हणून जगभर प्रसिद्ध झाले पाहिजे."

सोन्याबापूंचा ठराव सर्व गावकऱ्यांना पसंत पडला. त्यांनी जवळपासच्या गाव-कऱ्यांकडून पण वर्गणी वसूल केली आणि शिवरात्री उत्सवाला हजर राहण्याची विनंती केली.




एका जत्रेचे रूप आले शिवरात्रि उत्सवाला. पहाटे पासून पूजा, पाठ, भजन, कीर्तनादिकास सुरवात झाली.

सोन्याबापूंना लोक शंकराचा आवतार मानू लागले. स्वत: गोपाळपण तेच मानू लागला होता. त्या दिवशी गोपाळ आला तेव्हां त्याला एका बाजूला नेऊन सोन्याबापू म्हणाले–"हे पहा गोपाळराव! आज देव तुमच्या अंगात येणार आहे. म्हणजे तुम्ही तसे नटले तरी पाहिजेच व देवाच्या तोंडचे शब्द म्हणून तुम्ही सांगावे की आजचा उत्सव संपल्यावर जी रक्कम उरेल ती माझ्या नावे गांवकऱ्यांनी लिहून द्यावी. कारण कोणाला कशी दुर्बुद्धी होईल कोणास ठाऊक?"

गोपाळच्या मनात सोन्याबापूंविषयी जो आदर होता तो पार लयास गेला. देवाच्या नावाने वसूल केलेले धन स्वत:च्या नावी लिहून टाकायला सांगतो आहे, लबाड! आज याची खोड मोडलीच पाहिजे.

रात्री लक्षदीप लावण्यात आले. सर्व देऊळ त्या ज्योतीच्या प्रकाशात सुंदर दिसत होते. कीर्तन चालू होते. भजन चालू असता सोन्याबापू व गोपाळ पण भजनांत निमग्न झाले.

तेवढ्यात सोन्याबापूंनी डोळ्याने खूण केली. लगेच गोपाळ जोराने ओरडला. भजन एकाएकी थांबले. गोपाळ शिवतांडव नृत्य करू लागला. सर्व ते दृश्य पाहून घाबरून गेले. पण सोन्याबापूंनी सर्वांना शांत केले व म्हणाले–"हे पहा, गोपाळच्या अंगात देव आला आहे. काल रात्री मला दृष्टांत झाला. देव म्हणाला, मी कोणत्यातरी रूपात प्रगट होणार आहे आणि देव अंतर्धान पावला. तो दृष्टांत यथार्थ झाला. शंकराला आपल्या पैकी कोणामध्ये काही दोष दिसला असावा."

नंतर सोन्याबापू गोपाळकडे वळून त्याला विचारू लागले–"प्रभो! आपल्या भक्ताच्या हातून काही अपराध घडला आहे का? आपल्या आज्ञेचे आम्ही डोळे झांकून अक्षरश: पालन करू."

गोपाळ बोलू लागला–"हे स्वामिद्रोही! मी स्वप्नात तुला आज्ञा केली होती. पण या पापाच्या खड्ड्यातुन बाहेर यायची तुझी इच्छा दिसत नाही. या सर्व भक्तांच्या समोर सत्य लपवून ठेवून मला राग यायला कारण झाला आहेस. आज पावेतो तू माझी सेवा करून पुष्कळ पुण्य मिळविले आहेस. आज माझ्या अदृश्य देहांत तुझा पंचभूतांचा हा देह लीन होण्यास उत्तम मुहूर्त आहे. तुला मी स्वप्नात सांगितले त्याप्रमाणे तू सजीव समाधी घे. तू आज्ञा भंग केली आहेस." असे सांगून गोपाळ बेशुद्ध स्थितीत जमिनीवर पडला.

काही वेळाने त्याला शुद्ध आली. तो पर्यंत सर्व भक्त सोन्याबापूला घोळका करून विचारू लागले–"काय हो, हे सर्व तुम्ही कां नाही आम्हांला सांगितलेत? देवाची आज्ञा मोडलीत! त्याचे फळ तुम्हांला मिळेल ते मिळेल, आम्हां गावकऱ्यांना पण




देवाचा कोप सहन करावा लागेल. तुमच्या सारखा भाग्यवान कोण असणार? स्वत: देवाने तुम्हांला प्रेमाने बोलाविले आहे. तेव्हां आम्ही तुमचे अभिनंदन करतो."

नंतर काही गावकऱ्यांनी एक खड्डा खणला. सोन्याबापूंचे हातपाय कापू लागले. गोपाळने त्यांना फसविले होते. म्हणून एका बाजूला राग तर दुसऱ्या बाजूला प्राणभय. ते थरथर कापू लागले. तेवढ्यांत एक जण येऊन म्हणाला–"यावे! समाधीप्रवेशाची तयारी झाली आहे."

पण सोन्याबापू म्हणाले–"मी हाती घेतलेले काम पुरे करून समाधी घेणार

     



आहे. घाई कसली? मी गेल्यावर या गावावर मोठ मोठे प्रसंग येतील. म्हणून मला काही तजवीज केली पाहिजे."

गावकऱ्यांना सोन्याबापूंच्या बोलण्याचा राग आला. म्हणाले—"तू कसला भक्त रे! देवाने स्वत: बोलाविले व तू पाय मागे घेतोस? देवाने आपला तिसरा डोळा उघडला तर तुझ्याबरोबर आम्ही सुद्धा भस्म होऊन जाऊ. आम्ही तुझे एक देखील ऐकणार नाही."

सोन्याबापूंच्या अर्वांगाला घाम सुटला. ते सर्व पहात असता गोपाळचे पाय धरून म्हणाले—"गोपाळ! तूंच वांचविलेस तर हा जीव वाचणार?"

सोन्याबापूंनी गोपाळचे पाय कां धरले, लोकांना कळेना. तेव्हां गोपाळ म्हणाला— मी खरी गोष्ट सांगतो ती ऐका! सोन्याबापू आपल्या गावी पोटापाण्यासाठी भक्ताचे सोंग करून आले. आपण त्यांचे सत्य रूप ओळखले नाही. त्यांनी धनलोभाने पैसे जमा करण्याचा उद्योग सुरू केला. त्या-साठीच त्यांनी निरनिराळे उत्सव योजले. शिवरात्रीचा उत्सव त्यासाठीच होता. त्यांनी मला देव अंगात येण्याचे सोंग करायला सांगून देवाचे सर्व धन आपल्या नांवी लिहून देण्यास सांगावे असे सांगून ठेवले होते. हे सर्व मी आधी सांगितले असते तर तुमचा माझ्या बोलण्यावर विश्वासच बसला नसता. पण आतां सर्व वस्तुस्थिती उघड झाली आहे."

सोन्याबापूनी गोपाळ जे म्हणाला ते सर्व खरे असल्याचे कबूल केले. ज्या गृहस्थाचा सर्वांनी इतके दिवस आदर केला त्याला शिक्षा करण्याचा विचार कोणाच्या मनाला शिवला नाही. परंतु सोन्याबापू स्वत:च गांव सोडून निघून गेले.





रूप घेतले आहे. त्याला याच रूपात पकडून ठार करून जाळून टाकूया."

पडक्या देवळाच्या पुजाऱ्याच्या अपूर्व चातुर्याच्या गोष्टीवर शिखीमुखला विश्वास बसला होता. तो अस्वलाचे रूप घेऊन पळत असल्यास नवल नाही. नागजातीचा विश्वास त्याच्या अपूर्व शक्तीवर आहे. म्हणून हे भोळे भावडे नाग अस्वलाला पाहून अस्वलाच्या रूपात पुजारीच असल्याचे समजून फसल्यास नवल नाही.

असे समजून शिखीमुखने आपल्या लाल कुत्र्याला 'छू' करून अस्वलावर सोडले आणि म्हणाला—"विक्रम! तुम्ही सर्व जण जाऊन त्या अस्वलाला पकडा. लट्टूसिहाच्या अनुयायांनी सांगितल्याप्रमाणे अस्वलाच्या रूपांत तो पुजारी असू शकेल. असो किंवा नसो, निदान आतां तरी त्यांना राग येईल असे वागून भागणार नाही. मी तिकडे, तो गुहेत लपून बसलेला तर नाही, ह्याची खात्री करून घेतो." असे सांगून शिखीमुख गुहेत शिरला.

गुहेचा काना कोपरा लक्षपूर्वक पाहाल्या-नंतर शिखीमुखला काही खुणा दिसल्या. त्यांवरून पुजारी त्या गुहेत काही दिवस का होईना, राहाला असेल, या गोष्टीचा त्याला संशय राहाला नाही. गुहेच्या एका कोपऱ्यात वाघाचे कातडे अंथरलेले होते. दुसऱ्या कोपऱ्यात काही भांडी व चुली दिसल्या. चुलींच्या बाजूला दोन मशाली तेलात भिजवलेल्या दिसल्या.

शिखीमुखने प्रत्येक भिंत व जमीन ठोकून वाजवून खातरी करून घेतली की पळून जायला कोठून चोर वाट तर नाही. तो पुष्कळ आधी निघून गेला होता व फार चातुर्याने त्याने गुहेच्या तोंडावर अस्वलाचा उपयोग केला होता.

पडक्या देवळाच्या पुजाऱ्याच्या चातुर्याचे शिखीमुख कौतुक करीत उभा असता त्याला एकाएकी विक्रमकेसरीची आरोळी ऐकू आली. तो लगेच गुहेबाहेर आला. अस्वलाला उंच खडकांच्या कोंडीत कोंडून नागलोक त्याच्या गळ्यात दोरीचा फांस घालण्याच्या प्रयत्नात होते. लाल कुत्रा त्या खडकांमधून पळून जायला जो पळवाट होती तिच्या तोंडाशी पलीकडच्या बाजूने भुंकत होता. अस्वलाला पळून जाणे अशक्य होते.



विक्रमकेसरी शिखीमुख जवळ येऊन हळूच म्हणाला—"शिखी! हे काळे अस्वल आहे, पुजारी नाही, हे मला नक्की कळत आहे. परंतु या मूर्ख नागलोकांच्या बोलण्या-वर विश्वास केला नाही तर आपण विनाकारण यांना दुखविल्या सारखे होईल. ही गोष्ट हे लोक आपला नायक लट्टूसिह याला सांगितल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणतील—"आम्ही सर्व माहीत असून ही जाणून बुजून अस्वलाच्या वेषांतल्या पुजाऱ्याला सोडले. पुजाऱ्याच्या मंत्रातंत्रावर लट्टूसिहाचा पूर्ण विश्वास आहे, हे पण आपणां सर्वांना माहीत आहे."

"पण मला तसे वाटत नाही. पुजाऱ्या-मुळे लट्टूसिह संकटात सांपडला. तेव्हां पासून पुजाऱ्यावरचा त्याचा विश्वास



उडाला आहे. उलट तो पुजाऱ्याचा तो द्वेष व घृणा करू लागला आहे. ते काही असो, डोंगराखाली पाहारा देणाऱ्यांना पुजारी या गुहेतून निघून गेल्याची गोष्ट नक्कीच माहीत नसणार. आणि हे अस्वल या गुहेत रहात आहे. याला धरून घेऊन जाऊन लट्टूसिह व बाबांना आपण दाखवू या. नंतर आपण पुजाऱ्याचा शोध काढू." शिखीमुख म्हणाला.

शिखीमुखने उंच खडकावर चढून अस्वला-कडे न्याहाळून पाहिले. ते डोळे वटारून लोकांना भेडसावीत पळून जाण्याच्या तयारीत होते.



शिखीमुखने एकदा चहूकडे दृष्टी फिरविली. दूर झाडीत झाडांवर जंगली वेली लोंबत होत्या. त्या ओढून त्यांची दोरी वळून दोरीचा फास अस्वलाच्या गळ्यांत टाकून ओढला. तो फास, अस्वल त्यात जास्त अडकत जाईल अशा बेताने ओढण्यात आला. अस्वल दोरी दोन्ही हातांनी धरून ती तोडू लागले. शिखीमुखने सर्वांना सावध करून दोघातिघां नागलोकांना वर खडकावर पाठवून दोरी वर ओढायला सांगितले. त्यामुळे अस्वल जमिनीवरून एक दोन फूट वर उचलले गेले. शिखीमुखने ते असहाय अवस्थेत असतांना त्याच्या तोंडांत एक दोर टाकून तो दोर जोराने आवळला. त्यानंतर अस्वलाला हालता डुलता येईना.

शिखीमुख व विक्रमकेसरीने त्या अस्वलाला शिताफीने खडकांच्या कोंडीतून बाहेर काढले. नंतर दोरखंडे नागलोकांच्या हातात देऊन म्हणाले–"चला आतां शबरांच्या वस्तीकडे. तुमचा नायकच सांगेल की हा पुजारी आहे की हे अस्वल आहे."

अस्वलाला घेऊन सर्व शबरांच्या वस्तीपर्यंत आले. तेव्हां गांवातल्या बायका व मुले 'पुजारी अस्वल' 'पुजारी अस्वल' असे ओरडत त्याच्या मागून येऊ लागले. जिवाजी व लट्ठूसिंह गांवाच्या वाड्यात बसले होते.

जिवाजीला बाहेर गडबड ऐकू आली तेव्हां त्याने बाहेर येऊन पाहिले. शिखीमुखला व अस्वलाला पाहून त्याने विचारले–"हे काय घेऊन आला आहेस? तो बदमाश पुजारी गुहेत नव्हता का?"

"पुजारी गुहेतून केव्हांच पळून गेला. ही गोष्ट पाहारेकऱ्यांना कळू नये म्हणून त्याने गुहेत या अस्वलाला बांधून ठेवले होते." शिखीमुखने आपल्या समजुतीप्रमाणे जिवाजीला सांगितले. थोडा वेळ विचार करून तो पुन्हा आपल्या बापाला म्हणाला–"लट्ठूसिंहाच्या अनुयायांना वाटते आहे की हे अस्वलच पुजारी आहे. म्हणून याला पकडून आणले आहे. तेव्हां लट्ठूसिंहाने एकदां या अस्वलाला पाहून घेतले तर बरे होणार आहे. त्याने सांगितले तरच त्याच्या नाग अनुयायांना हे अस्वल आहे की पुजारी हे कळेल."

त्याच वेळी लट्ठूसिंहाचे दोन अनुयायी त्याला आपल्या खांद्यांचा आधार देऊन बाहेर घेऊन आले. त्याने आपल्या अनुयायांकडून सर्व हकीकत ऐकून घेतली व अस्वलाकडे खोल नजरेने पाहून म्हणाला–"पुजारी काय वाटेल ते करील. मी या अस्वलाला घेऊन जाऊन माझी मुलगी नागमल्ली हिच्याकडे ठेवतो. नागमल्लीच्या हातातली बरछी पाहून हे अस्वल खरे काय ते बोलेल. नंतर आपल्या अनुयायांकडे वळून तो म्हणाला–"आपण सर्वांनी सावध राहले पाहिजे. तो पुजारी कुत्रा जंगलात फिरत असल्यास आश्चर्य नाही. आपल्या सर्व नाग अनुयायांना सावध करा. त्या दुष्ट पुजाऱ्याला पकडले पाहिजे."

लट्ठूसिंहाचे अनुयायी त्या अस्वलाला धरून तेथून निघून गेले. तेव्हां जिवाजीने मोठ्या प्रेमाने लट्ठूसिंहाची पाठ थोपटून म्हटले–"बरे तर लट्ठूसिंह! आम्ही जातों





आपल्या गावी. त्या दुष्ट पुजाऱ्याने आपल्या परस्परांमध्ये फुकटाची एक भिंत उभी केली होती. आता हे सर्व आपण विसरू या. तुझ्या जखमा लवकर भरून येतील, याची मला खात्री आहे. माझ्या मुलाने घाईघाईत जे केले त्याबद्दल मला वाईट वाटते."

जिवाजीचे ते शेवटचे वाक्य ऐकून लट्टूसिंह जोराने हसला व म्हणाला– "तरुण वयात घाई केली नाही तर उतार वयात करतो का कोणी? मी देखील त्याच्या वयाचा असताना आपल्या सासऱ्याच्या बाबतीत घाईच केली होती की! माझी पोरगी नागमल्लीकडे पहा, तिच्या समोर हा पोर थोडा नरमच वाटतो मला तरी. तुम्ही सर्वांनी आज रात्री माझ्या गावी मेजवानीला हजर राहिले पाहिजे. तोपर्यंत त्या पुजारी कुत्र्याचा शोध सुद्धा कदाचित लागेल."

लट्टूसिंहाचा सत्कार स्वीकार करणे बरोबर होईल की नाही हे विचारण्याच्या हेतूनेच जणुकाही जिवाजीने आपल्या मुलाकडे व विक्रमकेसरीकडे पाहिले. ते दोघे काही बोलले नाहीत. पण त्यांची नजर लट्टूसिंहावर खिळून होती. त्यांना लट्टूसिंहाचा यात काही डाव तर नसेल अशी शंका वाटत होती.

जिवाजी काय उत्तर देतो हे पाहण्यासाठीच की काय लट्टूसिंह म्हणाला– "एका जातीच्या नायकाने जेवायला बोलावणे दिले व दुसऱ्या जातीचा नायकाने त्याला नकार दिला ही गोष्ट माझ्या उभ्या आयुष्यात मी कधी पाहिली नाही. मी कधी ऐकली पण नाही."

"ठीक, लट्टूसिंह! बरे तर आम्ही सर्वच येऊ शकणार नाही. मी, शिखीमुख, विक्रमकेसरी व माझे चारपाच अनुयायी एवढे येऊ. बाकी लोकांनी काळोख पडण्यापूर्वी आमच्या गावी पोचले पाहिजे. कारण तो पुजारी आम्ही सर्व इकडे गुंतलो की तिकडे हल्ला करणार नाही कशावरून?" जिवाजी म्हणाला.

"बरोबर आहे, तुझे म्हणणे, जिवाजी! त्या दुष्टाची हाडे मोडल्याशिवाय माझ्या मनाचे समाधान होणार नाही. बरे तर, निघू या." लट्टूसिंह म्हणाला.

जिवाजीने आपल्या अनुयायांपैकी चार पांच जणांना मागे रहायला सांगितले आणि इतर सर्वांना शबरवस्तीत जाऊन रात्रभर सावध रहायला सांगून पाठविले. नंतर लट्टूसिंहाच्या अनुयायांनी आपल्या नायकासाठी एक डोली तयार केली व तिच्यात त्याला बसवून डोली उचलून आपल्या गावाकडे निघाले. जिवाजी, शिखीमुख, विक्रमकेसरी व इतर शबर त्यांच्या बरोबर पाठोपाठ चालू लागले.

समोर एक तास चालत राहिल्यानंतर ते नागलोकांच्या गावात आले. गावाच्या मध्यभागी लट्टूसिंहाच्या घरासमोर वस्तीतले लोक जमा होऊन हसत खिदळत असलेले दिसले. जिवाजीला वाटले की बहुतेक त्यांनी पुजाऱ्याला धरून आणले असावे. परंतु तेथे गेल्यावर त्याला लट्टूसिंहाची मुलगी नागमल्ली अस्वलाकडून पुष्कळ गमती जमतीचे खेळ करवीत असलेली दिसली.




जिवाजीने चकित होऊन लट्टूसिंहाला विचारले–"इतक्या लवकर तुझ्या मुलीने या जंगली जनावराला ताळ्यावर आणून माकडासारखे नाचवायला कशी काय सुरुवात केली बुवा?"

"आमच्या नागलोकात "घाडस्च मोठे वैभव आहे" अशी एक म्हण आहे. माझी ही पोरगी साहस दाखविण्यात माझी बरोबरी करते. तुझा मुलगा हिची बरोबरी करू शकेल की नाही, एवढीच शंका



मला वाटते. मी म्हटले त्याचा राग नको मानूस जिवाजी बरं का!" लट्ठूसिह प्रेमाने आपल्या मुलीकडे पहात म्हणाला.

नागमल्लीने बापाला पाहताच अस्व-लाच्या गळ्यातली दोरी फेकून दिली व आपल्या बापाला जाऊन मिठी मारून म्हणाली–"बाबा! तुम्हांला चालता येत नाही ना? कोणी म्हणाले, तसे जास्त लागले नाही ना?"

"तसे जास्त लागले नाही, मुली! पण डाव्या पायाला थोडे..." असे म्हणत हसत शिखीमुखकडे बोट दाखवून लट्ठूसिह म्हणाला–"या वीराला डोलीवर चढवणारा हा वाघ कोण आहे, माहीत आहे का? याचे नाव शिखीमुख! दिसायला भोळा गरीब दिसतो, पण आहे धाडसी, काय पण हिंमत! वा:!"

नागमल्लीने शिखीमुखकडे पाहिले. क्षणार्धात तिच्या डोळ्यात आलेले पाणी वाळून गेले. रागाने तिचे डोळे लाल झाले. खालच्या ओठावर वरचे दांत गेले. नाकपुड्या फुगीर दिसू लागल्या. ती काही बोलणार, पण लगेच तिने तोंड फिरवले.

विक्रमकेसरी हे सर्व लक्ष देऊन पहात होता. शिखीमुखच्या कानात म्हणाला– "लट्ठूसिहाने एकदम जेवण देण्याचे ठरविले, त्याचा गूढ अर्थ काय असावा याचा आपण विचार करीत होतो. फार तर तो विष घालण्याच्या विचारात असेल. परंतु त्याची पोरगी फणफणलेली दिसते आहे. ती सूड घेण्याचा विचार करीत असावी थोडा संभाळून रहा."

शिखीमुख काही बोलणार इतक्यात मोकळे सुटलेले अस्वल गुरगुरत समोर जो दिसला त्याला आपला पंजा मारून खाली पाडू लागले. नागमल्ली व शिखीमुख "दूर व्हा, दूर व्हा!" म्हणत अस्वलाच्या मागे धावले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# चोरटे सोने

विक्रमार्कांने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला आणि प्रेत खांद्यावर काढून घेऊन स्मशानाच्या दिशेने मौन पणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बस-लेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझा हा सर्व यत्न चांगला असू शकेल. परंतु सत्प्रयत्नांचा परिणाम वाईट होण्याची शक्यता आहे. या गोष्टीस एक उदाहरण म्हणून मी तुला सा.यक्रीची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी सप्तपुर नावाच्या गावी शतकंठ नावाचा राजा राज्य करीत असे. ते राज्य तसे वैभवशाली नव्हते. अर्थातच

प्रजा पण गरीबच होती. म्हणुन 'राजा आपल्या ऐपतीप्रमाणे प्रजेच्या सुखरोयी भागवीत असे. प्रजा पण त्याबद्दल आपल्या राजाची स्तुती करी.












सप्तपुर राज्यात तशी मोठी व्यापाराची मोठी पेठ नव्हती की व्यापार पण भरभराटीचा नव्हता. तरी काही साहसी व्यापाऱ्यांनी त्या गावी आपल्या पेढ्या काढल्या व समुद्रापलीकडे दूरवर व्यापार करून पुष्कळ धन मिळविले. परंतु त्यांनी मिळालेले सोने राजाच्या दृष्टीस पडू नये असे गुप्तपणे ठेवले. कोट्यावधी रुपयांची प्राप्ती राजाला झाली असती ती होऊ शकली नाही. म्हणून राजाने सर्व व्यापाऱ्यांना, त्यांच्याजवळ जे धन आहे त्याची यादी करून पाठविण्यास कळविले. यादी पेक्षा जास्त धन त्याच्याकडे निघाल्यास ते जप्त केले जाईल असे पण राजाने जाहीर केले.

व्यापाऱ्यांनी त्यांच्याकडे जे धन होते त्याची यादी तयार करून राजाकडे पाठविली. परंतु त्या यादीत उल्लेख करण्यायोग्य गोष्टीच त्यांनी वगळल्या म्हणून राजाने त्यांना विचारले–"तुमचा व्यापार समुद्रापलीकडच्या देशांशी होतो आणि तुम्हांला नफा काहीच होत नाही वाटते?"

"महाराज! नफा होतो ही गोष्ट खोटी असे नाही आम्ही म्हणत. परंतु तो नफा काय कामाचा? एक जहाज बुडाले की जो नफा पूर्वी मिळाला असतो त्याच्या दामदुप्पट तोटा सोसावा लागतो. दर्यावर्दी चाचेगिरी करणारे जहाजे लुटतात, खलाशी बंडे करतात. कधी कधी इतकी मंदी येते की तोटा सोसून माल विकावा लागतो. पण हे सर्व कष्ट कोणा जवळ बोलणार?" व्यापाऱ्यांनी उत्तर दिले.

व्यापारी जे म्हणाले ते सर्व खोटे आहे, असे राजाला वाटले. त्यांनी लपवून ठेवलेले सोने बाहेर यावे म्हणून राजाने पुष्कळ प्रयत्न केले, पण ते सर्व फोल ठरले.

सप्तपूर गावी सात्यकी नावाचा एक हुशार नागरिक रहात असे. त्याची घरची स्थिति बेताचीच होती. परंतु तो फार चतुर होता. व्यापाऱ्यांनी धन लपविले आहे व राजाने सर्व प्रयत्न करून हात टेकले हे सर्व तो पहात होता. राजाला वाटे तसेच सात्यकीला वाटे की व्यापाऱ्यांनी आपले गुप्त धन राजाला किंवा इतर कोणाला ही कळू नये अशा तऱ्हेने कोठे तरी दडवून ठेवले आहे. म्हणून सात्यकीने एक सामान्य लहान व्यापाऱ्याचे सोंग केले आणि मोठ्या व्यापाऱ्याची लहानमोठी सर्व कामे करून देऊ लागला. हळूहळू सर्व व्यापाऱ्यांचा त्याच्यावर पूर्ण विश्वास बसला. नंतर त्यांच्या गुप्त गोष्टी व ते आपसात बोलताना जे खुणेचे शब्द







वापरत त्यांचा अर्थ त्याला चांगला कळू लागला.

नंतर सात्यकी प्रत्येक व्यापाऱ्याकडे किती व कोठे धन गुप्तपणे पुरून ठेवलेले आहे हे पाहून घेऊ लागला. पुढे काही दिवसांनी व्यापाऱ्यांनी इतके काळजी पूर्वक लपवून ठेवलेले सोने नाहीसे होऊ लागले. ते सोने राजाला कळू नये ह्या हेतूने पुरून ठेवले असल्या कारणाने चोरी झाल्याची फिर्याद राजाकडे घेऊन जाणे व्यापाऱ्यांना शक्य नव्हते.

सात्यकीने चोरून नेलेले सोने स्वत:जवळ ठेवले नाही, तो वेष पालटून गरिबांच्या घरात खिडकीतून टाकी. हळूहळू गरिबांच्या घरी देखील सोने झाले व ते आले कसे हे रहस्य कोणाला कळेना. असे बरेच दिवस चालू होते.

राजाच्या कानावर ही गोष्ट गेली. राजाने ज्याच्या ज्याच्याकडे सोने सापडले त्यांना धरून आणायला आपल्या शिपायांना पाठविले. प्रत्येकाने सोने कोठून व कसे आले, हे त्यांना माहीत नसल्याचे सांगितले.

व्यापाऱ्यांनी पुरून ठेवलेले सोने कोणी-तरी चोरून नेतो व गरिबांना वाटून टाकतो हे राजाने ओळखले. पुरून ठेवलेले सोने बाहेर काढणे कठीण होते, पण ते प्रजेला वाटणाऱ्याला पकडणे कठीण नव्हते. म्हणून राजाच्या शिपायांनी सात्यकीला पकडले.

चोरीच्या आरोपावर सात्यकीला राजाने चवकशी करून तुरुंगात टाकले. त्याला पकडून तुरुंगात टाकल्यानंतर चोरी व्हायची बंद झाली व सोने वाटण्याचे काम पण बंद पडलेले दिसले. यावरून सात्यकी एकटाच चोर होता हे पण स्पष्ट झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"शतकंठ राजाने सात्यकीचा जाहीर सन्मान न करता त्याला सामान्य चोरा-सारखी शिक्षा कां केली? राजा स्वत:च चोरटे सोने बाहेर काढू शकला नाही, ते चातुर्याने बाहेर काढून गोरगरिबांना व प्रजेला वाटणाऱ्या सात्यकीला एक सामान्य आरोपी मानून शिक्षा करण्याचे काय कारण असू शकेल, हे नाही कळले मला. या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याची शिक्षा तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

राजा विक्रमार्क म्हणाला—"सात्यकीचा अपराध, त्याने सोने चोरले हा नव्हेच. त्याचा अपराध त्याने ते सोने राजा-कडे जमा न करता प्रजेला स्वखुशीने वाटले हा होय. प्रजेच्या योगक्षेमाची जबाबदारी राजावर असते. तो अधिकार सात्यकीने आपल्या हाती घेतला. नंतर व्यापाऱ्यांना आपल्या बाजूला करून घेणे पण राजाला साहजिकच जास्त आवश्यक वाटले. कारण ते अनुकूल असतील तर व्यापाराची भरभराट होईल व करवाढ करून प्रजेला सुखी करणे शक्य होईल. त्यापूर्वी व्यापारी राजाला कळविल्याशिवाय सोने चोरून ठेवीत होते. सोने वाटून टाकण्यापेक्षा जमा करून राज्याच्या भर-भराटी साठी त्याचा उपयोग करणे जास्त आवश्यक होते. सात्यकीला सोने चोरून आणणे फक्त माहीत होते. पण व्यापाऱ्यांना सोने कसे मिळवावे हे कळत होते. म्हणून त्याना स्वत:कडे वळवून घेणे जास्त फायद्याचे होते. काही व्यापाऱ्यांनी पुन्हा धन लपवून ठेवण्याचा विचार केला तर सात्यकीला तुरुंगातून सुटका देऊन त्यांचा चोरटा व्यापार उघडकीला आणणे राजाच्या हातात होते. या सर्व गोष्टींचा विचार करू नच राजाने सात्यकीला शिक्षा केली होती."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)















# भुतांचा दरबार

जपान देशातील लोक आपल्या प्राचीन काळातील वीरांचे पोवाडे गात असत. त्या वीर गाथात एका शूर जपान्याची गाथा होती. शत्रूशी समुद्रावर युद्ध करीत असता त्याला वीरगती मिळाली होती. त्यावेळी त्याच्या बायकोने शत्रूच्या हाती कैद झाल्यास ते अपमानस्पद होईल असा विचार करून आपल्या लहान मुलाला कडेवर घेऊन समुद्रात उडी मारून जीव दिला.

होल्बी नांवाचा एक आंधळा भिकारी आपल्या तुणतुण्यावर असेच पोवाडे गाई. त्याला त्या धंद्यावर पोटा पाण्यापुरेसे पैसे मिळत. जे थोडे जास्त पैसे मिळत ते लपवून ठेवायला त्याला घरदार काही नव्हते. म्हणून तो एका बौद्ध मठाच्या अधिकाऱ्याच्या कृपेने मठाच्या ओसरीत त्याच्याकडे जे काही सामान होते ते सर्व घेऊन रहात असे.

एक दिवशी संध्याकाळी सूर्यास्ताच्या सुमारास मठात कोणी नव्हते. सगळीकडे शुकशुकाट होती. होल्बी ओसरीच्या खांबाला टेकून गुणगुणल्यासारखे गाणे म्हणू लागला. त्या वेळी अचानक कोणी तरी आला व होल्बीचा हात धरून म्हणाला–"होल्बी! तू फार छान गातोस असे आमच्या महाराजांना कळले आहे. त्यांनी तुला बोलावून आणण्यासाठी मला पाठविले आहे. चल जाऊ या."

राजाने बोलाविले आहे तर जाणे भाग आहे असा विचार करून होल्बी त्या मनुष्याचा हात धरून चालू लागला. आता ते दरबारात पोचले असल्याचे होल्बीने ओळखले. कारण त्याला स्त्रियांच्या कपड्यांचा फरफर असा आवाज ऐकू आला व त्याच्या पाठोपाठ उच्चकुळातल्या स्त्रिया लावतात त्या अत्तराचा वास पण आला.

होल्बीला एका उच्चासनावर बसविण्यात आले. 'समुद्रावर झालेल्या युद्धात वीरगती प्राप्त झालेल्या वीर पुरुषाची गाथा म्हणून' असा एका स्त्री कंठातून आलेला हुकूम होल्बीला ऐकू आला. त्याप्रमाणे आपल्या खड्या आवाजात होल्बी आवेशाने पोवाडा म्हणू लागला. त्याचा तो पोवाडा ऐकून गायला सांगणारी स्त्री रडत असल्याचे त्याला ऐकूं आले. त्या पोवाड्यातल्या वीर पुरुषाची बायकोच ती स्त्री होती, ही गोष्ट होल्बीला माहीत नव्हती.

होल्बीला हात धरून घेऊन येणारा त्याला पुन्हा बौद्ध विहारात पोचता करून म्हणाला–"असाच एक आठवडाभर रोज येऊन गाणे म्हटलेस तर आमचे महाराज तुला मोठे इनाम देणार आहेत." असे सांगून तो मनुष्य निघून गेला.

असेच तीन चार दिवस होल्बी रोज दरबारात जाऊन आला. रात्री तो ओसरीत नसतो हे बौद्ध विहाराच्या अधिकाऱ्याला कळले. हा आंधळा रात्रीच्या वेळी कोठे बरे जात असेल, जरा बरोबर जाऊन पाहून तर या असे सांगून त्याने त्या कामावर आपल्या दोघां नोकरांचा नेमले.

संध्याकाळी सहा वाजण्याच्या सुमारास होल्बी स्वतःच उठून जोरजोराने जात















असलेला पाहून नोकरांना आश्चर्य वाटले. तो कोणाचा तरी हात धरून चालल्या-सारखा दिसे, पण हात धरून नेणाराव्यक्ति मात्र दिसत नव्हता. ते होल्बीच्या पाठोपाठ स्मशानात गेले. तेथे होल्बी एका उंच दगडावर बसून आपल्या तुणतुण्याच्या सुरात गाणे म्हणू लागला. ते पाहून नोकर होल्बीच्या जवळ गेले. दोघांनी त्याचा एकेक हात धरला व त्याला बौद्ध विहाराच्या अधिकाऱ्यासमोर आणून उभे केले. होल्बीने चार पांच दिवस जे घडले ते जसेच्या, तसे सांगितले. ते सर्व ऐकून अधिकाऱ्याला जुना इतिहास आठवला. प्राचीन काळात जी युद्धे झाली ती युद्धभूमी बौद्ध विहाराच्या शेजारीच होती. त्या स्मशानात राहणारे त्या वीर पुरुषांचे प्रेतात्मे आपली वीर गाथा रोज ऐकायला म्हणून होल्बीला बोलावून नेत असणार. असा विचारकरून विहाराचा अधिकारी म्हणाला–"होल्बी, तुला रोज बोलावून नेणारी भुते आहेत. त्यांच्याशी तू मैत्री वाढविलीस तर ते तुझा सर्वनाश करतील." ते ऐकून होल्बी घाबरला.

अधिकाऱ्याने होल्बीला धीर दिला व म्हणाला–"या खेपेस तो मनुष्य तुला घेऊन जायला आला की तू त्याच्याशी बोलूच नकोस." असे सांगून त्याच्या सर्व अंगावर त्याने काही तरी मंत्र लिहून ठेवला.

पण तो त्याच्या कानावर मंत्राक्षर लिहायला विसरला. म्हणून होल्बीला घेऊन जाण्यासाठी जेव्हां भूत आले तेव्हां त्याला होल्बीच्या कानाशिवाय दुसरे काही दिसले नाही. म्हणून त्या भुताने त्याचा कान धरून त्याला जोराने ओढले. तेव्हां त्या भुताच्या हातात होल्बीचा फक्त कानच आला. कान तुटल्यावर कळा येऊ लागल्या. पण तो तेथून उठला नाही. तो स्वत:शीच एवढे पुटपुटला–"इतके दिवस त्या भुतांसाठी गाणे म्हटले त्याचे हेच बक्षिस मिळाले."





# हितोपदेश

कांभोज देशाचा राजा जयसिद्धी याला विजय नावाचा एक मुलगा होता. तो एक शूर, पराक्रमी व साहसी तरुण होता. त्याला युद्धविद्या पण उत्तम अवगत होती. युद्धाचे डावपेच, व्यूहरचना इत्यादी-मध्ये त्याचा हात धरणारा जवळपास कोणी नव्हता.

विजयच्या मनात साहसाची कामे करण्याची मोठी महत्वाकांक्षा होती. परंतु त्याच्या बरोबर नित्य अंगरक्षक असत व ते त्याला काही करू देत नसत.

युवराजाने आपल्या राज्याभिषेकाच्या पूर्वी सर्व राज्यभर एकदा पर्यटन करून यावे अशी इच्छा वडिलांजवळ व्यक्त केली व राजाने त्याला आनंदाने परवानगी दिली. म्हणाला–"होय! तू होणारा राजा, राज्यात कोठे काय आहे हे स्वत: पाहून येणेच बरे. प्रजेची सुखदु:खे काय आहेत ती तू पाहून घ्यावीस हे भावी राजाला शोभेसेच आहे. तू पर्यटन करीत असता मुख्य करून तीन गोष्टी लक्षात ठेव. पहिली गोष्ट म्हणजे थोडा वेळ देखील तू एकटा कोठे जाऊ नकोस दुसरी गोष्ट, तू विश्रांती घेण्यासाठी कोठे थांबला तर पुढे जाण्यापूर्वी एकदा आजू बाजूला पाहिल्याशिवाय पुढे जाऊ नकोस. तिसरी गोष्ट, आपल्या रानात अस्वले पुष्कळ आहेत. चुकूनदेखील त्यांची खोड काढू नकोस. जमिनीवर स्वस्थ पडून असलेल्याच्या वाटेला अस्वल जात नाही. म्हणून अस्वल आढळलेच तरी आपले शौर्य त्याच्यासमोर दाखविण्या ऐवजी जमिनीवर मेल्यासारखा स्वस्थ पडून रहा."

विजयने राज्यभर एकट्यानेच पर्यटन करण्याचा विचार केला. परंतु राजाने तशी परवानगी दिली नाही व त्याच्या बरोबर दोघां हुशार योद्ध्यांना पाठविले.



अरण्यातून जाण्याची गरज नाही. आपण वाहेरून पलीकडे जाऊ या."

ते ऐकून विजयच्या सर्वांगाचा जणु-काही भडका उडाला. परंतु स्वत:चा राग आवरून व थोडेसे चातुर्य दाखवून तो दोघा अंगरक्षकांना म्हणाला–"जंगलाच्या उजव्या बाजूने गेल्यास बरे होईल की डाव्याबाजूने हे तुम्ही दोघे थोडे दूर जाऊन पाहून या. तुम्ही दोघे येईपर्यंत मी तुमची वाट पाहातो."

दोघे एकेका बाजूने निघून गेले. ते दोघे

कित्येक वाघांना ठार करणे डाव्या हाताचा खेळ आहे. पुरुषासारखा पुरुष मी आणि बायकासारखी सोबत मला कशाला? युवराज विचार करू लागला.

ज्या ठिकाणी बसून त्याने काही वेळ विश्राती घेतली तेथून उठून तो पुढे निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला अरण्यात कोठून तरी एक विचित्र आवाज ऐकू आला. असेल एखादे जंगली जनावर, असा विचार मनात येताच त्याचा हात एकदम तलवारीच्या मुठीवर गेला. पण तलवारच नव्हती. ज्या ठिकाणी विश्रांती घेण्यासाठी तो थांबला होता तेथे त्याने तलवार बाजूला काढून ठेवली होती व निघताना तो तेथेच विसरून आला होता.

इतक्यात समोरून गुरगुरत एकदोन अस्वले येत असलेली त्याला दिसली. दोन अस्वले होती. हातात तलवार असती तरी दोन्ही अस्वलांशी दोन हात करणे कठिण होते. अस्वलासमोर आपले शौर्य व बळ दाखवू नकोस, मेल्यासारखा जमिनीवर पडून रहा, असे वडिलांनी सांगितले होते ते त्याला आठवले. त्याप्रमाणे लगेच तो जमिनीवर निश्चळ उताणा पडून राहाला. अस्वलांनी त्याच्याकडे ढुंकून सुद्धा पाहिले नाही आणि पुढे निघून गेली.













विजय उठला व त्याने जेथे वाघाला ठार केल्यावर विश्रांती घेतली होती तेथे आला. तलवार तेथेच होती. ती घेऊन व पुढे जाण्याचा विचार सोडून देऊन परत फिरला व जेथे अंगरक्षकांना भेटण्यासाठी तो वाट पहात बसणार होता तेथे येऊन बसला. दोघे अंगरक्षक युवराज दिसत नाही असे पाहून त्याचा शोध काढीत हिंडत होते.

ऐन दुपारची वेळ होती. कडक ऊन पडले होते. विजयला भूक लागली होती व तहान पण लागली होती. जवळच त्याला एक बाग दिसली व बागेत एक सरोवर दिसले. सरोवर दिसताच त्यात उडी मारून थोडे से डुंबावे असे त्याला वाटले. त्याप्रमाणे त्याने कपडे काढून काठावर ठेवले व पाण्यात उडी मारून पोहू लागला. स्नान करून काठावर येऊन पाहातो तर त्याचे कपडे त्याला दिसे नासे झाले. त्याने चारी बाजूला एक नजर फिरवून पाहिले. वर पाहिले झाडावर माकडे होती. त्यांच्या जवळ त्याचे कपडे होते. माकडे ते कपडे उलट सुलट करून पहात होती. मधून मधून दातांनी कुरतडीत पण होती.

मी एकटा नसतो तर असे झाले नसते. बाबांनी सांगितले होते ते बरोबर होते. अंगरक्षक असते तर माकडांनी कपड्यांना हात लावला नसता.

काय करावे हे त्याला सुचेना. त्याने माकडांना दगड मारायला सुरवात केली. माकडांनी रागाच्या भरात त्याचे कपडे फेकले.

कपडे मिळाले, परंतु फाटून गेलेले होते. ते फाटके कपडेच त्याला घालावे लागले.

इतक्यात त्याचे अंगरक्षक पण त्याला शोधत तेथे आले.

तेव्हांपासून विजयने, वडिलांनी, ज्या गोष्टींची खुणगांठ बांधून घ्यायला त्याला सांगितली होती ती त्याने बांधून घेतली. त्यानंतर त्याचे पर्यटन निर्विघ्न पार पडले.





# हुंडा

फार पूर्वी कांचीपुरम येथे विश्वगुप्त नावाचा एक वैश्य रहात असे. त्याच्या बायकोचे नाव गुणवती असे होते. त्यांना चार मुले होती. कधीकाळी त्या वैश्य कुटुंबाची गणना श्रीमंत व्यापाऱ्यात होत असे. परंतु तूर्त त्यांची आर्थिक स्थिति चांगली नव्हती. म्हणून चौघां मुलांना स्वतःच्या व कुटुंबाच्या पोटापाण्यासाठी मेहनत करावी लागे. मोठ्या मुलाचे नाव रामगुप्त होते. चौघां मुलांत तोच एक हुशार होता. बाकी तिघे निरुपयोगी होते.

मुलांच्या लहानपणीच विश्वगुप्त मरण पावला. मुलांची सर्व जबाबदारी गुणवतीवरच येऊन पडली. एक योग्य सून पाहून तिने रामगुप्ताचा संसार थाटून दिला. कारण पुढे नाव काढील तर तो एकटाच होता. संसाराचा गाडा चालविण्याची योग्यता होती ती पण त्या एकट्यातच होती.

पुढे काही दिवसांनी रामगुप्ताला एक मुलगी झाली. तिचे नाव वसुमती असे ठेवण्यात आले. वसुमती जन्मली तेव्हां पासूनच गुणवतीने अंथरूण धरले. औषध पाणी पुष्कळ केले. पण गुण मुळीच पडला नाही. अंतकाळ जवळ येऊन ठेपला असल्याचे ओळखून तिने आपल्या मोठ्या मुलाला जवळ बोलाविले. ती गोष्ट रामगुप्ताच्या धाकट्या भावंडांना कळली. आईने कोठे तरी पैसे गुप्तपणे ठेवले आहेत व ती गोष्ट भावाला सांगणार असेल. म्हणून तिघे भाऊ जवळच भिंतीला कान लावून ऐकत उभे राहाले.

रामगुप्ताला खाटेवर बसायला सांगून गुणवती म्हणाली–"मुला! बाळा! आपल्या देव्हाऱ्याच्या खाली तांब्याच्या लोट्यांत सोन्याची काही नाणी ठेवलेली आहेत. पण त्यांना हात लावता कामा नये.



यापूर्वी आपल्या कुळातील एका दोघांनी हात लावण्याचा प्रयत्न केला आणि त्यांच्यावर मोठे प्रसंग ओढवले. म्हणून पुढच्या पिढीला या गोष्टीची जाणीव आगाऊ करून देण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे."

"होय आई! पण तेथे त्या लोटया पुरून कोणी ठेवल्या? तुला माहीत आहे का?" रामगुप्तने विचारले—"आपल्या कुळात पूर्वी कोणीतरी बाईने त्या मरण येण्यापूर्वी पुरून ठेवल्या व 'मी पुन्हा जन्म घेऊन ते गुप्त धन घेईन. तोपर्यंत कोणी हात लावू नये. हात लावल्यास तत्काळ त्यांना मरण येईल', असे सांगितले होते, नव्हे"..., [illegible] म्हणवती म्हणीला. [illegible]

आईने जे सांगितले ते सर्व रामगुप्ताच्या भावंडांनी ऐकले व सरळ देव्हाऱ्या जवळ गेले. देव्हारा उचलून बाजूला ठेवला व जमीन खणून पाहिली, तेव्हां त्यांना पाच तांब्याच्या लोटया दिसल्या. प्रत्येक तांब्यात सोन्याची नाणी भरलेली होती व तांब्यांच्या तोंडाला सोन्याची तार बांधलेली होती. रामगुप्ताला ही गोष्ट कळली तेव्हां धावत जाऊन आपल्या धाकटया भावंडांना समजावून सांगितले. पण कोणी ऐकले नाही. त्या तिघां भावंडात जो सर्वात मोठा होता त्याने लोटी धरून उचलण्याचा यत्न केला, पण ती जागची हालत नव्हती. म्हणून त्याने खूप जोर लावला. पण ती लोटी बाहेर तर आलीच नाही, उलट तो धक्का लागल्या सारखा खाली पडला व भडाभडा रक्त ओकला. ते पाहून इतर दोघे घाबरून पळून गेले. तेव्हां मोठया भावाने खड्डा बुजवला व जमीन सारखी करून पुन्हा देव्हारा पूर्वी सारखा ठेवून दिला.

कित्येक वर्षे लोटली, वसुमती लहानाची मोठी झाली. वरशोधनाची काळजी लागली रामगुप्ताला. योग्य वर पाहिजे म्हणजे हुंडापण तसाच द्यावा लागणार. पण तेवढे धन कोठून येणार?

एकदा वसुमती पाणी आणायला नदीवर गेली. एक तरुण युवक घोडयावर बसून तिकडे येत असतांना तिला दिसला. त्याला पाहून ती मनातल्या मनात म्हणाली— "किती सुंदर आहे!"

त्याच वेळी त्या तरुणाने पण तिला पाहिले व मनातल्या मनात म्हणाला— "किती सुंदर आहे!"

त्या तरुण युवकाचे नाव भानुगुप्त, व त्याच्या वडिलांचे नाव प्रसन्न गुप्त असे होते. कांचीपुरमच्या श्रीमंत घराण्यांपैकी त्याचे एक घर होते. त्याच्याकडे जेवढे धन व वैभव होते, तितकाच तो लोभी पण होता. त्याच्या मुलाला चांगला मोठा हुंडा मिळाल्याशिवाय त्याचे लग्न करायचे नाही असे तो सर्वांना सांगत असे.

दोघांनी प्रथम परस्परांना पाहिले तेव्हां पासून कित्येकदां त्यांची नदीवर भेट झाली व त्यांचे परस्परांवर प्रेम जडले. "मी लग्न करीन तर तुझ्याशीच." असे भानुगुप्ताने वसुमतीला उघड सांगून पण टाकले.

त्या दिवशी वसुमतीने घरी गेल्यावर ती गोष्ट आपल्या वडिलांना जाऊन सांगितली.



तेव्हां रामगुप्त प्रसन्न गुप्तला जाऊन भेटला व म्हणाला—"माझ्या मुलीला आपली सून करून घ्या. दोघांचा जोडा छान शोभेल, पहा."

"माझ्या मुलाला हजार पुतळ्यांचे सोने हुंडा म्हणून देणार असाल तर लग्नाच्या गोष्टी बोलायला मी तयार आहे. नाही तर ती गोष्ट पुन्हा कधी बोलायला यायची गरज नाही." प्रसन्न गुप्त म्हणाला.

रामगुप्ताने घरी आल्यावर ते सर्व मुलीला सांगितले.

रात्री झोपल्यावर वसुमतीला स्वप्नात सोन्याच्या पुतळ्यांनी भरलेल्या तांब्याच्या लोटया त्या देव्हाऱ्याच्या खाली असल्याचे










दिसले. परंतु त्या स्वप्नातल्या गोष्टी-कडे तिने दुर्लक्ष केले. परंतु ते स्वप्न दररोज दिसू लागले. म्हणून उजाडल्यावर एकदा ती आपल्या वडिलांना म्हणाली— "बाबा! मला रोज रात्री स्वप्नात देव्हाऱ्याच्या खाली पुरलेल्या, सोन्याच्या पुतळ्या भरलेल्या पांच त्यांब्याच्या लोट्या दिसतात. मग ते खरे का हो?"

"बापरे! तुला त्या स्वप्नात दिसल्या तशा आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु त्या विसरून जा माझे आई! त्यांना जो हात लावतो त्याचा सर्वनाश होतो." बाप मुलीला म्हणाला. नंतर त्याने, मुलीच्या आजीने अंतकाळी जे सांगितले ते व त्याच्या डोळ्यासमोर धाकटा भाऊ त्या लोट्यांना हात लावताच कसा रक्त ओकला ते सांगितले.

बापाने जे सांगितले त्यावर वसुमतीने बराच वेळ विचार केला व मनातल्या मनात एका गोष्टीचा दृढ निश्चय केला. आपले लग्न भानुगुप्ताशी झाले नाही तर आपले जीवितच नव्हे तर भानुगुप्ताचे जीवित सुद्धा व्यर्थच जाणार. त्यापेक्षा त्या लोट्यांना हात लावून मरण आले तर बरे. कारण त्यात तिचा एकटीचाच जीव जाणार. असा मनाशी विचार करून बाप 'नको नको' म्हणत असता तिने देव्हाऱ्या खालची जमीन खणली व पुरलेल्या त्या पांचही लोट्या सहज बाहेर काढल्या. रामगुप्त ते पाहून चकित झाला.

प्रत्येक लोटीत पांच पांचशे पुतळ्या होत्या. एकूण अडीच हजार पुतळ्या होत्या. तर मग हे सर्व वसुमतीनेच पूर्व जन्मी पुरून ठेवलेले धन असले पाहिजे. रामगुप्ताला आता संशय उरला नाही.

त्याने भानुगुप्ताशी मुलीचे लग्न एक हजार पुतळ्यांचा हुंडा देऊन करून दिले.





# विचित्र चढाओढ

अंगदेशाचा युवराज जयदेव धनुर्विद्येत पारंगत होता. त्याच्या बरोबर नेहमी [illegible]

[illegible] रानात रानटी जनावरांची शिकार करते. डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या लुटेऱ्यांच्या [illegible]

पैकी कोणी त्याची बरोबरी करण्याचे साहस कधी दाखविले नाही. तो म्हणेल ते करील याची खात्री प्रत्येकाला होती. म्हणून जयदेव त्याला म्हणाला—"तर मग तू विभूतीला बरोबर घेऊन मणिपूरला जा आणि काम पुरे करून परत ये."

विभूती विक्रम बरोबर निघाला. विभूती नित्य सावली सारखा विक्रमच्या बरोबर

येऊन पोचले

मणिपूरच्या राजाने आपल्या जन्या सर्वांना

सरदाराला ओळखले व प्रेमादर सहित

विचारले—"कसे काय विक्रम? बरं

आहे ना? माझ्या दरबारी पुन्हा नोकरी करायला आला आहेस वाटते?"

"महाराज, आज मी आपल्या दरबारी नोकरी मागण्यासाठी आलो नाही. आमचे युवराज जयदेव यांच्या मनात आपली मुलगी लक्षणा हिच्याशी लग्न करावे असे आहे. याच कामासाठी त्यांनी मला आपल्या दरबारी पाठविले आहे. महाराजांनी राजकन्येला माझ्या बरोबर पाठविण्याची व्यवस्था करावी." विक्रम विनयपूर्वक म्हणाला.

ते ऐकून राजाला मनस्वी राग आला. म्हणाला—"चोर, नमकहराम! तीन वर्षे तू माझे मीठ खाल्लेस आणि आज तू हे बोलतो आहेस? पकडा या दुष्टाला! स्वामिद्रोही! काळ कोठडीत टाका याला. उपाशी मरू दे त्याला तेथे." क्षणभर दरबारात कोणी काही बोलले नाही की हालचाल केली नाही. सर्व दरबारी भयकंपित स्तब्ध जागच्या जागी उभे होते.

तयार होऊनच पुढे यावे. नाहीतर

तलवार फेकून देऊन बाजूला व्हावे."

विक्रमची गर्जना ऐकून कोणाची पुढे यायची छातीच होईना. त्यांना विक्रमच्या पराक्रमाची पूर्वीपासूनच चांगली कल्पना होती.

मणिपूरच्या राजाला प्रसंग ओळखायला वेळ लागला नाही. त्याचा आवाज एकदम खाली पडला. म्हणाला—"विक्रम! तुझ्या युवराजाची लक्षणाशी विवाह करण्याची इच्छा आहे, एवढेच ना? मी तिला तुझ्या बरोबर पाठवून देतो. तुझ्या पराक्रमाची परीक्षा घेण्याची माझी इच्छा होती." त्या वेळी विक्रमच्या तलवारीचे टोक राजाच्या छातीपासून फक्त एका वितेवर होते.

राजाने म्हटल्याप्रमाणे लक्षणाला पाठविण्याची व्यवस्था केली. ती एका घोड्यावर बसून त्या दोघांच्या बरोबर निघाली.

वाटेत एका जागी संध्याकाळ झाली व काळोख पडू लागला. सर्वांना एका धर्मशाळेत उतरावे लागले. राजकुमारीला मध्ये झोपवून दोघे पाहारा देण्याच्या हेतूने दोन्ही बाजूला तलवार व भाला ठेवून झोपले.

अचानक मध्यरात्रीच्या सुमारास विक्रमची झोप मोडली. घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून तो दचकून उठून बसला. आवाज जवळ जवळ येत होता. भाला हातात घेऊन



धर्मशाळेच्या बाहेर आला. कोणीतरी योद्धा हातात भाला घेऊन कवच व शिरस्त्राण धारण करून त्याच्याकडेच येत असलेला त्याला दिसला.

जवळ आल्यावर त्या घोडेस्वाराने घोड्याला थांबविले.

विक्रमने आपल्या भाल्याच्या टोकाने [illegible] शिरस्त्राण [illegible] उडवून "कोण [illegible] तू? तुला यमलोकी पाठविण्यापूर्वी मी तुला [illegible]

"लागोपाठ तीन वर्षे दररोज मला पाहून ही ओळखले नाहीस वाटते?" बायकी आवाज होता.

विक्रम चकित होऊन म्हणाला–"कोण लीलावतीदेवी! अशा मध्यरात्रीच्या वेळी?"

लीलावती घोड्यावरून खाली उतरून म्हणाली–"माझ्या विवाहापूर्वी तू माझ्या धाकट्या बहिणीचा विवाह करून घ्यायला निघाला आहेस? हे धर्मविरुद्ध काम करायला तु तयार कसा काय झालास? माझा विवाह देखील तूच कां नाही कोठे लावून देत?"

"मी वर कोठून आणू?" विक्रमने विचारले.

"तरमग तूच हो लग्नाला तयार! तू यापूर्वी कधी विचारले असतेस तर मी तुझ्याशी केव्हांच लग्न केले असते. तूं कधी विचारले होतेस का? म्हणून मीच विचारते आहे." लीलावती म्हणाली.

याहून माझे मोठे भाग्य ते काय असणार? मी तयार आहे, लीलावतीदेवी." विक्रम म्हणाला.

[illegible] ती आहे. माझ्या बरोबर एकट्याने [illegible] करण्याची तुझी हिंमत? मणि- [illegible] एका ही सरदारात एवढी हिंमत [illegible] हे मला माहीत आहे."

[illegible] उजाडण्याच्या सुमारास दोघे वार लक्षणाला घेऊन जयदेव होता तेथे आले. लक्षणाला पाहून जयदेवला फार आनंद झाला. परंतु मोठ्या बहिणीशी लग्न करून [illegible]

[illegible] विचार [illegible] द्वंद्वयुद्ध [illegible] पूरच्या [illegible] नाही.

आपल्या पदरी नोकरी करणारा विक्रम आपला साडू होणार व आपली बरोबरी करणार हे शल्य विक्रमच्या मनात राहून गेले. म्हणाला–"तू माझ्या मोठ्या मेहुणीशी लग्न करणार हे नाही मला पसंत. माझ्या मेहुणीचे लग्न माझ्यासारख्या कोणत्या तरी युवराजाशी, निदान राजकुमाराशी व्हावे अशी माझी इच्छा आहे." जयदेव म्हणाला.

जयदेव जे म्हणाला ती गोष्ट विक्रमला झोंबली. तरी स्वतःला आवरून शांतपणे म्हणाला–"मी लीलावतीशी स्वतः लग्नाला तयार झाले नाही. तिनेच माझ्याशी लग्न करण्याची इच्छा व्यक्त केली आहे. तिच्या इच्छेप्रमाणे मी लग्नाला तयार झाले, एवढेच."

जयदेवने लीलावतीला कोणत्या तरी युवराजाशी किंवा राजकुमाराशी लग्न करण्यास सांगितले. पण लीलावती म्हणाली– "विक्रमहून कोणी मोठा शूरवीर असेल तर मी त्याच्याशी लग्नाला तयार आहे."

विक्रमने लगेच शौर्याची परीक्षा घेण्यासाठी आवश्यक व्यवस्था केली. शौर्याची परीक्षा कोणत्या गोष्टीत करावयाची हे लीलावतीने सुचविले.

लीलावतीने एक तलवार पुरून ठेवायला सांगितले, नंतर तिने विक्रमला बाणाचे अणकुचीदार टोक काढून बाण त्या तलवारीला मारायला सांगितले. बाण तलवारीला लागला व उभा चिरला गेला. दोन्ही भाग सारखे होते.

नंतर जयदेवच्या मित्रमंडळी पैकी वीरांनी प्रयत्न करून पाहिला. परंतु कोणाला ते साधले नाही. तेव्हां जयदेवला विक्रमशी लीलावतीच्या लग्नाला होकार द्यावा लागला.

विक्रम लीलावती बरोबर मणिपूरला गेला. मणिपूरच्या राजाने त्याला आपला सेनापती नेमले. पुढे राजाने त्यालाच आपला वारस म्हणून नेमले.

